भारत-गौरव-ग्रंथमाला—पुष्प १०८ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## सप्तम खंड.

भीष्मपर्व, अ० ५०–१२२. द्रोणपर्व, अध्याय १–१२०.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

—भ. गी., अ. ४, ३८.

लेखक :

आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री,

संस्थापक, आचार्यकुल, पुणें.

यो हि धर्मं परित्यज्य भवत्यर्थपरो नरः।
सोऽस्माच्च हीयते लोकात् क्षुद्रभावं च गच्छति ॥ पृ. २८६
सुहृदां हितकामानां वाक्यं यो न शृणोति ह।
स महद्व्यसनं प्राप्य शोचते वै यथा भवान् ॥ पृ. ४६८

शके १८५३.] किंमत ४ रुपये [सन १९३२.

# विषयानुक्रमणिका.



## ६ भीष्मपर्व ( पुढें चालू )

### भीष्मवधपर्व ४. पृ. १—२२३.

---

## ७ द्रोणपर्व.

—:०:—

### द्रोणाभिषेकपर्व १. पृ. २२५–२६८.

---

## संशप्तकवधपर्व २. पृ. २६८–३०७.



---

## अभिमन्युवधपर्व ३. पृ. ३०७–३७४.

---

## प्रतिज्ञापर्व ४. पृ. ३७४–४०५.



---

## जयद्रथवधपर्व ५. पृ. ४०५—४८०.

---

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



## सप्तम खंड

## ६ भीष्मपर्व—( पुढें चालू )



## भीष्मवधपर्व ४.



### अध्याय ५० वा.

[ १ युधिष्ठिराचा विषाद. २ कृष्णानें केलेलें त्याचें समाधान. ३ युधिष्ठिरानें धृष्टद्युम्नाला केलेली कौरववधाची आज्ञा. ४ क्रौञ्चव्यूहाचें वर्णन. ]

**( १ ) संजय—हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें युद्धाचा पहिला दिवस संपून सर्व सैन्यें विश्रांतीसाठीं आपापल्या शिबिरांत परत गेलीं. तेव्हां भीष्माचा युद्धांतील उत्साह पाहून दुर्योधन संतुष्ट झाला. इकडे युधिष्ठिर आपल्या पराभवानें अतिशय शोकाकुल झाला होता. तो आपले सर्व भ्राते व इतर नराधिप यांच्यासह जनार्दनाकडे आला आणि भीष्माचा पराक्रम पाहून उद्विग्न मनानें कृष्णाला असें म्हणाला—" हे कृष्णा, भीष्माचा पराक्रम किती भयंकर आहे, पहा ! ग्रीष्म-ऋतूंत तृण जाळणाऱ्या दावानलाप्रमाणें त्यानें माझें सैन्य आपल्या शरांनीं दग्ध करून टाकिलें. हवीनें प्रदीप्त होणाऱ्या अग्नीप्रमाणें तो माझें सैन्य जणुं काय गिळून टाकितो. अशा स्थितींत त्या महात्म्याकडे वर दृष्टि करून पहाण्यास तरी आम्ही कसे समर्थ होऊं ! त्या बलाढ्य नर-श्रेष्ठानें रणांगणांत जेव्हां शरवृष्टि चालविली, तेव्हां माझें सर्व सैन्य दश-दिशांत पळत सुटलें.**

हे वासुदेवा, क्रुद्ध झालेला यम किंवा इंद्र यांनाहि प्रसंगीं जिंकतां येईल, पाश धारण करणाऱ्या वरुणाचा किंवा गदाधर कुबेराचाहि युद्धांत पराभव करतां येईल, परंतु या महातेजस्वी भीष्माला युद्धांत जिंकतां येणें शक्य नाहीं. खरोखर मी भीष्माशीं युद्धाला प्रवृत्त होऊन नौकारहित अशा अगाध जलांत मग्न झालों, हें माझें बुद्धिदौर्बल्यच होय. हे केशवा, या सर्व पृथ्वीपालांना भीष्माच्या हातीं देऊन त्यांना मृत्यूच्या मुखांत लोटणें मला योग्य वाटत नाहीं. त्यापेक्षां मी वनांत निघून जातों. तेथेंच जीवित कंठणें मला श्रेयस्कर वाटतें. हा महा अस्त्रवेत्ता भीष्म माझ्या सैन्याचा क्षय करील. पतंग ज्या-प्रमाणें स्वतःच्याच विनाशासाठीं प्रज्वलित अग्नीवर जाऊन पडतात, त्याप्रमाणें माझे हे सर्व सैनिक भीष्माच्या संनिध जाऊन नाश पावत आहेत.

हे वार्ष्णेया, माझे वीर भ्राते शरपीडित झाले आहेत. ते सर्व भ्रातृस्नेहा-मुळें राज्यापासून व सुखापासून भ्रंश पावले. जीविताचें महत्त्व फार आहे, असें मी समजतों. तें अतिशय दुर्लभ आहे. यास्तव अवशेष राहिलेल्या आयुष्यानें मी दुश्चर तप आचरीन. परंतु माझ्या या सर्व मित्रांचा मी रणां-मध्यें नाश होऊं देणार नाहीं. हा प्रहार करणारांतील श्रेष्ठ भीष्म आपल्या दिव्य अस्त्रांनीं माझ्या सहस्रावधि रथिश्रेष्ठांचा संहार करील. यास्तव हे माधवा, काय केलें असतां माझें सत्वर हित होईल तें मला सांग.

समरांगणामध्यें हा सव्यसाची तर एखाद्या मध्यस्थासारखाच वागतो. तो मनःपूर्वक युद्ध करीत नाहीं. एकटा भीमच काय तो परम शक्तीनें युद्ध करीत असतो. तो महाबाहु क्षत्रधर्माला स्मरून व केवल स्वबाहुबलाचा आश्रय करून आपल्या वीरघाती गदेनें अतिशय दुष्कर कर्म करीत असतो. रथ, अश्व, गज व नर यांच्यावर तो अतिशय उत्साहानें गदेचे प्रहार करीत सुटतो. तथापि शत्रुसैन्याचा क्षय करण्यास तो एकटा पुरेसा नाहीं. अशा सरळ युद्धानें शंभर वर्षांतहि हा संग्राम संपणार नाहीं. हा तुझा सखा ( अर्जुन ) अस्त्रवेत्ता आहे खरा, पण तो महात्म्या भीष्म-द्रोणांकडून दग्ध केल्या जाणाऱ्या आमची उपेक्षा करीत आहे. भीष्म-द्रोणांनीं पुनः पुनः प्रयुक्त केलेलीं दिव्य अस्त्रें सर्व क्षत्रियांना भस्मसात् करून टाकतील. हे कृष्णा, क्षुब्ध झालेला भीष्म सर्व पार्थिवांसह आमचा खरोखरच क्षय करून टाकील. अशा प्रकारचा त्याचा पराक्रम आहे. यास्तव हे महाभाग योगेश्वरा, मेघ जसा दावानल शमवितो, तसा या पराक्रमी पितामहाला शांत करील असा कोणी वीर तुला दिसत

असल्यास पहा. तुझ्या प्रसादानेंच पांडव शत्रूंचा वध करून स्वराज्याला प्राप्त होतील व आपल्या बांधवांसह संतुष्ट होतील.''

( २ ) असें बोलून तो उदार अंतःकरणाचा पार्थ खिन्न मनानें विचार करीत बसला. शोकानें किंकर्तव्यतामूढ झालेला तो ज्येष्ठ पांडव विमनस्क होऊन चिंतामग्न व शोकार्त झाला आहे, हें जाणून सर्व पांडवांना आनंद देणारा गोविंद म्हणाला—"हे भरतश्रेष्ठा, शोक करूं नको. सर्व लोकांतील प्रसिद्ध धनुर्धर व शूर असे तुझे सर्व भ्राते असतां तूं असा शोक करणें योग्य नाहीं. शिवाय सात्यकि व मी तुमचें प्रिय करण्यास सज्ज आहों. विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न त्याचप्रमाणें हे सबल राजे व तुझे भक्त तुझ्या प्रसादाची प्रतीक्षा करीत आहेत. तुझें हित चिंतिणारा हा पार्षत सर्वदा तुझें प्रिय करण्यांत रत असतो. या महाबलाढ्य धृष्टद्युम्नानें तुझें सैनापत्य स्वीकारलें आहे. शिखंडी तर भीष्माचा साक्षात् मृत्यूच आहे.''

( ३ ) वासुदेवाचें हें वचन ऐकून त्याच्या समक्ष त्या सभेमध्यें धर्म धृष्टद्युम्नाला म्हणाला—हे धृष्टद्युम्ना, मी सांगतों तें लक्षपूर्वक ऐक आणि मी जें तुला आतां सांगणार आहें, त्याचें यत्किंचित्‌हि अतिक्रमण करूं नको. तूं वासुदेवाला संमत असलेला माझा सेनापति आहेस. पूर्वीं कार्तिकेय जसा देवांचा सेनापति झाला होता, तसा तूंहि आतां पांडवांचा सेनानी हो, आणि हे पुरुषश्रेष्ठा, तूं आपला पुरुषार्थ प्रकट करून कौरवांचा वध कर. मी तुझ्या मागोमाग येईन. कृष्ण, माझे चार भ्राते, पांच द्रौपदेय आणि जे मुख्य पृथ्वीपाल आहेत, तेहि सर्व तुला अनुसरतील.

तेव्हां सर्वांना हर्ष देत धृष्टद्युम्न म्हणाला—"हे पार्था, मला पूर्वीं शंभूनें द्रोणाचा अंत करण्यासाठींच उत्पन्न केलें आहे. मी रणामध्यें भीष्म, कृप, द्रोण, शल्य, जयद्रथ व दुसरेहि अन्य दृप्त झालेले क्षत्रिय यांच्याशीं प्रतियुद्ध करीन.''

शत्रुसूदन पार्षत धृष्टद्युम्नाचें हें भाषण ऐकतांच युद्धदुर्मद धनुर्धर पांडवांनीं आनंदानें जयघोष केला व तो सेनापति युद्धाची तयारी करूं लागला. तें पाहून युधिष्ठिर पुनः त्याला म्हणाला—"हे पार्षता, पूर्वीं देवासुरांच्या युद्धांत बृहस्पतीनें जो व्यूह इंद्राला सांगितला होता, त्या क्रौंचारुण-व्यूहाची तूं रचना कर. तो व्यूह सर्व शत्रूंचा संहार करण्यास उपयुक्त आहे. परसैन्याचा नाश करणारा तो अपूर्व व्यूह कौरवांसह सर्व राजे पाहोत.''

( ४ ) राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर तो सेनापति इंद्राज्ञेनें युद्ध करणाऱ्या विष्णूप्रमाणें युधिष्ठिराच्या वचनावरून उद्युक्त झाला. दुसऱ्या दिवशीं प्रभातींच त्यानें क्रौंचारुण व्यूहाची रचना करण्यासाठीं सर्व सैन्य सज्ज केलें. त्यांनीं सैन्याच्या अग्रभागीं धनंजयाची योजना केली. त्या सव्यसाचीचा आकाशांत फडकणारा अद्भुत ध्वज मनोरम दिसत होता. साक्षात् इंद्राच्या आज्ञेवरून तो विश्वकर्म्यानें निर्माण केला होता. इंद्रायुधासारख्या पताकांनीं तो अलंकृत असून एखाद्या पक्ष्याप्रमाणें किंवा गंधर्वनगरीप्रमाणें तो अंतरिक्षांत शोभत होता. तो रत्नजडित ध्वज पार्थाच्या रथामार्गावर जणुंकाय नृत्यच करीत आहे, असा भास होत होता. त्या रत्नजडित ध्वजानें पार्थ व पार्थामुळें तो ध्वज हे दोघे सूर्य व मेरुपर्वत यांप्रमाणें परस्परांस अत्यंत शोभा देत होते.

त्या व्यूहांत विपुल सेनेसह द्रुपदराजा पक्ष्याच्या शिरोभागीं उभा राहिला. कुंतिभोज व चैद्य हे दोघे नेत्रस्थानीं झाले. दाशार्णक, दाशेरकांसह प्रभद्रक, अनूपक व किरात हे ग्रीवास्थानीं झाले. पटच्चर, पौंड्रक, पौरव आणि निषाद, यांसह युधिष्ठिर पृष्ठभागीं स्थित झाला. पार्षत, धृष्टद्युम्न व भीमसेन हे दोघे दोन पंखांच्या स्थानीं दोन बाजूला उभे राहिले. उजव्या बाजूला त्याला साह्य करण्यास पांच द्रौपदेय, अभिमन्यु, महारथि सात्यकि, पिशाच, दारद, कुण्डीविषासह पुंड्र, मारुत, धेनुक, तंगण, परतंगण, बाह्लिक, तित्तिर, चोल व पांड्य हे सर्व नृपाल होते. डाव्या बाजूला अग्निवेश, हुंड, मालव, दानभारि, शबर, उद्भस, नाकुलासह वत्स आणि दोघे माद्रेय होते. हे दोन बाजूचे पंख मिळून दहा हजार रथ होते. शिरोभागीं एक लक्ष वीर होते. पृष्ठभागीं दहा कोटि वीस हजार आणि ग्रीवास्थानीं एक लक्ष सत्तर हजार योद्धे होते.

पंखाच्या अग्रभागीं व अंतीं राजांनीं परिवेष्टित झालेले गज, चालणाऱ्या पर्वताप्रमाणेंच भासत होते. केकयांसह विराट, तीस हजार रथांसह शैब्य व काशिराज यांनीं पृष्ठभाग संभाळला होता. याप्रमाणें क्रौंचारुण नामक महाव्यूहाची रचना करून युद्धार्थ सज्ज झालेले पांडव सूर्योदयाची वाट पहात राहिले. त्यावेळीं रथांवर व गजांवर असलेलीं त्यांचीं सूर्याप्रमाणें देदीप्यमान विस्तीर्ण व शुभ्र छत्रें अतिशय शोभलीं. ६. ४. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

[ १. भीष्माचें रक्षण करण्याविषयीं दुर्योधनाची कौरवसेनेला आज्ञा. २ व्यूह-रचना. ३ युद्धार्थ उभयसैन्याचे शंखनाद व रणक्षेत्रांत आगमन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, अमित तेजस्वी व सुरक्षित असलेला तो महाघोर क्रौंचव्यूह पाहून तुझा पुत्र दुर्योधन आचार्यांच्या समीप आला व कृप, शल्य, सौमदत्ति, विकर्ण, अश्वत्थामा, दुःशासनादि सर्व भ्राते व युद्धार्थ जमलेले इतरहि अनेक शूर क्षत्रिय या सर्वांना हर्ष देणारें असें प्राप्तकाल वचन बोलला—"हे वीरहो, तुम्ही सर्व युद्धविशारद अहां, नाना शस्त्रांनीं प्रहार करण्यांत प्रवीण अहां व महारथ अहां. पांडुपुत्रांचा ससैन्य संहार करण्यास तुमच्यापैकीं एकेकटा वीरहि पुरेसा आहे, मग तुम्ही सर्व एकत्र जमल्यावर काय सांगावें ! शिवाय भीष्मानें जिचें रक्षण केलें आहे, ती आमची सेना अमर्याद आहे व भीम ज्याचें संरक्षण करीत आहे, तें पांडवांचें बल मर्यादित आहे. यास्तव संस्थान, शूरसेन, वेत्रिक, कुकुर, आरोचक, त्रिगर्त, मद्रक, तसेच यवन, शत्रुंजय, दुःशासन, विकर्ण, नंद, उपनंदक, चित्रसेन व पारिभद्रक, या सर्वांनीं आपापलीं सैन्यें पुढें करून भीष्माचें रक्षण करावें."

(२) हे प्रभो, त्यानंतर भीष्म, द्रोण व तुझे पुत्र यांनीं पांडवांना प्रतिबाधक होणारा महाव्यूह रचला व प्रचंड सैन्यानें परिवेष्टित झालेला भीष्म सुरेश्वराप्रमाणें निघाला. द्रोणाचार्य त्याच्या मागोमाग चालला. कुंतल, दशार्ण, मागध, विदर्भ, मेकल व कर्णप्रावरण हे सैन्यांसह भीष्माचें रक्षण करीत होते. गांधार, सिंधुसौवीर, शिबि, वसाति व शकुनि हे सैन्याच्या पृष्ठभागीं होते. सर्व भ्रात्यांसह दुर्योधन, अश्वातक, विकर्ण, अंबष्ठ, कोसल, दरद, शक, क्षुद्रक व मालव शकुनीचें रक्षण करीत होते. भूरिश्रवा, शल, शल्य, भगदत्त, अवंतीचे विंद-अनुविंद हे डाव्या बाजूचें रक्षण करीत होते, सौमदत्ति, सुशर्मा, कांबोज, सुदक्षिण, श्रुतायु, अच्युतायु हे उजव्या बाजूला होते. अश्वत्थामा, कृप, सात्वत व कृतवर्मा हे फार मोठ्या सैन्यासह पृष्ठगोपक झाले. केतुमान्, वसुदान्, काश्यपुत्र व नानादेशांतील राजे पृष्ठभागीं स्थित होते.

( ३ ) याप्रमाणें व्यूहरचना केल्यावर तुझ्या सर्व हृष्ट झालेल्या योद्ध्यांनीं युद्धार्थ सिंहनाद करून आपापले शंख वाजविले. त्यांचे सिंहनाद कानीं पडतांच कुरुवृद्ध पितामहानेंहि सिंहनाद करून आपला श्रेष्ठ शंख वाजविला. तेव्हां इतर सर्व रणवाद्यांचा प्रचंड ध्वनि झाला. त्या वेळीं शुभ्र अश्व जोडलेल्या भव्य रथांत

बसलेले कृष्णार्जुन आपले रत्नजडित सुवर्णाचे शंख वाजवूं लागले. त्याचप्रमाणें सर्व पांडव, तत्पक्षीय द्रुपदादि सर्व नृपाल व इतर श्रेष्ठ योद्धे यांनींहि आपापल्या शंखांचा पृथक् पृथक् ध्वनि करून उच्च स्वरानें सिंहनाद केला. वीरांच्या त्या प्रचंड घोषानें पृथ्वी व अंतरिक्ष भरून गेलें. याप्रमाणें कौरव आणि पांडव हृष्ट होऊन परस्परांना ताप देत पुनः युद्धाला प्रवृत्त झाले. ६. ४. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ दुर्योधनानें कौरवांना केलेली युद्धाची आज्ञा. २ भीष्मार्जुन युद्ध. ]

धृतराष्ट्र—याप्रमाणें कौरव-पांडवांची सेना व्यूह रचून युद्धाला सज्ज झाली असतां त्या वीरांचा संग्राम कसा झाला, तें मला सांग.

( १ ) संजय—हे धृतराष्ट्र महाराज, शोभिवंत ध्वजांनीं युक्त असलेलीं तीं दोन्ही सैन्यें व्यवस्थेनें समोरासमोर उभीं राहिलीं असतां कौरवांचें तें प्रचंड सैन्य अपार सागराप्रमाणें शोभलें. तेव्हां त्या सैन्याच्या मध्यभागीं स्थित असलेला तुझा पुत्र दुर्योधन सज्ज झालेल्या सर्व कौरवांना 'युद्धाला आरंभ करा' असें म्हणाला.

तेव्हां त्याची ती आज्ञा कानीं पडतांच ते सर्व जीवावर उदार झालेले योद्धे मन निष्ठुर करून आपले ध्वज उभारून पांडवांवर धांवून गेले. त्यावेळीं रथ व गज यांनीं संकुल असलेल्या त्या दोन्ही सैन्यांचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध जुंपलें. गज व अश्व यांवर श्रेष्ठ रथ्यांनीं अकुंठित बाणांची वृष्टि केली. याप्रमाणें संग्राम प्रवृत्त झाला असतां अमित पराक्रमी कुरुवृद्ध पितामहानें आपलें धनुष्य सज्ज केलें व सौभद्र, भीमसेन, महारथ सात्यकि, केकैय, विराट, पार्षत धृष्टद्युम्न आणि अजिंक्य चेदि-मत्स्य या वीरांवर शरांचा वर्षाव केला.

याप्रमाणें त्या वीरांचें घनघोर युद्ध प्रवृत्त झालें असतां ती सर्व व्यूहरचना विस्खलित झाली. त्या सर्व सैन्यांत फार मोठा गोंधळ झाला. पांडवांचे अश्वसादी, ध्वजी, रथ व सैनिक यांनीं पलायन आरंभिलें. गज गतप्राण होऊन पडले. तें पाहून अर्जुन अतिशय क्रुद्ध झाला, तो महारथ भीष्माकडे दृष्टि

---

१ या श्लोकांचा शब्दशः अर्थ गीतेंत आलेला आहे. म्हणून येथें त्याचें संक्षेपानें भाषांतर केलें आहे. गीतेंतील श्लोकांचीच येथें पुनरुक्ति आहे.

देऊन कृष्णाला म्हणाला—"हे जनार्दना, भीष्माच्या रथाकडे चल. दुर्योधनाच्या हितांत तत्पर असलेला भीष्म क्रोधानें माझ्या सैन्याचा नाश करीत आहे. त्या श्रेष्ठ धनुर्धर पितामहाकडून सुसंरक्षित असलेले हे द्रोण, कृप, शल्य, विकर्ण आणि दुर्योधनादि सर्व धार्तराष्ट्र पांचालांचा संहार करीत आहेत. यास्तव सैन्याच्या रक्षणासाठीं मी आज अगोदर त्या भीष्माचाच वध करितों."

त्यावेळीं वासुदेव म्हणाला—हे धनंजया, सज्ज हो. मी तुला आतां भीष्माच्या रथाकडे नेतों.

( २ ) असें बोलून त्या शौरीनें एका क्षणांत अर्जुनाचा रथ भीष्माच्या समीप नेला. त्यावेळीं सुहृदांचा हर्ष वाढविणाऱ्या पार्थाच्या रथावर अनेक पताका झळकत होत्या. सर्वांच्या वर बुभुःकार करणारा वानरकेतु शोभत होता. त्याच्या रथचक्रांचा निःस्वन मेघगर्जनेसारखा असून त्या रथाला बगळ्यासारखे शुभ्र अश्व जोडले होते. अशा प्रकारच्या त्या अमिततेजस्वी रथांत बसून तो कौंतेय कौरवसेनेचा व शूरसेनांचा संहार करीत चालला आणि मत्त गजाप्रमाणें वीरांवर शरांचा वर्षाव करीत तो सव्यसाची भीष्मावर चालून गेला.

त्या वेळीं सैंधव, प्राच्य, सौवीर, केकय इत्यादि प्रमुख वीरांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, असा शान्तनव भीष्महि अर्जुनावर मोठ्या वेगानें धांवून गेला. कारण गांडीव धनुष्य धारण करणाऱ्या अर्जुनावर भीष्म, द्रोण किंवा कर्ण यांवांचून अन्य कोणता रथी प्रहार करण्यास समर्थ आहे ! तेव्हां सर्व लोकांतील श्रेष्ठ भीष्मानें अर्जुनावर सत्याहत्तर बाण सोडिले. द्रोणानें पंचवीस, कृपानें पन्नास, दुर्योधनानें चौसष्ट, शल्यानें नऊ, जयद्रथानें नऊ, शकुनीनें पांच व विकर्णानें दहा बाण सोडिले. याप्रमाणें सर्व बाजूंनीं शरांचा वर्षाव होत असतां अर्जुन यत्किंचित्‌हि कंपित न होतां पर्वताप्रमाणें अचल राहिला.

धनंजयानें उलट भीष्माला पंचवीस शरांनीं, कृपाला नऊ शरांनीं, द्रोणाला साठ शरांनीं, विकर्णाला तीन, शल्याला तीन, सैंधवाला नऊ, शकुनीला पांच आणि दुर्योधनाला पांच बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां सात्यकि, विराट, पार्षत धृष्टद्युम्न, द्रौपदेय व अभिमन्यु यांनीं धनंजयाला वेढून त्याचें समंततः रक्षण केलें.

नंतर सोमकांसह पांचाल्य भीष्माच्या हितांत रत असलेल्या द्रोणावर चालून गेला. इतक्यांत रथिश्रेष्ठ भीष्मानें ऐंशी बाणांनीं भीमाला विद्ध केलें.

तें पाहून कौरवांनीं हर्षातिरेकानें जयघोष केला. तो कानीं पडतांच प्रतापवान् पार्थानें त्या सहा रथ्यांमध्यें प्रवेश केला व त्यांना लक्ष्य करून धनुष्याची क्रीडाच चालविली.

तेव्हां अर्जुन आपल्या सेनेस त्रस्त करीत आहे, हें पाहून दुर्योधन भीष्माला म्हणाला—"हे तात, कृष्णासह असलेला हा बलाढ्य धनंजय आमच्या सैन्याचें निर्मूलन करील. सर्व सैन्यानें कितीहि यत्न केला, तरी तो व्यर्थ आहे. हे पितामह, रथिश्रेष्ठ द्रोण व तूं जिवंत असतांना तो पार्थ आमचा समूल उच्छेद करीत आहे, हें तुम्ही कसें सहन करतां ! कर्ण सर्वदा माझ्या हितांत तत्पर असतो, पण तुझ्यासाठीं त्यानें शस्त्रत्याग केला आहे व तो युद्ध करीत नाहीं. यास्तव ज्याच्यायोगानें त्या पार्थाचा वध होईल असा कांहीं तरी उपाय योज."

दुर्योधन असें बोलला असतां तुझा पिता देवव्रत 'धिक्कार असो या क्षात्र-धर्माला' असें म्हणाला व पार्थाच्या रथाकडे वळला. हे धृतराष्ट्रा, पार्थ व भीष्म या दोघांच्याहि रथाचे अश्व श्वेतवर्णच होते. त्या दोघांचें युद्ध जुंपलेलें पाहून सर्व पार्थिवांनीं उच्च स्वरानें सिंहनाद केला व शंख वाजविले. अश्वत्थामा, दुर्योधन व तुझा पुत्र विकर्ण हे भीष्माच्या सभोंवार उभे राहून युद्धाला सज्ज झाले. त्याचप्रमाणें सर्व पांडवहि धनंजयाला समंततः वेढून युद्धासाठीं पुढें झाले. तेव्हां भीष्म व पार्थ या दोघांचें तुमुल युद्ध सुरू झालें.

गांगेयानें पार्थाला नऊ शरांनीं विद्ध केलें. अर्जुनानें त्याला उलट दहा मर्म-भेदक शरांनीं विद्ध केलें. तेव्हां पार्थानें सहस्र बाणांनीं भीष्माच्या सर्व दिशा आच्छादित केल्या. परंतु शांतनवानें पांडवांच्या त्या शरजालाला आपल्या शरांनीं तोडून टाकिलें. ते दोघेहि योद्धे युद्धोत्सुक होते, दोघेहि अस्त्रावर प्रतिअस्त्राचा प्रयोग करण्यांत निष्णात होते. त्यामुळें ते परम संतुष्ट झालेले वीर कोणतेंहि शस्त्रास्त्र शिल्लक न ठेवतां युद्ध करीत होते. भीष्माच्या चापापासून सुटलेले शरजालांचे संघ अर्जुनाच्या बाणांनीं तोडून टाकलेले दिसत होते. त्याचप्रमाणें अर्जुनाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं गांगेयाचे शर तोडून भूमीवर पाडविलेले दृष्टीं पडत होते.

अर्जुनानें भीष्माला पंचवीस बाणांनीं आच्छादित केलें व भीष्मांनीं त्याला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. त्या उभयतांनीं परस्परांचे अश्व, ध्वज, रथ व

रथचक्रें यांना भग्न करून टाकिलें. नंतर क्रुद्ध झालेल्या भीष्मानें वासुदेवाच्या हृदयावर तीन बाण सोडिले, त्यावेळीं भीष्माच्या बाणांनीं विद्ध झालेला तो मधुसूदन त्या समरांगणांत पुष्पित पलाशवृक्षाप्रमाणें शोभला. माधवाला विद्ध केलेलें पाहून अर्जुन अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें तीक्ष्ण शरांनीं पितामहाच्या सारथ्याला विद्ध केलें. याप्रमाणें ते दोघेहि महारथ परस्परांच्या वधाचा यत्न करीत असतां तो एकालाहि साध्य झाला नाहीं. त्या उभयतांचे सारथी सूतकर्मांत निष्णात असल्यामुळें त्यांनीं आपले रथ विविध प्रकारांनीं चालवून आपलें हस्तलाघव प्रकट केलें.

ते दोघेहि वीर एकमेकांचें छिद्र कसें सांपडेल, याचा विचार करीत होते व छिद्रान्वेषणपर झालेले ते वरच्यावर सिंहनादांनीं युक्त असा शंखध्वनि व धनुष्याचे टणत्कार करीत होते. त्यांच्या रथचक्रांच्या घोषांनीं व प्रचंड शंखनादांनीं भूमि विदीर्ण होऊन तिच्यांतून त्या गर्जनेचा प्रतिध्वनि उमटत होता. ते दोघेहि बलाढ्य योद्धे परस्परांस इतके भिडले होते कीं, त्यांच्यांतील अंतरच दिसत नव्हतें. त्यामुळें भीष्म कोणता व पार्थ कोणता हेंहि समजत नव्हतें. भीष्माच्या रथचिह्नावरून कौरवांनीं त्याला ओळखलें व वानरध्वजावरून हा पार्थाचा रथ आहे, असें पांडवांनीं जाणलें.

त्या उभयतां नरश्रेष्ठांचा तो तशा प्रकारचा पराक्रम पाहून सर्व प्राणिमात्र विस्मित झाले. धर्मांत स्थित असलेल्या लोकांत पापाचरणाला जसा यत्किंचितहि वाव मिळत नाहीं, त्याप्रमाणें त्या दोघांना परस्परांचें छिद्र कोठेंच सांपडलें नाहीं. ते दोघेहि क्षणांत शरांनीं आच्छादित होत व पुनः शरांचा छेद करून प्रकट होत.

त्यावेळीं युद्ध पहाण्यास अंतरिक्षांत जमलेले गंधर्व, चारण व ऋषि यांसह सर्व देव त्यांचा हा पराक्रम पाहून आपसांत असें भाषण करूं लागले—"देव, असुर, उरग, गंधर्व यांतील कोणीहि क्षुब्ध झालेल्या या दोघां श्रेष्ठ वीरांना युद्धांत जिंकण्यास समर्थ नाहीं. खरोखर हें अतिशय अद्भुत युद्ध आहे. अशाप्रकारचें युद्ध पुढें कधींहि होणार नाहीं. धीमान् पार्थ आपलें धनुष्य, रथ व अश्व यांसह अद्यापि जरी विद्ध झालेला नाहीं, तरीहि त्याला रणांत भीष्माला जिंकतां येणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें देवांनाहि दुरासद असलेला पार्थ भीष्माकडून कदापि जिंकला जाणार नाहीं. जगाच्या अंतापर्यंत या दोघांचें हें युद्ध असेंच चालणार असें दिसतें."

धृतराष्ट्रा, याप्रमाणें त्या दोघांच्या प्रशंसेचीं वचनें वरचेवर कानीं येत होतीं. त्या दोघां वीरांचें असें तुमुल युद्ध चालू असतां तुझ्या पुत्रांचें व पांडवांचेंहि युद्ध जुंपलें होतें. निर्मल खड्ग, परशु व इतर नानाप्रकारचीं शस्त्रें यांनीं दोन्ही सैन्यांतील शूरांनीं परस्परांच्या योद्ध्यांचा संहार चालविला होता. अशाप्रकारें इकडे दारुण युद्ध चाललें असतां द्रोण व धृष्टद्युम्न या दोघांचाहि फार मोठा संग्राम प्रवृत्त झाला. ६. ४. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ द्रोण व धृष्टद्युम्न यांचा संग्राम. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, महेष्वास द्रोण व पार्षत धृष्टद्युम्न या दोघांचा संग्राम कसा झाला तें मला सांग. खरोखर ज्याअर्थीं भीष्मासारख्या धनुर्धराला समरांगणांत पार्थाचें अतिक्रमण करतां आलें नाहीं, त्याअर्थीं पुरुषार्थापेक्षां दैवच बलवत्तर आहे, असें मला वाटतें. क्रुद्ध झालेला भीष्म चराचर लोकांचाहि नाश करण्यास समर्थ असतां तो अर्जुनाला युद्धांत कसा जिंकूं शकत नाहीं !

संजय—हे राजन्, स्थिर हो आणि स्वस्थ चित्तानें ऐक. तें युद्ध अतिशय दारुण होतें. इंद्रासह देवांनाहि पांडवांचा पराभव करतां येणें शक्य नाहीं. द्रोणानें धृष्टद्युम्नावर तीक्ष्ण बाण सोडून त्याच्या सारथ्याला रथस्थानापासून खालीं पाडविलें. त्याचप्रमाणें चार उत्तम शर सोडून चारी अश्वांना त्यानें पीडा दिली. तेव्हां धृष्टद्युम्नानें हंसतच 'थांब थांब' असें बोलून द्रोणावर नव्वद तीक्ष्ण शर सोडिले. म्हणून प्रतापी भारद्वाजानें अमर्षी धृष्टद्युम्नाला पुनः शरांनीं आच्छादून टाकिलें व पार्षताचा अंत करण्याच्या इच्छेनें त्याच्यावर एक घोर शर सोडिला. त्या शराचा स्पर्श इंद्राच्या वज्राप्रमाणें असून तो जणुकाय दुसरा कालदंडच होता. भारद्वाजानें तो बाण धनुष्याला जोडलेला पाहतांच सर्वसैन्यांत फार मोठा हाहाकार झाला.

तथापि हे महाराज, त्यावेळीं धृष्टद्युम्नाचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. तो वीर एकटा असूनहि त्या समरांत पर्वताप्रमाणें अचल राहिला. द्रोणानें सोडलेला तो दीप्त शर त्यानें पाहिला आणि स्वतःचा साक्षात् मृत्यूच

असा तो घोर बाण त्यानें मार्गांतच तोडून टाकिला व द्रोणावर शरांची वृष्टि चालविली. तेव्हां धृष्टद्युम्नाचें तें दुष्कर कर्म पाहून पांचालांसह सर्व पांडवांनीं उच्च रवानें सिंहनाद केला.

नंतर द्रोणाच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्यानें सुवर्ण व वैडूर्य रत्नांनीं भूषविलेली अतिशय वेगवान् शक्ति द्रोणावर सोडली, तेव्हां द्रोणानें हंसतच त्या शक्तीचे तीन तुकडे करून टाकिले. आपल्या शक्तीचा छेद झालेला पाहून प्रतापवान् धृष्टद्युम्नानें द्रोणावर शरवृष्टि केली. पण त्या महायशस्वी आचार्यानें शरवृष्टीचें निवारण करून त्या द्रुपदपुत्राच्या धनुष्याचे मधोमध दोन तुकडे केले. तें पाहून धृष्टद्युम्नानें आपली पर्वतासारखी जड गदा मोठ्या वेगानें द्रोणावर फेंकली.

द्रोणाच्या वधेच्छेनें ती वेगवान् गदा येत असतां त्या वृद्ध आचार्यांचा अद्भुत पराक्रम आम्हीं पाहिला. त्यानें आपल्या हस्तलाघवानें ती सुवर्णभूषित गदा अतिशय चापल्यानें चुकविली व तीच पार्षताकडे परत पाठविली. नंतर त्यानें तीक्ष्ण धारेचे व पाणी पाजलेले भल्लबाण पार्षतावर सोडले, त्या बाणांनीं त्याच्या कवचाचा भेद करून त्याचें रक्तप्राशन केलें. तेव्हां महारथ धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन द्रोणावर पांच बाण सोडिले. त्या वेळीं ते दोघेहि नरश्रेष्ठ रक्तानें माखले होते, त्यामुळें ते वसंतऋतूंतील पुष्पित पलाशवृक्षाप्रमाणें शोभले.

नंतर द्रोणानें धृष्टद्युम्नाचें धनुष्य पुनः तोडलें आणि पर्वतावर जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें त्याच्यावर शरवृष्टि केली, एक भल्लबाण सोडून त्याच्या सारथ्याला रथावरून खालीं पाडविलें. चार शरांनीं त्याच्या चारी अश्वांना विद्ध केलें व दुसरा एक भल्ल बाण सोडून त्याच्या हातांतील धनुष्याचा छेद केला आणि मोठ्यानें सिंहनाद केला. तेव्हां तो विरथ झालेला योद्धा हातांत गदा घेऊन खालीं उतरला व त्यानें आपला अचाट पराक्रम प्रकट केला. परंतु द्रोणानें विशिख बाणांनीं ती गदाहि खालीं पाडवून अद्भुत कर्म प्रकट केलें.

त्या वेळीं धृष्टद्युम्नानें आपली विशाल ढाल हातांत घेतली, ती शंभर चंद्र व सूर्य यांच्या आकृतींनीं चिह्नित होती. त्याचप्रमाणें त्या बलाढ्य योद्ध्यानें आपलें दृढ खड्गहि धारण केलें व द्रोणाचा वध करण्याच्या इच्छेनें, मत्त गजावर उडी टाकणाऱ्या सिंहाप्रमाणें तो त्याच्या अंगावर धांवून गेला. त्यावेळीं

भारद्वाजाचा अद्भुत पराक्रम, हस्तलाघव व बाहुबल आमच्या दृष्टीं पडलें. त्यानें शरवर्षाव करून पार्षताला आच्छादित केलें, तेव्हां धृष्टद्युम्न इतका बलवान् असूनहि तो द्रोणाचें निवारण करण्यासाठीं पुढें जाऊं शकला नाहीं. त्यानें आपली विशाल ढाल पुढें करून मोठ्या कौशल्यानें द्रोणाच्या बाणांचें निवारण केलें.

इतक्यांत महात्म्या पार्षताला संग्रामांत साह्य करणारा महाबाहु भीम मोठ्या वेगानें धांवून आला व त्यानें द्रोणाला सात शरांनीं विद्ध केलें आणि त्यानें पार्षताला तत्काल आपल्या रथावर घेतलें. तें पाहून दुर्योधनानें–'मोठी सेना घेऊन द्रोणाचें रक्षण करा' अशी कालिंगपुत्र भानुमानाला आज्ञा केली. तेव्हां कलिंगाची फार मोठी सेना भीमावर तुटून पडली. त्या वेळीं द्रोण पांचाल्य धृष्टद्युम्नाला सोडून विराट व द्रुपद या दोघां वृद्ध नृपतींकडे वळला व धृष्टद्युम्न धर्मराजाकडे आला. त्यानंतर हे महाराज, त्या वृद्धांचें चांगलेंच युद्ध जुंपलें आणि महात्मा भीम व कलिंग या दोघांचें जगाचा प्रलय करणारें, अतिशय घोररूप भयंकर युद्ध प्रवृत्त झालें. ५. ४. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ भीम व कलिंग यांचें तुमुल युद्ध. २ कलिंगाचा वध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, याप्रमाणें कलिंगाच्या सेनापतीशीं संग्राम सुरू झाला असतां अद्भुत कर्में करणाऱ्या भीमसेनाचें त्याच्या सैन्यासह युद्ध कसें झालें, तें मला सांग. तो महाबलाढ्य पांडव हातांत गदा घेऊन कालदंड धारण करणाऱ्या यमाप्रमाणेंच समरांगणांत संचार करीत असतो.

संजय—हे राजेंद्रा, तुझ्या पुत्राच्या आज्ञेप्रमाणें तो कलिंगपुत्र भानुमान् फार मोठें सैन्य घेऊन भीमाच्या रथावर धांवून गेला. तेव्हां अश्व-गजांनीं व्यापलेली ती कलिंगसेना आयुधें सज्ज करून आपल्याकडे येत आहे, असें पाहून भीम तिच्यावर तुटून पडला. त्याचप्रमाणें चेदीसह केतुमान् व निषाद यांवरहि तो धांवून गेला. तेव्हां क्रुद्ध झालेला श्रुतायुहि केतुमानासह भीमसेनावर चालून गेला आणि चेदींनीं व्यूह रचून अनेक सहस्र रथ, गज व निषादांची सेना यांनीं भीमाला वेढून टाकिलें. तें पाहून वृकोदराला अनु-

सरणारे चेदि, मत्स्य व करूष हे दुसऱ्या अनेक नृपालांसह निषादांवर तुटून पडले. त्यावेळीं घोर युद्ध प्रवृत्त झालें. परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें प्रहार करणाऱ्या त्या योद्धयांना आपला कोण, शत्रूचा कोण याचेंहि भान राहिलें नाहीं, त्यांनीं सारखा संहार चालविला.

प्रचंड दैत्यसैन्याशीं युद्ध करणाऱ्या इंद्राप्रमाणें भीमसेनानें भयंकर संग्राम आरंभिला, त्यांचें युद्ध चालू असतां समुद्राच्या गर्जनेसारखा प्रचंड शब्द झाला. ते योद्धे एकमेकांस ओळखीनातसे झाले व त्यांच्या क्षतांतून वहाणाऱ्या रक्तानें सर्व भूमि ससाच्या रक्तानें माखल्यासारखी तांबडी लाल दिसूं लागली. योद्धयांना स्व-पर ओळखूं येईनासें होऊन ते स्वतःच्या सैनिकांवरच प्रहार करूं लागले व अल्पसंख्येचा बहुसंख्येशीं फार मोठा संग्राम झाला. चेदींची संख्या अल्प असून कलिंग व निषाद पुष्कळ होते, तरी चेदींनीं त्यांच्याशीं निकराचें युद्ध करून त्यांचें मर्दन केलें. याप्रमाणें पुरुषार्थ गाजवून चेदि भीमसेनाला सोडून परत फिरले. त्यावेळीं कलिंगांशीं एकट्या भीमसेनालाच युद्ध करणें भाग पडलें. तथापि तो महाबाहु भीमसेन यत्किंचित्‌हि चलित न होतां आपल्या रथांतून हलला नाहीं. तेथूनच त्यानें कलिंगाच्या सेनेवर शरांचा वर्षाव केला.

( २ ) त्यावेळीं महा धनुर्धर कलिंग व त्याचा पुत्र शक्रदेव या दोघांनीं त्या पांडवावर शर सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां भीमसेनानें आपलें विशाल धनुष्य सज्ज करून कलिंगाशीं युद्ध आरंभिलें. शक्रदेवानेंहि शरवृष्टीनें भीमसेनाच्या अश्वांचा वध केला व त्याला विरथ झालेला पहातांच तो त्याच्यावर धांवून गेला. ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं मेघ जसे जलवृष्टि करतात तशी शक्रदेवानें शरवृष्टि करून भीमाला आच्छादून टाकिलें. परंतु भीमानें न भीतां त्या अश्वरहित रथावरच स्थित होऊन आपली लोखंडी गदा शक्रदेवावर फेंकली. त्या गदाप्रहारानें शक्रदेव सारथ्यासह हत होऊन धरणीवर पडला.

पुत्राचा वध झालेला पाहून कलिंगाधिपतीनें असंख्य रथांनीं भीमाला सर्व बाजूंनीं वेढून टाकिलें. तेव्हां भीमानें आपली वेगवान् प्रचंड गदा टाकून दारुण कर्म करण्यासाठीं अतिशय तीक्ष्ण खड्ग हातीं घेतलें व वृषभाच्या चर्माची दृढ ढाल धारण केली. ती सोनेरी तारे व अर्धचंद्र यांच्या आकृतींनीं अलंकृत केली होती. भीमानें याप्रमाणें ढाल-तलवार धारण केलेली पाहून

कलिंग क्रुद्ध झाला. त्यानें धनुष्याचा टणत्कार केला व भीमाच्या वधेच्छेनें त्याच्यावर एक सर्पविषतुल्य घोर बाण सोडिला. परंतु वेगानें येणाऱ्या त्या शराचे भीमानें तत्काल आपल्या तलवारीनें दोन तुकडे करून टाकिले व मोठ्या आनंदानें प्रचंड सिंहनाद केला. तेव्हां कलिंगानें पुनः भीमसेनावर चौदा तीक्ष्ण धारेचे तोमर सोडिले. ते भीमानें अंतरिक्षांतच तोडून टाकिले.

याप्रमाणें त्या चौदाहि तोमरांचा छेद करून तो पृथापुत्र कलिंगात्मज भानुमानावर धांवला. तेव्हां भानुमानानें भीमाला शरवृष्टीनें आच्छादून टाकिलें व सर्व अंतरिक्ष दुमदुमून सोडील अशी प्रचंड गर्जना केली. ती गर्जना भीमसेनाला सहन न होऊन त्यानें प्रचंड सिंहनाद केला. तो दारुण ध्वनि ऐकून कलिंगसेनेचा थरकांप झाला व 'भीमसेन खरोखरच मनुष्य नसून अतिमानुष कर्म करणारा कोणी अलौकिक पुरुष आहे,' असें ती समजली.

नंतर भीमानें पुनः एकदा गर्जना केली, तलवार घेऊन भानुमंताच्या श्रेष्ठ गजाचे दोन्ही दांत हातांनीं धरून मोठ्या वेगानें उडी मारली व त्याच्या पाठीवर आरोहण केलें. इतक्यांत कलिंगानें त्यावर शक्ति सोडली. परंतु बलाढ्य वृकोदरानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या दृढ तलवारीनें तिचे दोन तुकडे केले, गजारूढ असलेल्या भानुमंताचा शिरच्छेद केला आणि गजाच्या स्कंधावर प्रहार केला. तेव्हां सिंधुनदीच्या वेगानें उन्मूलून पडणाऱ्या शिखरयुक्त पर्वताप्रमाणें तो विशाल गज चीत्कार करीत खालीं पडला.

याप्रमाणें त्या राजपुत्राचा त्याच्या गजासह वध करून तो पांडव खालीं उतरला व हातांत खड्ग घेऊन युद्धार्थ सज्ज होऊन भूमीवर उभा राहिला. तो वीर आपलें तेजस्वी खड्ग फिरवीत विविध मार्गांनें त्या रणक्षेत्रांत वेगानें संचार करीत असतां तें अलातचक्राप्रमाणें भासलें. अश्व, गज व रथ यांच्या समुदायांचा व पदातींच्या समूहांचा संहार करीत फिरणारा तो श्रेष्ठ योद्धा रक्तानें माखला होता. तो बलाढ्य पांडव गजारोही योद्ध्यांचीं शरीरें व मस्तकें यांचा छेद करीत श्येनपक्ष्याप्रमाणें त्या रणभूमीवर फिरत होता. पायांनींच संचार करणाऱ्या, भयानक व क्रुद्ध झालेल्या त्या पृथापुत्राला पाहून ती सर्व सेना भयभीत झाली. प्रलयकालीन अंतकाप्रमाणें दिसणाऱ्या त्या भीमाला पाहून कांहीं योद्धे मोहित झाले व आक्रोश करीत हातांत खड्ग घेऊन भीमावर धांवून आले. तथापि त्या रिपुमर्दनानें त्या सर्व रथ्यांचे रथ व रथाचे विविध भाग

भग्न करून टाकिले. तो युद्धनिपुण पांडव भ्रान्त, आविद्ध, उद्भ्रान्त, आप्लुत, प्रसृत व प्लुत इत्यादि विविध मार्गांनीं युद्धांत संचार करीत असलेला दिसत होता. त्या वीरानें तलवारीच्या केवल अग्रानेंच तोडून टाकलेले विशाल गज मर्मावर प्रहार झाल्यामुळें चीत्कार करीत भूमीवर गतप्राण होऊन पडत होते. कांहींचे दंत भग्न झाले, कांहींचीं मर्मै तुटलीं, कित्येक गजांवरील योद्धे नाहींसे झाल्यामुळें ते गज इतस्ततः धांवून स्वपक्षांतील लोकांनाच तुडवूं लागले. याप्रमाणें गज व योद्धे गतप्राण होऊन खालीं पडले असतां त्यांच्याबरोबर तुटलेले तोमर, महातांचीं मस्तकें, चित्र-विचित्र झुली व इतर अलंकार, भूषणें, शक्ति, पताका, धनुष्यें इत्यादि आयुधें भूमीवर पडत असलेलीं आमच्या दृष्टीं पडलीं. विशाल गजांचीं मस्तकें, शरीरें व इतर अवयव छिन्न-भिन्न होऊन तेथें पसरल्यामुळें ती रणभूमि पर्वत ढांसळून पडलेल्या पृथ्वीप्रमाणें दिसत होती.

याप्रमाणें प्रचंड संहार करून भीमसेन अश्वसादींकडे वळला व त्यांच्याशीं त्याचें घोर युद्ध सुरू झालें. त्या संग्रामांत असंख्य अश्वरोहींचा भीमानें नाश केला. त्यावेळीं अश्वाच्या रश्मी व सुवर्णासारखीं उज्ज्वल भूषणें, योद्धयांचे प्रास, ऋष्टि, कवचें, ढाली, व चित्र-विचित्र आस्तरणें, या सर्व वस्तु त्या रणांगणावर सर्वत्र पसरल्या होत्या. योद्धयांचीं नानाप्रकारचीं आयुधें तोडून टाकून भीमानें त्या समरांगणाला चित्र-विचित्र कुसुमांनीं आच्छादित केलेल्या वसुधेचीच शोभा आणिली. त्या बलाढ्य पांडवानें कांहीं रथांवर उड्या मारून खड्गप्रहारांनीं त्यांतील योद्धयांना ध्वजांसह खालीं पाडविलें. हे भरतश्रेष्ठा, त्या यशस्वी वीरानें वारंवार सर्व दिशांतून जणुकाय उड्डाणच करीत व भिन्न भिन्न मार्गांतून संचार करीत सर्व लोकांना विस्मित केलें. त्यानें कांहींना पायांखालीं तुडविलें, कित्येकांचा खड्गांनीं छेद केला. कोणाला केवल गर्जनेनेंच भयभीत केलें. कांहींना आपल्या ऊरुवेगानेंच भूमीवर पाडविलें व कित्येक तर त्याला पाहूनच गतप्राण झाले.

---

१ भ्रान्त म्ह० मंडलाकृति फिरविणें. आविद्ध म्ह० मोठ्या श्रमानें मंडलाकृति फिरविणें. उद्भ्रान्त म्ह० उन्नतीनें युक्त असणें. उत्प्लवन म्ह० उड्या मारणें. प्रसृत म्ह० सर्व दिशांत पसरणें; प्लुत म्ह० एकाच दिशेंत पसरणें; संपात म्ह० वेग व समुदीर्ण म्ह० सर्व प्रतिपक्षांवर तुटून पडणें.

याप्रमाणें ती कलिंगाची सेना भीष्माला वेढून भीमावर चाल करून गेली असतां त्या पांडवानें तिला अशाप्रकारें त्रस्त करून सोडिलें. त्यानंतर कलिंग-सेनेच्या अग्रभागीं श्रुतायुषाला पाहून भीमसेन त्यावर चालून गेला. तेव्हां तो आपल्या अंगावर येत आहे, असें पाहून त्या कलिंगानें भीमसेनाच्या वक्षःस्थ-लावर नऊ बाण सोडिले. त्यावेळीं कलिंगाच्या बाणांनीं विद्ध झालेला भीम-सेन अंकुशानें टोचलेल्या गजाप्रमाणें व्यथा पावला व त्यामुळें इंधन घातलेल्या अग्नीप्रमाणें त्याचा क्रोध अधिकच प्रज्वलित झाला.

इतक्यांत भीमाच्या ‘विशोक’-नामक सारथ्यानें सुवर्णानें अलंकृत केलेला रथ सज्ज करून पुढें आणला. त्यावर सत्वर आरूढ होऊन तो पृथापुत्र ‘थांब, थांब’ असें म्हणत कलिंगावर धांवून गेला. तेव्हां श्रुतायूनें तीक्ष्ण धारेचे शर सोडून भीमाला आपलें हस्तलाघव दाखविलें. त्यानें जेव्हां आपल्या उत्कृष्ट धनुष्यापासून नऊ शर सोडून भीमाला विद्ध केलें, तेव्हां दंडाचा प्रहार केला असतां सर्प जसा चवताळतो, तसा तो बलाढ्य पांडव संतप्त झाला. त्यानें आपलें धनुष्य धारण केलें व सात पोलादी तीक्ष्ण बाण सोडून कलिंगाचा वध केला. कलिंगाचे रथचक्ररक्षक सत्य व सत्यदेव हे दोघेहि महा बलाढ्य होते, त्यांनाहि त्यानें क्षुरप्र बाणांनीं यमसदनीं पाठविलें. त्याचप्रमाणें केतुमानालाहि नाराच बाणांनीं गतप्राण केलें.

तें पाहून कलिंगाची सहस्रावधि क्षत्रियांनीं युक्त असलेली प्रचंड सेना एकत्र जमली व तिनें भीमसेनाला वेढून टाकिलें. शक्ति, गदा, तोमर इत्यादि अनेक आयुधांच्या प्रहारांनीं तिनें भीमाला आच्छादिलें. तेव्हां त्या महा-बलाढ्य पांडुपुत्रानें त्या घोर सेनेचें निवारण करून आपली वेगवान् गदा धारण केली व तिच्या प्रहारांनीं सातशें वीरांना मृत्यूच्या स्वाधीन केलें. पुनः त्यानें दोन सहस्र योद्धयांची मृत्युलोकांतून यमलोकीं रवानगी करून दिली. तो फारच अद्भुत प्रकार घडला. याप्रमाणें भीमसेनानें भीष्माकडे वरचेवर नजर टाकीत त्या कलिंगसेनेचा संहार चालविला. त्या वेळीं पाठीवरील योद्धे मृत झाल्यामुळें स्वामिहीन झालेले असंख्य मत्त गज वायूनें उडवून दिलेल्या मेघाप्रमाणें इतस्ततः उधळले व शरांनीं विह्वल झालेल्या त्यांनीं चीत्कार करीत स्वपक्षाचेंच सैन्य पायांखालीं तुडविलें.

त्यानंतर महा बलाढ्य खड्गधारी भीमानें हृष्ट होऊन मोठ्यानें शंख वाज-विला. तो महाघोष ऐकून कलिंगसैनिकांचीं मनें भयकंपित झालीं. त्यांना मोह

पडला व सैन्य आणि सर्व वहानें भयभीत झालीं. त्यावेळीं भीमसेन मार्गांतून अनेक प्रकारें संचार करीत, धांवत व वारंवार उड्या मारीत चालला असतां सर्व सैन्यें भयानें मोहित झालीं. महत्सरोवराला क्षुब्ध करणाऱ्या मकराप्रमाणें अद्भुत कर्में करणाऱ्या भीमसेनानें त्रस्त केलेली ती सर्व सेना परत फिरत होती व पुनः संघशः पळत होती. कलिंगसेनेची ही स्थिति पाहून पांडवांच्या सेनापति पार्षतानें आपल्या योद्ध्यांना 'शत्रूवर चालून जाण्याची हीच वेळ आहे, सज्ज होऊन युद्ध करा' अशी आज्ञा केली.

धृष्टद्युम्नाची ही आज्ञा कानीं पडतांच शिखंडीप्रभृति श्रेष्ठ योद्धे अनेक रथी, व सैन्य यांसह भीमाच्या साह्यार्थ धांवले. युधिष्ठिरहि आपल्या मेघासारख्या श्यामवर्ण गजसैन्यांसह त्यांना अनुसरला. याप्रमाणें स्वसैन्याची व्यवस्था लावून धृष्टद्युम्नानें मुख्य मुख्य योद्ध्यांसह भीमाच्या बाजूचें रक्षण केलें. त्या पांचाल राजपुत्राला सात्यकि व भीम या दोघांवांचून अधिक प्रिय कोणीहि नव्हता. तो त्या उभयतांना प्राणांहूनहि प्रिय मानीत होता. त्यानें जेव्हां महाबाहु भीमाला कलिंगसैन्यांत निर्भयपणें संचार करीत असलेलें पाहिलें, तेव्हां त्यानें हर्षातिरेकानें मोठ्यानें सिंहनाद करून शंख वाजविला.

त्या पार्षताच्या रथाला पारव्या रंगाचे अश्व जोडले होते व त्यावर कोविदार वृक्षाचा ( रक्तवर्ण ) ध्वज फडकत होता. त्या रथांत बसून धृष्टद्युम्न आपल्या साह्यार्थ येत आहेसें पाहून भीमसेनाचा उत्साह अधिकच वाढला. त्या कालिंगांनीं भीमसेनाला वेढलेलें पाहून धृष्टद्युम्न त्याच्या रक्षणार्थ धांवून आला आणि सात्यकिहि त्यांच्या साह्यार्थ निघाला. तेव्हां दुरूनच सात्यकीला पाहून भीम व धृष्टद्युम्न अधिकच संतुष्ट झाले आणि ते दोघे कलिंगावर तुटून पडले. इतक्यांत सात्यकि तेथें येऊन पोंचला व त्यानें दारुण कर्म आरंभिलें. त्यानें हातांत धनुष्य घेऊन आपलें उग्ररूप प्रकट करीत कालिंगांचा संहार चालविला. भीमसेनानें तर कालिंगांच्या रक्त-मांसांच्या चिखलानें युक्त असलेली रक्ताची नदीच निर्माण केली व एकटा भीमसेनच त्या कौरव-पांडवांच्या मधील त्या नदीचें उल्लंघन करूं शकला. तशा प्रकारच्या भीमाला पाहून तुझे सर्व सैनिक 'खरोखरच हा अंतक कालच भीमाच्या रूपानें अवतरला आहे' असा आक्रोश करूं लागले.

त्यावेळीं तो आक्रोश ऐकून शान्तनव भीष्म सभोंवार सेनेचा व्यूह रचून भीमावर चाल करून आला. तें पाहून भीम, धृष्टद्युम्न व सात्यकि हे तिघेहि

भीष्माच्या सुवर्णानें अलंकृत केलेल्या रथाकडे धांवले. त्यांनीं भीष्माला सर्व बाजूंनीं वेढून त्यांतील त्याच्यावर प्रत्येकानें तीन बाण सोडिले. परंतु देवव्रतानें त्या तिघांवर उलट तीन तीन बाण सोडिले, एक हजार बाण सोडून सर्व महारथांचें निवारण केलें व भीमसेनाच्या सुवर्णालंकारांनीं भूषित असलेल्या अश्वांना गतप्राण केलें. परंतु त्या अश्वरहित रथांत बसूनच भीमानें गांगेयावर मोठ्या वेगानें शक्ति सोडिली. तथापि ती शक्ति रथाजवळ येऊन पोंचण्याच्या आधींच पितामहानें तिचे तीन तुकडे केले, तेव्हां ती पृथ्वीला विदीर्ण करून खालीं पडली.

त्यावेळीं आपली लोखंडाची जड गदा उचलून भीमसेन मोठ्या वेगानें भीष्मावर धांवला. तें पाहून भीमाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें सात्यकीनेंहि त्वरेनें बाण सोडिले व भीष्माच्या सारथ्याला गतप्राण केलें. सारथि मृत होऊन पडला असतां भीष्माचे वायूप्रमाणें वेगवान् अश्व रथ घेऊन त्या रणांगणांत इतस्ततः धांवत सुटले. याप्रमाणें भीष्माचा रथ दूर निघून जातांच तृणावर पडलेल्या अग्नीप्रमाणें भीमाचा क्रोध प्रज्वलित झाला व तो बलाढ्य पांडव सर्व कालिंगांचा वध करून सैन्याच्या मध्यभागीं उभा राहिला. त्यावेळीं तुझ्याकडील एकहि योद्धा भीमाच्या पुढें उभें रहाण्यास धजला नाहीं.

त्यानंतर धृष्टद्युम्नानें सर्व सैन्य पहात असतां त्या यशस्वी पृथापुत्राला आपल्या रथांत घेतलें व सर्व पांचाल्य आणि मत्स्य यांनीं त्याचा सत्कार केला. त्यावेळीं धृष्टद्युम्नाला आलिंगन देऊन भीम सात्यकीपाशीं आला. तेव्हां सत्यपराक्रमी सात्यकि धृष्टद्युम्नाच्या समक्ष भीमसेनाला हर्ष देत असें म्हणाला— 'भीमसेना, तूं कलिंगराज, त्याचा पुत्र, शक्रदेव, केतुमान् व सैन्यासह सर्व कालिंग वीर यांचा वध केलास, हें फार उत्तम झालें. धन्य आहे तुझी. तूं एकट्यानें केवल स्वतःच्या बाहुबलावर अश्व-नागयुक्त प्रचंड सेनेचा व कालिंगांच्या वीरांचा संहार केलास व त्यांचा महाव्यूह तोडून टाकिलास, हें केवढें दुष्कर कर्म आहे !'

असें बोलून सात्यकि आपल्या रथावरून भीमाच्या रथावर चढला, त्यानें भीमसेनाला दृढालिंगन दिलें व पुनः आपल्या रथावर येऊन त्या कौरवांच्या सेनेचें मर्दन चालविलें. त्यामुळें भीमाला अधिकच बळ आलें. ६. ५. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ द्रोण व धृष्टद्युम्न यांचें युद्ध. २ सौभद्राच्या साह्यार्थ अर्जुनाचें गमन. ३ पार्थाचा पराक्रम व द्वितीयदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) **संजय**—हे भारता, याप्रमाणें त्या दिवशीं पूर्वाह्ण संपत आला असतां रथ, गज, अश्व, पदाति व अश्वसादी या सर्वांचा भयंकर क्षय झाला. त्यावेळीं पांचाल्य धृष्टद्युम्नानें अश्वत्थामा, शल्य व कृपाचार्य या तीन महारथांशीं युद्ध आरंभिलें. त्यानें तीक्ष्ण बाणांनीं अश्वत्थाम्याच्या लोकप्रिय अश्वांना गतप्राण केलें. तेव्हां अश्वहत झाल्यामुळें त्या द्रोणपुत्रानें शल्यरथाचा आश्रय करून धृष्टद्युम्नावर शरांचा वर्षाव केला. त्यावेळीं द्रौणि व पांचाल्य या दोघांचें युद्ध जुंपलेलें पाहून सौभद्र तीक्ष्ण शरांची वृष्टि करीत त्याच्यावर तुटून पडला. त्यानें शल्याला पंचवीस बाणांनीं, कृपाला नऊ शरांनीं व अश्वत्थाम्याला आठ बाणांनीं विद्ध केलें.

तें पाहून द्रोणपुत्रानें त्या सौभद्रेयावर तीक्ष्ण शर सोडिले. शल्यानें दहा व कृपानें तीन बाण सोडिले. तेव्हां संतुष्ट झालेला तुझा पौत्र लक्ष्मणहि सौभद्रावर धांवून गेला व त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें. क्रुद्ध झालेल्या लक्ष्मणानें सौभद्रावर तीक्ष्ण बाण सोडिले, तेव्हां एक अद्भुत प्रकार घडला. सौभद्रानें तत्क्षणीं आपलें हस्तलाघव प्रकट केलें व आपल्या त्या भ्रात्यावर पांचशें बाण सोडले. तें पाहून लक्ष्मणानें पुनः एक तीक्ष्ण धारेचा बाण सोडून त्याचें धनुष्य मुठीजवळच तोडून टाकिलें. तें पाहून लोकांनीं मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां सौभद्रानें तें मोडलेलें धनुष्य टाकून दिलें व त्याहून अधिक दृढ असें दुसरें धनुष्य घेऊन पुनः युद्ध आरंभिलें. त्या दोघांनीं परस्परांवर असंख्य तीक्ष्ण विशिख बाणांची वृष्टि केली. ते दोघेहि परस्परांच्या प्रहारांवर प्रतिप्रहार करणारे होते.

( २ ) तेव्हां सौभद्र आपल्या पुत्राला पीडा देत आहे, असें पाहून दुर्योधन, त्याच्याकडे त्वरेनें आला व इतर जनाधिपहि त्याच्या मागोमाग निघाले. त्या सर्वांनीं रथसमूहानें सौभद्रेयाला वेढून टाकिलें. तथापि तो कृष्णतुल्य पराक्रमी कुमार यत्किंचित्‌हि भ्याला नाहीं, किंवा त्या शूरांनीं वेढा दिल्यामुळें व्यथितहि झाला नाहीं. इतक्यांत आपल्या पुत्राला कौरवांनीं वेढलेलें पाहून त्याचें रक्षण करण्यासाठीं धनंजय मोठ्या वेगानें धांवून आला. तेव्हां भीष्म-द्रोणादि सर्व

योद्धे अश्व-गजांच्या मोठ्या सैन्यासह अर्जुनाचें निवारण करण्यास पुढें झाले. त्यावेळीं गज, अश्व, रथ व पदाति यांच्या वेगानें उडालेली धूलि अंतरिक्षांत सूर्यरथापर्यंत जाऊन पोंचली. सहस्त्रावधि गज व शेंकडों भूमिपाल अर्जुनाच्या बाणांना प्राप्त होऊन परत येऊं शकले नाहींत. ते तेथेंच गतप्राण होऊन पडले. सर्व भूतें आक्रोश करूं लागलीं व सर्व दिशांत अंधकार पसरला. कौरवांनीं आजपर्यंत केलेला दारुण अन्याय तीव्रस्वरूपानें फलद्रूप झालेला दिसला. किरीटीच्या शस्त्रसंघानें सर्व दिशा व्यापून टाकिल्या. अंतरिक्षांत भूमि, दिशा किंवा सूर्य यांतील कांहींहि दिसेनासें झालें. असंख्य रथी, गज, व रथांचे अश्व गतप्राण झाले. कित्येक रथि आपापले रथसमूह घेऊन पळत सुटले. बाहुभूषणें व शस्त्रें धारण केलेले कांहीं योद्धे विरथ होऊन इतस्ततः धावूं लागले. अश्वसादी अश्व सोडून व गजसादी गजांना सोडून अर्जुनाच्या भयानें पळून जाऊं लागले. पार्थाच्या बाणांनीं अनेक वीर रथांवरून, अश्वांवरून व गजांवरून पटापट खालीं पडत असलेले दिसूं लागले. त्यावेळीं धनंजयानें उग्र रूप धारण करून आपल्या तीक्ष्ण बाणांनीं ठिकठिकाणीं गदा, खड्ग, प्रास, तूणीर शर, शरासनें, अंकुश, पताका इत्यादि धारण केलेले असंख्य योद्ध्यांचे हात तोडून टाकिले. त्या रणांगणावर गोफणी, रथाचे भिन्न भिन्न भाग, तरवारी, परशु, तोमर, छिन्न झालेलीं सोनेरी कवचें, ढाली, छत्रें, ध्वज, प्रतोद, इत्यादि विविध वस्तूंच्या राशी पडलेल्या दिसत होत्या. त्या संग्रामांत अर्जुनाच्या पुढें जाईल असा एकहि योद्धा तुझ्या सैन्यांत नव्हता. त्या शूर पार्थाच्या समीप जो कोणी शत्रुसैनिक गेला, त्यास त्यानें क्षणार्धांत परलोकीं पाठवून दिलें. याप्रमाणें तुझे सैनिक दश-दिशांत पळत असतां अर्जुन व वासुदेव या दोघांनीं आपापले उत्कृष्ट शंख वाजविले.

(३) त्यावेळीं आपलें सर्व सैन्य दुर्बल होऊन इतस्ततः पळत आहे, हें पाहून तुझा देवव्रत पिता हंसतच द्रोणाचार्याला म्हणाला—"कृष्णाचें ज्याला साह्य आहे, अशा या बलाढ्य पांडुपुत्रानें तर अग्नीप्रमाणेंच आपल्या सैन्याचा भडका उडवून दिला आहे. याला समरांत जिंकतां येणें कोणालाहि शक्य नाहीं. कालान्तक यमाप्रमाणें याचें स्वरूप दिसत आहे, त्याला परतविण्यास ही प्रचंड सेनाहि समर्थ होणार नाहीं. पहा, हें सर्व कौरवसैन्य परस्परांकडे पहात पळत सुटलें आहे. हा दिनकरहि सर्व लोकांच्या चक्षूंचा जणुकाय उपसंहार करीत अस्ताचलाकडे चालला आहे, (म्ह० सर्वत्र अंधकार पसरत चालला आहे.)

यास्तव आपणहि आपलें सैन्य परत फिरवूं या. आपले सर्व योद्धे श्रांत व भयभीत झालेले दिसत आहेत. ते आतां युद्ध चालू ठेवण्यास समर्थ नाहींत, असें मला वाटतें. ”

भीष्मानें द्रोणाचार्यांला असें बोलून सर्व कौरवांची सेना परत फिरविली. याप्रमाणें सूर्य अस्तास गेला, संध्याकाल झाला व कौरव-पांडवांचीं दोन्ही सैन्यें विश्रांतीसाठीं आपापल्या शिबिरांकडे वळलीं. ६. ४. ५५.

---

## अध्याय ५६ वा.



[ १ कौरवांच्या गरुडव्यूहाचें वर्णन. २ पांडवांच्या अर्धचंद्रव्यूहाची रचना. ३ युद्धाला आरंभ. ]

( १ ) **संजय**—हे भारता, ती रात्र जाऊन प्रभात झाली असतां शान्तनव भीष्मानें आपलें सर्व सैन्य एकत्र जमवून त्यास रणांगणांकडे निघण्याची आज्ञा केली. तुझ्या पुत्रांच्या जयाची इच्छा करणाऱ्या कुरुवृद्ध भीष्मानें त्या दिवशीं 'गारुड'-व्यूह रचला. त्या महाव्यूहाची रचना गरुड पक्ष्याच्या आकाराची होती. गरुडाच्या मुखाच्या स्थानीं तुझा पिता देवव्रत स्वतः उभा राहिला. दोन नेत्रांच्या स्थानीं द्रोण व सात्वत कृतवर्मा स्थित झाले. अश्वत्थामा व कृप हे दोघे यशस्वी वीर मस्तकाच्या स्थानीं होते. त्रैगर्त, कैकेय, वाटधान, भूरिश्रवा, शल, शल्य, भगदत्त, भद्रक, सिंधुसौवीर, पांचनद व जयद्रथ हे सर्व सज्ज होऊन मानेजवळ उभे राहिले. भ्रात्यांसह दुर्योधनानें पृष्ठभागाचें रक्षण केलें. अवंतीचे विंदानुविंद, शकांसह काम्बोज व शूरसेन यांनीं पुच्छस्थान संभाळलें. मागध, कालिंग व दासेरकगण सज्ज होऊन दक्षिण बाजूला उभे राहिले आणि कारुष, विकुंज, मुण्ड व कुण्डीवृष यांनीं बृहद्बलासह डावी बाजू राखली.

( २ ) याप्रमाणें कौरवसैन्याचा व्यूह पाहून परंतप सव्यसाचीनें धृष्टद्युम्नाच्या साह्यानें त्या दिवशीं 'अर्धचंद्र'-नामक दारुण प्रतिव्यूह रचला. त्या अर्धचंद्राच्या उजव्या टोंकाला भीमसेन शोभत होता. तो विविध शस्त्रें धारण केलेल्या अनेक देशांतील नृपालांनीं परिवेष्टित होता. त्याच्या मागोमाग विराट व द्रुपद हे दोघे महारथ होते. त्यांच्या मागें नीलायुधासह नील होता.

त्याच्या नंतर चेदि, काशि, करूष व पौरव यांनीं परिवेष्ठित झालेला धृष्टकेतु होता. सैन्याच्या मध्यभागीं धृष्टद्युम्न, शिखंडी, पांचाल व प्रभद्रक युद्धासाठीं सज्ज होऊन उभे होते. तेथेंच प्रचंड गजसमूहानें वेष्ठित असलेला धर्मराजाहि होता. त्याच्यानंतर सात्यकि, द्रौपदीचे पांच पुत्र, अभिमन्यु, इरावान् हे एकत्र उभे होते, त्यांच्या पुढें भीमसेनाचा पुत्र व महारथ केकय होते आणि सर्वांच्या शेवटीं डाव्या टोंकाला मनुजांतील श्रेष्ठ पार्थ स्थित झाला. सर्व जगताचें रक्षण करणारा जनार्दन त्याचा रक्षक होता.

( ३ ) हे राजन्, याप्रमाणें पांडवांनीं तुझ्या पुत्रांच्या व त्यांच्या पक्षाला जे जमले होते, त्यांच्या वधार्थ महाव्यूह रचिला. त्यानंतर रथ व गज परस्परांना जाऊन भिडले आणि त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें. ठिकठिकाणीं कौरवांचे सैनिक, अश्वसादी व रथी यांचे संघ परस्परांचा संहार करीत असलेले दिसत होते. कांहीं योद्धयांचे संघ परस्परांवर पृथक् पृथक् तुटून पडत होते. कांहीं धांवत होते व एकमेकांवर प्रहार करीत होते. याप्रमाणें तुझे पुत्र व पांडव यांचें तुमुल युद्ध जुंपलें असतां परस्परांचा वध करणाऱ्या वीरांचा सिंहनाद, दुन्दुभींचा ध्वनि व अश्व-गजांचा शब्द यांचा प्रचंड नाद स्वर्गाला जाऊन पोंचला. ६. ४. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ तिसऱ्या दिवसाचें संकुल युद्ध. ]

( १ ) संजय—हे भारता, याप्रमाणें दोन्ही सैन्यें व्यूह रचून सज्ज झालीं असतां धनंजयानें तीक्ष्ण शरांनीं तुझ्या रथाच्या अधिपतींचा वध केला व रथसैन्याचें विदारण केलें. प्रलयकालच्या अंतकाप्रमाणें पार्थानें कौरवांचा संहार चालविला असतां धार्तराष्ट्रांनींहि पांडवांशीं मोठ्या यत्नानें युद्ध केलें. ते सर्व कौरव मरणाच्या क्षणापर्यंत युद्धापासून निवृत्त व्हावयाचें नाहीं, अशा निश्चयानें यशाची प्रार्थना करीत होते. ते सर्व मन एकाग्र करून पांडवांच्या सैन्यावर तुटून पडले.

त्या संग्रामांत पळणारे, भग्न झालेले व परत फिरलेले सैनिक आपले कोणते व शत्रूचे कोणते, हें परस्परांस ओळखतां येत नव्हतें. त्यावेळीं भूमीवरून उधळलेल्या धूळीनें दिवाकरालाहि झांकून टाकिलें. दिशा, प्रदिशा कांहींच

ओळखतां येईनातशा झाल्या. मग तेथें त्या वीरांनीं कसें युद्ध केलें असेल याची कल्पनाच करणें बरें !

ते योद्धे अनुमानानें, ध्वजादि चिह्नांवरून, वीरांच्या संकेतावरून व त्यांनीं परस्परांस नाम-गोत्रांनीं केलेल्या आह्वानांवरून परकीयांना ओळखत होते व याप्रमाणें जेथें तेथें दोन्ही पक्षांचें युद्ध जुंपलेलें दिसत होतें. असें जरी होतें तरी सत्यसंध द्रोणानें रक्षण केलेल्या कौरवांचा यत्किंचित्हि व्यूहभेद झाला नाहीं. त्याचप्रमाणें सव्यसाची व वृकोदर या दोघां भ्रात्यांकडून सुसंरक्षित असलेल्या पांडवांचा व्यूहहि भंग पावला नाहीं.

दोन्ही सैन्यांच्या अग्रभागीं असलेले योद्धे पुढें सरसावून रथ व गज यांच्या सैन्यांशीं युद्ध करीत होते. अश्वसादी अश्वसादींवर प्रास, ऋष्टि इत्यादिकांनीं प्रहार करीत होते. त्या दारुण संग्रामांत एक रथी दुसऱ्या रथ्याला सुवर्णानें भूषविलेल्या बाणांनीं विद्ध करून पाडवीत होता. त्याचप्रमाणें तुझ्या पुत्रांचे व पांडुपुत्रांचे गजारोही, परस्परांच्या गजारोह्यांना तीक्ष्ण नाराच बाणांनीं व तोमरांनीं विद्ध करीत होते. श्रेष्ठ गजावर आरूढ झालेल्या कोणा एका योद्ध्यानें उडी मारून दुसऱ्या वीराचे केस धरले व तेथल्या तेथें त्याचा शिरश्छेद केला. कित्येक वीरांचीं हृदयें गजांच्या दंताग्रांनीं विदीर्ण होऊन ते निःश्वास सोडीत रक्त ओकूं लागले. हत्तींच्या दंतांवर स्थित असलेले कांहीं रणविशारद योद्धे दुसऱ्या अस्त्रवेत्त्या व गजशिक्षाविशारद योद्ध्यांनीं फेंकलेल्या शक्तींनीं विद्ध होऊन थरथरां कांपूं लागले.

हे राजन्, याप्रमाणें त्या दारुण संग्रामांत उभय सैन्यांतील पदातींच्या समुदायांनीं पदातींवर, गजयूथपांनीं श्रेष्ठ रथ्यांवर, अश्वसादींनीं गजारोहांवर व रथस्थांनीं पदातींवर विविध प्रकारच्या तीक्ष्ण शस्त्रांचे प्रहार केले. ते परस्परांवर तुटून पडत होते व पुढें येणाऱ्या शत्रुपक्षीय सैनिकांचा संहार करीत होते. त्या रणांगणांत सहस्त्रावधि प्राणी विह्वल होऊन पडलेले दिसत होते. विविध प्रकारचीं तुटलेलीं शस्त्रें, भग्न झालेलीं धनुष्यें, चित्र-विचित्र ध्वज, गदा, शक्ति, कवचें, उच्च-नीचजातीचीं मूल्यवान् वस्त्रें, इत्यादि नानाप्रकारच्या वस्तूंनीं ती रणभूमि आच्छादित झाली होती, त्यामुळें ती भूमि चित्रविचित्र पुष्पमालांनीं आच्छादित झाल्याप्रमाणें शोभत होती. नर, अश्व, गज यांच्या शरीरांनीं व्यापलेली ती पृथ्वी मांस व रक्त यांच्या चिखलानें माखली, त्यामुळें

उधळलेली सर्व धूळि शांत झाली व सर्व दिशा निर्मळ दिसूं लागल्या. त्या रणांगणांत सर्वत्र पसरलेलीं असंख्य कबंधें ( मस्तकावांचून शरीरें ) पाहून तें जगाच्या विनाशाचेंच चिह्न भासूं लागलें. त्या अतिशय दारुण व महाभयंकर युद्धांत रथी समंततः धांवत असलेले दिसत होते. त्यानंतर भीष्म, द्रोण, सैंधव, जयद्रथ, पुरुमित्र, जय, भोज व सौबलासह शल्य हे सिंहतुल्य पराक्रमी समरदुर्धष वीर पांडवसेनेचा पुनः पुनः संहार करीत होते. त्याचप्रमाणें भीमसेन, घटोत्कच राक्षस, सात्यकि, चेकितान आणि द्रौपदीचे पांच पुत्र यांनीं दानवांना पळवून लावणाऱ्या देवांप्रमाणें सर्व नृपालांसह तुझ्या पुत्रांचा पराभव केला. परस्परांचा वध करणारे व रक्तानें माखलेले ते श्रेष्ठ क्षत्रिय घोर दानवांप्रमाणें शोभले. दोन्ही सैन्यांतील ते वीर परस्परांना जिंकून नभोमंडलांतील श्रेष्ठ ग्रहांप्रमाणें दिसूं लागले.

हे महाराज, त्यानंतर तुझा पुत्र दुर्योधन एक सहस्र रथांसह घटोत्कच राक्षसावर धांवून आला. त्याचप्रमाणें फार मोठ्या सेनेसह सर्व पांडव द्रोण-भीष्मद्रोणांवर चालून गेले. क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें सर्व बाजूंनीं श्रेष्ठ नृपालांवर प्रहार केले. सात्यकि आणि सौभद्र यांनीं सौबलाच्या सैन्याशीं युद्ध आरंभिलें. याप्रमाणें त्यावेळीं विजयाची इच्छा करणाऱ्या तुझ्या पुत्रांचा व पांडवांचा अंगावर रोमांच आणणारा भयंकर संग्राम पुनः प्रवृत्त झाला. ६. ४. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ पांडवांनीं केलेला कौरवसैन्याचा पराभव. २ दुर्योधन-भीष्मसंवाद. ३ भीष्माचें त्वेषयुक्त उत्तर व युद्धारंभ. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्यानंतर त्या सर्व क्रुद्ध झालेल्या पार्थिवांनीं पार्थाला त्या समरांगणांत गांठून अनेक सहस्र रथांनीं वेढून टाकिलें. याप्रमाणें त्याला रथसमुदायांनीं परिवेष्टित करून सर्व बाजूंनीं असंख्य बाणांची वृष्टि केली. त्या क्रुद्ध झालेल्या योद्ध्यांनीं शक्ति, गदा, प्रास, मुद्गर, मुसळें, इत्यादि आयुधांची पार्थाच्या रथावर वृष्टि केली. तेव्हां तो आयुधांचा वर्षाव शलभांच्या प्रचंड समुदायाप्रमाणेंच भासला. त्यावेळीं पार्थानें आपल्या सुवर्णाच्या भूषणांनीं अलंकृत केलेल्या बाणांनीं त्या सर्वांचें सर्वतः निवारण केलें. पार्थाचें तें अतिमानुष हस्तलाघव पाहून देव, दानव, गंधर्व, पिशाच, उरग व राक्षस या सर्वांनीं 'धन्य धन्य' असें बोलून फाल्गुनाची प्रशंसा केली.

याप्रमाणें अर्जुनाचें युद्ध चाललें असतां इकडे सात्यकि व अभिमन्यु फार मोठ्या सेनेनें आवृत्त होऊन सौबलासह शूर गान्धारांवर धांवून गेले व क्रुद्ध झालेल्या सौबलांनीं नानाविध शस्त्रांनीं आणि आयुधांनीं सात्यकीच्या रथाचे तिळाएवढे तुकडे केले. तेव्हां असा भयावह प्रसंग ओढवला असतां सात्यकीनें तो भग्न झालेला रथ टाकून मोठ्या त्वरेनें अभिमन्यूच्या रथांत उडी टाकिली व एका रथांत स्थित असलेल्या त्या दोघां वीरांनीं तीक्ष्ण नतपर्व बाणांनीं सौबलाच्या सैन्याचा संहार आरंभिला.

त्याच वेळीं दुसरीकडे सज्ज झालेल्या भीष्मद्रोणांनीं कङ्कपत्रयुक्त तीक्ष्ण शरांनीं धर्मराजाच्या सैन्याचा संहार चालविला. धर्मपुत्र युधिष्ठिर व माद्रीपुत्र नकुल-सहदेव या तिघांनीं सर्व सैन्यांच्या समक्ष द्रोणाचार्यांच्या सैन्याला पळवून लाविलें. पूर्वीं देवासुरांचें जसें अतिशय दारुण व अंगावर रोमांच आणणारें युद्ध झालें होतें, तसेंच त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें.

भीमसेन व घटोत्कच हे दोघेहि महत्कर्म करीत असतां दुर्योधनानें त्यांच्या समीप येऊन त्यांचें निवारण केलें. त्यावेळीं घटोत्कचानें आपल्या पितरांचेंहि अतिक्रमण करून युद्ध केलें. त्याचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. क्रुद्ध झालेल्या वृकोदरानेंहि जणुं काय हंसतच अमर्षी दुर्योधनाच्या वक्षःस्थलावर एक तीक्ष्ण बाण सोडिला. त्या बाणाच्या प्रहारानें पीडित झालेला राजा दुर्योधन रथांत बसल्या जागींच मूर्च्छित होऊन पडला. त्याला संज्ञाशून्य झालेलें पहातांच त्याच्या सारथ्यानें मोठ्या त्वरेनें त्याचा रथ रणांगणांतून दूर नेला व त्याचें सैन्य इतस्ततः पसरलें. कौरवांची सेना पळत आहे, असें पाहून भीमसेन तीक्ष्ण शरांचा वर्षाव करीत तिच्या पाठोपाठ धांवला.

धर्मराज व धृष्टद्युम्न हे दोघेहि द्रोण व भीष्म पहात असतां त्यांच्यासमक्ष शत्रुसैन्याचा संहार करणाऱ्या आपल्या तीक्ष्ण विशिख बाणांनीं कौरवसैन्याचा विध्वंस करूं लागले. त्यावेळीं भीष्म व द्रोण हे महारथहि पळत असलेल्या आपल्या सैन्याचें निवारण करण्यास समर्थ झाले नाहींत. महात्मे भीष्म-द्रोण निवारण करण्याचा यत्न करीत असतांहि त्यांच्या समक्ष ती सेना पळूं लागली. याप्रमाणें सहस्रावधि रथि पळत असतां एकाच रथांत स्थित असलेले सौभद्र व सात्यकि यांनीं सौबलांच्या सर्व सैन्यालाहि समंततः उधळून दिलें. त्यावेळीं

ते दोघे वीर अमावास्येच्या दिवशीं नभोमंडलांत शोभणाऱ्या चंद्र-सूर्यांप्रमाणें शोभले.

क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें तर मेघाच्या जलधाराप्रमाणें त्या सैन्यावर शरांची वृष्टि केली. पार्थाच्या शरांनीं विद्ध होणारें तें कौरवसैन्य विषाद व भय यांनीं कंपित होऊन पळूं लागलें. पण आपलें सैन्य पळत असलेलें पाहून दुर्योधनाच्या हिताची इच्छा करणाऱ्या व अतिशय प्रक्षुब्ध झालेल्या महारथ भीष्म-द्रोणांनीं त्यांचें निवारण केलें. इतक्यांत दुर्योधनहि सावध झाला व आपल्या इतस्ततः पळणाऱ्या सैन्याकडे परत आला. त्या तुझ्या पुत्रानें ज्या ज्या महारथाकडे पाहिलें, ते ते सर्व परत फिरले. तेव्हां त्यांना परत फिरलेलें पाहून इतरहि सैनिक परस्परांच्या स्पर्धेनें व लज्जेनें आपापल्या स्थानींच थांबले. त्या परत फिरणाऱ्या योद्धयांचा वेग चंद्रोदय कालीं होणाऱ्या समुद्राच्या भरतीच्या वेगाप्रमाणें होता.

(२) हे राजन्, तें सैन्य परत फिरलेलें पाहून दुर्योधन मोठ्या त्वरेनें भीष्मापाशीं गेला व त्याला म्हणाला—" हे पितामह, मी तुम्हांला काय सांगत आहें, तें लक्ष देऊन ऐका. तुम्ही जिवंत असतां आपल्या सैन्याचें हें पलायन उचित आहे, असें मला वाटत नाहीं. अहो, पुत्रांसह अस्त्रवेत्त्यांतील श्रेष्ठ द्रोण, महाधनुर्धर कृप व इतर शूर सुहृज्जन यांच्या समक्ष आपलें सैन्य कसें पळूं लागलें! पांडवांचें बल आपल्याहून अधिक आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं. आपल्या सेनेचा संहार होत असतां ज्याअर्थीं द्रोण, कृप, अश्वत्थामा आणि हे पितामह, तूंहि त्यांची उपेक्षा करीत आहेस, त्याअर्थीं पांडवच तुम्हांला अनुग्रहार्ह आहेत असें दिसतें, पण हें जर तुम्हीं युद्धाच्या पूर्वींच मला सांगितलें असतेंत; 'पांडव, सात्यकि व पार्षत यांच्यांशीं आम्ही युद्ध करणार नाहीं,' असें कृपाचार्य व द्रोणाचार्य यांनीं जर मला म्हटलें असतें, तर मीं कर्णाच्या विचारानें त्याचवेळीं मला जें कांहीं करावयाचें तें केलें असतें. यास्तव तुम्हांला जर आतां या संग्रामांत माझा त्याग करावयाचा नसेल, तर आपल्या पराक्रमाच्या अनुरूप युद्ध करा."

( ३ ) तुझ्या पुत्राचें हें भाषण ऐकून भीष्म पुनः पुनः मोठ्यानें हंसला, त्यानें क्रोधानें नेत्र विस्फारले व दुर्योधनाला असें उत्तर दिलें—"हे राजन्, इंद्रासह देवांनाहि पांडव युद्धांत अजिंक्य आहेत, हें यथार्थ व हितवचन तूं

पुष्कळ वेळां माझ्या तोंडून ऐकलें आहेस. यास्तव हे नृपश्रेष्ठा, मज वृद्धांला जें कांहीं करतां येणें शक्य आहे, तें मीं यथाशक्ति करीन. आज मी एकटाच भ्राते व सैन्य यांसह पांडुपुत्रांचें सर्व लोकांच्या समक्ष निवारण करतों. तें तूं आपल्या बांधवांसह पहा."

भीष्माचें हें वचन ऐकून तुझ्या पुत्रांनीं मोठ्या हर्षभरानें शंख, नगारे, भेरी इत्यादि वाद्यांचा घोष केला, तेव्हां पांडवांनींहि तो प्रचंड ध्वनि ऐकून आपापले शंख, भेरी, वाजवून ती रणभूमि निनादित केली. ६. ४. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ भीष्माचें युद्ध. २ कृष्णाचें शस्त्रग्रहण. ३ अर्जुनाचा जय. ४ तृतीयदिन-युद्ध समाप्ति. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, माझ्या पुत्रानें ज्याला अशा प्रकारें क्रोध आणला होता व जो विशेषतः दुःखी झाला होता, त्या भीष्मानें घोर युद्धाची प्रतिज्ञा केली असतां त्यानें पांडुपुत्रांचें कसें निवारण केलें व पांचालांनीं पितामहाशीं कसें युद्ध केलें तें मला सांग.

संजय—हे भारता, त्या वेळीं पूर्वाह्णकाल उलटून गेला होता. सूर्यानें पश्चिम दिशेचा आश्रय केला. जयप्राप्तीमुळें महात्मे पांडव हृष्ट झालेले दिसत होते. अशा वेळीं सर्वधर्मविशेषज्ञ देवव्रतानें मोठ्या वेगानें पांडवसेनेवर चाल केली. तो शान्तनव फार मोठ्या सेनेनें युक्त होता व तुझे पुत्र त्याचें रक्षण करीत होते. याप्रमाणें भीष्म चाल करून गेला असतां तुझ्या अन्यायामुळें पांडवांचें व तुझ्या पुत्रांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. धनुष्याचे टणत्कार व तल-हाताचे प्रहार यांचा पर्वत विदीर्ण होत असल्याप्रमाणें प्रचंड घोष झाला. त्या युद्धभूमीवर योद्धयांचे 'थांब, थांब, हा मी थांबलों. ये; याला विद्ध कर; परत फिर; उभा रहा; हा उभा राहिलों, कर पाहूं प्रहार;' असे शब्द सर्वत्र ऐकूं येत होते. पर्वतावर जशा शिला आपटाव्या, त्याप्रमाणें योद्धयांचीं सुवर्णाचीं कवचें, किरीट व ध्वज यांवर शस्त्रांचा प्रहार होत असतां ध्वनि होत होता. त्याचप्रमाणें सहस्रावधि वीरांचीं तुटलेलीं मस्तकें व विभूषित केलेले बाहु जमिनीवर पडून जणुं काय वळवळत आहेत, असें दिसलें.

कांहीं योद्ध्यांचीं मस्तकें तुटलीं होतीं, कांहींच्या हातांत सज्ज केलेलीं धनुष्यें होतीं व कित्येकांनीं उगारलेलीं आयुधें तशींच हातांत धरलेलीं होतीं व ते गतप्राण होऊन जागच्या जागीं तसेच स्थित असलेले दिसत होते. त्यावेळीं तेथें नर, अश्व व गज यांच्या देहापासून प्रवृत्त झालेली महावेगवान् रुधिर-वाहिनी नदीच वाहूं लागली. तिच्यामध्यें रक्तमांसाचा चिखल झाला होता. गजांचीं शरीरें भयंकर शिलांप्रमाणें भासत होतीं. ती नदी परलोकगामिनी असून गृध्रपक्षी व गोमायु यांना आनंद देणारी होती.

हे भारता, तुझ्या पुत्रांचें व पांडुसुतांचें जें हें युद्ध झालें, तशाप्रकारचें युद्ध पूर्वीं कोणीं पाहिलें नव्हतें किंवा ऐकलेंहि नव्हतें. योद्ध्यांनीं गतप्राण करून पाडलेले हत्ती नीलपर्वताच्या शृंगांप्रमाणें दिसत होते. त्यांच्या प्रचंड शरीरांनीं तें रणांगण इतकें व्यापलें होतें कीं त्यामुळें रथांचा मार्गहि कुंठित झाला होता. चित्रविचित्र कवचें व शिरस्त्राणें जागजागीं पसरलीं होतीं, त्यामुळें तें रणक्षेत्र शरदृतूंतील नभस्तलाप्रमाणें शोभत होतें. शरांच्या प्रहारांनीं कोणी छिन्नभिन्न झाले होते, कित्येकांचीं आंतडीं बाहेर पडलीं होतीं, तथापि ते पीडित झालेले वीरहि मोठ्या त्वेषानें निर्भयपणें शत्रूंवर धांवून जात होते.

रणांत पडलेले योद्धे, 'अरे बाबा, हे भ्रात्या, हे मित्रा, हे माझ्या मातुला, हे सख्या, मला येथें सोडून जाऊं नकोरे' असा आक्रोश करीत होते. कोणी 'इकडे ये. तूंच माझ्यापाशीं ये; असा भितोस काय ! तूं चाललास कोठें ? मी संग्रामांतच स्थित आहें. भिऊं नको,' असें ओरडत होते. याप्रमाणें ती रणधुमाळी प्रवृत्त झाली असतां शांतनव भीष्म तेथें प्राप्त झाला. त्या सत्यप्रतिज्ञ वीरानें नित्य मंडलाकार असलेल्या आपल्या धनुष्यापासून दीप्त अग्रें असलेले सर्पासारखे बाण सोडिले. त्या नियतव्रतानें सर्व दिशांना आपल्या बाणांचें लक्ष्य केलें व पांडवांच्या रथांना सर्वतः विद्ध केलें. तो रथस्थ वीर जणुकाय नृत्यच करीत आपलें हस्तलाघव प्रदर्शित करीत असतां सर्वत्र अलात-चक्राप्रमाणें फिरत असलेला दिसला. तो महारथ एकटा असूनहि केवल लाघवामुळें पांडव व सृंजय यांना सहस्रावधि भीष्म असल्याप्रमाणें भासला. त्यावेळीं त्यानें मायेनें स्वतःचीं अनेक शरीरें निर्माण केलीं आहेत कीं काय असें वाटलें. तो श्रेष्ठ धनुर्धर पूर्व दिशेंत जों दिसत आहे, तोंच एका क्षणांत उत्तरेकडे दृष्टीं पडे. लगेच पश्चिमेकडे प्रकट होई व पहातां पहातां दक्षिण दिशेंत स्थित असलेला दिसूं लागे.

याप्रमाणें तो शूर गांगेय रणांगणांत संचार करीत असतां पांडवांतील कोणीहि त्याच्याकडे पहाण्यास समर्थ झाला नाहीं. भीष्माच्या धनुष्यापासून सुटलेले असंख्य विशिख बाणच तेवढे दृष्टीं पडत होते. सैन्याचा संहार करणारें तें भयंकर कर्म पाहून अनेक योद्धे आक्रोश करूं लागले. हे राजन्, तुझा पिता याप्रमाणें अतिमानुष रूपानें त्या समरभूमीवर संचार करीत असतां दैवानेंच प्रेरणा केलेले सहस्रावधि राजे शलभाप्रमाणें स्वतःच्या नाशासाठींच भीष्माच्या क्रोधाग्नींत उडी टाकून प्राणाला मुकत होते. त्या युद्धकुशल भीष्माच्या सभोंवार अनेक अश्व, गज व नर असल्यामुळें त्याचा एकहि बाण व्यर्थ जात नव्हता.

पर्वताला विदीर्ण करणाऱ्या वज्राप्रमाणें भीष्माचा एकच तीक्ष्ण धारेचा बाण कांटेरी कवचें धारण करणाऱ्या गजांचीं मस्तकें छिन्न-भिन्न करीत होता. एकाच गजावर कवचधारी दोन तीन योद्धे एकत्र जरी बसलेले असले, तरी तुझा पिता एकच नाराच बाण सोडून त्यांना गतप्राण करीत होता. जो जो वीर नरव्याघ्र भीष्मावर चाल करून गेलेला दिसला, तो तो दुसऱ्याच क्षणीं मरून पडलेला माझ्या दृष्टीं पडत होता.

याप्रमाणें त्या अतुल पराक्रमी वीरानें धर्मराजाच्या महाचमूचा संहार चालविला असतां, ती अनेक प्रकारें नाश पावली. शरवृष्टीनें तप्त झालेल्या त्या महासेनेचा थरकांप झाला आणि वासुदेव, पार्थ व शिखंडी हे पहात असतां त्यांच्या समक्ष महारथ पळूं लागले. तेव्हां ते तेथें असूनहि भीष्माच्या बाणांनीं पीडिलेल्या वीरांचें संरक्षण करूं शकले नाहींत. इंद्रतुल्य पराक्रमी भीष्मानें पांडवांच्या सैन्याचा संहार चालविला असतां दोन योद्धेहि एकत्र पळतांना दिसले नाहींत. ( ज्याला जिकडे जसा मार्ग सांपडला, तसा तो तिकडे जीव घेऊन पळूं लागला. )

नर, अश्व व गज विद्ध झाल्यामुळें ध्वजकूबर मोडून भूमीवर पडलेले दिसत होते. तें पाहून पांडवांच्या सैन्यांत हाहाकार झाला. दैवाच्या प्रबलतेमुळें पिता पुत्राचा वध करीत होता व पुत्र पित्याला यमसदनीं पाठवीत होता. मित्र मित्राला युद्धाचें आह्वान करीत होता. पांडुपुत्रांचे कांहीं सैनिक कवचें टाकून व केस मोकळे सोडून धांवत असलेले दिसत होते. कांहीं रथयूथप इतस्ततः पळत होते. त्यावेळीं ते व्याघ्राला पाहून भयभीत होऊन पळणाऱ्या गायींच्या कळपाप्रमाणें भासले.

याप्रमाणें आपलें सैन्य पळत असलेलें पाहून श्रीकृष्णानें आपला श्रेष्ठ रथ थांबविला व पार्थाला म्हटलें—"हे पार्था, तूं ज्याची अपेक्षा करीत होतास, ती वेळ आतां प्राप्त झाली आहे. यास्तव आतां तूं निःशंकपणें प्रहार कर. नाहीं तर पुनः मोहांत पडशील. 'भीष्म-द्रोणादि सर्व प्रमुख वीर व धार्तराष्ट्राचे सर्व सैनिक यांतील जे कोणी माझ्याशीं युद्ध करावयास येतील, त्यांचा मी रणांमध्यें वध करीन' अशी प्रतिज्ञा तूं पूर्वीं राजांच्या सभेंत केली होतीस, तें आपलें वचन आतां सत्य करून दाखीव. हे बीभत्सो, स्वसैन्याचा नाश होत आहे. मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें असलेल्या भीष्माला पाहून, सिंहाला पाहून पळणाऱ्या भयार्त मृगाप्रमाणें युधिष्ठिराच्या सैन्यांतील हे राजे पळत सुटले आहेत, पहा."

वासुदेवाचें हें वचन ऐकून धनंजय म्हणाला—"हे केशवा, अश्वांना प्रेरणा कर व जेथें भीष्म आहे, तेथेंच माझा रथ या सेनासमुद्रांतून घेऊन चल. मी आज त्या दुर्धर्ष व वृद्ध पितामहाला रणांत विद्ध करून गतप्राण करून पाडतों."

संजय—त्यानंतर माधवानें पार्थाच्या रजतासारख्या शुभ्र अश्वांना चोदना करून भीष्माचा सूर्याप्रमाणें दुष्प्रेक्ष्य रथ जेथें होता, तेथें त्याला नेलें. त्यावेळीं महाबाहु पार्थ भीष्माच्या समीप आला आहे, हें पहातांच युधिष्ठिराचें महत्सैन्य पुनः परत फिरलें, तें पाहून भीष्मानें उच्चरवानें सिंहाप्रमाणें गर्जना केली व मोठ्या त्वरेनें धनंजयाचा रथ शरांनीं आच्छादित केला. तेव्हां एका क्षणांत सारथ्यासह तो रथ शरवृष्टीनें झांकला जाऊन दिसेनासा झाला. परंतु त्यावेळीं वासुदेवानें यत्किंचित्‌हि भ्रांत न होतां मोठ्या धैर्यानें अश्वांना प्रेरणा केली व भीष्माच्या शरवृष्टीपासून रथ दूर नेला.

त्यावेळीं पार्थानें मेघगर्जनेसारखा टणत्कार करणारें दिव्य धनुष्य धारण केलें व तीन शरांनीं भीष्माचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां तुझ्या पित्यानें तें छिन्न झालेलें धनुष्य टाकून देऊन क्षणार्धांत दुसरें धनुष्य सज्ज केलें. तथापि क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून पितामहाच्या त्याहि चापाचा छेद केला. त्यावेळीं पांडुपुत्राचें तें हस्तलाघव पाहून शान्तनूचा पुत्र अतिशय प्रसन्न झाला. तो त्याचा सत्कार करीत म्हणाला—"हे महाबाहो पार्था, धन्य, धन्य आहे तुझी. तुझें हें कर्म तुला शोभण्यासारखेंच आहे. हे वत्सा, मी संतुष्ट झालों आहें. ये, माझ्याशीं युद्ध कर."

याप्रमाणें त्या कुरुवृद्धानें पार्थाची प्रशंसा करून दुसरें फार मोठें धनुष्य घेतलें व पार्थाच्या रथावर शरवृष्टि चालविली. त्यासमयीं वासुदेवानें आपलें सारथ्यकर्मांतील विलक्षण कौशल्यहि प्रकट केलें. त्यानें अनेक मंडलें घेऊन भीष्माचे शर व्यर्थ घालविले. तें पाहून भीष्मानें वासुदेव आणि धनंजय या दोघांच्या सर्व गात्रांना तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. त्यावेळीं भीष्माच्या शरांनीं विद्ध झालेले ते दोघे नरव्याघ्र शिंगांनीं माती उकरणाऱ्या मत्त वृषभांप्रमाणें शोभले. क्षुब्ध झालेल्या भीष्मानें पुनः त्या दोघां कृष्णार्जुनांवर शरवृष्टि करून सर्व दिशा झांकून टाकिल्या. त्या क्रुद्ध झालेल्या गांगेयानें वासुदेवावर तीक्ष्ण शर सोडिले व पुनः पुनः मोठ्यानें हंसून वार्ष्णेयाला कंपित केलें.

तेव्हां कृष्णानें भीष्माचा तो अतुल पराक्रम पाहिला आणि दोन्ही सैन्यांच्या-मध्यें तळपणाऱ्या आदित्याप्रमाणें शोभणाऱ्या भीष्मावर शरवर्षाव करणारा पार्थ मृदुयुद्ध करीत आहे, हेंहि जाणलें. पितामह युधिष्ठिराच्या सैन्यांतील श्रेष्ठ श्रेष्ठ वीरांचा प्रलयकालाप्रमाणें संहार करीत आहे, हें भगवानाला सहन झालें नाहीं. त्या अमेयात्म्यानें असा विचार केला—"भीष्माचें हें युद्ध असेंच चालल्यास युधिष्ठिराचें सर्व सैन्य नष्ट होईल. हा गांगेय एका दिव-सांत देव-दानवांचाहि नाश करील, मग ससैन्य पांडुसुतांची काय कथा! महात्म्या पांडवांची ही महासेना पळत सुटली आहे. हे कौरव सोमकांना युद्धांतून पळावयास लावीत आहेत, हें पाहून पितामहाला हर्ष होत आहे. यास्तव आज मी पांडवांसाठीं भीष्माचा वध करून महात्म्या पांडवांचा भार कमी करतों. हा अर्जुन तीक्ष्ण शरांनीं विद्ध होत असतांहि केवल भीष्माविषयींच्या आदरामुळें आपलें कर्तव्य जाणेनासा झाला आहे."

याप्रमाणें वार्ष्णेय विचार करीत आहे, तोंच क्रुद्ध झालेल्या पितामहानें पार्थाच्या रथावर असंख्य बाण सोडिले. त्याच्या त्या विपुल शरांनीं सर्व दिशा झांकून गेल्या आणि अन्तरिक्ष, दिशा, भूमि व सूर्यहि दिसेनासा झाला. त्यावेळीं धूमयुक्त वायु वाहूं लागले. सर्व दिशा क्षुब्ध झाल्या. इतक्यांत भीष्माच्या आज्ञेनें द्रोण, विकर्ण, जयद्रथ, भूरिश्रवा, कृतवर्मा, कृप, श्रुतायु अंबष्ठपति, विंदानुविंद, सुदक्षिण, प्राच्य, सौवीरगण सर्व वसाति, क्षुद्रक व मालव देशांतील राजे, हे सर्व मोठ्या त्वरेनें पार्थावर चालून गेले.

तेव्हां शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ कृष्णार्जुनांस शतसहस्र अश्व, पदाति, रथ, गज, व सैन्य यांच्या जालांनीं वेढून टाकिलें आहे, हें पाहून सात्यकि

त्यांच्या साह्यार्थ धांवून आला व विष्णूनें जसें इंद्राला साह्य केलें, तसें त्यानें अर्जुनाला साह्य केलें. त्यावेळीं भीष्माच्या शरांनीं विदीर्ण झालेले हत्ती, अश्व, रथ, ध्वज आणि भीष्मानें ग्रस्त केलेले सर्व योद्धे व युधिष्ठिराचें सैन्य पळत आहे, हें पाहून तो शिनिश्रेष्ठ सात्यकि म्हणाला—" हे क्षत्रियहो, कोठें चाललां ! प्राचीन लोकांनीं क्षत्रियांचा धर्म असा सांगितलेला नाहीं. हे वीरांनो, आपली प्रतिज्ञा वृथा करूं नका. आपल्या धर्माचें पालन करा."

त्यावेळीं मुख्य मुख्य योद्धे समंततः पळत आहेत, पार्थ मृदुयुद्ध करीत आहे व भीष्माचा युद्धावेश वाढत चालला आहे, हें सर्व पाहून वार्ष्णेय तें सहन करूं शकला नाहीं. तो सात्यकीच्या वचनाची प्रशंसा करीत त्याला म्हणाला—" हे शिनिश्रेष्ठा, समग्र कौरवसेना तुटून पडत असलेली पाहून आपले जेवढे योद्धे पळत असतील त्यांना खुशाल पळ काढूं दे. आतां जे रणांगणांत उभे आहेत, त्यांनाहि हवें तर जाऊं दे. आज मी भीष्म-द्रोणांना त्यांच्या गणांसह युद्धांत पराभूत करितों, पहा. हे सात्वता, क्रुद्ध झालेल्या माझ्या हातून आज कौरवांचा एकहि योद्धा जिवंत सुटणार नाहीं, मी आज उग्र सुदर्शनचक्र धारण करून महाव्रत भीष्माचे प्राण हरण करीन आणि गणांसह भीष्म-द्रोणांचा वध करून धनंजय व चारी पांडव भ्राते यांचें प्रिय करीन. सर्व धृतराष्ट्रपुत्र व तत्पक्षीय मुख्य मुख्य राजे या सर्वांचा वध करून हृष्ट झालेला मी अजातशत्रु युधिष्ठिराला त्याचें राज्य संपादन करून देईन."

(२) असें बोलून त्या वसुदेवपुत्रानें आपल्या हातांतील अश्वांचे रश्मि सोडले, सूर्यासारखें तेजस्वी, वज्रतुल्य दृढ, तीक्ष्ण धारेचें, सुनामचक्र हातांत घेऊन रथांतून खालीं उडी टाकिली व तो महात्मा आपल्या पावलांनीं भूमीला जणुंकाय कंपित करीतच मोठ्या वेगानें भीष्मावर धांवून गेला. त्यावेळीं तो क्रुद्ध उपेंद्र भीष्मावर चाल करून निघाला असतां मदांध होऊन दर्पानें निर्भयपणें उभ्या असलेल्या गजेंद्रावर झडप घालणाऱ्या सिंहाप्रमाणें भासला. त्यावेळीं श्रीकृष्णानें परिधान केलेला पिवळा पितांबर वायूनें उडत होता. त्यामुळें त्याच्या श्यामदेहावर तें पीत वस्त्र जलयुक्त मेघांत चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें शोभलें. त्या चक्रपाणीचें शरीर हेंच सरोवर, त्याचा दीर्घ बाहु हेंच कमलनाल आणि सुदर्शनचक्र हेंच कमल, तें कृष्णाच्या क्रोधरूपी सूर्याच्या उदयानें विकास पावलें असून त्याचे तीक्ष्ण दंत याच पाकळ्या होत्या. तें चक्र सृष्टीच्या आरंभीं नारायणाच्या नाभीपासून उत्पन्न झालेल्या व बालार्काप्रमाणें ज्याची

कांति आहे, अशा आदित्याप्रमाणें भासत होतें. तें सुदर्शन चक्र हातीं घेऊन मोठ्या त्वेषानें गर्जना करीत येत असलेल्या त्या क्रुद्ध भगवानाला पाहून 'आज कौरवांचा निश्चित क्षय होणार' असें सर्व भूतांना वाटलें व तीं भयानें आक्रोश करूं लागलीं. त्यावेळीं तो चक्रपाणि सर्व लोकांना दग्ध करणाऱ्या कालांतक अग्नीप्रमाणें दिसला. तो लोकगुरु देवकीनंदन हातांत चक्र घेऊन भूतांना दग्ध करणाऱ्या धूमकेतूप्रमाणें भीष्मावर उडी टाकून गेला असतां शान्तनव यत्किंचित्‌हि चलित झाला नाहीं.

त्यानें दोन्ही हातांनीं आपल्या महाधनुष्याचा गांडीवासारखा प्रचंड टणत्कार केला व चित्त विवेकमूढ होऊं न देतां गोविंदाला म्हटलें—"हे देवेशा, जगन्निवासा ये. माधवा, चक्रपाणे, मी तुला नमस्कार करितों. हे लोकनाथा, या रणांगणांत तूं मला रथांतून खालीं पाडीव. तुझ्या हातून माझा वध झाला असतां मला इह व परलोकीं श्रेयःप्राप्ति होईल. हे वृष्णिनाथ, तूं मजवर चालून आलास हा तीन्ही लोकांत माझा मोठा गौरव झाला."

भीष्म याप्रमाणें बोलत आहे, इतक्यांत पार्थानें मोठ्या वेगानें रथांतून उडी टाकिली व त्वरेनें जाऊन आपल्या पुष्ट व दीर्घ बाहूंनीं कृष्णाचे पुष्ट व दीर्घ बाहु धरून त्याला अडविलें. परंतु त्यावेळीं क्रोधसंतप्त झालेल्या कृष्णानें महावातानें उडविलेल्या वृक्षाप्रमाणें पार्थाला आपल्याबरोबर पुढें ओढीत नेलें. तथापि किरीटीनें परम बलानें आपले पाय भूमीवर दृढ रोवून भीष्माच्या समीप वेगानें जाणाऱ्या कृष्णाला दहाव्या पावलावर मागें ओढून थांबविलें आणि त्याला स्थिर केल्यावर कांचनमाला धारण करणाऱ्या अर्जुनानें मोठ्या प्रेमानें प्रणिपात करून म्हटलें—"हे केशवा, आम्हां पांडवांची गति तूंच आहेस. यास्तव हा क्रोध सोडून दे. मीं प्रतिज्ञा केलेलें कर्म कदापि टाकणार नाहीं, हें मी तुला माझे पुत्र व भ्राते यांची शपथ घेऊन सांगतों. तूं मला प्रयुक्त केल्याप्रमाणें मी कौरवांचा अन्त करीन, हें निश्चित समज."

धनंजयाची ही प्रतिज्ञा व निश्चय ऐकून जनार्दन प्रसन्न झाला व पांडवांचें प्रिय करण्यांत सर्वदा तत्पर असलेला तो आपल्या हातांतील चक्रासह पुनः रथांत येऊन बसला. त्या शत्रूंचा नाश करणाऱ्या शौरीनें अश्वांचे रश्मि पुनः हातांत घेतले व आपला पांचजन्य शंख वाजवून त्याच्या ध्वनीनें सर्व दिशा निनादित केल्या. त्यावेळीं कुंडलादि भूषणांनीं शोभणाऱ्या त्या कमलपत्राक्षानें

शंख हातीं घेतलेला पाहून कुरुश्रेष्ठ आक्रोश करूं लागले व कौरवांच्या त्या सैन्यांत मृदंग, भेरी, पणव इत्यादि वाद्यांचा उग्र निनाद व सिंहनाद झाला. त्यावेळीं गांडीव धनुष्याच्या टणत्कारानें व पार्थाच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं सर्व दिशा आणि नभोमंडल व्यापून टाकिलें. तें पाहून तो कौरवाधिप भीष्म व भूरिश्रवा यांच्यासह तृणाला दग्ध करणाऱ्या धूमकेतूप्रमाणें त्या पांडवावर धांवून गेला. भूरिश्रव्यानें अर्जुनावर सात भल्लबाण सोडिले. दुर्योधनानें त्याच्यावर उग्र वेगवान् तोमर, शल्यानें गदा व भीष्मानें शक्ति फेंकली.

तेव्हां अर्जुनानें भूरिश्रवानें सोडलेल्या सात बाणांचे सात शरांनीं तुकडे करून टाकिले. दुर्योधनाचें तोमर तीक्ष्ण धारेच्या बाणानें तोडून टाकिलें. शान्तनवानें सोडलेल्या विद्युल्लतेसारख्या चकचकीत शक्तीचा व मद्रानें फेंकलेल्या गदेचा दोन शरांनीं छेद केला. नंतर त्या किरीटमालीनें आपल्या दृढ बाहूंनीं गांडीव धनुष्य आकर्ण ओढलें व त्याला अतिशय घोर माहेंद्रास्त्र यथाविधि जोडून अंतरिक्षांत प्रकट केलें. त्या अद्भुत अस्त्रापासून अग्नीप्रमाणें प्रज्वलित बाणजाल उत्पन्न होऊन त्यांनीं सर्व कुरुसैन्याचें निवारण केलें. पार्थाच्या श्रेष्ठ धनुष्यापासून सुटलेल्या त्या शरांनीं शत्रूंचे रथ, ध्वज, धनुष्यें व बाहु यांचें विदारण करून नृपाल, अश्व व गज यांच्या देहांत प्रवेश केला. त्यानंतर पार्थानें आपल्या सुतीक्ष्ण धारेच्या शरांनीं दिशा व उपदिशा व्यापून टाकिल्या व गांडीवाच्या टणत्कारानें शत्रूंचीं मनें व्याकुल करून सोडलीं.

गांडीवाचा घोर टणत्कार होत असतां त्याच्या प्रचंड ध्वनींत शंख-दुन्दुभींचा निःस्वन लोपून गेला. गांडिवाचा टणत्कार कानीं पडतांच विराट, द्रुपद इत्यादि प्रमुख वीर त्या प्रदेशांत धांवत आले. परंतु जेथून जेथून गांडीवाचा ध्वनि ऐकूं येत होता, तेथें तेथें कौरवसैन्य मात्र पुढें सरसावण्यास धजलें नाहीं. ( तें जागच्या जागीं खिळलें. ) याप्रमाणें नृपांचा घोर संहार होत असतां नाराच बाणांनीं रथ, अश्व व सूत यांसह श्रेष्ठ योद्ध्यांना हत करून त्यांच्या सुवर्णकक्षायुक्त महापताका खालीं पाडविल्या. गांडीवाच्या शरजालांनीं प्रमुख वीर, रथ, अश्व व सारथि यांचा संहार केला. अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं मोठाल्या पताका व झुली यांनीं युक्त असलेले गज विदीर्ण होऊन भूमीवर पडत होते. सैन्याच्या पुरोगामी उभारलेले ध्वज, पदातींचे संघ, रथ, गज या सर्वांचें पार्थानें मर्दन केलें. अर्जुनाच्या महान् ऐंद्रास्त्रापासून सुटणाऱ्या शरांनीं

शत्रूंकडील वीरांचीं कवचें व शरीरें विदीर्ण झालीं व ते गतप्राण होऊन पडले. गज आणि अश्वहि गात्रांचा संकोच होऊन भूमीवर निश्चेष्ट होऊन पडत होते.

(३) त्यानंतर हे महाराज, धनंजयानें मेद, मांस, यांनीं युक्त असलेली रक्ताची नदीच त्या रणांगणांत प्रवृत्त केली. त्या नदीवर हिंस्र पशु व राक्षस मांसाशन करीत होते. ती भयंकर नदी लोकांना प्रतिवैतरणीच भासली. अर्जुनाच्या बाणजालांनीं निर्माण झालेली ती रुधिराची नदी आणि जिच्यांतील प्रमुख वीरांचा पार्थानें वध केला आहे, अशी ती कौरवसेना यांना पाहून चेदि, पांचाल, करूष, मत्स्य व सर्व पांडव यांनीं जयघोष केला. विजयप्राप्तीनें त्यांचा उत्साह अधिकच वाढला व त्यांची ती रणगर्जना ऐकून कौरवांचे योद्धे अतिशय त्रस्त झाले. मृगांच्या कळपाला भयभीत करणाऱ्या सिंहाप्रमाणें पार्थानें कौरवांच्या सेनेला भयत्रस्त करून त्यांच्या प्रमुख वीरांनाहि गतप्राण केलेले पाहून जनार्दनानें जयाची गर्जना केली. त्याच्या बरोबर अर्जुनानेंहि मोठ्यानें सिंहनाद केला.

( ४ ) त्यावेळीं सहस्ररश्मि भानु आपलें रश्मिजाल आंवरून अस्ताचलाकडे चालला आहे, पण युगान्तासारखें असलेलें घोर ऐंद्रास्त्र मात्र अंतरिक्षांत तसेंच पसरलेलें आहे, हें पाहून कौरवसेनेसह भीष्म, द्रोण, दुर्योधन, बाह्लिक इत्यादि सर्व प्रमुख वीर रणांगणांतून परत फिरले. तेव्हां अस्ताला जाणारें रविमंडल आरक्त झालें असून निशा समीप येऊं लागली आहे, शत्रु पराभूत होऊन आपला विजय झाला आहे, हें पाहून यश व कीर्ति यांस प्राप्त झालेला धनंजयहि आपलें त्या दिवसाचें कार्य संपवून सर्व नरेंद्र व भ्राते यांसह रात्रीची विश्रांति घेण्यासाठीं आपल्या शिबिरांत गेला.

त्यावेळीं कौरवसैन्यांतील वीर अर्जुनाच्यानें पराभव पावून हातांत मोठाल्या प्रदीप्त उल्का ( मशाली ) घेऊन आपल्या निवासस्थानाकडे परतले. ते सर्व 'आज अर्जुनानें दहा सहस्र रथी व सातशें गज यांचा वध करून सर्व प्राच्य, सौवीर, क्षुद्रक व मालववीर यांना गतप्राण केलें. साक्षात् भीष्म, द्रोण, कृप, जयद्रथ, बाह्लिक, भूरिश्रवा, शल, शल्य, श्रुतायु, अंबष्ठपति, दुर्योधन, दुर्मर्षण यांसहि आपल्या बाहुबलानें जिंकलें व अद्भुत कर्म केलें. असा पराक्रम करण्यास

१ अशा प्रकारच्या नदीचें रूपकात्मक वर्णन मागें अनेकदां सविस्तर आलेलें आहे. यास्तव येथें त्याचा संक्षेप केला आहे.

यालोकीं अन्य कोणीहि समर्थ नाहीं.' अशी प्रशंसा करीत अर्जुनानें त्रस्त केलेल्या त्या सर्व कौरवांच्या योद्धयांनीं आपापल्या शिबिरांत प्रवेश केला. ६. ४. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ भीष्म व अर्जुन यांचें युद्ध. ]

( १ ) संजय—हे धृतराष्ट्र महाराज, ती रात्र उलटून प्रभात झाली असतां क्रुद्ध झालेला भीष्म आपल्या सर्व सैन्यानें आवृत्त होऊन सैन्याच्या अग्रभागीं आला. तेव्हां द्रोण, दुर्योधन, बाह्लिक, दुर्मर्षण, चित्रसेन, जयद्रथ व आपापल्या सैन्यांसह सर्व नृपाल त्याला परिवेष्टित करून निघाले. त्यावेळीं त्या सर्व तेजस्वी व वीर्यवान् महारथांनीं परिवेष्टित झालेला तो पितामह देवांनीं आवृत्त झालेल्या वज्रपाणि इंद्राप्रमाणें शोभला. त्याचप्रमाणें सैन्याच्या अग्रभागीं असलेल्या महागजांच्या स्कंधावर ज्यांच्या सुवर्णाच्या व रुप्याच्या दांड्या चकाकत आहेत, अशा श्वेत, पीत व रक्त वर्ण महापताका अतिशय शोभा देत होत्या. महारथ, गज व अश्व यांनीं युक्त असलेलें व भीष्मानें संरक्षण केलेलें तें कौरवसैन्य वर्षाऋतूंतील व विद्युत्युक्त गर्जना करणाऱ्या मेघांनीं व्यापलेल्या आकाशाप्रमाणें भासलें.

त्यानंतर भयंकर वेगवान् नदीप्रमाणें असलेली ती भीष्माभिरक्षित कौरवसेना अर्जुनावर चाल करून गेली. तेव्हां गज, अश्व, पदाति व रथांचा संघ यांनीं युक्त असलेली व विशेष प्रकारचा व्यूह रचून येत असलेली ती कौरवसेना अर्जुनानें दूरून पाहिली. तेव्हां शुभ्र अश्वांच्या रथांत बसलेला तो कपिध्वज वीर सर्व शत्रूंचा वध करण्याच्या इच्छेनें त्या सैन्यावर धांवून गेला. त्याच्या रथाचीं चक्रें उत्कृष्ट असून त्यांच्या दांड्या चर्मानें मढविलेल्या होत्या. यदुश्रेष्ठानें ज्यांचें नियमन केलें आहे अशा श्वेताश्वांनीं व कपिध्वजानें युक्त असलेला पार्थाचा रथ येत आहे, असें पाहून तुझ्या पुत्रांसह सर्व कौरव खिन्न झाले.

धर्मराजानें जो अद्भुत व्यूह रचिला होता, त्याच्या चारी बाजूला चार चार हजार गज असून महारथ किरीटी शस्त्र उगारून त्याचें रक्षण करीत होता. असा अद्भुत व्यूह भूलोकीं पूर्वीं कोणीं रचला नव्हता, पाहिला नव्हता, किंवा ऐकलाहि नव्हता.

त्यानंतर चेदि व पांचाल आपल्या प्रमुख वीरांसह आपापल्या नियत स्थलीं उभे राहिले व सहस्रावधि भेरी वाजवूं लागले. त्यावेळीं सर्व सैन्यांत शंख, रथचक्राचे घोष, सिंहनाद व वीरांनीं आकर्ण ओढलेल्या धनुष्यांचे टणत्कार यांचा निनाद होऊं लागला. त्या वाद्यांच्या घोषानें सर्व अंतरिक्ष दुमदुमून गेलें व तें भूमीवरून उडालेल्या धूळीनें आवृत्त झाले. एका रथ्यानें सारथि, अश्व, रथ व केतु यांसह दुसऱ्या रथ्याला खालीं पाडविलें. गजांनीं गजांना, पदातींनीं पदातींना, अश्वसादींनीं अश्वसादींना प्रहार करून गतप्राण केलें. त्यावेळीं कांहीं योद्धे विद्ध होऊन भूमीवर पडले होते, ते छिन्न-भिन्न झालेले वीर भयंकर दिसत होते. सूर्याप्रमाणें तेजस्वी व सुवर्णाच्या तारांनीं अलंकृत केलेलीं कवचें, भाले व खड्गें यांचे तुकडे होऊन रणांगणांत सर्वत्र पसरले होते. कांहीं योद्धे हत्तींच्या दांतांच्या आघातांनींच आपल्या सारथ्यांसह भूमीवर पडले. उलटपक्षी कांहीं मत्तगज रथ्यांच्या शरांनीं विह्वल होऊन गडबडां लोळूं लागले. कित्येक पदाति हत्तींच्या समुदायांत सांपडून त्यांच्या पदाघातांनीं चिरडून व दंतप्रहारांनीं विद्ध होऊन आक्रोश करीत होते. त्यांचें तें विह्वलणें ऐकूनच कांहीं लोक भयभीत होऊन भूमीवर पडले.

याप्रमाणें अश्वसादी व पदाति यांचा घनघोर संग्राम चालला असतां अनेक गज, रथ व अश्व रणांगणांतून पळून जाऊं लागले. इतक्यांत महारथांनीं परिवेष्टित असलेल्या पितामह भीष्माची दृष्टि कपिध्वज किरीटीकडे वळली. त्यावेळीं त्याच्या रथाला श्रेष्ठ अश्व जुंपलेले असल्यामुळें ते अतिशय वेगानें धांवत होते. त्या रथावरील तालध्वज पांच ताड उंचीचा होता व त्या रथांत बसलेला गांगेय दिव्य अस्त्रांच्या योगानें विद्युल्लतेप्रमाणें चमकत होता. अशा प्रकारचा तो शान्तनव अर्जुनावर धांवून आला. त्याचप्रमाणें द्रोणादि वीरहि इंद्रतुल्य पराक्रमी पार्थावर तुटून पडले व कृप, शल्य, विविंशति, दुर्योधन व सौमदत्ति हेहि त्यांस अनुसरले.

तें पाहून अर्जुनाचा पराक्रमी पुत्र अभिमन्यु त्यांच्यावर अतिशय वेगानें धांवला. त्यावेळीं त्या सर्वास्त्रवेत्त्या वीरानें विचित्र नक्षीकाम केलेलें सोनेरी कवच धारण केलें असून त्या महारथ्यानें शत्रूंच्या महान् अस्त्रांचें तत्काल

---

१ युद्धांचें अशा प्रकारचें वर्णन पूर्वी अनेकदां येऊन गेल्यामुळें त्यांचा येथें संक्षेप केला आहे.

निवारण केलें. तो असह्य पराक्रमी सौभद्रेय रणांमध्यें आपलें तेज प्रकट करीत असतां मंत्राहुतीनें प्रज्वलित केलेल्या यज्ञवेदींतील प्रदीप्त अग्नीप्रमाणें भासला.

सौभद्रेयाचा तो पराक्रम पाहून भीष्मानें तत्काल शत्रूंच्या रक्ताची नदी निर्माण केली व अभिमन्यूला सोडून तो अर्जुनाकडे वळला. तेव्हां पार्थानें आपल्या अद्भुत पराक्रमी गांडीवाला तीक्ष्ण धारेचे विपाठ बाण जोडिले व भीष्माच्या महा अस्त्रजालाचा नाश केला व त्यानंतर पितामहावर शरांची वृष्टि चालविली. भल्ल बाणांनीं त्याला आच्छादून टाकिलें. त्यावेळीं पराक्रमी भीष्मानेंहि सूर्य जसा अंधकाराला नाहींसा करितो, त्याप्रमाणें अर्जुनाचें शर-जाल विशीर्ण करून टाकिलें. याप्रमाणें त्या उभयतां भीष्म-धनंजयाचें तें द्वैरथ युद्ध चाललें असतां धनुष्यांचे प्रचंड टणत्कार होत होते. असें तें अद्भुत युद्ध कुरु, सृंजय व इतर लोक यांच्या दृष्टीं पडलें. १. ४. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ धृष्टद्युम्नानें केलेला सांयमनिपुत्रवध. ]

( १ ) **संजय**—हे मारिषा, याप्रमाणें एकीकडे भीष्मार्जुनाचें युद्ध चाललें असतां दुसरीकडे अश्वत्थामा, भूरिश्रवा, शल्य, चित्रसेन व सांयमनीचा पुत्र या पांच वीरांनीं सौभद्राचें निवारण केलें. त्यावेळीं तो तेजस्वी बालवीर पांच हत्तींच्या बरोबर झुंजणाऱ्या सिंहाच्या छाव्याप्रमाणें लोकांना भासला. तो एकटा राजपुत्र पांच मनुजव्याघ्रांशीं निर्भयपणें युद्ध करीत होता. त्या सौभद्रे-याचें शौर्य, पराक्रम, शस्त्रास्त्रांतील प्रावीण्य व हस्तलाघव यांत त्याच्या सदृश एकहि वीर तेथें नव्हता.

याप्रमाणें सज्ज होऊन युद्ध करणाऱ्या आपल्या पुत्राचा पराक्रम पाहून अर्जुनानें हृष्ट चित्तानें सिंहनाद केला. त्यावेळीं हे राजेंद्रा, तुझ्या पौत्रानें शत्रुसैन्याला त्रस्त केलेलें पाहून कौरववीरांनीं त्याला वेढून टाकिलें. परंतु तो सौभद्रेय निर्भयपणें त्यांच्यावर चालून गेला. शत्रूंशीं युद्ध करीत असतां त्या अलौकिक पार्थपुत्राचें आदित्यासारखें तेजस्वी धनुष्य मोठ्या वेगानें बाणांची वृष्टि करीत असलेलें दिसत होतें. त्या अमित पराक्रमी वीरानें एका बाणानें अश्वत्थाम्याला व पांच बाणांनीं शल्याला वेध केला आणि आठ बाणांनीं सांयम-नीच्या ध्वजाचा छेद केला. तेव्हां सौमदत्तीनें त्याच्यावर सुवर्णदंडानें युक्त अस-

लेली सूर्यतुल्य शक्ति सोडली. पण अभिमन्यूनें एकाच तीक्ष्ण बाणानें तिचें निवारण केलें.

शल्यानें त्या सौभद्रावर अतिशय वेगवान् शर सोडिले, परंतु आर्जुनीनें एकाच तीक्ष्ण बाणानें त्याच्या चारी अश्वांना गतप्राण केलें. तें पाहून भूरिश्रवा, शल्य, द्रौणि, सांयमनि व शल हे सर्व भयभीत झाले. अभिमन्यूच्या बाहुबलापुढें ते सर्व हतबल झाले. तेव्हां हे राजेंद्रा, धनुर्वेदवेत्ते व युद्धांत अजिंक्य असलेले केकय, मद्र व त्रिगर्त यांनीं तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें पंचवीस हजार योद्धयांसह अभिमन्यू व किरीटी यांस वेढा दिला.

इतक्यांत त्या पिता-पुत्रांस शत्रूनें वेढलें आहे, असें अरिंदम पांचालानें पाहिलें व तो सेनापति सहस्रावधि गज, अश्व, पदाति व रथसमूह यांसह मोठ्या क्रोधानें निघाला. त्यानें आपल्या सैन्याला शत्रूंवर चाल करण्याची आज्ञा केली. आपलें धनुष्य आकर्ण ओढलें व तो मद्रसैन्यावर व केकयांवर धांवून गेला. त्यावेळीं त्या कीर्तिमान् धनुर्धर सेनापतीनें रक्षण केलेलें तें रथ, गज व अश्व यांनीं युक्त असलेलें सैन्य शत्रूंवर चाल करून जात असतां फार शोभलें. त्या पांचाल कुलवर्धन धृष्टद्युम्नानें अर्जुनाच्या संमुख येणाऱ्या शारद्वत कृपाच्या वक्षःस्थलावर तीन बाण सोडिले. दहा मद्रकांचा दहा शरांनीं वध केला व कृतवर्म्याच्या पृष्ठरक्षकाला एक भल्ल बाण सोडून तत्काल गतप्राण केलें. महात्म्या पौरवाचा पुत्र ' दमन ' यास नाराच बाणाच्या तीक्ष्ण अग्रानें यमलोकीं पाठविलें. तेव्हां शलाच्या पौत्रानें त्या युद्धदुर्मद पांचालावर तीस बाण सोडिले व त्याच्या सारथ्याला दहा बाणांनीं विद्ध केलें. याप्रमाणें त्या सांयमनीच्या पुत्रानें महाधनुर्धर धृष्टद्युम्नाला विद्ध केलें असतां तो अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें संतापानें जिभल्या चाटल्या व एक भल्ल बाण सोडून त्या शलपुत्राचें धनुष्य तोडून टाकिलें. त्याच्यावर पंचवीस बाण सोडिले व त्याच्या अश्वांसह दोन्ही पृष्ठरक्षकांना यमसदनीं पाठवून दिलें.

तेव्हां त्या अश्वरहित रथांतूनच त्या शलपौत्रानें पांचालपुत्राकडे पाहिलें, हातांत अतिशय तीक्ष्ण धारेचें खड्ग धारण केलें व तो रथांतून उडी टाकून रथस्थ धृष्टद्युम्नावर पायांनींच धांवून गेला. त्यावेळीं तो सांयमनिपुत्र महा जलौघाप्रमाणें किंवा अंतरिक्षांतून पडणाऱ्या सर्पाप्रमाणें भासला. गजाप्रमाणें मत्त असलेला तो वीर सूर्याप्रमाणें त्या रणांगणांत प्रकाशत होता. त्यानें

आपलें तीक्ष्ण धारेचें खड्ग मोठ्या वेगानें कोशांतून बाहेर ओढलें असतां तो वीर जगाचा संहार करणाऱ्या अंतकाप्रमाणें शोभला. तेव्हां आपल्या शराचा वेध चुकवून तो सांयमनीचा पुत्र हातांत तीक्ष्ण खड्ग व ढाल घेऊन आपल्याला येऊन भिडत आहे, हें पाहून क्रुद्ध झालेल्या पांडवांच्या सेनापतीनें गदाघातानें त्याचें मस्तक तोडून टाकिलें. याप्रमाणें तो शलपौत्र हत झाला असतां त्याच्या हातांतील ढाल व तलवार मोठ्या वेगानें भूमीवर उडाली. तो राजपुत्र गदाघातानें मरण पावलेला पाहून धृष्टद्युम्नाला अतिशय संतोष झाला व तुझ्या सैन्यांत मोठा हाहाकार उडाला.

आपल्या पुत्राचा वध झालेला पाहून सांयमनि क्रोधसंतप्त होऊन मोठ्या वेगानें धृष्टद्युम्नावर धांवून गेला. त्यावेळीं ते दोघे युद्धदुर्मद वीर समरांगणांत परस्परांशीं भिडले असतां पांडव व कौरव मोठ्या विस्मयानें त्यांचें युद्ध पाहूं लागले. मत्त हत्तीवर अंकुशाचा जसा प्रहार करावा, तसें सांयमनीनें धृष्टद्युम्नाला तीन बाणांनीं विद्ध केलें व त्याच वेळीं शल्यानेंहि पार्षताच्या वक्षःस्थलावर जोरानें प्रहार केला आणि त्यांचें तुमुल युद्ध सुरू झालें. ६. ४. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ भीमाचें युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, ज्याअर्थीं पांडवांच्या सैन्याकडून माझ्या सैन्याचा नित्य नाश होत आहे, माझ्या पुत्रांचा संहार चालला आहे आणि पांडव मात्र अव्यग्र व हृष्ट दिसत आहेत, असें तूं सांगतोस, त्याअर्थीं पुरुषार्थापेक्षां दैवच श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. माझे पुत्र पुरुषार्थात पांडवांहून हीन प्रतीचे असून त्यांतील कोणी पडत आहेत, कित्येक पाडले जात आहेत व मारले जात आहेत, असेंच तूं सांगत आहेस. बा संजया, आपलें सर्व बल एकवटून युद्ध करणारे माझे पुत्र जयासाठीं इतका झटून यत्न करीत असतां पांडवांचाच जय होत आहे व माझे पुत्र पराभव पावत आहेत, असें कां व्हावें ! या दुर्योधनाच्या कृतीमुळें मी आजवर अनेक दुःसह व तीव्र दुःखें सहन करीत आलों. मी पुष्कळ विचार करितों, परंतु ज्याच्या योगानें पांडवांचा पराजय होईल व माझे पुत्र विजयी होतील, असा एकहि उपाय मला दिसत नाहीं. हे संजया, तूं तरी कांहीं उपाय सुचीव.

(२) संजय—हे राजन्, हा सर्व तुझ्याच महान् अपराधाचा परिणाम आहे. त्याला आतां उपाय कोण करूं शकणार! हा जो गज, अश्व, रथ व मनुष्यें यांचा भयंकर क्षय होत आहे, त्याचें मी यथार्थ वर्णन करतों, तें लक्षपूर्वक ऐक. शल्यानें धृष्टद्युम्नाला नऊ बाणांनीं पीडिलें असतां त्यानें क्रुद्ध होऊन उलट त्या मद्रपतीला लोखंडी बाणांनीं पीडा दिली. त्यावेळीं त्याचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. पण शल्यानें क्षणार्धांत त्या बाणांचें निवारण केलें. परस्परांशीं भिडलेल्या त्या दोघां रथिश्रेष्ठांत घटकाभर कांहींच अंतर दिसत नव्हतें. तथापि शल्यानें तीक्ष्ण बाणानें पार्षताचें धनुष्य तोडलें व वर्षा ऋतूंत जलवृष्टीनें पर्वतांस आच्छादून टाकणाऱ्या मेघाप्रमाणें त्यानें शरवृष्टीनें त्या पांचालास झांकून टाकिलें.

त्यावेळीं शल्य धृष्टद्युम्नाला शरजालानें पीडा देत आहे, हें पाहून अभिमन्यु क्रोधानें मद्राधीशावर धांवून गेला व त्यानें शल्याला तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. अभिमन्यूचें निवारण करण्यासाठीं तुझ्या पक्षांतील वीर शल्याच्या रथाकडे धांवले. हे राजा, तुझें कल्याण असो. दुर्योधन, विकर्ण, दुःशासन, विविंशति, दुर्मर्षण, दुःसह, चित्रसेन, दुर्मुख, सत्यव्रत व पुरुमित्र हे सर्व मिळून शल्याचें रक्षण करूं लागले. त्यावेळीं या दहा कौरव वीरांचें निवारण करण्यासाठीं क्रोधी भीमसेन, पार्षत धृष्टद्युम्न, पांच द्रौपदेय, अभिमन्यु व नकुल सहदेव असे पांडवांचेहि दहाच वीर पुढें सरसावले. ते परस्परांच्या वधेच्छेनें एकमेकांवर नानाप्रकारचीं शस्त्रें हृष्ट चित्तानें सोडीत होते. हे राजा, तुझ्याच दुष्ट मतीमुळें या दहा योद्धयांचें युद्ध जुंपलें होतें. ते उभय पक्षांतील दहा दहा रथी क्रुद्ध होऊन परस्परांवर तुटून पडले असतां इतर रथी त्यांचें युद्ध पहात स्वस्थ उभे राहिले. त्या महारथांनीं अनेकप्रकारच्या शस्त्रांचे परस्परांवर प्रहार केले. ते शस्त्रें सोडीत होते व एकमेकांस आह्वान करून शस्त्रप्रहार करीत होते. परस्परांच्या वधाच्या इच्छेनें ते क्रुद्ध होऊन स्पर्धेनें एकमेकांवर तुटून पडत होते. एकमेकांचा आप्तसंबंध विसरून जाऊन ते अमर्षी योद्धे प्रतिस्पर्ध्यांवर महास्त्रांचा प्रयोग करीत होते.

त्यावेळीं दुर्योधनानें क्रुद्ध होऊन धृष्टद्युम्नाला चार बाणांनीं विद्ध केलें. त्याचवेळीं दुर्मर्षणानें वीस, चित्रसेनानें पंचवीस, दुर्मुखानें नऊ, दुःसहानें सात, विविंशतीनें पांच व दुःशासनानें तीन बाण त्याच्यावर सोडिले. परंतु एकट्या धृष्टद्युम्नानें प्रत्येकावर पंचवीस बाण सोडून आपलें हस्तलाघव व्यक्त केलें.

अभिमन्यूनें सत्यव्रत व पुरुमित्र यांना दहा दहा बाणांनीं विद्ध केलें. माद्रीपुत्रांनीं आपल्या मातुलावर तीक्ष्ण बाण सोडिले. तो प्रकार खरोखर अद्भुतच झाला. तेव्हां शल्यानें त्या आपल्या दोघांहि भागिनेयांना बाणवृष्टीनें आच्छादित केलें. माद्रीपुत्रांशीं प्रतियुद्ध करणाऱ्या त्या मद्राधिपानें त्यांना शरजालांनीं इतकें व्यापून टाकिलें कीं, त्या दोघांस स्थानावरून हलतांहि येईना.

( ३ ) इकडे दुर्योधन भीमसेनाच्या दृष्टीं पडतांच, त्यानें कलहाचा अंत करणारी आपली गदा हातीं घेतली व तो महा बलाढ्य पांडव मोठ्या वेगानें दुर्योधनावर धांवला. त्यावेळीं कैलासशिखराप्रमाणें उभारलेली गदा घेऊन येणाऱ्या भीमसेनाला पाहून तुझ्या पुत्रांनीं भीतीनें पलायन केलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या दुर्योधनानें मागधाला सज्ज होण्याची आज्ञा केली. ती ऐकतांच दहा हजार वेगवान् गजांनीं युक्त असलेल्या सैन्यांसह मागध पुढें सरसावले. त्यांना पुढें करून दुर्योधन भीमावर चालून गेला. याप्रमाणें गज-सैन्यासह दुर्योधन चालून येत आहे, हें पहातांच भीमसेनानें आपली अति-शय जड असलेली लोखंडी गदा हातीं घेतली, सिंहासारखी गर्जना करीत तो रथांतून खालीं उतरला व अंतकाप्रमाणें त्या गजसैन्यावर धांवून गेला. तो महाबलाढ्य वृकोदर आपल्या गदाप्रहारांनीं गजसंघाचा संहार करीत वज्रधर इंद्राप्रमाणें त्या समरांगणांत संचार करूं लागला. त्याचा तो हृदय-विदारण करणारा प्रचंड सिंहनाद ऐकून गज भयभीत झाले व जागच्या जागीं स्थिर उभे राहिले.

इतक्यांत भीमसेनाचे पृष्ठरक्षक पांच द्रौपदेय, अभिमन्यु, नकुल-सहदेव व पार्षत धृष्टद्युम्न यांनीं त्या गजसैन्यावर शरांची वृष्टि केली. वीरांचा गजावर होणारा तो शरवर्षाव पर्वतावर जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें भासला. त्या पांडवांच्या श्रेष्ठ योद्ध्यांनीं क्षुरें, क्षुरप्र, भल्ल व आंजलिक इत्यादि अनेक प्रका-रच्या बाणांनीं गजयोद्ध्यांचीं मस्तकें तोडलीं. त्यावेळीं त्या योद्ध्यांचे अंकुश धरलेले हात, भूषणांनीं अलंकृत असलेले बाहु व शिरस्त्राणांनीं युक्त असलेलीं मस्तकें तुटून खालीं पडत असतां अश्मवृष्टीचा भास झाला. कांहीं गजयोधी

---

१ हे बाणांचे प्रकार आहेत. क्षुर म्ह० ज्याची धार वस्तऱ्यासारखी आहे. क्षुरप्र म्ह० ज्याचीं अग्रें घोड्याच्या नालासारखीं आहेत असे. भल्ल म्ह० रुंद अग्रांचे व आंजलिक म्ह० अर्धचंद्राकार अग्रांचे.

मस्तकें तुटून पडल्यावरहि ते तसेच गजपृष्ठावर बसून राहिले असतां पर्वतावरील भग्नशिखरें झालेल्या वृक्षांप्रमाणें शोभले. शिवाय धृष्टद्युम्नानें पाडलेले व पाढविलेले अनेक महागज आमच्या दृष्टीं पडले.

हे राजन्, इतक्यांत मागधराजानें त्या रणांगणांत आपला ऐरावतासारखा विशाल गज सौभद्राच्या रथावर घातला. तो मागधाचा महागज आपल्या अंगावर येत आहेसें पाहून सौभद्रानें एकाच बाणानें त्याचा वध केला आणि दुसरा एक बाण सोडून त्या मागधराजालाहि गतप्राण केलें. भीमसेनानें त्या गजसैन्यांत प्रवेश करून, इंद्र जसा वज्रानें पर्वतांना विदीर्ण करितो, तसा आपल्या गदाघातानें गजांचा संहार चालविला. वज्राघातानें चूर्ण होणाऱ्या पर्वताप्रमाणें भीमाच्या एकाच प्रहारानें गतप्राण होऊन पडलेले असंख्य हत्ती त्या रणांगणांत दिसत होते. कांहींचे दांत तुटले होते, कांहींचीं गंडस्थलें फुटलीं होतीं. कोणाच्या मांड्या भग्न झाल्या होत्या, कांहीं गतप्राण झाले होते, कित्येक चीत्कार करीत होते, कित्येक कंबर मोडून बसले होते, कांहीं रणांगणांतून पराङ्मुख होऊन—तोंड फिरवून उभे होते, कांहीं पळत होते, कांहीं भयभीत होऊन जागच्या जागीं देहधर्म करीत होते, कांहीं भीमसेनाच्या मार्गांतच पर्वतांप्रमाणें आडवे पडले होते, कित्येकांच्या मुखांतून रक्त व फेन वहात होता, तर कित्येक भग्न होऊन विह्वळत पडले होते, अशा प्रकारचे अनेक गज तेथें मला दिसले.

हे महाराज, त्यावेळीं भीमसेन त्या हत्तींचें रक्त व मेद यांनीं माखला होता. त्यांची वसा व मज्जा सर्वांगावर उडाली होती व तो हातांत गदा घेऊन दंडधर कालाप्रमाणें त्या रणांगणांत संचार करीत होता. रक्तानें माखलेली गदा धारण करून फिरणारा तो वृकोदर पिनाकपाणि शंकराप्रमाणें विकराल व भयानक दिसत होता. याप्रमाणें तो मध्यम पांडव हत्तींचा संहार करीत चालला असतां अनेक गज भयार्त होऊन पळत सुटले व ते आपल्याच सैन्याला पायांखालीं तुडवीत चालले. भीमसेन युद्ध करीत असतां इंद्राचें रक्षण करणाऱ्या देवांप्रमाणें सौभद्रादि वीरांनीं त्याचें रक्षण केलें. रक्तानें माखलेली गदा धारण करणारा भीम त्यावेळीं कृतान्त कालाप्रमाणें घोर दिसूं लागला. हातांत गदा घेऊन सर्व दिशांत संचार करणारा तो नृत्य करणाऱ्या साक्षात् शंकराप्रमाणें भासला. त्याची गदा कालदंडाप्रमाणें दृढ व इंद्राच्या वज्राप्रमाणें निस्वन करणारी होती. त्याची ती केंस-मज्जांनीं

लिप्त झालेली गदा क्रुद्ध होऊन पशूंचा वध करणाऱ्या रुद्राच्या पिनाकधनुष्यासारखी क्रूर भासली. पशुपाल जसा आपल्या काठीनें सर्व पशूंचा समुदाय हांकीत नेतो, तसा भीमसेन आपल्या गदेनें सर्व गजसैन्याला बडवीत होता. ते गज भीमाच्या गदेनें व इतर वीरांच्या बाणांनीं विद्ध होत असतां तुझ्या सैन्याला तुडवीत पळत सुटले. त्यावेळीं हे राजा, महावायूनें मेघांना जसें उडवून द्यावें, त्याप्रमाणें तुझे सर्व गज उधळून देऊन तो भीमसेन श्मशानांत उभ्या रहाणाऱ्या शंकराप्रमाणें त्या सैन्याच्या मध्यभागीं उभा राहिला. ६. ४. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ भीमानें केलेला कौरवांच्या गजसैन्याचा संहार. २ भीमाचें भीष्माशीं युद्ध. ]

( १ ) संजय—हे राजा, याप्रमाणें कौरवांच्या गजसैन्याचा संहार होत असतां तुझ्या दुर्योधन पुत्रानें 'भीमसेनाचा वध करा' अशी आपल्या सर्व सैनिकांस आज्ञा केली. तेव्हां तुझ्या पुत्राची ही आज्ञा ऐकतांच सर्व सैन्य भयंकर गर्जना करीत भीमसेनावर धांवून गेलें. देवांनाहि दुःसह असलेल्या बलाढ्य भीमावर तो बलौघ धांवून आला असतां पर्वकालीं दुस्तर असलेल्या समुद्राप्रमाणें भासला. ती प्रचंड सेना अश्व, गज व रथ यांनीं व्याप्त होती. शंख-दुंदुभींचा सारखा निनाद चालला होता. तिच्यामध्यें अनंत रथ व पदाति होते. ती सर्वथा धूलीनें आच्छादित झाली होती. ती प्रचंड सेना अपार समुद्राप्रमाणें चालून आली असतां त्या अक्षोभ्य सेनासागराचें भीमसेनानें वेलेप्रमाणें सहज निवारण केलें. हे राजन्, त्यावेळीं त्या महात्म्या पांडवाचें आश्चर्यकारक अतिमानुष कर्म आमच्या दृष्टीं पडलें. त्यानें यत्किंचित्‌हि भ्रांत न होतां अश्व, गज व रथ यांसह धांवून येणाऱ्या सर्व नृपालांचें आपल्या गदेनें निवारण केलें. अशाप्रकारें तो रथिश्रेष्ठ त्या अलोट बलौघाचें गदेनें निवारण करून मेरुपर्वताप्रमाणें त्या समरांगणांत अचल उभा राहिला.

तथापि त्या परम दारुण प्रसंगीं अतिशय भय उत्पन्न झालें असतांहि भीमसेनाचे भ्राते, पुत्र, धृष्टद्युम्न, द्रौपदेय, अभिमन्यु व शिखंडी हे पांडववीर भीमाला सोडून दूर गेले नाहींत. त्यानंतर तो बलाढ्य वृकोदर आपली अतिशय जड कोखंडी गदा घेऊन दंडधर अंतकाप्रमाणें तुझ्या योद्ध्यांवर धांवून गेला.

तो पार्थ कालाप्रमाणें रणांत संचार करीत असतां शत्रुसैन्याचा भयंकर संहार झाला. त्या अजिंक्य वीरानें रथसमूह व अश्वसमूह यांचें मर्दन केलें. आपल्या बाहुवेगानेंच कांहींना चिरडून टाकिलें. मांड्यांच्या वेगानें कित्येकांना भूमीवर लोळविलें. हत्ती जसा वेळूंना कडाकड मोडून टाकितो, तसा त्या वीरानें तुझ्या सैन्याचा चुराडा आरंभिला.

महावायु मोठाल्या वृक्षांचें जसें उन्मूलन करितो, तसा हा वायुपुत्र आपल्या गदाघातानें रथस्थ वीरांचा रथांतल्या रथांतच संहार करूं लागला. महाबाहूनें गजारोहींना गजपृष्ठांवरच यमसदनीं पाठविले, अश्वसादींना अश्वांवरच गतप्राण केलें व पदातींचा वध करून त्यांना भूमीवर पाडविलें. त्यावेळीं त्याची ती अश्वगजांचा वध करणारी गदाहि वसा, मज्जा, रक्त व मांस यांनीं माखल्यामुळें अतिशय भयानक दिसत होती. सर्वत्र अश्व, गज व नर यांचे छिन्न-विछिन्न झालेले मृतदेह पसरल्यामुळें तें रणांगण यमालयासारखें भासत होतें व भीमसेनाची ती गदा पशूंचा संहार करणाऱ्या रुद्राच्या पिनाकाप्रमाणें, किंवा यमाच्या कालदंडाप्रमाणें, अथवा इंद्राच्या वज्राप्रमाणेंच घोर भासली. तो महात्मा कुंतीपुत्र आपल्या त्या भयंकर गदेनें शत्रुसैन्याचा संहार करीत चालला असतां त्याचें तें उग्र रूप प्रलयकालच्या अंतकाप्रमाणें शोभलें. त्या फार मोठ्या सैन्याला पुनः पुनः पळवून लावणारा भीमसेन येत असलेला पाहून 'आपला मृत्युच येत आहे' असें मानून सर्व योद्धे खिन्न दिसत होते. तो बलाढ्य भीम आपली प्रचंड गदा उगारून जेथें जेथें वळत होता, तेथें तेथें सर्व सैन्य विदीर्ण झालेलें दिसत होतें.

( २ ) याप्रमाणें तो पांडव आपली महागदा धारण करून अमित पराक्रमानें सैन्याचें विदारण करीत असतां व मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें सैन्याला ग्रासीत असतां भीष्माचें लक्ष त्याच्याकडे गेलें. तेव्हां तो पितामह मोठ्या वेगानें भीमावर धांवला. त्या शान्तनवाचा रथ सूर्यासारखा तेजस्वी होता. त्याच्या रथाचा मेघाप्रमाणें निस्वन होत होता. अशा श्रेष्ठ रथांत बसून भीष्मानें पर्जन्याप्रमाणें शरवृष्टि करून भीमाला आच्छादून टाकिलें. तेव्हां मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें येत असलेल्या त्या पितामहाला पाहून अमर्षी भीमसेन मोठ्या क्रोधानें पुढें सरसावला.

त्यावेळीं शिनिप्रवीर सात्यकि भीमाच्या साह्यार्थ धांवला. त्यानें तुझ्या पुत्राच्या सैन्याला कांपवीत व आपल्या दृढ धनुष्यानें शत्रूंचा वध करीत पिता-

महार्चे निवारण केलें. तो सात्यकि आपल्या रजततुल्य शुभ्र अश्वांच्या रथांत बसून तीक्ष्ण शर सोडीत असतां तुझ्या सैन्यांतील एकहि योद्धा त्याचें निवारण करण्यास समर्थ झाला नाहीं. तें पाहून अलंबुष राक्षसानें सात्यकीवर दहा शर सोडून त्याला विद्ध केलें. परंतु सात्यकीनें उलट चार बाणांनीं वेध करून त्याच्या रथावर चाल केली. तो वृष्णिश्रेष्ठ सात्यकि शत्रुसैन्यांत संचार करून कुरुश्रेष्ठांना पुनः पुनः रणांगणांतून पळवून लावीत होता. मोठमोठ्यानें सिंहनाद करीत होता. तो वीर पुनः आपल्यावर चाल करून येत आहे, असें पाहून पर्वताला जलधारांनीं आच्छादित करणाऱ्या मेघसमूहाप्रमाणें तुझ्या वीरांनीं त्याला शरजालांनीं आच्छादून टाकिलें. तथापि मध्याह्नीं तळपणाऱ्या सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेल्या त्या तेजस्वी वीराला ते झांकूं शकले नाहींत. त्यावेळीं एकट्या सोमदत्ताच्या पुत्रावांचून तेथें असलेले सर्व वीर खिन्न झाले. तो सौमदत्ति भूरिश्रवा मात्र आपल्या सैन्याचा पराभव होत आहे, असें पाहून सात्यकीशीं युद्ध करण्यासाठीं आपलें धनुष्य घेऊन पुढें सरसावला. ६.४.६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ भीमाचें दुर्योधनाशीं युद्ध. २ धार्तराष्ट्रांचा वध. ३ घटोत्कचाचा पराक्रम. ४ चतुर्थदीन युद्ध समाप्ति. ]

( १ ) संजय—हे राजन्, त्यानंतर महागजाला अंकुशानें जसें टोंचावें तसें क्रुद्ध झालेल्या भूरिश्रवानें सात्यकीला नऊ बाणांनीं विद्ध केलें. परंतु सात्यकीनें सर्व लोकांच्या समक्ष नतपर्व बाणांनीं त्या कौरवाच्या शरांचें निवारण केलें. तें पाहून भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेल्या दुर्योधनानें सज्ज होऊन सौमदत्तीला वेढून त्याचें सर्वतः रक्षण केलें. त्याचप्रमाणें सर्व पांडवहि सात्यकीला सर्व बाजूंनीं वेढून उभे राहिले. क्रुद्ध झालेल्या भीमसेनानें गदा उगारून दुर्योधनादि तुझ्या सर्व पुत्रांचें निवारण केलें.

त्यावेळीं तुझा अमर्षी पुत्र नंदक हजारों रथ्यांसह भीमावर धांवून आला. त्यानें तीक्ष्ण धारेच्या विशिख बाणानें भीमसेनाला विद्ध केलें. दुर्योधनानेंहि क्रुद्ध होऊन भीमाच्या वक्षःस्थलावर नऊ तीक्ष्ण बाण सोडले. तेव्हां महाबाहु भीमसेन आपल्या श्रेष्ठ रथावर चढला व आपल्या रथश्रेष्ठ विशोक सारथ्याला म्हणाला—

" हे सूता, हे सर्व येथें जमलेले धार्तराष्ट्र शूर व महारथ आहेत. अतिशय क्रुद्ध झालेले ते या युद्धांत माझाच वध करण्यास उद्युक्त झाले आहेत. ज्याअर्थी ते सर्व सोदर भ्राते येथें एकत्र जमले आहेत, त्याअर्थी आमचा फार दिवसांचा मनोरथ आज सफल होईल, असें मला वाटत आहे. जेथें रथचक्रापासून उडालेली धूलि अंतरिक्षास जाऊन भिडली आहे, तेथेंच राजा सुयोधन सज्ज झालेल्या भ्रात्यांसह व मदोत्कट कुलपुत्रांसह उभा आहे, त्याचा मी आज तुझ्या समक्ष वध करीन यांत संशय नाहीं. यास्तव तूं सज्ज होऊन अतिशय दक्षतेनें माझ्या रथाश्वांचें नियमन कर. "

राजा, असें सारथ्याला सांगून त्या यशस्वी पार्थानें तुझ्या दुर्योधन पुत्राला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें व नंदकाच्या वक्षःस्थलावर तीन बाण सोडिले. तेव्हां दुर्योधनानें भीमाला सहा शरांनीं व त्याच्या विशोक सारथ्याला तीन तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें आणि हंसतच भीमाचें उग्र धनुष्य मुठीजवळच तोडून टाकिलें. दुर्योधनानें आपल्या सारथ्याला तीक्ष्ण बाणांनीं पीडिलेलें पाहून भीमसेन अतिशय संतप्त झाला, त्यानें तुझ्या पुत्राचा वध करण्याच्या इच्छेनें एक दिव्य धनुष्य हातीं घेतलें व तीक्ष्ण धारेच्या क्षुरप्र बाणांनीं दुर्योधनाचें श्रेष्ठ धनुष्य तोडून टाकिलें. तें पाहून दुर्योधनहि क्रुद्ध झाला, त्यानें तें तुटलेलें धनुष्य टाकून दिलें. दुसरें बलवत्तर धनुष्य घेतलें, त्यावर काल-मृत्यू-प्रमाणें तेजस्वी असलेला विशिख बाण जोडला आणि भीमाला वक्षःस्थलावर विद्ध केलें.

त्या तीव्र बाणाच्या वेदनेनें रथस्थ भीमसेन व्यथित होऊन तत्काल रथांतच खालीं बसला व बसल्याजागीं मूर्च्छित झाला. तेव्हां भीमसेनाला अशा प्रकारें व्यथित केलेलें पाहून अभिमन्युप्रभृति पांडवांच्या महारथांना तें सहन झालें नाहीं. त्यांनीं तुझ्या पुत्राच्या मस्तकावर तीक्ष्ण शरांची वृष्टि केली. इतक्यांत भीमसेन सावध झाला व त्या महाबलाढ्य वीरानें दुर्योधनावर प्रथम तीन व नंतर आणखीं पांच बाण सोडिले. शल्याला रुक्मपुंख पंचवीस बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां व्यथित झालेला तो वीर रणांगणांतून पळून गेला.

( २ ) त्यानंतर सेनापति सुषेण, जलसंध, सुलोचन, उग्र, भीमरथ, भीम, वीरबाहु, अलोलुप, दुर्मुख, दुष्प्रधर्ष, विवित्सु, विकट व सम असे तुझे चौदा पुत्र वृकोदरावर चालून आले. त्यांनीं क्रोधानें नेत्र आरक्त करून भीमसेनावर

बाणांची वृष्टि केली. पण तुझे पुत्र धांवून येत असलेले पाहून भीमसेन पशूंच्या समुदायांत उभ्या रहाणाऱ्या वृकाप्रमाणें जिभल्या चाटीत क्षणभर उभा राहिला व गरुडाप्रमाणें मोठ्या वेगानें त्यांच्यावर तुटून पडला. त्या क्षुब्ध झालेल्या पांडवानें तुझ्या सेनापतीचा तीक्ष्ण बाणानें शिरश्छेद केला आणि त्या हृष्ट झालेल्या वीरानें हंसतच तीन बाण सोडून व जलसंधाला यमसदनीं पाठवून दिलें, सुषेणाचा वध केला, भल्लबाण सोडून कुंडलांनीं विभूषित असलेलें उग्राचें मस्तक शिरस्त्राणासह भूमीवर पाडविलें, सत्तर बाणांनीं वीरबाहूला त्याच सारथी व अश्व यांसह गतप्राण केलें. भीम व भीमरथ या तुझ्या दोघां मत्त पुत्रांना यमलोकीं पाठविलें आणि एकाच तीक्ष्ण बाणानें सुलोचनाला मृत्यूच्या स्वाधीन केलें.

याप्रमाणें त्या महायुद्धांत सर्व लोकांच्या समक्ष त्या पांडवानें तुझ्या पुत्रांचा असा संहार चालविला असतां, तुझे अवशिष्ट राहिलेले पुत्र भीमसेनाचा तो पराक्रम पाहून भयभीत झाले व भीमसेन युद्ध करीत असतांच दश-दिशांत पळत सुटले. तें पाहून शान्तनव भीष्म सर्व महारथांना म्हणाला—“ हा क्रुद्ध झालेला भीम रणांमध्यें सर्व धार्तराष्ट्रांचा संहार करीत आहे. तो उग्रधन्वा येथें जमलेल्या सर्व शूर, ज्येष्ठ व प्रमुख वीरांना पाडीत चालला आहे. यास्तव त्याला सत्वर धरून ठेवा. उशीर लावूं नका. ”

शान्तनवाची ही आज्ञा ऐकतांच धृतराष्ट्राचें सर्व सैन्य क्रुद्ध होऊन बलाढ्य भीमसेनावर धांवून गेलें. मदोन्मत्त हत्तीवर आरूढ झालेला भगदत्त भीमसेनाच्या समीप गेला व त्यानें सूर्याला आच्छादित करणाऱ्या मेघाप्रमाणें भीमाला शरजालानें आच्छादून टाकिलें. तथापि भीमसेन शत्रूच्या शरजालानें झांकला जाणें हें अभिमन्युप्रभृति अमर्षी वीरांना सहन झालें नाहीं. त्यांनीं सर्व बाजूंनीं बाणांचा वर्षाव करून भगदत्ताला वेढून टाकिलें व त्याच्या गजालाहि सर्वतः विद्ध केलें. त्यावेळीं सर्व पांडववीरांनीं नानाप्रकारच्या शरांचा वर्षाव करून त्या हत्तीला विद्ध केल्यामुळें त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. तेव्हां नीलवर्णाचा महामेघ सूर्याच्या आरक्त किरणांनीं जसा प्रेक्षणीय दिसतो, तसा तो शोभला. काळप्रेरित अंतकाप्रमाणें तो मदोन्मत्त हत्ती दुप्पट वेगानें त्या रणांगणांत धांवून आला असतां भूमि कंपित झाली. त्याच्या एकंदर उग्र स्वरूपावरून सर्व महारथांना तो असह्यच भासला व त्यांची प्रसन्नता लोपली. इतक्यांत भगदत्तानें भीमाचें वक्षःस्थल विद्ध केलें. त्या तीक्ष्ण बाणाच्या प्रहा-

रानें भीमाला पुनः मूर्च्छा आली व तो ध्वजाच्या काठीला टेंकून उभा राहिला. तेव्हां भीमसेनाला पुनः मूर्च्छित झालेला पाहून पांडवांचे वीर भयभीत झाले व भगदत्तानें हर्षभरानें प्रचंड सिंहनाद केला.

( ३ ) हे राजन्, त्यावेळीं भीमसेन व्यथित झाला आहे, हें पहातांच घटोत्कच राक्षस अतिशय क्रुद्ध होऊन अंतर्धान पावला व निमेषार्धांत दारुण माया निर्माण करून तो तेथेंच पुनः प्रकट झाला. स्वतःच मायेनें निर्माण केलेल्या 'ऐरावण'-नामक दिग्गजावर तो घोर राक्षस आरूढ झाला होता. अंजन, वामन व तेजस्वी महापद्म या नांवाचे दुसरे तीन दिग्गज त्याच्या मागोमाग चालले होते. त्या तीनहि प्रचंड गजांवर राक्षस बसलेले असून, त्या प्रचंड गजांच्या गंडस्थलांतून मदाचा प्रवाह वहात होता. हत्तीसह भगदत्ताचा वध करण्याच्या इच्छेनें घटोत्कचानें आपला गज त्याच्या अंगावर सोडला. त्याच्या मागोमाग राक्षसांनीं प्रेरणा केलेले ते तीनहि दिग्गज सर्व दिशांनीं धांवून भगदत्ताच्या हत्तीला दांतांनीं टोंचून पीडा देऊं लागले.

तेव्हां दिग्गजांनीं त्रस्त केल्यामुळें व योद्धयांच्या शरांनीं विह्वल झाल्यामुळें भगदत्ताच्या त्या मदोन्मत्त गजानें इंद्राच्या अशनीप्रमाणें भयंकर चीत्कार केला. तेव्हां ओरडणाऱ्या हत्तीचा तो घोर आवाज ऐकून भीष्म द्रोणाला व राजा दुर्योधनाला असें म्हणाला—"हा भगदत्त दुर्मति घटोत्कचाशीं युद्ध करीत आहे. परंतु हें एक मोठें संकटच ओढवलें आहे. कारण तो हिडिंबापुत्र बलाढ्य राक्षस आहे व राजा अतिशय क्रोधी आहे. हे दोघे समरांगणांत काल व मृत्यु यांच्यासारखे शोभत आहेत. हृष्ट झालेल्या पांडवांनीं आनंदानें केलेला जयघोष ऐकूं येत आहे आणि भयभीत झालेल्या हत्तींचा रोदनध्वनि कानीं पडत आहे. यास्तव आपण त्या राजाचें रक्षण करावयास जाऊं या. तुमचें कल्याण असो. या संग्रामांत आपण जर त्याचें रक्षण केलें नाहीं, तर तो भगदत्त सत्वरच प्राणांना मुकेल ! यास्तव हे महापराक्रमी वीरांनो, त्वरा करा. आपण उशिरां जाऊन काय उपयोग ! त्यांचा हा अंगावर रोमांच आणणारा भयंकर संग्राम चालला आहे आणि हा सेनापति आपला भक्त असून शूर व कुलीन आहे. यास्तव त्याचें संरक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे."

भीष्माचें हें भाषण ऐकून ते सर्व महारथ भगदत्ताचें रक्षण करण्याच्या इच्छेनें भीष्म-द्रोणांस पुढें करून अतिशय त्वरेनें निघाले व जेथें तो राजा होता, तेथें

आले. याप्रमाणें ते कौरव वीर येत असलेले पाहून युधिष्ठिराला पुढें करून पांडवांसह सर्व पांचाल शत्रूच्या मागोमाग गेले. तें शत्रुसैन्य पहातांच प्रतापवान् राक्षसेंद्रानें विजेच्या कडकडाटाप्रमाणें प्रचंड गर्जना केली.

तेव्हां त्याचा तो सिंहनाद ऐकून व दिग्गजांचें तें युद्ध पाहून शान्तनव भीष्म पुनः भारद्वाजाला असें म्हणाला—"या दुरात्म्या राक्षसाशीं युद्ध करणें मला योग्य वाटत नाहीं. तो बल व वीर्य यांनीं स्वभावतःच युक्त असून सांप्रत साहाय्यसंपन्न आहे. साक्षात् इंद्रहि त्याला युद्धांत जिंकण्यास समर्थ नाहीं. तो अप्रतिम लक्ष्यवेधी आहे, प्रहार करण्यांत प्रवीण आहे आणि पांचालांच्या व पांडवांच्या शरांनीं विद्ध झाल्यामुळें आपण आपल्या वहानांसह श्रांत झालों आहों. शिवाय आदित्यहि अस्ताचलीं त्वरेनें चालला आहे. यास्तव जयाची इच्छा करणाऱ्या पांडवांशीं आतां युद्ध करणें मला रुचत नाहीं. तस्मात् आपण आतां युद्धापासून निवृत्त व्हावें, हें बरें. आज हें युद्ध येथेंच थांबवूं या व उद्यां आपण शत्रूंशीं युद्ध करूं."

( ४ ) पितामहाचें हें वचन ऐकून कौरवांनीं त्याप्रमाणें केलें. घटोत्कचाच्या भयानें आर्त झालेलें तें कौरवसैन्य परत फिरलें. याप्रमाणें कौरवसेना युद्धापासून निवृत्त झाली असतां जयाकाङ्क्षी पांडवांनीं मोठ्या हर्षानें सिंहनाद केला व आपले शंख वाजविले.

याप्रमाणें कौरव व पांडव यांचें घटोत्कचाला पुढें करून त्या दिवशींचें युद्ध झालें. पांडवांकडून पराभूत झालेले ते कौरव रात्र पडली असतां लज्जित होत्साते आपल्या शिबिरांत आले आणि महारथ पांडुपुत्रहि युद्धांत जरी सर्व गात्रें शरांनीं विद्ध झालीं होतीं तरी अतिशय प्रसन्न मनानें स्वशिबिरांत परत आले. त्यावेळीं हे महाराज, भीमसेन व घटोत्कच या उभयतां पिता-पुत्रांना पुढें करून त्या पांडववीरांनीं परस्परांची हृष्टचित्तानें प्रशंसा केली. त्यावेळीं विविध वाद्यें व शंख यांचा घोष व सिंहनाद यांचा फार मोठा निनाद झाला. ते महात्मे सिंहनाद करीत असतां पृथ्वी कंप पावली.

इकडे भ्रात्यांच्या वधानें मर्मावर आघात झालेला दुर्योधन रात्र पडली असतां दीन होऊन शिबिरांत शिरला. त्यानें घटकाभर चिंतन केलें, नंतर बाष्पशोकाकुल झालेल्या त्या कौरवानें शिबिराची यथाविधि सर्व व्यवस्था केली व भ्रातृवधानें शोकसंतप्त झालेला तो विचार करीत बसला. ६. ४. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा शोक व संजयाला प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ विश्वोपाख्यान. ४ परमात्म्याचें स्तवन. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, देवांनाहि दुष्कर असें पांडुपुत्रांचें कर्म ऐकून मला अतिशय भय व विस्मयहि वाटत आहे. त्याचप्रमाणें माझ्या पुत्रांचा सर्वशः पराभव ऐकून पुढें काय होईल, याविषयीं मला अतिशय चिंता वाटूं लागली आहे. हे सूता, विदुराचीं तीं वाक्यें माझें हृदय जाळीत आहेत. त्याच्याच म्हणण्याप्रमाणें दैवयोगानें सर्व घडून येत आहे. ज्याअर्थीं भीष्मप्रभृति सर्व शस्त्रज्ञ व श्रेष्ठ योद्धे यांच्याशींहि पांडवांच्या सैन्यांतील वीर युद्ध करीत आहेत, त्याअर्थीं महाबलाढ्य पांडुपुत्र कोणत्या उपायानें अवध्य झाले आहेत ! त्यांना कोणीं वर दिला आहे ! किंवा त्यांनीं कोणतें ज्ञान संपादन केलें आहे कीं, ज्याच्या योगानें ते आकाशांतील तारागणाप्रमाणें क्षय पावत नाहींत ! पांडवांकडून आमचें सैन्य पुनः पुनः नाश पावत आहे, ही वार्ता मला ऐकवत नाहीं. तथापि परम दारुण दैवामुळें माझ्यावरच हा कालदंड आदळत आहे. यास्तव हे पांडुपुत्र अवध्य कसे झाले व माझेच पुत्र वध्य कां होतात, याचें कारण मला तत्त्वतः सांग.

हे संजया, विस्तीर्ण महासागर आपल्या हातानें पोहून परतीरावर जाण्याचा यत्न करणाऱ्या मनुष्याप्रमाणें मला या माझ्या दुःखसागराचा पार दिसत नाहीं. माझ्या पुत्रांवर अतिशय दारुण संकट ओढवलें आहे. भीम माझ्या सर्व पुत्रांचा नाश करील यांत संशय नाहीं. माझ्या पुत्रांचें रणामध्यें रक्षण करील असा एकहि वीर मला दिसत नाहीं. खरोखर माझ्या पुत्रांचा विनाशच प्राप्त झाला आहे, यांत संशय नाहीं. यास्तव याचें कारण आणि विशेषतः पांडवांना यश देणारी शक्ति कोणती आहे, हें मी तुला विचारीत आहें. तें मला यथार्थ कथन करण्यास तूंच समर्थ आहेस.

आपलें सैन्य युद्धापासून विमुख होत आहे, हें पाहून दुर्योधनानें काय केलें ! भीष्म, द्रोण, कृप, सौबल, जयद्रथ, द्रौणि व विकर्ण, या महात्म्यांनीं माझे पुत्र युद्धपराङ्मुख झाले असतां कोणता निश्चय केला, तें मला सांग.

( २ ) **संजय**—हे राजन्, सावधान चित्तानें लक्षपूर्वक ऐक. पांडव कोणताहि मंत्रप्रयोग करीत नाहींत, किंवा तशा प्रकारची मायाहि त्यांना अवगत

नाहीं. त्याचप्रमाणें ते कोणत्याहि बिभीषिकेचेंहि अवलंबन करीत नाहींत. तर ते शक्तिमान् पांडव यथान्याय युद्ध करीत आहेत व महद्यशाची प्रार्थना करणारे ते पार्थ आपल्या जीविकेपासून सर्व कार्यें सर्वदा धर्मानेंच आरंभितात. धर्मानें युक्त असलेले ते महाबलाढ्य वीर युद्धापासून कदापि निवृत्त होत नाहींत. ते परमश्रीनें युक्त आहेत. कारण जेथें धर्म तेथेंच जय असतो. याच कारणानें पार्थ रणामध्यें अवध्य असून सर्वदा विजयी होतात.

उलट पक्षीं तुझे दुरात्मे पुत्र सर्वदा पापांतच निरत असतात. ते निष्ठुर असून हीनकर्मै करणारे आहेत, त्यामुळें युद्धांत पराजित होतात. हे जनेश्वरा, तुझ्या पुत्रांनीं अनेक नृशंस कर्मै केलीं आहेत. नीच मनुष्याप्रमाणें त्यांनीं पांडुपुत्रांचे विपुल अपराध केले आहेत. तथापि ते पांडुपुत्र सर्वदा तुझ्या पुत्रांच्या या सर्व पातकांची उपेक्षा करितात व त्यांच्या या दुष्कर्मांचा कोठें उच्चारहि करीत नाहींत. परंतु तुझ्या पुत्रांना मात्र त्याचें कांहीं महत्त्वहि वाटत नाहीं. सांप्रतचें हें घोर युद्ध त्यांनीं केलेल्या पापाचेंच फल आहे.

यास्तव हे महाराज, तूंहि आपले पुत्र व सुहृज्जन यांसह कृतकर्मांचें हें फल भोग. सुहृदांनीं तुझें वेळींच निवारण केलें असतां तूं त्याकडे दुर्लक्ष्य केलेंस. त्याचप्रमाणें विदुर, भीष्म, महात्मा द्रोण आणि मींहि तुझें अनेकदा निवारण केलें असतां तें तूं ऐकलें नाहींस. मरणोन्मुख मनुष्याला औषध व पथ्य जसें रुचत नाहीं, तसेंच तुला आमचें पथ्यकर हितवचन रुचलें नाहीं व पुत्रांच्या मतानें वागून पांडवांना जित मानूं लागलास. यास्तव पांडवांच्या जयाचें कारण तूं जें मला विचारीत आहेस, तें मीं तुला तत्त्वतः सांगतों. ऐक.

दुर्योधनानें हाच प्रश्न पितामहाला विचारला होता. आपल्या सर्व महारथ भ्रात्यांचा रणांत पराभव होत आहे, हें पाहून तो कौरव शोकानें मोहित झाला व रात्रीच्या वेळीं महाप्राज्ञ पितामहाकडे विनयानें येऊन त्याला असें म्हणाला. तुझा पुत्र काय म्हणाला तें सांगतों. ऐक.

दुर्योधन—हे पितामह, तूं स्वतः महारथ असून द्रोण, शल्य, कृप, द्रौणि, कृतवर्मा, हार्दिक्य, कांबोज, सुदक्षिण, भूरिश्रवा, विकर्ण व भगदत्त, हेहि सर्व महारथ आहेत, अशी त्यांची प्रसिद्धि आहे. ते कुलपुत्र जीवावर उदार होऊन युद्ध करूं लागले असतां तिन्ही लोकांना जिंकण्यास पुरेसे आहेत, असें माझें निश्चित मत आहे. परंतु ते सर्व पांडवांच्या पराक्रमापुढें निस्तेज होत

आहेत. हें पाहून माझ्या मनांत फार मोठा संशय उत्पन्न होतो. तस्मात् कोणाचा आश्रय करून पांडव क्षणोक्षणीं आम्हांला जिंकीत आहेत, तें मला सांग.

भीष्म—राजन्, माझें वचन ऐक. मी तुला आजवर अनेकप्रकारें सांगत आलों आहें, परंतु तूं त्याप्रमाणें वागला नाहींस. हे विभो, अजुन तरी तूं पांडवांशीं शम कर, त्यांत तुझें व पृथ्वीचेंहि कल्याण आहे. या पृथ्वीचा उपभोग घे व भ्रात्यांसह सुखी हो. शत्रूंना ताप दे व सर्व बांधवांना संतुष्ट कर. हे महाबाहो, मी पूर्वींपासून आक्रोश करीत असतां तूं ऐकलें नाहीं सव पांडवांचा अवमान केलास त्याचें हें फल तुला प्राप्त झालें आहे.

आतां ते अक्लिष्ट कर्मे करणारे पांडव अवध्य कां आहेत, याचें कारण सांगतों, ऐक. शार्ङ्गधन्व्यानें ज्यांचें रक्षण केलें आहे, त्या पांडवांना जिंकील, असा एकहि वीर यालोकीं पूर्वी झाला नाहीं, सध्यां विद्यमान नाहीं किंवा पुढें होणार नाहीं. भावितात्म्या मुनींनीं जें एक पुराणगीत मला सांगितलें होतें, तेंच मी तुला तत्त्वतः सांगतों. तें ऐक.

( ३ ) पूर्वी एकदा गंधमादन पर्वतावर सर्व देव आणि ऋषि एकत्र जमून पितामहाच्या समीप बसले होते. इतक्यांत त्या सर्वांच्या मध्यभागीं बसलेल्या प्रजापतीला अंतरिक्षांत स्वतेजानें प्रज्वलित होणारें विमान स्थित असलेलें दिसलें. तेव्हां त्यांत कोण आहे, हें त्या ब्रह्मयानें ध्यानानेंच जाणून नियतचित्त होऊन हात जोडले व त्या परमपुरुषाला हृष्ट चित्तानें नमस्कार केला. ब्रह्मदेव उठून नमस्कार करीत आहे, असें पहातांच देव आणि ऋषिहि उठले व तो चमत्कार पहात हात जोडून उभे राहिले. तेव्हां सर्व ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ ब्रह्मदेवानें त्याचें यथाविधि अर्चन केलें आणि त्या परम धर्मवेत्त्या जगत्स्रष्ट्यानें त्याचें स्तवन आरंभिलें.

( ४ ) ब्रह्मदेव—हे विश्वावसो, विश्वमूर्ते, तूं या विश्वाचा ईश आहेस, तूं विश्वक्सेन आहेस आणि वासुदेवहि तूंच आहेस. यास्तव तुज दैवताला मी शरण आलों आहें. हे विश्वरूपा, महादेवा तुझा जयजयकार असो. तूं सर्वदा लोकांच्या हितांत रत असतोस; तूं योग्यांचा ईश्वर आहेस; हे विभो, तूं योगपारावर आहेस; तूं भूत, वर्तमान व भविष्यत् यांचा नियंता आहेस. हे पद्मगर्भ विशालाक्ष, तूं सर्व लोकेश्वरांचा ईश्वर आहेस. तूं सौम्य व स्वयं-

भूचाहि स्वयंभु आहेस. तूं असंख्य गुणाधार आहेस, सर्वपरायण आहेस, नारायण तूंच आहेस. तूं दुष्पार आहेस. शार्ङ्गधनुष्य धारण करणारा तूं सर्व गुणांनीं युक्त आहेस. तूं निरामय व लोकार्थांत तत्पर असतोस. अशा तुझा जयजयकार असो.

हे प्रभो, शेष व वराहरूप धारण करणारा तूंच आहेस. हे पीतकेशा, तूं दिशांचा ईश व विश्वामध्यें वास करणारा आहेस. तूं अव्यय, व्यक्त, अव्यक्त, व अमितस्थानरूप आहेस. तूं जितेंद्रिय, सत्क्रिय, असंख्येय, आत्मभावज्ञ, गंभीर, कामद, अनंत, विदित, ब्रह्मज्ञ, अविनाशी व भूतभावन आहेस. तूं कृतकार्य, कृतप्रज्ञ, धर्मज्ञ व विजयावह आहेस. हे गुह्यात्मन्, हे सर्व योगात्मन्, हे स्फुटसंभूतसंभव, सर्व भूतांचें आदिकरण तूंच आहेस. तुझा जयजयकार असो. हे परमेश्वरा, तूं निसर्गाला निर्माण करणारा व त्याचा प्रलय करणारा आहेस. तूं अमृतोद्भव असून विजयप्रद आहेस, हे मुक्तात्मन्, तूं प्रजापतीचाहि पति, महाबलाढ्य, आत्मभूत, महाभूत आहेस. हे पद्मनाभ देवा, तुझा जयजयकार असो.

हे विष्णो, ही पृथ्वी तुझे दोन चरण आहेत. दिशा बाहु आहेत, अंतरिक्ष मस्तक, मीच तुझी मूर्ति आहें. देव शरीर आहेत, चंद्र व सूर्य हे नेत्र आहेत. बल, तप व सत्य हेंच तुझें धर्मात्मक कर्म आहे. तेज, अग्नि, वायु, श्वास, आणि जल तुझ्या स्वेदापासून उत्पन्न झालीं आहेत. उभय अश्विनिकुमार तुझे श्रवणेंद्रिय आहेत, सरस्वती देवी नित्य तुझ्या जिह्वेवर आहे. तुझी संस्कार-निष्ठा हेच वेद आहेत. हें सर्व जगत् तुझ्याच आश्रयानें स्थित आहे. तुझें तेज व पराक्रम यांची गणना करतां येत नाहीं, किंवा त्यांचें परिमाण सांगतां येत नाहीं. हे योगयोगीशा, तुझें सामर्थ्य किंवा उत्पत्ति आम्हांला कळत नाहीं. आम्ही केवल तुझ्या भक्तींत निरत राहून, तुझ्याच आश्रयानें नियमानें तुझें अर्चन करितों.

हे विशालाक्षा, तुझ्या कृपेनेंच मीं ऋषि, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, पन्नग, पिशाच, मनुष्य, मृग, पक्षी, सर्प इत्यादि सृष्टि निर्माण केली. सर्व भूतांची गति तूंच आहेस. तूंच नेता आहेस व जगद्गुरुहि तूंच आहेस. हे देवेशा, तुझ्या प्रसादानें देव सर्वदा सुखी असतात. त्याचप्रमाणें तुझ्याच अनुग्रहानें पृथ्वीहि सदा निर्भय होती, पण आतां ती सभय झाली आहे. यास्तव हे विभो, पुनः धर्माची संस्थापना करण्यासाठीं व दैत्यांच्या वधासाठीं तूं यदुकुलांत उत्पन्न

हो. एवढी माझी ही प्रार्थना मान्य कर. तुझ्याच प्रसादानें मीं तुझें हें गुह्यांतील गुह्य यथार्थ सांगितलें आहे.

हे देवा, तूं स्वतःच आपल्यापासून संकर्षणाला उत्पन्न केलेंस व त्याचप्रमाणें तूं स्वतःपासूनच प्रद्युम्नाला उत्पन्न केलेंस. प्रद्युम्नापासून तूं अव्यय विष्णु अनिरुद्ध झालास. अनिरुद्धापासून लोकांना धारण करणारा मी ब्रह्मदेव जन्म पावलों. तूंच ज्याला निर्माण केलेंस, तो मी वासुदेवमय आहें. तस्मात् हे प्रभो, तूं स्वतःचा विभाग करून मानव अवतार धारण कर आणि मृत्युलोकीं जाऊन सर्व लोकांच्या सुखासाठीं असुरांचा वध कर. तेथें धर्म व यश यांना प्राप्त होऊन नंतर तुझ्या योगस्वरूपांत विलीन हो. हे अमितविक्रमा, ब्रह्मर्षि व देवगण आपापल्या लोकांत तुज परमात्म्याचेंच भिन्न भिन्न नांवांनीं गायन करितात. तुझा आश्रय करून हे सर्व प्राणी रहातात आणि विप्र तुज आदि-मध्य व अंत यांनीं रहित असलेल्या परमात्म्याला या लोकांतून तरून जाण्याचा 'सेतू' म्हणतात. ६. ४. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ भगवानाचें पितामहाला उत्तर, देवादिकांचा प्रश्न. २ ब्रह्मदेवानें कथन केलेलें वासुदेवाचें माहात्म्य. ३ भीष्माचें दुर्योधनाला विश्वोपाख्यानकथन. ]

( १ ) भीष्म—हे राजा, त्यानंतर तो भगवान् देव, लोकांच्या ईश्वराचाहि ईश्वर स्निग्ध व गंभीर वाणीनें ब्रह्मदेवाला असें वचन बोलला—"हे तात, तुझें हें सर्व ईप्सित योगबलानें मला पूर्वींच कळलें आहे. तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल."

असें बोलून तो प्रभु तेथेंच अंतर्धान पावला. तेव्हां तेथें जमलेल्या त्या सर्व देव-गंधर्वादिकांना हा सर्व अद्भुत प्रकार पाहून अतिशय विस्मय वाटला व ते कुतूहलानें पितामहाला म्हणाले—"हे विभो, तूं ज्याला अतिशय विनयानें प्रणाम केलास व उत्कृष्ट शब्दांनीं ज्याची स्तुति केलीस, तो कोण आहे, हें जाणण्याची आमची इच्छा आहे."

( २ ) हा प्रश्न ऐकून पितामह त्या सर्व देव-ब्रह्मर्षि-गंधर्वादिकांस मधुर वाणीनें म्हणाला—'हे सुरश्रेष्ठहो, ज्याची सत्ता त्रिकालीं असते, जो भूतात्मा प्रभु, परात्पर, परम ब्रह्म, तो प्रसन्न होऊन येथें प्रकट झाला होता. त्याच्याशीं मीं

संभाषण केलें व मीं त्या जगत्पतीला जगतावर अनुग्रह करण्याविषयीं प्रार्थना केली. "या पृथ्वीतलावर असुरांच्या वधार्थ जन्म घे आणि मृत्युलोकीं वासुदेव या नांवानें प्रसिद्ध हो" अशी मीं त्याला विज्ञप्ति केली. कारण पूर्वी जे महा बलाढ्य घोररूपी दैत्य, दानव व राक्षस रणांत मरण पावले होते, तेच आतां मनुष्ययोनीला प्राप्त झाले आहेत. त्यांनीं मनुष्यजन्म घेतल्यामुळें जितेंद्रिय भगवान् नारायण नरासह मनुष्य देह धारण करून पृथ्वीवर संचार करील. ते दोघे नर-नारायण पुराणऋषि आहेत. ते एकाच वेळीं भूलोकीं जन्म घेतील. ते अमित द्युतिमान् असलेले दोघे एकत्र असतां देवांनाहि युद्धांत अजिंक्य आहेत. तथापि मूढ लोक त्या नर-नारायण ऋषींना अद्यापि जाणत नाहींत. तो सर्व जगाचा प्रभु आहे. त्याचा मी ज्येष्ठ पुत्र आहें. तुम्ही त्या सर्वलोक महेश्वराचें पूजन करा.

त्याचप्रमाणें हे देवश्रेष्ठहो, 'हा मनुष्य आहे' असें मानून या शंख-चक्र-गदा धारण करणाऱ्या महा वीर्यवान् वासुदेवाची तुम्ही कदापि अवज्ञा करूं नका. परम गुह्य हाच आहे. परम पद हाच आहे, परम ब्रह्म व परम यशहि हाच आहे. अव्यक्त, अक्षर व शाश्वत महत्तेज हाच आहे. याच पुरुषसंज्ञक परमात्म्याचें गायन केलें जातें, पण तें कोणालाहि जाणतां येत नाहीं. परम तेज व परम सुख हाच आहे. हाच परम सत्य आहे, असें विश्वकर्म्यानें म्हटलें आहे. तस्मात् इंद्रासह सर्व देव व सर्व लोक यांनीं या अमितपराक्रमी प्रभूचा 'हा वासुदेव एक मनुष्यच आहे' असें म्हणून अवमान करूं नये.

जो मंदमति पुरुष 'हा केवल मानव आहे' असें म्हणतो व हृषीकेशाचा अवमान करितो, तो पुरुषाधम म्हटला जातो. मनुष्यदेहाचा आश्रय करून राहणारा तो महात्मा योगी आहे. त्या वासुदेवाचा जो अपमान करितो, त्याला लोक 'तामस' असें म्हणतात. त्याचप्रमाणें श्रीवत्सलांछनानें चिह्नित असलेल्या त्या चराचरात्मक श्रेष्ठ देवाला जो जाणत नाहीं, त्यालाहि ज्ञाते जन 'तामस'च समजतात. हा पद्मनाभ मित्रांना सौख्य देणारा आहे. त्या किरीट-कौस्तुभधर महात्म्याला जो अवमानितो, तो घोर तमांत बुडतो. हा तत्त्वार्थ जाणून सर्व लोकांच्या ईश्वराचाहि ईश्वर असा जो वासुदेव, तो सर्व लोकांना नमस्कारार्ह आहे.'

(२) भीष्म—असें बोलून त्या ब्रह्मदेवानें ऋषिगणांसह सर्व देवांची ती सभा विसर्जन केली व तो आपल्या भवनाला निघून गेला. तेव्हां तेथें जमलेले

देव, गंधर्व, मुनि, अप्सरादि सर्व ब्रह्मदेवानें सांगितलेली ती कथा मोठ्या प्रीतीनें ऐकून स्वर्गलोकीं गेले.

. बा दुर्योधना, पूर्वीं एकदा भावितात्मे ऋषि एकत्र जमून वासुदेवाची ही कथा सांगत असतां मीं ती ऐकली. त्याचप्रमाणें जामदग्न्य राम, धीमान् मार्कण्डेय, व्यास व नारद यांच्याकडूनहि ऐकली आहे. यास्तव हे धार्तराष्ट्रा, ही कथा ऐकून महात्मा वासुदेव अव्यय प्रभु आहे हें जाण. सर्व जगाचा पिता ब्रह्मदेव त्याचा आत्मज आहे. अशा प्रकारचा हा वासुदेव मानवांना अर्चनीय व पूजनीय कसा होणार नाहीं ?

'हे तात, त्या वासुदेवाचें अर्जुनाला साह्य आहे, यास्तव पांडवांशीं तूं युद्धाला उभा राहूं नको' असें सांगून मीं तुझें अनेकदा निवारण केलें, वेदवेत्त्या मुनींनींहि तुला परोपरीनें सांगितलें, तथापि तूं मोहानें तें ऐकलें नाहींस.

ज्याअर्थीं तूं गोविंदाचा व धनंजयाचा द्वेष करीत आहेस, त्याअर्थीं तूं तमानें आवृत्त झालेला क्रूर राक्षस असावास, असें मला वाटतें. त्यावांचून दुसरा कोणता मानव नर-नारायण देवांचा द्वेष करील !

यास्तव हे राजन्, मी तुला सत्य सांगतों कीं, जो या तिन्ही लोकांना धारण करितो, तो चराचर गुरु सर्व लोकांचा प्रभु व नित्य शास्ता आहे. तोच ध्रुव व धात्रीधर आहे. तो सर्व प्रकृतीचा ईश्वर योद्धा, जय व जेता आहे. तो सर्वमय असून तमो-रागविवर्जित आहे. यास्तव जेथें कृष्ण तेथें धर्म आणि जेथें धर्म तेथें जय असतो, हें निश्चित जाण. या भगवंताच्या माहात्म्ययोगानें व आत्मयोगाच्या बलानें पांडवांचें संरक्षण होत आहे व त्यामुळेंच त्यांचा जय होत आहे. जो पांडवांना सर्वदा श्रेयोयुक्त बुद्धि देतो, रणांत सामर्थ्यानें युक्त करितो व भयापासून रक्षितो, तोच हा सर्व गुह्यमय शाश्वत देव वासुदेव आहे, असें तूं निश्चयानें जाण. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे आप-आपल्या गुणांनीं युक्त असलेले चार वर्णांचे लोक स्व-स्ववर्णाला उचित अशा कर्मांनीं नित्य वासुदेवाचें अर्चन करितात. द्वापराच्या शेवटीं व कलीच्या आरंभीं नारद-पंचरात्रागम विधीनें पूजा करणाऱ्या संकर्षणानें ज्या वासुदेवाचें गीत गायलें, तोच हा वासुदेव प्रत्येक युगांत देवलोक, मर्त्यलोक, समुद्रानें परिवेष्टित असलेली द्वारकापुरी आणि मनुष्यांचें हें निवासस्थान पुनः पुनः निर्माण करितो. ६. ४. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ दुर्योधनाचा प्रश्न. २ भीष्मानें वर्णिलेलें वासुदेवाचें कार्य व माहात्म्य. ३ केशवाच्या पूजेचें फल. ]

( १ ) **दुर्योधन**—हे पितामह, वासुदेवाची उत्पत्ति व स्थिति अद्भुत आहे, असें सर्व लोकांत म्हटलें जातें. यास्तव तें जाणण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) **भीष्म**—हे भरतर्षभा, परम श्रेष्ठ वासुदेव सर्व दैवतांचेंहि दैवत आहे. त्या पुण्डरीकाक्षाहून श्रेष्ठ असें दुसरें कोणीहि नाहीं. मार्कंडेयानें तर या गोविंदाचें अद्भुत वर्णन केलें आहे. त्यानें या वासुदेवाला सर्व भूतांचा भूतात्मा, महात्मा, पुरुषोत्तम व जल, वायु, तेज, या तीन महाभूतांचा उत्पादक म्हटलें आहे. त्या लोकेश्वर प्रभूनें ही पृथ्वी निर्माण करून जलांत शयन केलें. तो सर्व तेजोमय देव योगबलानें तेथेंच गाढ निद्रित होतो. त्या अच्युत परमात्म्यानें आपल्या मुखापासून अग्नि आणि प्राणापासून वायु उत्पन्न केला. मनापासून वेद व सरस्वती यांना निर्माण केलें. यानेंच प्रथम सर्व ऋषिगणांसह देव आणि सर्व लोक यांची उत्पत्ति केली.

हा जनार्दनच मरण व मरणाचें प्रयोजन आहे. तोच सर्व प्रजांची उत्पत्ति, स्थिति व लय यांचा हेतु आहे. तो धर्मज्ञ धर्मरूप असून वरद व सर्व कामना पूर्ण करणारा आहे. हा पूर्वदेव स्वयंप्रभु असून कर्ता व कार्य आहे. यानें भूत, भव्य व भविष्यत् हीं पूर्वींच कल्पिलीं आहेत. प्रातः व सायं हे दोन संध्याकाल, सर्व दिशा, आकाश व सृष्टीचे सर्व नियम या केशवानेंच केले. या गोविंदानेंच ऋषि व तप यांना निर्माण केलें. जगत्स्रष्ट्या प्रजापतीलाहि या अव्यय प्रभूनेंच उत्पन्न केलें. सर्व भूतांचा अग्रज जो संकर्षण तोहि यानेंच निर्मिला. सनातन देवाधिदेव नारायणहि याच्यापासूनच झाला.

सर्व लोकांच्या उत्पत्तीला कारण असलेलें जें कमल तें याच्याच नाभीपासून उत्पन्न झालें. त्याच्यापासून ब्रह्मदेव झाला व ब्रह्मदेवापासून या सर्व प्रजा जन्म पावल्या. अनंत व विश्वरूपी जो दिव्य शेष त्यालाहि यानेंच निर्माण केलें. हा शेष पर्वतांसह समग्र पृथ्वी व सर्व भूतें यांना आपल्या मस्तकावर धारण करितो. विप्र या महौजसाला ध्यानयोगानें जाणतात. या पुरुषोत्तमाच्या कानांतील मलापासून 'मधु'-नांवाचा एक असुर उत्पन्न झाला. तो उग्र कर्में करणारा व उग्र बुद्धीचा आश्रय करणारा होता. त्यानें ब्रह्मदेवाचा क्षय करण्याचें मनांत आणिलें, तेव्हां त्याचा तो दुष्ट हेतु जाणून या प्रभूनें त्या असु-

राचा वध केला. त्या दैत्याच्या वधापासून देव, दानव, मानव व ऋषि याला 'मधुसूदन' म्हणूं लागले.

हाच पद्मनाभ वराह, नृसिंह व तीन पावलांनीं त्रिभुवन पादाक्रांत करणारा वामन झाला. हा हरि सर्व प्राण्यांची माता व पिता आहे. या सृष्टींत पुंडरीकाक्षाहून पृथक् असें कांहींच नाहीं, पूर्वीं कधीं झालें नाहीं व पुढें होणार नाहीं. या प्रभूनें आपल्या मुखापासून ब्राह्मण, बाहूपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य आणि पायांपासून शुद्र, याप्रमाणें चार वर्ण निर्माण केले. हा देवाधिदेव देहधारण करणाऱ्या सर्व प्राण्यांचें निधान असून तपानें नियत आहे.

( ३ ) या महात्म्याची जो कोणी आमावास्येला व पौर्णिमेला नियमपूर्वक उपासना करील, किंवा तप करील, त्याला या ब्रह्मस्वरूप केशवाचें परमपद प्राप्त होईल. हा हृषीकेश परम तेज आहे व सर्व लोकांचा पितामह आहे, असें मुनि म्हणत असतात. यास्तव हे राजा, हा कृष्ण आपला आचार्य, पितर व गुरु आहे, असें समज. जो कृष्णाला प्रसन्न करितो, त्यानें तिन्ही लोक जिंकले, असें समजावें. जो पुरुष भयप्रसंगीं कृष्णाला शरण जातो, किंवा या स्तवनाचें पठण करितो, तो सर्वदा सुखी होतो व स्वास्थ्याला प्राप्त होतो. जे मानव कृष्णाला शरण जातात ते कदापि मोहित होत नाहींत. फार मोठ्या भवसागरांत बुडालेल्यांचेंहि हा जनार्दन रक्षण करितो.

दुर्योधना, युधिष्ठिरानें या जगदीश्वराचें यथार्थ स्वरूप जाणलें आहे व त्यामुळेंच तो या सर्वात्म्या केशवाला, सर्व योग्यांच्या ईश्वराला सर्वदा शरण जातो. ६. ४. ६७.

---

## अध्याय ६८ वा.

[ १ भीष्मानें केलेलें केशवाचें स्तवन. २ पांडवांशीं शम करण्याचा पुनः उपदेश. ]

( १ ) भीष्म—हे दुर्योधना, पूर्वीं ब्रह्मर्षि व देव यांनीं भूलोकीं मला कथन केलेलें या ब्रह्मस्वरूप केशवाचें स्तवन मी तुला सांगतों, तें ऐक.

"हे प्रभो, तूं साध्यांचा व देवांचाहि ईश्वर आहेस, तूं लोकभावज्ञ व लोकभावन आहेस, असें नारदानें तुझ्याविषयीं म्हटलें आहे. तूं भूत, भव्य व भविष्यत् आहेस, असें मार्कंडेयानें म्हटलें आहे. तूं यज्ञांचा यज्ञ, तपांचेंहि तप,

व देवांचाहि देव आहेस, असें भगवान् भृगूनें म्हटलें आहे. हे विष्णो, तुझें हें परम रूप पुरातन आहे. अष्टावसूंतील वासुदेव तूंच असून इंद्राला इंद्रपदावर तूंच स्थापन केलेंस. देवांचाहि तूं देव आहेस, असें द्वैपायन मुनीनें म्हटलें आहे.

पूर्वी सृष्टिनिर्माणकालीं तुलाच दक्षप्रजापति म्हणत असत. अङ्गिरामुनीनें तुला सर्वलोकांचा स्रष्टा म्हटलें आहे. तुझ्या शरीरापासून अव्यक्त उद्भवलें असून व्यक्त तुझ्या मनांत स्थित आहे. देवांचें उत्पत्तिस्थान तूंच आहेस, असें देवलानें म्हटलें आहे. तूं आपल्या मस्तकानें अंतरिक्ष व्यापिलें आहेस, बाहूंनीं पृथ्वी आच्छादित केली आहेस, तिन्ही लोक हें तुझें जठर आहे, तूं सनातन पुरुष आहेस, असें तपानें युक्त असलेले लोक समजतात. आत्मदर्शनानें तृप्त झालेल्या ऋषींमध्यें तूंच वरिष्ठ आहेस. हे मधुसूदना, युद्धांतून निवृत्त न होणारे, उदार व सर्व धर्मपरायण अशा श्रेष्ठ राजर्षींची गति तूंच आहेस. याप्रमाणें सनत्कुमारप्रभृति योगवेत्ते भगवान् पुरुषोत्तमाचें नित्य स्तवन व पूजन करितात. याप्रमाणें मीं तुला संक्षेपानें व विस्तारानें केशवाचें यथार्थ स्वरूप कथन केल आहे. यास्तव केशवाचें परम प्रीतीनें भजन कर."

(२) संजय—हे धृतराष्ट्र महाराज, हें पुण्यप्रद आख्यान ऐकून तुझ्या पुत्राला केशव व महारथ पांडव यांच्याविषयीं आदर वाटूं लागला. तेव्हां भीष्म पुनः त्याला म्हणाला—"हे राजन्, तूं महात्म्या केशवाचें माहात्म्य ऐकलेंस, त्याचप्रमाणें तूं मला विचारलेलें नराचेंहि यथार्थ स्वरूप माझ्या मुखानें तूं जाणलें आहेस. हे दोघे नरनारायण ऋषि कोणत्या कारणासाठीं भूतलावर अवतरले, ते दोघे युद्धांत कसे अजिंक्य असून अवध्य आहेत, त्याचप्रमाणें पांडव श्रीकृष्णाला अतिशय प्रिय असल्यामुळें युद्धामध्यें त्यांचा वध करण्यास कोणीहि कसा समर्थ नाहीं, हें मीं तुला सविस्तर कथन केलें आहे. तस्मात्, तुझा पांडवांशीं शम होवो आणि तूं आपल्या बलाढ्य भ्रात्यांसह पृथ्वीचा उपभोग घे. तूं जर या नर-नारायण देवांची अवज्ञा करशील, तर मात्र अवशिष्ट रहाणार नाहींस.

राजा धृतराष्ट्रा, असें बोलून तुझा पिता शान्तनव स्वस्थ बसला. त्यानें दुर्योधनाला जाण्याची अनुज्ञा दिली व आपण शयन केलें. तेव्हां त्या महात्म्याला नमस्कार करून दुर्योधन स्वशिबिरांत आला व तोहि त्या रात्रीं आपल्या शुभ्र शयनावर पडून निद्रावश झाला. ६. ४. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ पांचव्या दिवसाच्या युद्धाला आरंभ. २ कौरवांचा मकरव्यूह. ३ पांडवांचा श्येनव्यूह. ४ सात्यकीचें भीष्म-द्रोणांशीं युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, ती रात्र जाऊन दिवस उगवला असतां दोन्ही सैन्यें युद्धासाठीं रणांगणांत जमा झालीं. त्यांतील क्रुद्ध झालेले सर्व योद्धे परस्परांना जिंकण्याची इच्छा करीत होते. ते एकमेकांकडे पहात युद्धामध्यें प्रतियोद्ध्यांवर तुटून पडत होते. राजा, हा सर्व तुझ्या दुष्ट बुद्धीचा परिणाम आहे. तो अनिष्ट प्रसंग ओढवला असतां प्रहार करणारांतील श्रेष्ठ कौरव व पांडव हृष्ट चित्तानें स्व-स्व-सैन्यांचे व्यूह रचून युद्धाला सज्ज झाले.

( २ ) हे राजन्, कौरवांच्या मकरव्यूहाचें भीष्मानें संमततः रक्षण केलें. त्याचप्रमाणें पांडवांनींहि आपल्या व्यूहाचें संरक्षण केलें. हे महाराज, तुझा देवव्रत पिता फार मोठा रथसमुदाय बरोबर घेऊन निघाला, तेव्हां रथी, पदाति, गज व अश्वसादी आपापल्या नियत स्थलीं स्थित होऊन परस्परांस अनुसरले.

( ३ ) याप्रमाणें कौरवांना युद्धाला सज्ज झालेलें पहातांच यशस्वी पांडवांनींहि समरांत अजिंक्य असलेला श्रेष्ठ श्येनव्यूह रचिला. त्या श्येनपक्ष्याकार व्यूहाच्या मुखस्थानीं महाबलाढ्य भीमसेन शोभत होता. दोन नेत्रांच्या जागीं दुर्धर्ष शिखंडी व पार्षत धृष्टद्युम्न हे दोघे वीर होते. मस्तकाच्या ठिकाणीं अमित पराक्रमी सात्यकि होता. मानेच्या जागीं आपलें गांडीव धनुष्य हालवीत पार्थ उभा होता. डाव्या पंखाच्या बाजूला एक अक्षौहिणी सेनेसह श्रीमान् द्रुपद स्थित होता आणि उजव्या पंखाच्या जागीं अक्षौहिणीसह तिचा पति केकयराज उभा राहिला. पृष्ठभागीं पांची द्रौपदेय, सौभद्रेय व उभयतां माद्रेयांसह ज्येष्ठ कौंतेय युधिष्ठिर स्थित होता.

( ४ ) हे महाराज, याप्रमाणें व्यूहरचना करून तीं उभय सैन्यें परस्परांच्या संमुख आलीं असतां भीमसेनानें त्या मकरव्यूहाच्या मुखांत प्रथम प्रवेश केला व पितामह भीष्माला बाणांनीं आच्छादून टाकिलें. तेव्हां शान्तनवानें महा अस्त्रांचा प्रयोग करून त्या महायुद्धांत पांडवांच्या सैन्याला मोहित केलें. आपलें सैन्य मोहित झालेलें पहातांच धनंजयानें भीष्मावर सहस्रावधि शरांचा वर्षाव करून त्याला विद्ध केलें. तेव्हां भीष्म त्याचें निवारण करून आपल्या युद्धोत्सुक सैन्यांसह युद्धाला सज्ज झाला.

तें पाहून दुर्योधनाला अर्जुनानें पूर्वी केलेल्या आपल्या सैन्याच्या नाशाचें

स्मरण झालें. त्याला युद्धांत झालेला भ्रातृवधहि आठवला व तो राजा भारद्वाज द्रोणाला म्हणाला—"हे आचार्य, तूं सर्वदा माझ्या हितांत तत्पर असतोस, यांत संशय नाहीं. आम्ही तुझा व पितामहा भीष्माचा आश्रय करून देवांनाहि रणांत जिंकण्यास निःसंशय समर्थ होऊं; मग पराक्रम व सामर्थ्य यांनीं हीन असलेल्या पांडवांची काय कथा! यास्तव हे भगवन्, ज्या उपायानें पांडवांचा वध होईल, अशी योजना कर. तुझें कल्याण असो."

हे महाराज, तुझ्या पुत्रानें अशी प्रार्थना केली असतां द्रोणाचार्यांनें सात्यकीच्या समक्ष पांडवसेनेचा भेद केला. तेव्हां सात्यकीनें द्रोणाला प्रतिकार केला व त्या दोघांचें घोर युद्ध प्रवृत्त झालें. प्रतापवान् भारद्वाजानें हंसतच सात्यकीच्या वक्षःस्थलावर तीक्ष्ण शर सोडिले. तेव्हां क्रुद्ध झालेल्या भीमसेनानें शस्त्रवेत्त्यांतील श्रेष्ठ द्रोणापासून सात्यकीचें रक्षण करण्यासाठीं त्या आचार्याला शरांनीं विद्ध केलें. तें पाहून भीष्म, द्रोण व शल्य या तिघांनीं भीमसेनाला शरांनीं आच्छादित केलें.

तेव्हां क्रुद्ध झालेले द्रौपदेय व सौभद्रेय यांनीं, त्या आयुधें उगारून युद्ध करणाऱ्या वीरांना तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. त्यावेळीं महाबलाढ्य भीष्मद्रोण अतिशय क्रुद्ध होऊन तुटून पडले आहेत, हें पाहून महेष्वास शिखंडीनें आपलें दृढ धनुष्य हातांत घेतलें व मेघगर्जनेप्रमाणें त्याचा टणत्कार करून शरांची इतकी वृष्टि केली कीं, त्याच्यायोगानें सूर्यहि आच्छादून गेला. शिखंडी युद्धाला पुढें येतांच भारतांच्या पितामहानें त्याचें पूर्वीचें 'स्त्रीत्व' स्मरून त्याच्याशीं प्रतियुद्ध केलें नाहीं.

तेव्हां तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें भीष्माचें रक्षण करण्यासाठीं द्रोण शिखंडीवर धांवून गेला. प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें प्रखर असलेल्या त्या शस्त्रवेत्त्यांतील श्रेष्ठ द्रोणाचार्याला भिडलेलें पहातांच त्रस्त झालेल्या शिखंडीनें त्याच्याशीं युद्धाचा प्रसंग टाळला.

त्यानंतर महद्यशाची इच्छा करणाऱ्या तुझ्या पुत्रानें फार मोठ्या सैन्यासह भीष्माचें संरक्षण केलें. त्याचप्रमाणें पांडवांनीं धनंजयाला पुढें करून विजयी होण्याच्या दृढ आशेनें भीष्मावरच चाल केली आणि युद्धामध्यें अद्भुत यश व जय मिळविण्याची इच्छा करणाऱ्या त्या कौरव-पांडवांचें देव-दानवांसारखें घोर युद्ध झालें. ६. ४. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ भीम व भीष्म यांचें युद्ध चालू असतां त्या रणांगणाचें वर्णन. ]

( १ ) संजय—हे महाराज, भीमसेनाच्या भयापासून तुझ्या पुत्रांचें रक्षण करण्यासाठीं त्यावेळीं शान्तनव भीष्मानें तुमुल युद्ध केलें. त्या दिवशीं पूर्वाह्ण-कालीं पांडवांच्या व कौरवांच्या मुख्य मुख्य शूरांचा विनाश करणारें भयंकर युद्ध झालें. हत्तींचा चीत्कार, अश्वांचें खिंकाळणें आणि भेरी, शंख, इत्यादि वाद्यांचा प्रचंड घोष यांचा गगनभेदी शब्द झाला. गोठ्यांतील मत्त ऋषभ जसे डुरकण्या फोडतात, तसे ते महाबलाढ्य युद्धोत्सुक पराक्रमी वीर जया-साठीं परस्परांना हांका मारीत गर्जना करीत होते.

हे भरतश्रेष्ठा, तीक्ष्ण शरांनीं रणांगणांत पाडविलीं जाणारीं मस्तकें आका-शांतून होणाऱ्या अश्मवृष्टीप्रमाणें भासलीं. सुवर्णालंकारांनीं भूषित झालेलीं व कुंडलें आणि शिरस्त्राणें यांनीं युक्त असलेलीं मस्तकें पडत असलेलीं दिसत होतीं. तीक्ष्ण बाणांनीं छिन्न-भिन्न झालेले अवयव, बाहुभूषणांनीं युक्त अस-लेले धनुष्यांसह बाहु, अलंकृत केलेले हस्त, कवचांनीं युक्त असलेलीं शरीरें व आरक्त नेत्रांनीं शोभणारीं चंद्रासारखीं शुभ मुखें, यांनीं भूमि आच्छादित झाली होती. गज, अश्व व नर यांच्या देहांनीं एका घटकेंत तें सर्व रणांगण व्याप्त झालें.

रजतासारख्या शुभ्र मेघांचा जसा गडगडाट होतो, तसा विद्युल्लतेसारख्या चमकणाऱ्या आयुधांचा तुमुल निर्घोष झाला. त्या कौरव-पांडवांचा अतिशय घोर, रक्ताची नदीच प्रवृत्त करणारा तुमुल संग्राम झाला. अंगावर रोमांच आणणारा तो घोर संग्राम चालला असतां युद्धदुर्मद क्षत्रियांनीं शरांचा वर्षाव केला. त्या शरवर्षावानें त्रस्त झालेले तुझ्या पुत्रांचे व पांडवांचे मत्त गज मोठ्यानें चीत्कार करूं लागले. त्या अमित तेजस्वी, धैर्यवान् व संतप्त झालेल्या वीरांच्या धनुष्यांचा टणत्कार व तलाघात यांचा निर्घोष इतका प्रचंड होत होता कीं, त्या ध्वनींत कांहींच कळेनासें झालें.

हे भरतश्रेष्ठा, त्या समरांगणांत सर्वत्र रक्ताची नदी वहात होती. त्यावेळीं शत्रूंचा वध करण्यास उद्युक्त झालेल्या नृपालांचीं कबंधें उठून इतस्ततः धांवत होतीं. ज्यांचे बाहु परिघासारखे दीर्घ आहेत, असे अतिशय तेजस्वी धीर शूर, शक्ति, गदा, खड्ग इत्यादि शस्त्रांनीं परस्परांचा वध करीत होते. शरांनीं विद्ध

झालेले निरंकुश गज भ्रमण करूं लागले. अश्वसादी मरून पडल्यामुळें त्यांचे अश्व दश-दिशांत धांवूं लागले. शरांच्या प्रहारांनीं पीडित झालेले कौरवांचे व पांडवांचे कांहीं योद्धे उठत होते व पुनः पडत होते. त्या भीम-भीष्मांच्या संग्रामांत गजाश्वांचीं मस्तकें, वीरांचीं धनुष्यें, गदा, परिघ, तुटलेले बाहु, मांड्या, पाय व केयूरादि भूषणें यांच्या राशि पडलेल्या दिसत होत्या. युद्धापासून निवृत्त झालेले अश्व, गज व रथ यांचे संघ जागजागीं दृष्टीं पडत होते.

हे राजा, ज्यांचा कालच ओढवला आहे, असे क्षत्रिय गदा, खड्ग, प्रास व तीक्ष्ण धारेचे बाण यांनीं परस्परांना गतप्राण करीत होते. कांहीं युद्धकुशल वीर आपल्या लोखंडी परिघासारख्या बाहूंनीं, मुष्टींनीं, जानूंनीं व तलाघातांनीं परस्परांचा वध करीत होते. पडलेल्या, पाडणाऱ्या व भूमीवर पडून तळमळणाऱ्या योद्धयांनीं ती रणभूमि घोर दिसत होती. कांहीं विरथ झालेले रथी हातांत खड्गें घेऊन शत्रूच्या वधेच्छेनें प्रतिस्पर्ध्यांवर धांवत होते. त्यानंतर दुर्योधन भीष्माला पुढें करून विपुल कालिंगांनीं परिवेष्टित होत्साता पांडवांवर धांवला. त्याचप्रमाणें पांडवहि भीमाला सर्वतः वेढून भीष्मावर क्रोधानें चालून गेले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. ६. ४. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १ धनंजयाचें भ्रात्यांच्या साह्यार्थ गमन, पार्थध्वजाचें वर्णन. २ संकुलयुद्ध. ३ रणांगणाचें वर्णन. ]

( १ ) संजय—हे राजन्, याप्रमाणें भीष्म व अन्य पार्थिव आपल्या भ्रात्यांवर तुटून पडलेले पाहून धनंजय शस्त्रास्त्रें उगारून गांगेयावर धांवला. त्यावेळीं पांचजन्य शंखाचा निर्घोष व गांडिव धनुष्याचा टणत्कार कानीं पडतांच आणि पार्थाचा ध्वज दिसतांच आम्ही सर्व भयभीत झालों. हे महाराज, धनंजयाचा तो ध्वज सिंहाच्या पुच्छानें चिह्नित होता, ज्वालामुखी पर्वताप्रमाणें आकाशांत शोभत होता. तो वृक्षांत अडकून रहात नव्हता. धूमकेतूसारखा पसरलेला होता. तो अनेक वर्णांचा व त्यामुळेंच विचित्र दिसत होता. असा तो वानरचिह्नानें युक्त असलेला पार्थाचा दिव्य ध्वज आमच्या दृष्टीं पडला.

त्या महायुद्धांत सुवर्णपृष्ठयुक्त गाण्डीवधनुष्य आकाशांतील मेघमंडलांत शोभणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें भासलें. त्यानें तुझ्या सैन्याचा संहार चालविला

असतां अर्जुनाच्या गाण्डीवधनुष्याचा टणत्कार व त्याचा तलशब्द मेघाच्या गडगडाटासारखा आमच्या कानीं पडला. प्रचंड झंझावात विद्युत्युक्त मेघांना जसा दशदिशांत पसरवून टाकितो, त्याप्रमाणें धनंजयानें गांगेयावर भैरवास्त्र सोडिलें. तेव्हां अस्त्रमोहित झालेल्या आम्हांला पूर्व व पश्चिम दिशाहि ओळखूं येईनातशा झाल्या.

हे राजा, तुझ्या सैन्यांतील कांहींचीं वहानें श्रांत झालीं होतीं. कित्येकांचे अश्व हत झाल्यामुळें ते योद्धे निरुत्साह झाले होते. ते सर्व दिङ्मूढ होऊन परस्परांस कवटाळूं लागले व तुझ्या पुत्रांसह ते सर्व सैनिक भीष्माच्या मार्गें लपले. त्या प्रसंगीं एकटा शान्तनवच त्या आर्तांचा आश्रय झाला. कांहीं रथ्यांनीं भयभीत होऊन आपल्या रथांतून खालीं उड्या टाकल्या. त्याचप्रमाणें त्रस्त झालेल्या अश्वसादींनीं अश्वांच्या पाठीवरून भूमीवर उड्या घेतल्या व पदाती तर भीतीनें भूमीवर पटापट पडले. अशनीच्या कडकडाटासारखा गाण्डीवाचा निर्घोष ऐकून भ्यालेलीं सर्व कौरवसैन्यें जेथें तेथें लपून उभीं राहिलीं.

(२) तेव्हां कलिंगाधिप पुढें सरसावला. त्याच्या सभोंवार कांबोज देशांतील शीघ्रगामी, जातिवंत, मोठ्या अश्वांनीं युक्त असलेला बालरक्षकांचा समुदाय, मद्र, सौवीर, गांधार, त्रिगर्त व कालिंगाचे मुख्य वीर होते. त्याचप्रमाणें सर्व राजांचा समुदाय व अनेक प्रकारचा नरगण यांसह जयद्रथ दुःशासनाला पुढें करून निघाला. त्याचप्रमाणें तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें चौदा हजार श्रेष्ठ अश्वसादींनीं परिवेष्टित असलेला सौबल शकुनि त्यांस अनुसरला. याप्रमाणें भिन्न भिन्न रथाश्वांवर आरूढ झालेले ते सर्व वीर एकत्र जमून अर्जुनावर चालून गेले.

(३) रथ, अश्व व गज यांच्या पायांनीं उडालेल्या धूलीनें व्याप्त झालेलें रणांगण मेघयुक्त आकाशाप्रमाणें भासलें. तोमर, प्रास, नाराच इत्यादि आयुधांनीं सज्ज असलेल्या मोठ्या सैन्यांसह भीष्महि अर्जुनावर चालून आला. त्यावेळीं हे राजा, आवंत्य काशिराजावर धांवला, जयद्रथ भीमसेनावर तुटून पडला, पुत्र व अमात्य यांसह युधिष्ठिरानें यशस्वी मद्रपतीशीं युद्ध केलें. विकर्ण सहदेवावर व चित्रसेन शिखंडीवर धांवून गेला. मत्स्यराजानें दुर्योधन व शकुनि यांच्याशीं युद्ध आरंभिलें. द्रुपद, चेकितान व महारथ सात्यकि यांनीं अश्वत्थामा व द्रोण यांच्यावर चाल केली. कृप व कृतवर्मा धृष्टद्युम्नावर तुटून पडले.

याप्रमाणें त्या उभय सैन्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें असतां त्या रणांगणांत सर्वत्र अश्व, गज व रथ इतस्ततः भटकत असलेले दिसत होते. त्यावेळीं आकाश निरभ्र असूनहि तीव्र विजा चमकत होत्या. दिशा धूलीनें व्याप्त झाल्या. गडगडाट झाला, उल्कापात होऊं लागला, वावटळ सुरू झाली व धूलीची जणुकाय वृष्टि होऊं लागली. सैन्याच्या पायांनीं उडालेल्या धूलीनें सूर्य आच्छादित झाला. धूलीनें दिशा व्यापल्यामुळें कांहीं दिसेनासें झालें. अस्त्र-जालांनीं जर्जर झालेले सर्व प्राणी मोहित झाले. वीरांच्या हातून सुटणारें शर-संघातांचें जाळें पसरलें. ते तीक्ष्ण शर दृढ कवचाचेंहि विदारण करणारे होते. वीरांनीं उगारलेलीं चकचकीत शस्त्रें नक्षत्रांप्रमाणें चमकत होतीं. त्यांच्या तेजानें आकाश प्रकाशित झालें. ऋषभांच्या कातड्यानें मढविलेल्या व सुवर्णानें भूषविलेल्या असंख्य ढाली इतस्ततः पसरल्या होत्या. सूर्याप्रमाणें देदीप्यमान् तरवारींनीं छेद करून पाडविलेलीं मस्तकें व शरीरें सर्व दिशांत दिसत होतीं. कांहीं प्रचंड रथांचीं चक्रें, कणे वगैरे भिन्न भिन्न भाग मोडून पडले होते. कांहींचे ध्वज तुटले होते, कित्येकांचे अश्व मरून पडले होते, कित्येक रथांतील योद्धे व सारथि गतप्राण होऊन अश्व क्षतांनीं विह्वल झाले होते आणि रथांना ओढीत भलत्याच दिशेकडे धांवत होते. कांहीं शरविद्ध अश्व मुखांवरील बंधनांसह जुंपलेलें जूं ओढीत इतस्ततः भ्रमण करीत होते. एका ठिकाणीं मत्त गज रथयोद्ध्यांस सारथि व अश्व यांसह तुडवीत होते.

कांहीं मत्तगज सैन्यांच्या संभ्रमांत मदस्रावाच्या उग्र दर्पाचें अवघ्राण करून मोहित झाले व दुर्बलांसच मत्त समजून त्यांना ओढूं लागले. नाराच बाणांनीं विद्ध होऊन मरून पडलेले गज व गतप्राण होऊन हातांतील अंकुशांसह खालीं पडणारे योद्धे यांनीं तें समरांगण व्यापून गेलें होतें. त्या सैन्यांत कांहीं प्रचंड मत्तगज सोडले होते. त्यांनीं आपल्या शुंडा-दंडांनीं ध्वज, व योद्धे यांसह सामान्य आकाराच्या दुर्बल गजांना चिरडून टाकिलें. कांहीं हत्तींनीं आपल्या सर्पासारख्या दीर्घ शुंडांनीं अनेक रथांचीं युगें तोडून टाकिलीं होतीं. कित्येक दीर्घ दंतांच्या हत्तींनीं रथ मोडून त्यांतील योद्ध्यांचे केस धरून त्यांना बाहेर ओढून काढले व वृक्षाच्या शाखेप्रमाणें त्यांना गरगरां फिरवून भूमीवर फेंकून दिलें. कांहीं ठिकाणीं एका रथाचीं चक्रें दुसऱ्या रथांत अडकून बसलीं होतीं, अशा रथांना कित्येक गज फरफटीत भ्रमण करीत चालले होते व मोठ्यानें चीत्कार करीत होते. अशा प्रकारचे ते रथ ओढीत

असतां, सरोवरांतून कमलांचें गुंतलेलें जाळें ओढून काढणाऱ्या गजांप्रमाणें शोभले. याप्रमाणें तें रणांगण अश्वसादी, पदाति व ध्वजांसह महारथ यांनीं व्याप्त झालेलें दिसत होतें. ६. ४. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ भिन्न भिन्न वीरांचें प्रतियोद्धयांशीं पृथक् पृथक् युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें मत्स्यराज विराटासह शिखंडीनें महाधनुर्धर भीष्मावर चाल केली. द्रोण, कृप, महाबलाढ्य विकर्ण व इतर शूर नृपाल यांच्याशीं धनंजयानें युद्ध आरंभिलें. भ्राते व अमात्य यांसह सैंधव, प्राच्य व दाक्षिणात्य भूमिप आणि तुझा अमर्षी पुत्र यांच्यावर भीमसेन धांवून गेला. शकुनि व उलूक या दोघां पिता-पुत्रांशीं सहदेवानें संग्राम केला. तुझ्या पुत्रानें ज्याची वंचना केली, त्या युधिष्ठिरानें गजसैन्यावर चाल केली. माद्रीपुत्र नकुलानें त्रिगर्तांच्या सैन्याशीं युद्ध केलें. सात्यकि, चेकितान व सौभद्रेय हे तिघे क्रुद्ध होऊन शाल्व व केकय यांवर तुटून पडले. दुर्जय धृष्टकेतु व घटोत्कच राक्षस यांनीं तुझ्या पुत्रांच्या रथदलावर चाल केली. सेनापति धृष्टद्युम्नानें उग्र कर्में करणाऱ्या द्रोणाशीं युद्ध केलें. याप्रमाणें कौरव व पांडवपक्षांतील वीरांनीं प्रतियोद्धयांची निवड करून तुमुल युद्ध आरंभिलें.

त्यावेळीं सूर्य माध्याह्नीं आला असून सर्व नभोमंडल तप्त झालें होतें. अशा समयीं कौरव-पांडवांचें घनघोर युद्ध प्रवृत्त झालें. व्याघ्रचर्मांनें मढविलेले, सुवर्णांनीं भूषविलेले व ध्वज-पताकांनीं युक्त असलेले रथ रणभूमीवर इतस्ततः फिरत होते. परस्परांना जिंकण्याच्या इच्छेनें एकत्र जमलेल्या वीरांचा सिंहनाद खरोखरच सिंहांच्या गर्जनेप्रमाणें भासला.

त्यानंतर सृंजय व कौरव यांचा संग्राम सुरू झाला. त्या उभयतांचे परस्परांवर होत असलेले प्रहार अतिशय दारुण व अद्भुत होते. त्यांनीं सोडलेल्या शरांनीं सूर्य, दिशा व उपदिशाहि आच्छादित झाल्या. तीक्ष्ण धारेच्या शक्ति, तोमर व चकचकीत खड्गें यांचें नील कमलासारखें तेज पसरलें होतें. विचित्र कवचें व भूषणें यांच्या प्रभेनें अंतरिक्ष, दिशा व उपदिशा प्रकाशित झाल्या होत्या. तें समरांगण ठिकठिकाणीं चंद्र-सूर्यांप्रमाणें तेजस्वी नृपालांच्या शरीरांनीं शोभत होतें. रणांत एकत्र जमलेले ते सर्व वीर नभोमंडलांतील ग्रहांप्रमाणें भासत होते.

राजा, नंतर भीष्मानें अतिशय क्रुद्ध होऊन सर्व सैन्याच्या समक्ष भीमाचें निवारण केलें. त्यावेळीं शान्तनवानें सोनेरी पृष्ठयुक्त तीक्ष्ण शरानें भीमसेनाला विद्ध केलें. तेव्हां भीमसेनानें क्रुद्ध झालेल्या सर्पाप्रमाणें घोर शक्ति भीष्मावर सोडिली. ती सुवर्णाच्या दंडानें युक्त असलेली दुरासद शक्ति येत असलेली पाहून गांगेयानें नतपर्व बाणांनीं तिचे मार्गांतच तुकडे करून टाकिले आणि दुसरा एक भल्ल बाण सोडून भीमसेनाचें धनुष्य तोडून त्याचे दोन तुकडे केले.

तेव्हां सात्यकि पुढें सरसावला व आपलें धनुष्य आकर्ण ओढून त्यानें पितामहावर शरांची वृष्टि केली. तें पाहून भीष्मानें एक परम दारुण तीक्ष्ण शर सोडून सात्यकीच्या सारथ्याचा वध केला. तेव्हां सूत गतप्राण होऊन खालीं पडला असतां, अश्व रथ घेऊन वायुवेगानें किंवा मनोवेगानें इतस्ततः पळत सुटले. तेव्हां सर्व सैन्यांत फार मोठा कोलाहल झाला. महात्म्या पांडवांच्या पक्षांत हाहाकार उडाला. ‘धांवा, धांवा, अश्वांना धरा,’ अशा प्रकारच्या गर्जना करीत सैनिक सात्यकीच्या रथाकडे धांवले.

इतक्या वेळांत भीष्मानें असुरांचा नाश करणाऱ्या इंद्राप्रमाणें पांडवांच्या सेनेचा संहार चालविला. भीष्मानें पांचाल व सोमक यांचा वध चालविला असतां, ते युद्धाचा निश्चय करून अधिकच त्वेषानें त्यांच्यावर धांवून जात होते. तुझ्या पुत्राच्या सैन्याला जिंकण्याची इच्छा करणारे धृष्टद्युम्नादि पांडवांकडील वीरहि पितामहावर धांवून गेले. तेव्हां भीष्म-द्रोणांस पुढें करून कौरवहि मोठ्या वेगानें युद्धाला सरसावले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. ६. ४. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ परस्परांचें संकुल युद्ध. २ अभिमन्यूचें लक्ष्मणाशीं युद्ध. ३ लक्ष्मणाचा पराजय. ]

( १ ) संजय—हे धृतराष्ट्रमहाराज, त्या युद्धांत विराटानें भीष्मावर तीन बाण सोडले व तीन बाणांनीं त्याच्या अश्वांना विद्ध केलें. तेव्हां शान्तनव भीष्मानें त्याच्यावर उलट दहा शर सोडिले. इकडे अश्वत्थाम्यानें अर्जुनाच्या हृदयावर सहा बाण सोडिले. परंतु अर्जुनानें व्यथित न होतां तीक्ष्ण बाणांनीं त्याचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या द्रौणीनें दुसरें दृढ धनुष्य

घेतलें व मोठ्या वेगानें अर्जुनावर नव्वद व वासुदेवावर सत्तर बाण सोडिले. तें पाहून पार्थ क्रोधसंतप्त झाला. त्याचे नेत्र आरक्त झाले. त्यानें दीर्घ निश्वास सोडला व कृष्णासह क्षणभर विचार करून धनुष्याचा टणत्कार केला आणि जीविताचा अंत करणारे शिलीमुख घोर बाण सोडून द्रौणीला विद्ध केलें. त्या बाणांनीं त्याच्या कवचाचा भेद करून त्याचें रक्त प्राशन केलें. तथापि अश्वत्थामा यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. त्यानें विह्वल न होतां भीष्माचें रक्षण करण्यासाठीं पुनः शरांचा वर्षाव चालविला. अश्वत्थामा कृष्णार्जुनांशीं युद्ध करीत आहे, हें पाहून कौरवांनीं त्याच्या त्या महत्कर्माची प्रशंसा केली. त्याला द्रोणाचार्यांपासून अतिशय दुर्लभ अस्त्रांची प्राप्ति झाली होती. तो त्यांचे प्रयोग व संहार योग्यप्रकारें जाणत होता. त्यामुळें तो नित्य सैन्यामध्यें निर्भयपणानें युद्ध करीत असे.

त्यावेळीं अर्जुनानें त्या भारद्वाजपुत्रावर दया केली. "हा माझ्या आचार्यांचा पुत्र असून तो द्रोणाला अतिशय प्रिय आहे, विशेषतः ब्राह्मण आहे आणि मलाहि तो मान्य आहे." असा विचार करून तो शत्रुतापन वीर द्रौणीला सोडून तुझ्या इतर सैनिकांकडे वळला. इतक्यांत दुर्योधनानें भीमसेनाशीं युद्ध आरंभिलें. त्यानें तीक्ष्ण धारेचे दहा बाण भीमावर सोडिले. तेव्हां क्रुद्ध झालेल्या भीमानें आपलें विचित्र धनुष्य धारण केलें. तें दृढ धनुष्य शत्रूंचे प्राण हरण करणारें होतें. त्यानें त्या कुरुश्रेष्ठावर दहा तीक्ष्ण बाण सोडून त्याचें वक्षःस्थल विद्ध केलें. तेव्हां त्याच्या गळयांत असलेला सुवर्ण सूत्रस्थ मणि शरांनीं परिवेष्टित झाला व आकाशांत नक्षत्रांनीं आवृत्त झालेल्या सूर्याप्रमाणें शोभला.

भीमसेनानें याप्रमाणें विद्ध केलें असतां तें तुझ्या पुत्राला सहन झालें नाहीं. मत्त गजाला जशी तळहाताची थाप सहन होत नाहीं, तसा तो अमर्षी दुर्योधन संतप्त झाला व त्यानें तीक्ष्ण धारेच्या बाणांची भीमसेनावर वृष्टि करून सर्व सैन्याला भयभीत केलें. युद्धांत परस्परांस क्षतयुक्त करणारे ते दोघेहि तुझे महाबलाढ्य पुत्र त्यावेळीं देवांप्रमाणें शोभले.

त्या दोघांचें असें युद्ध चालू असतां इकडे परवीरहा सौभद्रानें नरव्याघ्र चित्रसेनाला दहा बाण मारले. पुरुमित्रावर सात व सत्यव्रतावर सत्तर बाण सोडिले. तो वीर इंद्रतुल्य पराक्रम करीत त्या रणांगणांत जणुं काय नृत्यच

करीत होता. तें पाहून आमचें मन व्यथित झालें. त्यावेळीं त्या कुमारावर चित्रसेनानें दहा, सत्यव्रतानें नऊ व पुरुमित्रानें सात बाण सोडिले. तेव्हां शरांनीं विद्ध झालेल्या सौभद्रेयाच्या क्षतांतून रक्ताच्या धारा वहात असतांहि त्यानें चित्रसेनाचें विचित्र धनुष्य तोडून टाकिलें व त्याच्या कवचाचा भेद करून वक्षःस्थल विद्ध केलें. तें पाहून तुझ्याकडील महारथ राजपुत्र जमले व त्यांनीं तीक्ष्ण बाणांची अभिमन्यूवर वृष्टि चालविली. तथापि सौभद्रेय परम अस्त्रवेत्ता होता. त्यानें तत्काल त्या सर्व वीरांचें निवारण केलें. त्याचें तें अद्भुत कर्म पाहून तुझ्या पुत्रांनीं त्याला वेढून टाकिलें. त्यावेळीं सैन्याला दग्ध करणारा तो वीर वनांतील तृणाला जाळणाऱ्या दावानलाप्रमाणें भासला; तो तेजस्वी आर्जुनि सैन्याचा संहार करीत असतां शिशिरऋतूनंतर प्रखर होणाऱ्या उन्हाळ्यांतील प्रदीप्त अग्नीप्रमाणें शोभला.

( २ ) राजा, याप्रमाणें अभिमन्यूचें तें महत्कृत्य पाहून तुझा पौत्र लक्ष्मण तत्काल त्याच्यावर चालून गेला. तेव्हां सौभद्रानें संतप्त होऊन लक्ष्मणाला सहा व त्याच्या सारथ्याला तीन बाणांनीं विद्ध केलें. लक्ष्मणानेंहि उलट त्याच्यावर तीक्ष्ण धारेचे बाण सोडिले. त्यावेळीं त्याचें तें युद्ध मोठें अद्भुतच झालें. सौभद्रेयानें तीक्ष्ण शर सोडून लक्ष्मणाच्या चारी अश्वांना गतप्राण केलें, सारथ्याचा वध केला व लक्ष्मणावर चाल केली. तेव्हां त्या अश्वरहित रथांतूनच लक्ष्मणानें सौभद्रावर शक्ति सोडिली. ती सर्पतुल्य घोर शक्ति येऊन पोंचण्यापूर्वींच अभिमन्यूनें शर सोडून तिचे मार्गांतच तुकडे करून टाकिले.

( ३ ) तेव्हां कृपाचार्यानें लक्ष्मणाला स्वतःच्या रथांत घेतलें व सर्व सैन्याच्या समक्ष त्याला तेथून दूर नेलें. त्यानंतर महाभय उपस्थित झालें असतां परस्परांच्या वधाची इच्छा करणारे पांडवांचे व तुझे महारथ एकमेकांवर धांवून गेले. त्यावेळीं योद्ध्यांच्या शिखा सुटल्या होत्या, कवचें तुटलीं होतीं, धनुष्यें मोडलीं होतीं व ते विरथ झाले होते. अशा प्रकारचे सृंजय कौरवांशीं बाहुयुद्ध करूं लागले. महाबाहु भीष्मानें दिव्य अस्त्रांनीं महात्म्या पांडवांच्या सेनेचा संहार चालविला. याप्रमाणें युद्ध चाललें असतां हत झालेले अश्व, गज, नर, अश्वावरून पडलेले सादी, रथी, इत्यादिकांच्या शरीरांनीं ती रणभूमि आच्छादित झाली. ६. ४. ७३.

## अध्याय ७४ वा.

[ १ सात्यकि-भूरिश्रवायुद्ध. २ सात्यकीच्या दहा पुत्रांचा वध. ३ पंचमदिन युद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे राजा, त्यानंतर युद्धदुर्मद सात्यकीनें आपलें अतिशय श्रेष्ठ व दृढ धनुष्य हातीं घेतलें आणि तें आकर्ण ओढून सर्पतुल्य शर सोडिले. त्यावेळीं त्यानें आपलें अप्रतिम हस्तलाघव प्रदर्शित केलें. तो शर घेतो केव्हां, धनुष्याला जोडतो केव्हां, सोडतो केव्हां व शत्रूंचा पटापट प्राण घेतो केव्हां, हें पहाणारांसहि कळत नव्हतें. त्याचें तें हस्तचापल्य पाहून सतत जलवृष्टि करणाऱ्या मेघाचाच भास झाला.

सात्यकीचा तो उत्साह पाहून दुर्योधनानें त्यावर दहा हजार रथ पाठविले, परंतु परम अस्त्रवित् पराक्रमी सात्यकीनें त्यांचा दिव्य अस्त्रानें संहार केला व हें दारुण कर्म केल्यावर तो वीर भूरिश्रवावर धांवून गेला. तेव्हां कौरवांची कीर्ति वाढविणारा भूरिश्रवाहि आपल्या एवढ्या मोठ्या सैन्याचा सात्यकीनें नाश केलेला पाहून अतिशय क्रोधानें त्याच्यावर तुटून पडला. त्यानें आपलें इंद्रधनुष्यासारखें महद्धनुष्य आकर्ण ओढलें व वज्रासारखे तीक्ष्ण व सर्पतुल्य प्राणघातक सहस्रावधि बाणांचा वर्षाव करीत आपलें हस्तलाघव प्रकट केलें. त्यावेळीं त्याचे ते मृत्युतुल्य शर सात्यकीच्या अनुचरांस सहन झाले नाहींत. ते सात्यकीला एकट्याला रणांत सोडून स्वतःचा जीव घेऊन पळाले.

( २ ) तेव्हां युद्धदुर्मद सात्यकि एकटाच रणांगणांत उभा आहे, हें पाहून त्याचे महाबलाढ्य प्रख्यात दहा पुत्र पुढें सरसावले. ते सर्व चित्र-विचित्र कवचें व ध्वज यांनीं युक्त होते. ते त्या रणांगणांत भूरिश्रवाच्या समीप येऊन त्याला म्हणाले—" अरे हे कौरवदायादा, तूं जर एवढा महाबलाढ्य आहेस तर ये, आमच्याशीं युद्ध कर. तुला हवें तर आम्हां सर्वांबरोबर एकाच वेळीं युद्ध कर किंवा एकेकट्याशीं द्वंद्व कर. तूं आम्हांला जिंकून या संग्रामांत यश संपादन कर, किंवा आम्ही तुझा पराजय करून पित्याच्या प्रीतीला पात्र होऊं."

याप्रमाणें त्या शूरांचें भाषण ऐकून तो महाबलाढ्य व स्वपराक्रमाची श्लाघा करणारा वीर म्हणाला—" हे वीरांनो, तुम्हीं जो हा विचार केला आहे, तो उत्तम आहे. यास्तव आतां सज्ज होऊन माझ्याशीं युद्ध करा. मी युद्धांत तुम्हांला गतप्राण करीन."

भूरिश्रवा असें बोलला असतां शीघ्र गतीनें शरक्षेप करणारे ते वीर त्याच्यावर फार मोठी शरवृष्टि करीत धांवून गेले. हे महाराज, अपराह्णकालीं त्यांचा तुमुल संग्राम प्रवृत्त झाला. एकाशीं युद्ध करणारे ते अनेक वीर रणांगणांत जमले व त्यांनीं त्या रथिश्रेष्ठ कौरवाला शरांनीं आच्छादित केलें. तेव्हां तो वर्षाऋतूंत मेघांनीं सिक्त झालेल्या मेरु पर्वताप्रमाणें शोभला. त्या दहा वीरांनीं सोडलेले शर यमदंडाप्रमाणें अतिशय घोर होते. त्यांची प्रभा अशनीप्रमाणें पसरली होती. तथापि तें पाहून तो महारथ मुळींच श्रांत झाला नाहीं. त्यानें ते शर येऊन पोंचण्यापूर्वींच त्यांचा छेद केला. त्यावेळीं आम्हीं सौमदत्तीचा अद्भुत पराक्रम पाहिला. तो एकटा अनेक योद्ध्यांशीं निर्भयपणें युद्ध करीत होता.

राजा, नंतर त्या दहा महारथांनीं शरवृष्टि करून त्या महाबाहूला वेढून टाकिलें, तेव्हां क्रुद्ध झालेल्या सौमदत्तीनें त्यांच्या धनुष्यांचा छेद केला व नतपर्व बाण सोडून त्यांचीं मस्तकेंहि तोडून टाकिलीं. तेव्हां हत झालेले ते राजपुत्र वज्रानें भग्न झालेल्या वृक्षांप्रमाणें भूमीवर पडले.

याप्रमाणें आपल्या महाबलाढ्य पुत्रांचा वध झालेला पाहून सात्यकि फार मोठी गर्जना करीत भूरिश्रवाच्या समीप आला. त्या उभयतांचे रथ परस्परांस भिडले व त्या दोघांनीं एकमेकांच्या रथांच्या अश्वांना मारून टाकिलें. तेव्हां ते दोघेहि विरथ झालेले योद्धे गर्जना करीत आपापलीं खड्गें घेऊन धांवले. युद्धाला सज्ज होऊन ढाली पुढें करून उभे असलेले ते दोघे नरव्याघ्र त्यावेळीं प्रेक्षणीय दिसत होते.

इतक्यांत भीमसेन खड्ग धारण केलेल्या सात्यकीच्या समीप मोठ्या त्वरेनें आला व त्यानें त्याला आपल्या रथांत घेतलें. त्याचप्रमाणें तुझ्या पुत्रानेंहि सर्व धनुर्धरांच्या समक्ष आपला रथ सत्वर भूरिश्रवाजवळ नेऊन त्याला आपल्या रथांत बसविलें.

इकडे त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें असतां क्षुब्ध झालेले पांडव महारथ भीष्माशीं युद्ध करूं लागले. सूर्य आरक्त होऊन अस्ताचलीं चालला असतां धनंजयानें मोठ्या त्वरेनें पंचवीस हजार महारथांचा संहार केला. ते सर्व दुर्योधनाच्या आज्ञेवरून पार्थाचा वध करण्यास आले होते, परंतु ते अग्नीमध्यें नाश पावणाऱ्या शलभाप्रमाणें मृत झाले. त्यानंतर मत्स्य व धनुर्वेदविशारद केकय यांनीं पुत्रांसह पार्थाला वेढून टाकिलें.

( ३ ) इतकें होईपर्यंत सूर्य मावळला. सर्वत्र अंधकार पसरला. सैन्याला दिसेनासें झालें. तेव्हां संध्येचा काल झाल्यामुळें ज्याचे अश्व श्रांत झाले आहेत, अशा तुझ्या देवव्रत पित्यानें आपल्या सैन्यांना परत फिरण्याची आज्ञा केली. ती ऐकून पांडव व कौरव यांच्या या समागमांत भयानें उद्विग्न झालेल्या त्या दोन्ही सेना आपापल्या शिबिरांत गेल्या. स्वशिबिरांत गेल्यावर सृंजयांसह पांडवांनीं व त्याचप्रमाणें कौरवांनींहि विश्रांति घेतली. ६. ४. ७४.

---

## अध्याय ७५ वा

[ १ राजांचें रणांगणाकडे प्रयाण. २ पांडवांचा मकरव्यूह. ३ कौरवांचा क्रौंचव्यूह. ४ तुमुल युद्ध. ]

( १ ) संजय—हे राजन्, याप्रमाणें कौरव पांडवांनीं आपापल्या सैन्यासह विश्रांति घेतली व ती रात्र निघून गेली असतां ते पुनः युद्धाला निघाले. त्यावेळीं सज्ज झालेले रथिश्रेष्ठ, गज, अश्व, पदाति यांचा युद्धभूमीकडे त्वरेनें जाण्याचा संभ्रम व शंख-दुन्दुभींचा नाद यांचा फार मोठा घोष झाला.

( २ ) त्यानंतर युधिष्ठिर धृष्टद्युम्नाला म्हणाला—हे महाबाहो, शत्रूचा नाश करणाऱ्या मकरव्यूहाची रचना कर.

युधिष्ठिराची ही आज्ञा ऐकतांच रथिश्रेष्ठ धृष्टद्युम्नानें त्या व्यूहांतील सर्व वीरांचीं स्थानें नियत केलीं. मस्तकाच्या जागीं द्रुपद व धनंजय उभे राहिले. नकुल-सहदेव या दोघांनीं दोन नेत्रांचें स्थान भूषविलें. भीमसेन मुखाच्या जागीं स्थित झाला. सौभद्र, द्रौपदेय, घटोत्कच, सात्यकि व धर्मराज हे त्या मकरव्यूहाच्या मानेच्या जागीं उभे राहिले. फार मोठ्या सेनेनें परिवेष्टित असलेल्या धृष्टद्युम्नासह विराटराजा पृष्ठभागीं स्थित झाला. पांच केकय भ्रात्यांनीं डावी बाजू संभाळली आणि धृष्टकेतु व चेकितान यांनीं उजव्या बाजूचें रक्षण केलें. फार मोठ्या सैन्यानें आवृत्त असलेला शतानीक कुंतिभोज व सोमक यांनीं परिवेष्टित झालेला शिखंडी या दोघांनीं दोन पायांकडील भागांचें संरक्षण केलें व इरावान् पुच्छाच्या जागीं स्थित झाला. याप्रमाणें त्या महाव्यूहाची रचना करून सज्ज झालेल्या पांडवांनीं सूर्योदय होतांच युद्धार्थ प्रयाण केलें. ते आपलीं सर्व तीक्ष्ण धारेचीं शस्त्रें उगारून मोठ्या त्वरेनें कौरवांवर चाल करण्यास निघाले.

( ३ ) हे राजन्, पांडवांचा तो व्यूह पाहून तुझ्या देवव्रत पित्यानें आपल्या सैन्याचा क्रौंचव्यूह रचिला. त्या व्यूहाच्या मुखाच्या जागीं भारद्वाज द्रोण उभा राहिला. अश्वत्थामा व कृप नेत्रस्थानीं स्थित झाले. कृतवर्मा व काम्बोज बाल्हिकांसह मस्तकाच्या स्थानीं झाले. शूरसेन व अनेक नृपालांसह तुझा पुत्र दुर्योधन हे मानेच्या जागीं उभे राहिले. मोठ्या सैन्यांनीं युक्त असलेले मद्र, सौवीर व केकय वीर प्राग्ज्योतिषांसह हृदयाच्या स्थानीं उभे राहिले. प्रस्थलाधिप सुशर्मा स्वसेनेसह डाव्या बाजूचा आश्रय करून सज्ज होऊन राहिला. चूचुपासह तुषार, यवन व शक हे व्यूहाच्या उजव्या बाजूच्या संरक्षणार्थ स्थित झाले. श्रुतायु, शतायु व सौमदत्ति हे परस्परांचें रक्षण करीत व्यूहाच्या मागच्या बाजूस उभे राहिले.

( ४ ) त्यानंतर पांडव कौरवांशीं येऊन भिडले व फार मोठें युद्ध प्रवृत्त झालें. रथी, गजसादी, अश्वसादी व पदाति इत्यादि योद्धे प्रतियोद्ध्यांवर तुटून पडले. ते क्रुद्ध झालेले योद्धे परस्परांवर धांवून गेले. त्यावेळीं भीमसेन, अर्जुन, माद्रेय व अन्य महारथ यांनीं संरक्षिलेली पांडवांची ती सेना नक्षत्रांनीं युक्त असलेल्या रात्रीप्रमाणें शोभली. त्याचप्रमाणें भीष्म, कृप, द्रोण, शल्य व दुर्योधनादि भ्राते यांनीं युक्त असलेलें तुझें सैन्य ग्रहांनीं व्यापलेल्या अंतरिक्षाप्रमाणें भासलें.

हे महाराज, त्यावेळीं पराक्रमी द्रोणाला पाहून भीमसेन आपल्या वेगवान् अश्वांच्या योगानें भारद्वाजाच्या सैन्यावर धांवून गेला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या द्रोणानें भीमाच्या मर्मस्थलांवर नऊ बाण सोडून त्याला विद्ध केलें आणि विह्वल झालेल्या भीमानें द्रोणाच्या सारथ्याला तत्काल यमसदनीं पाठविलें. तेव्हां हे राजन्, त्या प्रतापवान् द्रोणानें आपल्या हातांत रज्जु धारण करून स्वतःच अश्वांचें नियमन केलें व वायूनें उडवून दिलेल्या कापसाच्या राशीप्रमाणें पांडवांचें सैन्य उधळून लाविलें. त्यावेळीं द्रोण व भीष्म यांच्या कडून पीडित होणाऱ्या केकयांसह सृंजयांनीं तेथून पलायन केलें.

त्याचप्रमाणें भीमार्जुनांनीं त्रस्त केलेली तुझी सेना मदयुक्त वारांगनेप्रमाणें मोहित होऊन मंदगतीनें जाऊं लागली. मुख्य मुख्य वीरांचा वध झाल्यामुळें त्या दोन्ही व्यूहांचा भेद झाला. दोन्ही सैन्यें एकमेकांत मिसळलीं व त्यांचा घोर संग्राम सुरू झाला. याप्रमाणें तुझे सैनिक शत्रुसैन्यांत मिसळून ती एक-

रूप झालेली महासेना युद्ध करीत असतां अतिशय अद्भुत दिसली. ते महा बलाढ्य पांडव व कौरव आपापल्या अस्त्रांचा परस्परांवर प्रयोग करीत तुमुल युद्ध करूं लागले. ६. ४. ७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ धृतराष्ट्रानें वर्णिलेलें स्वसैन्याचें श्रेष्ठत्व. २ भवितव्यच बलवत्तर आहे असें समाधान. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, याप्रमाणें माझें सैन्य अनेक गुणांनीं युक्त व विविध प्रकारचें होतें. तें अमोघ सैन्य यथाशास्त्र व्यूह रचून उभें होतें. आमचें तें सैन्य सर्वप्रकारें संतुष्ट असून आमच्या हितांत तत्पर होतें. तें नम्र असून कोणत्याहि संकटांत सांपडणारें नव्हतें व त्यांच्या पूर्व पराक्रमाचीहि प्रसिद्धि आहे. माझ्या सैन्यांतील योद्धे अति बाल नाहींत, अति वृद्ध नाहींत, अति कृश नाहींत किंवा अति स्थूल ( वातयुक्त शरीराचे ) नाहींत. ते अतिशय चपल, उत्साहयुक्त, सुदृढ व निरोगी आहेत. शस्त्रास्त्रांनीं सज्ज झालेले ते सर्व वीर अनेक शस्त्रें धारण करण्यांत कुशल असून खड्गयुद्ध, द्वंद्वयुद्ध व गदायुद्ध यांत प्रवीण आहेत. प्रास, तोमर, ऋष्टि, शक्ति, मुसल इत्यादि विविध आयुधांनीं युद्ध करण्यांत विशारद असून मुष्टियुद्ध व नानाप्रकारचीं चित्र-विचित्र क्षेपणें यांत पारंगत आहेत. ते विविध प्रकारच्या विद्या जाणणारे माझे सैनिक उत्तम प्रकारचा व्यायाम करून आपली देहयष्टि सुदृढ ठेवीत असत. गजारूढ होण्यांत, त्वरेनें खालीं उतरण्यांत, उडी मारून पलीकडे जाण्यांत, अचूक नेम मारण्यांत, रथ चालविण्यांत व अश्वारूढ होण्यांत निष्णात आहेत. त्या सर्वांची परीक्षा घेऊन त्यांना यथान्याय वेतन देऊन ठेवलेलें आहे. संजया, माझे सैनिक मिथ्या गोष्टी सांगून वेठीला धरून आणलेले नाहींत. किंवा ते उपकृत असल्यामुळें व आप्तसंबंधाच्या नात्यामुळें जमलेले नाहींत. तर ते सर्व कुलीन व संपन्न असून संतुष्टचित्त आहेत.

माझ्या सैन्यांतील वीर विचारी, यशस्वी व प्रख्यात आहेत. त्यांनीं लोक-पालतुल्य थोर व शूर नृपालांचीं युद्धें पाहिलेलीं आहेत. पृथ्वीतलावर मान्य असलेले क्षत्रिय स्वेच्छेनें आपापल्या सेनेसह माझ्या पक्षाला येऊन मिळाले आहेत. त्यामुळें माझी प्रचंड सेना, ज्यांत समंततः अनेक नद्या येऊन मिळत

आहेत, अशा विस्तीर्ण समुद्राप्रमाणें भासत आहे. माझें सैन्य पक्षहीन, परंतु पक्ष्याप्रमाणें गतिमान् असलेल्या गजाश्वांनीं युक्त आहे. असंख्य योद्धे तुडुंब भरलेल्या जलाप्रमाणें भयंकर दिसत आहेत. विविध वाहनें तरंगांप्रमाणें शोभत आहेत. खड्ग, गदा, शक्ति, बाण, प्रास इत्यादि असंख्य आयुधांचा माझ्या सैन्यांत भरपूर संग्रह आहे व तें सैन्य ध्वज, भूषणें, रत्नें व वस्त्रें यांनीं समृद्ध आहे. धांवणाऱ्या अश्वांमुळें तें वायुवेगानें कांपत आहेसेंच भासतें. तें अपार समुद्राप्रमाणें गर्जना करणारें अप्रतिम सैन्य दूरवर पसरलें आहे.

(२) द्रोण, भीष्म, कृतवर्मा, कृप, दुःशासन, जयद्रथ, भगदत्त, विकर्ण, अश्वत्थामा, सौबल, बाल्हिक यांच्या सारखे श्रेष्ठ वीर माझ्या सैन्याचें रक्षण करीत असतां त्यांचा ज्याअर्थीं संग्रामांत महात्म्या पांडवांकडून संहार होत आहे, त्याअर्थीं पुरातन दैवच बलवत्तर होय.

हे संजया, या भूलोकीं अशाप्रकारचा उद्यम मानव, ऋषि किंवा पुरातन महात्मे यांनीं यापूर्वीं कधींहि पाहिला नव्हता. माझ्या सेनेचा एवढा प्रचंड ओघ असतांहि त्या शस्त्रांनीं समृद्ध असलेल्या सेनेचाहि पांडवांनीं वध करावा, याहून आणखी वेगळें भवितव्य तें काय असणार! हे संजया, अशा प्रकारच्या घोर सेनेचेंहि पांडवांनीं युद्धांत उल्लंघन केलें, ही वार्ता मला अतिशय विपरीत भासत आहे. ज्याअर्थीं माझ्या सैन्याचा नाश होत आहे, त्याअर्थीं पांडवांच्यासाठीं तेथें जमलेले देवच युद्ध करीत असावे, असें मला वाटतें.

हे संजया, विदुरानें मला नित्य हितकर व पथ्यकर वचन सांगितलें, तथापि माझ्या मंदमति दुर्योधन पुत्रानें तें ऐकलें नाहीं. त्या सर्वज्ञ महात्म्यानें पूर्वींच हें सर्व जाणलें होतें व त्याप्रमाणें सर्व घडून येत आहे.

त्याचीच मति खरी होय असें मला वाटतें. किंवा हे सूता, पूर्वीं प्रजापतीनें जें भवितव्य नियत करून ठेविलेलें असतें तसेंच सर्व घडतें, त्याच्या विरुद्ध कांहीं होत नसतें. ६. ४. ७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ संजयानें धृतराष्ट्राला दिलेला दोष. २ युद्धाचें वर्णन. ]

**( १ ) संजय—**हे राजन्, तूं स्वतःच्या दोषानें अशाप्रकारच्या अनर्थाला प्राप्त झाला आहेस. धर्माचा संकर करणारे जे दोष तुला दिसत आहेत, ते

दुर्योधन पहात नाहीं. हे विशांपते, तुझ्याच दोषामुळें पूर्वी द्यूत झालें व हें पांडवांशीं युद्धहि तुझ्याच दोषानें प्रवृत्त झालें आहे. यास्तव तूं जें पातक आचरिलेंस त्या आपल्या कर्मांचें फल तुलाच भोगलें पाहिजे. आपण केलेल्या कर्मांचें फल आपल्यालाच भोगावें लागतें.

या न्यायानें हे महाराज, तुला इह व पर लोकीं कृतकर्मांचें फल भोगणें भाग आहे, यास्तव प्राप्त संकटाला शांत चित्तानें तोंड दे. स्थिर हो; मी तुला युद्धाचा यथार्थ वृत्तान्त सांगतों, ऐक.

( २ ) हे नराधिपा, त्यावेळीं भीमसेनानें तीक्ष्ण बाणांनीं त्या महाचमूचा भेद करून दुःशासन, दुर्विषह, दुःसह, दुर्मद, जय, जयत्सेन, विकर्ण, चित्रसेन, सुदर्शन, चारुचित्र, सुवर्मा, दुष्कर्ण व कर्ण या सर्व दुर्योधनाच्या अनुजांना व दुसऱ्याहि अनेक क्रुद्ध झालेल्या महारथांना पाहिलें, भीष्मानें रक्षिलेल्या त्या महासैन्यांत प्रवेश केला व तो महारथ वीर त्या योद्धयांच्या समीप गेला. तेव्हां त्या पांडवानें आपल्या सैन्यांत प्रवेश केलेला पाहून त्या सर्व नराधिपांनीं 'आपण याचा जीव घेऊं या' असें म्हणून त्याला वेढलें. तेव्हां त्या कृतनिश्चयी भ्रात्यांकडून परिवेष्टित झालेला तो पार्थ प्रजासंहार प्रसंगीं क्रूर महाग्रहांनीं वेष्टिलेल्या सूर्याप्रमाणें शोभला.

त्यावेळीं शत्रुसैन्याच्या मध्यभागीं स्थित असतांहि त्या पांडवाच्या मनांत यत्किंचित्‌हि भीति उत्पन्न झाली नाहीं. देवासुरांच्या युद्धांत इंद्रावर चाल करणाऱ्या दानवांप्रमाणें त्या सहस्रावधि रथिश्रेष्ठांनीं आपापलीं तीव्र शस्त्रें उगारून एकाकी असलेल्या भीमाला वेढून टाकिलें. परंतु त्या धार्तराष्ट्रांची यत्किंचित्‌हि गणना न करतां शूर वृकोदरानें गज-अश्वांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ योद्धयांचा समरांत संहार चालविला. ते सर्व आपल्याला जिवंत धरण्यास उद्युक्त झाले आहेत, हें जाणून भीमसेनानें त्या सर्वांनाच गतप्राण करण्याचा निश्चय केला व त्या पांडवानें गदा हातांत घेऊन रथांतून उडी टाकली आणि महासागरासारख्या असलेल्या कौरवांच्या त्या बलौघाचा संहार चालविला.

याप्रमाणें भीमसेनानें शत्रुसैन्यांत प्रवेश केला असतां इकडे धृष्टद्युम्न द्रोणाला सोडून तुझ्या महत्सेनेचें निवारण करीत जेथें सौबल शकुनि होता, तेथें आला. तेव्हां भीमसेनाचा शून्य रथ त्याच्या दृष्टीं पडला, त्यावेळीं भीम-

१ आत्मनैव कृतं कर्म आत्मनैवोपभुज्यते ॥

रहित असलेल्या त्या रथावर त्याच्या विशोक सारथ्याला एकट्यालाच पाहून धृष्टद्युम्न अतिशय खिन्न झाला. तो देहभान विसरला. त्याचा कंठ सद्गदित झाला व दीर्घ निश्वास सोडीत दुःखित झालेल्या त्यानें सारथ्याला असा प्रश्न केला—“हे सूता, मला प्राणांहूनहि प्रिय असलेला माझा भीम कोठें गेला!”

तेव्हां विशोक हात जोडून पार्षताला म्हणाला—“हे प्रभो, पराक्रमी भीमसेनानें मला येथें रथासह थांबण्यास सांगून धार्तराष्ट्राच्या सैन्यसागरांत प्रवेश केला. त्यावेळीं तो पुरुषव्याघ्र मला असें प्रीतियुक्त वचन बोलला—“हे सूता, माझा वध करण्यास उद्युक्त झालेल्या या योद्ध्यांचा मी आज संहार करणार आहें, तोंवर तूं माझ्या या अश्वांचें नियमन करून त्यांचें दक्षतेनें रक्षण कर; असें बोलून हातांत गदा घेतलेला तो वीर शत्रुसैन्याकडे धांवत जात असलेला पाहून सर्व सैन्यांना अतिशय हर्ष झाला. तें तुमुल युद्ध चाललें असतां वृकोदरानें त्या महाव्यूहाचा भेद करून शत्रुसैन्यांत प्रवेश केला.”

विशोकाचें हें वचन ऐकून धृष्टद्युम्न त्याला म्हणाला—“हे सूता, पांडवांवरील स्नेह टाकून, एकट्या भीमसेनाला रणांगणांत सोडून मी दूर राहिलों, तर आज मला माझ्या जीविताचेंहि कांहीं प्रयोजन वाटत नाहीं. मी येथें असतांना भीम एकटाच शत्रुसैन्यांत शिरला व मी जर त्याला एकट्याला सोडून येथून निघून गेलों, तर सर्व क्षत्रिय मला काय म्हणतील! जो आपल्या साहाय्य करणाऱ्या योद्ध्यांस सोडून स्वतः सुरक्षित राहून घरीं निघून जातो, त्याचें[1] इंद्रासह सर्व देव अकल्याण करितात. भीम माझा सखा आहे व संबंधी आहे. तो आमचा भक्त आहे आणि माझीहि त्याच्यावर भक्ति आहे. यास्तव जेथें वृकोदर गेला आहे, तेथें मी जातों व मी आतां दानवांचा नाश करणाऱ्या इंद्राप्रमाणें शत्रूंचा संहार कसा करतों, तो तूं पहा.”

असें बोलून तो भीमसेनानें गदाप्रहारानें जेथें गजांना विह्वलत पाडविलें होतें, त्या मार्गानें निघाला. तेव्हां भीमसेन शत्रुसैन्याला दग्धच करीत असलेला त्याच्या दृष्टीं पडला. तो वीर वृक्षांचें उन्मूलन करणाऱ्या वायूप्रमाणें शत्रूंचें निर्मूलन करीत होता. रणांमध्यें भीमानें ज्यांना छिन्न-भिन्न करून टाकले होते, ते

---

१ अस्वस्ति तस्य कुर्वन्ति देवाः शक्रपुरोगमाः ।
यः सहायान् परित्यज्य स्वस्तिमानाव्रजेद्गृहम् ॥

सैन्यांतील रथी, सादी, पदाति व गज कर्णपटु आर्त स्वर करीत होते. त्यावेळीं तुझ्या सैन्यांत फार मोठा हाहाकार सुरू झाला. याप्रमाणें विचित्र युद्ध करणाऱ्या भीमसेनानें शत्रुसैन्याचा संहार चालविला असतां, तुझे सर्व कृतास्त्र वीर निर्भयपणें त्याला वेढून उभे राहिले व त्यांनीं वृकोदरावर सर्व बाजूंनीं शस्त्रवृष्टि आरंभिली.

हे राजा, अशा प्रकारें घोर सैन्याकडून परिवेष्टित झालेला तो शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ पांडव पार्षत धृष्टद्युम्नाच्या दृष्टीं पडतांच त्यानें त्याला आश्वासन दिलें व तो द्रुपदपुत्र त्याच्या साह्यार्थ धांवला. त्यावेळीं भीमसेनाचें अंग शरविद्ध झाल्यामुळें क्षतयुक्त झालें होतें. प्रलयकालच्या कालान्तकाप्रमाणें तो हातांत गदा घेऊन जणुकाय क्रोधरूपी विपच ओकीत पायांनींच संचार करीत होता. धृष्टद्युम्नानें मोठ्या त्वरेनें त्याच्या समीप जाऊन अगोदर त्याच्या अंगांत रुतलेले शर काढून टाकले, त्याला आपल्या रथांत घेतलें व दृढ आलिंगन देऊन सर्व शत्रूंच्या समक्ष आश्वासन दिलें.

तें पाहून तुझा पुत्र तें घोर युद्ध चाललें असतां आपल्या भ्रात्यांना असें म्हणाला—"हा दुरात्मा द्रुपदपुत्र आतां भीमाला येऊन मिळाला आहे, यास्तव आपण सर्व फार मोठ्या सेनेसह त्याच्यावर चाल करून जाऊं या. तुमच्या सैन्याला मारण्याची त्याची मनीषा पूर्ण न होवो."

तेव्हां दुर्योधनाचें तें वाक्य ऐकून ते सर्व अमर्षी धार्तराष्ट्र ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेप्रमाणें आयुधें उगारून शत्रूच्या वधार्थ निघाले. प्रलयकालीन धूमकेतूप्रमाणें त्या वीरांनीं आपलीं उग्र धनुष्यें धारण केलीं व त्यांच्या टणत्कारानें आणि रथनेमींच्या घोषानें पृथ्वी कंपित केली. त्या सर्व कौरववीरांनीं पर्वताला पर्जन्यधारांनीं व्यापणाऱ्या मेघांप्रमाणें त्या द्रुपदपुत्राला शरवृष्टींनीं झांकून टाकिलें. तथापि त्या विचित्र युद्ध करणाऱ्या शूरानें यत्किंचित्हि व्यथित न होतां त्यांच्यावर उलट तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. आपला वध करण्यासाठीं हे सर्व वीर आपल्या भोंवतीं जमले आहेत, असें पाहून अस्त्रप्रयोग करणाऱ्या महेंद्राप्रमाणें त्या क्रुद्ध झालेल्या तरुण द्रुपदात्मजानें प्राणघातक उग्र मोहनास्त्र सोडलें. तेव्हां ते धार्तराष्ट्र हतबुद्ध होत्साते मोहित होऊन पडले. तुझे पुत्र चेतनारहित होऊन पडले आहेत, हें ऐकून सर्व कौरववीर रथ, अश्व व गज यांसह समंततः पळूं लागले.

इतक्यांत शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ द्रोणानें द्रुपदाच्या समीप येऊन त्याला तीन बाणांनीं विद्ध केलें. तेव्हां द्रोणाकडून अतिशय विद्ध झालेला द्रुपद

पूर्वीच्या वैराचें स्मरण करीत तेथून पळाला. याप्रमाणें द्रुपदाला जिंकून प्रतापवान् द्रोणानें आपला शंख वाजविला. त्याचा तो शंखनाद ऐकून सर्व सोमक त्रस्त झाले. त्यानंतर 'तुझे पुत्र प्रमोहनास्त्रानें मोहित होऊन रणांगणांत पडले आहेत' हें ऐकून द्रोण मोठ्या त्वरेनें तेथें आला. तेव्हां त्या महारणांत संचार करणारे धृष्टद्युम्न व भीम त्याच्या दृष्टीं पडले. त्याचप्रमाणें मोहित होऊन निश्चेष्ट पडलेले तुझे पुत्रहि त्याला तेथें दिसले. त्यांना मूर्च्छित पडलेले पाहून त्या महारथ द्रोणानें प्रज्ञास्त्र सोडून मोहनास्त्राचा नाश केला, तेव्हां तुझे पुत्र तत्काल देहभानावर येऊन भीम आणि धृष्टद्युम्न यांच्याशीं पुनः युद्ध करण्यास सज्ज झाले.

तेव्हां युधिष्ठिर आपल्या सर्व सैनिकांना हांका मारून म्हणाला—"सौभद्रेयाच्या प्रमुखत्वाखालीं बारा सज्ज झालेले वीर भीम व पार्षत यांच्या रक्षणार्थ त्यांच्या मागोमाग जावोत व तेथील वृत्तान्त काय आहे तें मला सत्वर कळूं दे. त्यावांचून माझ्या मनाला स्वस्थता वाटणार नाहीं."

युधिष्ठिराची ही आज्ञा ऐकून ते सर्व पराक्रमी शूर योद्धे 'ठीक आहे' असें म्हणाले. सूर्य मध्याह्नीं आला असतां पांच केकय, द्रौपदीचे पांच पुत्र, धृष्टकेतु असे ते सर्व वीर फार मोठ्या सैन्यासह सौभद्रेयाला पुढें करून निघाले व त्यांनीं आपल्या सेनेचा सूचिमुख व्यूह रचिला आणि धार्तराष्ट्रांच्या सेनेचा भेद करून त्यांनीं आंत प्रवेश केला. तेव्हां ते अभिमन्युप्रभृति श्रेष्ठ योद्धे येत असलेले पाहून नुक्तेंच ज्यांना धृष्टद्युम्नानें मूर्च्छित पाडलें होतें, व भीमसेनानें भयभीत करून सोडलें होतें, ते तुझे सैनिक त्यांचें निवारण करण्यास समर्थ झाले नाहींत. एखादी मदमोहित झालेली युवती जशी मार्गांतच उभी रहाते, तशी तुझी सेना स्तब्ध होऊन जागच्या जागीं उभी राहिली.

तें पाहून ते श्रेष्ठ वीर धृष्टद्युम्न व वृकोदर ह्यांच्या साह्यार्थ धांवले. ते सर्वहि अभिजात वीर सुवर्णानें अलंकृत केलेले ध्वज धारण करून येत आहेत व सौभद्रेय त्यांच्या पुरोगामी आहे, हें पाहून भीम व पार्षत अतिशय हृष्ट झाले व ते अधिकच उत्साहानें कौरवसेनेचा संहार करूं लागले. इतक्यांत आपला गुरु चाल करून येत आहे, हें पाहून पांचाल्य धृष्टद्युम्नानें तुझ्या पुत्रांचा वध करण्याचा विचार बाजूला सारून तो प्रथम द्रोणाकडे वळला. त्यानें वृकोदराला कैकेयाच्या रथांत बसविलें व तो अतिशय क्रुद्ध होऊन अस्त्रपारग द्रोणा-

वर धांवून गेला. तेव्हां प्रतापवान् भारद्वाज मोठ्या त्वरेनें त्याच्यावर तुटून पडला. क्रुद्ध झालेल्या त्यानें एका बाणानें पार्षताच्या धनुष्याचा छेद केला आणि कौरवांच्या पिण्डाला स्मरून दुर्योधनाच्या हितासाठीं द्रोणानें त्याच्यावर आणखी शेकडों बाणांची वृष्टि केली. तेव्हां पार्षतानें दुसरें धनुष्य घेतलें व द्रोणावर वीस तीक्ष्ण बाण सोडले. त्यावेळीं द्रोणानें पुनः त्याचें धनुष्य तोडून टाकिलें. चार श्रेष्ठ बाण सोडून त्याच्या चारी अश्वांना यमसदनीं पाठवून दिलें व एका भल्ल बाणानें त्याच्या सारथ्याला मृत्यूच्या स्वाधीन केलें.

याप्रमाणें अश्व व सारथि यांचा वध झाला असतां धृष्टद्युम्नानें मोठ्या त्वरेनें आपल्या रथावरून उडी टाकली व तो अभिमन्यूच्या रथावर चढला. त्यावेळीं रथ, अश्व व गज यांच्यासह सर्व सेना कंपित झाली. भीमसेन व पार्षत यांच्या समक्ष अमिततेजस्वी द्रोणानें तें प्रचंड सैन्य भग्न केलेलें पाहून पांडवांचे महा-रथ त्यांचें निवारण करूं शकले नाहींत. द्रोणानें तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलेलें तें सैन्य क्षुब्ध झालेल्या सागराप्रमाणें इतस्ततः भ्रमण करीत असलेलें दिसत होतें. याप्रमाणें पांडवांची सेना जर्जर झालेली पाहून तुझ्या पुत्रांना फार संतोष झाला आणि द्रोणाचार्य क्रुद्ध होऊन शत्रुसैन्यावर तुटून पडत आहे, हें पाहून तुझे सर्व योद्धे सर्व बाजूंनीं 'धन्य, धन्य' अशी मोठ्यानें गर्जना करूं लागले. ६. ४. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ भीम व दुर्योधन यांचें युद्ध. २ सौभद्रेयादि वीरांचें संकुल युद्ध. ]

(१) संजय—हे महाराज, इकडे दुर्योधन मूर्च्छा नाहींशी होतांच पुनः भीमावर चालून गेला व शरवृष्टि करून त्याचें निवारण करूं लागला. हे राजन्, त्यावेळीं तुझे सर्व महारथ पुत्र एकत्र जमले व शस्त्रें उगारून भीमा-वर तुटून पडले. तेव्हां भीमसेनहि स्वरथावर चढला व दुर्योधनापाशीं आला. त्यानें आपलें दृढ धनुष्य सज्य केलें. तें वेगवान् बाण सोडणारें धनुष्य शत्रूंचे प्राण हरण करणारें होतें. भीमानें तुझ्या पुत्राला शरांनीं विद्ध केलें.

तेव्हां दुर्योधनानें तीक्ष्ण नाराच बाणानें भीमाच्या मर्मावर प्रहार केला. त्यावेळीं तुझ्या पुत्राकडून विद्ध झालेला तो भीम अतिशय संतप्त झाला. क्रोधानें त्याचे नेत्र आरक्त झाले. त्यानें वेगानें आपलें धनुष्य आकर्ण ओढलें व दुर्यो-

धनाच्या बाहूंवर दोन व वक्षःस्थलावर एक असे तीन बाण सोडले. त्यावेळीं तो राजा शिखरांनीं युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें शोभला.

ते दोघे वीर क्रुद्ध होऊन परस्परांचा वध करण्यास उद्युक्त झाले आहेत, हें पाहून दुर्योधनाचे सर्व अनुज पूर्वीचा संकेत स्मरून भीमाचा निग्रह करण्याच्या दृढ निश्चयानें निघाले. ते सर्वहि शूर असून जीवावर उदार झाले होते. ते सर्व धांवून येतांच भीमसेन, एक मत्त गज जसा दुसऱ्या अनेक गजांवर तुटून पडतो, तसा त्यांच्याशीं युद्ध करूं लागला. क्रुद्ध झालेल्या त्यानें प्रथम तुझ्या चित्रसेन पुत्रावर नाराच बाण सोडिला. त्याचप्रमाणें त्यानें अनेक प्रकारच्या तीक्ष्ण बाणांनीं तुझ्या इतर पुत्रांनाहि ताडन केलें.

( २ ) याप्रमाणें त्यांचें युद्ध जुंपलें असतां भीमसेनाच्या मागोमाग जाण्यासाठीं धर्मराजानें पाठविलेले अभिमन्युप्रभृति बारा महारथ तुझ्या महाबलाढ्य पुत्रांवर चालून आले. ते सर्व रथस्थ वीर, सूर्य व अग्नि यांच्या सारखे तेजस्वी होते. श्रीनें युक्त असलेले ते शूर त्या रणांगणांत शोभत होते. त्यांचे सुवर्णाचे देदीप्यमान मुकुट त्यावेळीं उज्ज्वल दिसत होते. याप्रमाणें ते वीर समीप आलेले पाहून तुझे महाबलाढ्य पुत्र भीमाशीं युद्ध करण्याचें सोडून परत फिरले, परंतु ते जिवंत सुटून जात आहेत, हें भीमसेनाला सहन झालें नाहीं. त्यानें त्या सर्वांना परतवून पुनः तुझ्या पुत्रांना पीडित केलें.

त्यावेळीं अभिमन्युप्रभृति वीर भीम व पार्षत यांना येऊन मिळाले आहेत, हें पाहून दुर्योधनप्रभृति महारथांनीं आपापलीं धनुष्यें घेतलीं व जेथें पांडवांचे महारथ होते, तेथें ते वेगवान् अश्वांनीं आले. तेव्हां अपराह्णकालीं तुझ्या पुत्रांचें व पांडवांचें घनघोर युद्ध प्रवृत्त झालें.

अभिमन्यूनें विकर्णाचे अश्व गतप्राण केले व त्याच्यावर पंचवीस ' क्षुद्र ' बाण सोडले. तेव्हां अश्व हत झाल्यामुळें विकर्ण आपला रथ सोडून चित्रसेनाच्या रथावर चढला. याप्रमाणें ते दोघे भ्राते एकाच रथांत स्थित झालेले पाहून आर्जुनीनें त्यांना शरजालांनीं आच्छादून टाकिलें. त्यावेळीं चित्रसेन व विकर्ण यांनीं सौभद्रेयाला पांच बाणांनीं विद्ध केलें. तथापि तो सुभद्रापुत्र यत्किंचित्हि कंपित न होतां, मेरूप्रमाणें स्थिर राहिला.

दुःशासनानें पांच केकयभ्रात्यांवर पांच बाण सोडले. त्यांचें तें युद्ध फार अद्भुत होतें. क्रुद्ध झालेल्या द्रौपदेयांनीं सर्पाच्या आकाराचे शर सोडून दुर्यो-

धनाचें निवारण केलें. तेव्हां तुझ्या दुर्धर्ष पुत्रांनींहि पांच द्रौपदेयांवर पृथक् पृथक् बाण सोडून त्यांना विद्ध केलें. त्यावेळीं शरांनीं क्षतयुक्त झालेले ते कुमार रक्तानें माखले असतां, गेरूनें मिश्रित झालेल्या नद्या ज्यावरून वहात आहेत अशा पर्वतांप्रमाणें शोभले.

हे राजन्, त्याप्रसंगीं दुसरीकडे भीष्महि पशूंना हांकून नेणाऱ्या गोपालाप्रमाणें पांडवांच्या सेनेला पळवून लावीत होता. दक्षिणेकडील सैन्याशीं युद्ध करणाऱ्या पार्थाच्या गांडीवाचा फार मोठा निर्घोष ऐकूं येतच होता. त्या समरांगणांत सर्वत्र पांडव व कौरव यांच्या सैन्यांतील कबंधें उठून उभीं राहिलीं. त्या सैन्यसागरांत रुधिराचें जल वहात होतें.[1] ज्यांचे हात तुटले आहेत, कवचें छिन्न-भिन्न झालीं आहेत, असे सहस्रावधि नरश्रेष्ठ तेथें पडलेले दिसत होते. रक्तानें माखलेल्या व गतप्राण होऊन पडलेल्या मत्त गजांनीं ती भूमि पर्वतांनीं व्यापल्याप्रमाणेंच भासत होती.

हे भारता, त्यावेळीं मला तेथें असा एक अद्भुत प्रकार दिसला कीं, तुझ्या व पांडवांच्या सैन्यांत युद्धाची आकांक्षा न करणारा असा एकहि पुरुष मला आढळला नाहीं. याप्रमाणें महायशाविषयीं उत्सुक असलेल्या व युद्धांत जयाची आकांक्षा करणाऱ्या तुझ्या पुत्रांनीं पांडवांशीं युद्ध केलें. ६. ४. ७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १ भीमाचें दुर्योधनाला युद्धार्थ आह्वान. २ भीम-सुयोधनयुद्ध. ३ सौभद्रादि पांच वीरांचें धार्तराष्ट्रांशीं युद्ध. ४ षष्ठदिन युद्धसमाप्ति. ]

( १ ) **संजय**—राजा, त्यानंतर सूर्य आरक्त झाला असतां ( अस्ताचलीं चालला असतां ) दुर्योधन भीमाचा वध करण्याच्या इच्छेनें मोठ्या वेगानें, त्याच्यावर धांवून गेला. तेव्हां आपला दृढवैरी चाल करून येत आहे हें पाहून क्रुद्ध झालेला भीमसेन असें म्हणाला—" हे गांधारे, मी कित्येक वर्षांपासून ज्याची वाट पहात होतों, तो काल आतां प्राप्त झाला आहे. आज आतां जर तूं हें रणांगण सोडून गेला नाहींस, तर मी तुझा प्राण घेईन. तुझा वध करून कुंतीचें दुःख, आम्हीं वनवासांत भोगलेल्या आपत्ति व द्रौपदीचे क्लेश, या सर्वांचें परिमार्जन करीन.

---

१ हें रूपक पूर्वी अनेकदा येऊन गेल्यामुळें येथें तें समग्र दिलें नाहीं.

तूं पूर्वी द्वेषानें प्रेरित होऊन पांडवांचा अवमान केलास, त्या पापाचें फल आतां प्राप्त झालें आहे. तूं पांडवांची गणानाच न करतां कर्ण व शकुनि यांच्या मतानें इष्ट वाटेल तसा वागलास. दाशार्ह कृष्ण शमाची याचना करीत असतां त्याचाहि अवमान केलास. तूं मोठ्या संतुष्ट चित्तानें उलूकाबरोबर जो निरोप पाठविला होतास, त्याप्रमाणें मी आज तुझा आप्त बांधवांसह वध करीन."

( २ ) असें बोलून भीमसेनानें आपलें घोर धनुष्य उचलून तें वरचेवर फिरविलें. त्यावर महा अशनीप्रमाणें प्रभा असलेले तीक्ष्ण बाण जोडले आणि दुर्योधनावर सव्वीस बाण सोडले. त्याचे ते बाण अग्नीच्या शिखेप्रमाणें प्रज्वलित, वज्रतुल्य व सरळ गतीनें जाणारे होते. नंतर वृकोदरानें दोन शरांनीं दुर्योधनाचें धनुष्य तोडलें. दोन बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें व चार बाण सोडून त्याचे चारी वेगवान् अश्व यमालयीं पाठविले. दोन शरांनीं त्या राजाच्या छत्राचा छेद केला व सहा बाणांनीं त्याचा देदीप्यमान ध्वज तोडून खालीं पाडविला. याप्रमाणें ध्वजाचा छेद करून त्या पांडवानें फार मोठ्यानें सिंहनाद केला. हे राजन्, नानारत्नांनीं भूषविलेल्या श्रेष्ठ रथावरून तो ध्वज तुझ्या पुत्रांच्यासमक्ष एकदम भूमीवर पडला, त्यावेळीं तो मेघांतून पडणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें शोभला. त्या ध्वजावर गजाचें रत्नजडित शुभ चिह्न काढलेलें होतें. कुरुपतीचा तो सूर्याप्रमाणें तळपणारा ध्वज छिन्न-भिन्न होऊन पडलेला सर्व पार्थिवांनीं पाहिला. नंतर महागजाला अंकुशानें जसें टोंचावें, तसें भीमानें हंसतच दुर्योधनाला दहा बाणांनीं विद्ध केलें. तें पाहून श्रेष्ठ योद्ध्यांनीं परिवेष्टित झालेल्या महारथ सिंधुराजानें दुर्योधनाच्या पृष्ठभागाचें रक्षण केलें. रथिश्रेष्ठ कृपाचार्यानें त्या परम ओजस्वी कौरवाला आपल्या रथांत घेतलें. त्यावेळीं भीमानें विद्ध केल्यामुळें व्यथित झालेला दुर्योधन श्रांत होऊन रथांत बसला.

( ३ ) त्यानंतर भीमाला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या जयद्रथानें सहस्रावधि रथांसह त्याला सर्व बाजूंनीं परिवेष्टित केलें. त्यावेळीं धृष्टकेतु, अभिमन्यु, केकय भ्राते व द्रौपदेय यांनीं तुझ्या पुत्रांशीं युद्ध आरंभिलें. तेव्हां चित्रसेन, सुचित्र, चित्राङ्ग, चित्रदर्शन, चारुचित्र, सुचारु व दोघे नन्दोपनंद या यशस्वी आठ कुमारांनीं अभिमन्यूच्या रथाला वेढून टाकिलें. तें पाहून पराक्रमी अभिमन्यूनें एकेकावर पांच पांच तीक्ष्ण बाण सोडले. सौभद्रेयाच्या विचित्र धनुष्या-

पासून सुटलेले ते शर वज्र किंवा मृत्यु यांच्या तुल्य होते. सौभद्रेयाचे प्रहार सहन न करणाऱ्या त्या सर्वांनीं मेरुपर्वतावर जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें आर्जुनीच्या रथावर शरवृष्टि केली. तेव्हां त्या शरांनीं पीडित झालेल्या कृतास्त्र अभिमन्यूनें देवासुरांच्या युद्धांत असुरांना कंपित करणाऱ्या महेंद्राप्रमाणें तुझ्या पुत्रांना भयभीत केलें.

त्या युद्धदुर्मद पांडवेयानें विकर्णाच्या रथावर चवदा भल्ल बाण सोडिले. ते बाण सर्पासारखे घोर होते. त्याच्या रथाचा ध्वज, सारथि आणि अश्व यांना खालीं पाडवून तो वीर रणांगणांत जणुकाय नृत्यच करूं लागला. क्रुद्ध झालेल्या त्या कुमारानें पुनः विकर्णावर बाण सोडिले. ते सर्व शर अतिशय तीक्ष्ण असून त्यांचीं अग्रें अकुंठित होतीं व ते पाजळलेले होते. ते कंकपक्ष्याच्या पिसांनीं सुशोभित केले होते. ते सुवर्णपुङ्खाग्रानें युक्त असलेले वेगवान् शर विकर्णाच्या देहाचा भेद करून संतप्त सर्पाप्रमाणें भूमींत शिरले. विकर्णाच्या रक्तानें माखलेले ते बाण पृथ्वीतलावर जणुकाय रुधिर ओकीत असल्याप्रमाणें भासले.

याप्रमाणें विकर्ण क्षतविद्ध झालेला पाहून त्याचे दुसरे सहोदर भ्राते सौभद्रादि वीरांवर धांवले. त्याचप्रमाणें इतरहि दुसरे वीर प्रतिपक्षावर तुटून पडले. ते सर्व सूर्याप्रमाणें तेजस्वी असलेले योद्धे परस्परांचा संहार करूं लागले. दुर्मुखानें श्रुतकर्म्याला सात वेगवान् बाणांनीं विद्ध केलें. एका बाणानें ध्वज तोडून टाकिला, सात बाणांनीं त्याचा सारथि पाडविला व ज्यांच्या अंगावर सुवर्णाच्या जाळ्या घातलेल्या आहेत, अशा वायूप्रमाणें वेगवान् अश्वांना सहा बाणांनीं गतप्राण केलें व सारथ्यालाहि यमालयीं पाठविलें. तेव्हां त्या अश्वरहित रथांतच उभें राहून महारथ श्रुतकर्म्यानें दुर्मुखावर उल्केप्रमाणें प्रज्वलित शक्ति सोडिली. ती शक्ति दुर्मुखाच्या निर्मल कवचाचा भेद करून स्वतेजानें देदीप्यमान् होत्साती भूमीचें विदारण करून आंत शिरली. याप्रमाणें श्रुतकर्मा विरथ झालेला पाहून सुतसोमानें सर्व सैनिकांच्या समक्ष त्याला आपल्या रथांत घेतलें.

हे महाराज, त्याचप्रमाणें वीर श्रुतकीर्ति तुझ्या जयत्सेन पुत्रावर त्याच्या वधेच्छेनें चालून गेला. परंतु जयत्सेनानें श्रुतकीर्तीचें तें प्रचंड टणत्कार करणारें दृढ धनुष्य, तो त्यापासून बाण सोडीत असतांनाच तीक्ष्ण धारेच्या शरानें

हंसतच तोडून टाकिलें. तेव्हां आपल्या सहोदराचें धनुष्य तुटलें आहे, हें पहातांच शतानीक सिंहाप्रमाणें वारंवार गर्जना करीत त्याच्यावर धांवला. त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून जयत्सेनाला दहा शिलीमुख बाणांनीं विद्ध केलें व मदोन्मत्त गजाप्रमाणें मोठ्यानें गर्जना केली. नंतर शतानीकानें सर्व आवरणांचा भेद करणारा दुसरा एक तीक्ष्ण बाण सोडून जयत्सेनाच्या हृदयावर वेध केला. त्यावेळीं त्याच्या समीप असलेला त्याचा भ्राता दुष्कर्ण क्रोधसंतप्त झाला व त्यानें नकुलपुत्र शतानीकाचें धनुष्य तोडून टाकिलें.

तेव्हां महाबलाढ्य शतानीकानें भारसहन करणारें दुसरें श्रेष्ठ धनुष्य घेतलें, त्यावर घोर शर जोडला व दुष्कर्णाला त्याच्या भ्रात्याच्या समक्ष हांक मारून 'थांब थांब' असें म्हणून सर्पासारखे तीक्ष्ण बाण सोडले. एका बाणानें त्याचें धनुष्य तोडलें. दोन बाणांनीं सूताचा वध केला, सात बाणांनीं त्याला विद्ध केलें व बारा तीक्ष्ण बाणांनीं त्याच्या, वायु व मन यांच्या सारखे वेगवान् असलेल्या कर्बुरवर्णाच्या अश्वांना गतप्राण केलें. नंतर दुसरा भल्ल बाण सोडून दुष्कर्णाचें हृदय विद्ध केलें. तेव्हां तो वज्रानें समूल उपटून पडणाऱ्या वृक्षाप्रमाणें भूमीवर पडला.

याप्रमाणें दुष्कर्ण व्यथित झालेला पाहून पांच महारथ शतानीकाचा वध करण्याच्या इच्छेनें त्याला सर्व बाजूंनीं वेढून उभे राहिले. शतानीकाला शरजालांनीं आच्छादित झालेलें पाहून पांच केकयभ्राते क्रुद्ध होऊन धांवून आले. ते आलेले पहातांच तुझे महारथ पुत्र मत्तगज जसे दुसऱ्या मदोन्मत्त गजांवर धांवून जातात, तसे त्याच्यावर तुटून पडले. दुर्मुख, दुर्जय, दुर्मर्षण, शत्रुंजय व शत्रुसह हे पांच यशस्वी वीर क्रुद्ध होऊन पांच केकय भ्रात्यांवर चालून गेले. त्यांचे रथ नगरासारखे भव्य होते. त्यांना मनासारखे वेगवान् अश्व जोडले होते. ते नानावर्णांच्या विचित्र पताकांनीं अलंकृत केले होते. त्या वीरांनीं श्रेष्ठ धनुष्यें व विचित्र कवचें धारण केलीं होतीं व त्यांचे चित्र-विचित्र ध्वज झळकत होते. अशा प्रकारच्या त्या वीरांनीं एका वनांतून दुसऱ्या वनांत शिरणाऱ्या सिंहाप्रमाणें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. तेव्हां परस्परांचा वध करणाऱ्या त्या योद्ध्यांचें घनघोर युद्ध प्रवृत्त झालें. सूर्य अस्ताचलाला जाण्याच्या वेळीं परस्परांचा वध करण्याची इच्छा करणाऱ्या त्या वीरांचा अतिशय दारुण संग्राम झाला. सहस्रावधि रथी व सादी विद्ध होऊन पडले.

(४) त्या वेळीं हे राजन्, क्रुद्ध झालेल्या शान्तनव भीष्मानें नतपर्व बाणांनीं महात्म्या पांडवांच्या सेनेचा संहार चालविला. त्यानें पांचालांच्या सेनेला यमालयीं पाठविलें. याप्रमाणें पांडवांच्या सेनेचा नाश केल्यावर धनुर्धर भीष्मानें आपल्या सैन्याचा अपहार केला व तो आपल्या शिबिरांत गेला. इकडे युधिष्ठिरहि भीम व पार्षत यांच्याकडे पाहून आणि त्यांच्या मस्तकाचें अवघ्राण करून हृष्ट चित्तानें आपल्या शिबिरांकडे वळला. ६. ४. ७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १ भीष्मदुर्योधन संवाद. २ दुर्योधनाची सैन्याला युद्धार्थ निघण्याविषयीं आज्ञा.]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें परस्परांशीं वैर करणारे ते वीर आपल्या शिबिरांत परत आल्यावर एकत्र जमले, रुधिरानें माखलेल्या त्या शूर योद्धयांनीं एकमेकांची प्रशंसा केली व रात्रभर विश्रांति घेऊन दुसरा दिवस उजाडतांच ते सर्व युद्धाच्या इच्छेनें पुनः सज्ज झालेले दिसले. त्यावेळीं तुझा पुत्र चिंताक्रान्त होत्साता रक्तानें माखलेल्या अंगानें पितामहापाशीं आला व त्यांस असें म्हणाला—

"हे पितामह, आपले अनेक ध्वजांनीं युक्त असलेले सैन्य भयंकर व्यूह रचून उभे असतां पांडवांच्या महारथांनीं त्या व्यूहाचें विदारण करून आमच्या वीरांचा वध केला, सैन्याला पीडित केलें, सर्वांना मोहित केलें व आम्हीं रचलेला मकरव्यूह वज्रतुल्य असतांहि त्याचा भेद करून भीमसेनानें आंत प्रवेश केला. साक्षात् मृत्यूच्या दंडाप्रमाणें असलेल्या घोर शरांनीं मला विद्ध केलें. क्रुद्ध झालेल्या त्या भीमाला पाहून मी भयानें मोहित झालों आहें. आज माझ्या मनाला मुळींच शांति वाटत नाहीं. यास्तव हे सत्यसन्ध, मी तुझ्या प्रसादानें पांडवांचा वध करून जयाची इच्छा करीत आहें.

त्याच्याकडून असें बोलला गेलेला तो महात्मा गंगासुत दुर्योधनाचा मृत्युच ओढवला होता, हें ऐकून हंसला व तो शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ वीर यत्किंचित्‌हि विमनस्क न होतां त्याला असें म्हणाला—"हे राजपुत्रा, परम यत्नानें शत्रुसेनेंत प्रवेश करून तुला विजय आणि सुख मिळवून देण्याची माझी इच्छा आहे. तुझ्या हितासाठीं मी आपल्या जीविताकडेहि पहात नाहीं. पांडवांना साह्य करणारे हे सर्व महारथ यशस्वी, शूरतम व कृतास्त्र आहेत. ते

युद्धांत क्लेश न पावतां जणुकाय रोषरूपी विष ओकीत आहेत. त्यांना सहज जिंकतां येणें शक्य नाहीं. ते सर्व पराक्रमांत उद्धत असून तूं त्यांच्याशीं वैर केलें आहेस. तथापि हे वीरा, मी प्राणावर उदार होऊन माझें सर्व सामर्थ्य खर्च करून त्यांच्याशीं प्रतियुद्ध करीन. तुझ्यासाठीं युद्ध करीत असतां मी माझ्या प्राणांचें रक्षण करणार नाहीं. तुझ्या हितासाठीं मी देवांसह घोर दैत्यांनाहि दग्ध करीन, मग शत्रुसैन्याची काय कथा! हे राजन्, मी पांडवांशीं युद्ध करीन व तुझें सर्व प्रिय करीन.

( २ ) भीष्माचें हें भाषण ऐकून दुर्योधन संतुष्ट झाला व त्यानें सर्व नृपतींना ' युद्धाला निघा ' अशी आज्ञा केली. तेव्हां त्याच्या आज्ञेप्रमाणें सर्व गज, अश्व, पदाति व रथ यांचे समुदाय संतुष्ट मनानें निघाले. तें नानाविध शस्त्रें धारण केलेलें व गजाश्वपदातींनीं युक्त असलेलें तुझें प्रचंड सैन्य रणांगणांत जात असतां अतिशय शोभलें. त्या शस्त्रास्त्रवेत्त्या नरवीरांनीं अधिष्ठित असलेला व रथ, पदाति, गज, अश्व यांच्या संघांनीं युक्त असलेला तुझ्या सैन्याचा समुदाय चालला असतां तरुण आदित्याप्रमाणें जी रक्तवर्ण धूलि उडाली, तिच्या योगानें रविकिरणेंहि आच्छादित झालीं. त्या रणांगणांत हत्तीच्या पाठीवर उभारलेल्या नाना रंगाच्या पताका वायूनें फडफडत असतां आकाशांत मेघमंडलांतून चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें भासल्या. त्याचप्रमाणें समंतात् असलेला हत्तींचा समुदाय सुव्यवस्थित चालला असल्यामुळें प्रेक्षणीय दिसत होता. नृपाल आपलीं धनुष्यें आकर्ण ओढीत असतां त्यांचा फार मोठा टणत्कार झाला. देवासुरांनीं जेव्हां समुद्रमंथन केलें, त्यावेळीं जसा प्रचंड निर्घोष झाला, त्याप्रमाणें त्या धनुष्यांचा निःस्वन ऐकूं येत होता. याप्रमाणें शत्रूंच्या सैन्याचा नाश करणाऱ्या अनेक वर्णांच्या मदोन्मत्त गजांनीं युक्त असलेली तुझी प्रचंड सेना त्यावेळीं युगान्तमेघाप्रमाणें शोभली. ६. ४. ८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ भीष्माचें प्रोत्साहनपर भाषण. २ दुर्योधनाला विशल्यकरणी ओषधींचें प्रदान. ३ सातव्या दिवसाचा युद्धारंभ, कौरवांचा मंडलाकार व्यूह. ४ पांडवांचा ' वज्र ' व्यूह. ५ संकुल युद्ध. ]

(१) **संजय**—हे महाराज, त्यानंतर विचारमग्न होऊन बसलेल्या तुझ्या पुत्राला गांगेय आनंद देणारें असें वचन बोलला—" हे दुर्योधना, मी, द्रोण, शल्य,

कृतवर्मा, सात्वत, अश्वत्थामा, विकर्ण, भगदत्त, सौबल, विंदानुविंद, बाह्लीक वीरांसह बाह्लीक राजा, त्रिगर्त, दुर्जय मागध, बृहद्बल, कौसल्य, चित्रसेन, विविंशति व दुसरे सहस्रावधि रथ युद्धाला उद्युक्त झाले आहेत. त्या सर्वांनीं शोभिवंत महाध्वज उभारले आहेत. भिन्न भिन्न देशांतील अश्वांवर अश्वसादी आरूढ झाले आहेत. त्यांच्याबरोबर मदोन्मत्त गजेंद्र आहेत. नानाप्रकारचीं आयुधें व ध्वज यांनीं युक्त असलेले विविध देशांतील योद्धे येथें जमले आहेत. हे व दुसरेहि सर्व तुजसाठीं आपल्या जीवावर उदार झाले आहेत. ते युद्धामध्यें देवांनाहि जिंकण्यास समर्थ आहेत, असें मी समजतों.

तथापि हे राजेंद्रा, तुला सर्वदा हितवचन सांगावें हें माझें अवश्य कर्तव्य आहे. पांडव महेंद्रासारखे पराक्रमी आहेत व त्यांना साक्षात् वासुदेवाचें साह्य आहे. यास्तव ते इंद्रासह देवांनाहि अजिंक्य आहेत. तरीहि हे राजा, मी तुझ्या सांगण्याप्रमाणें करीन. मी पांडवांना जिंकीन किंवा पांडव तरी मला जिंकतील.''

( २ ) असें बोलून भीष्मानें दुर्योधनाला विशल्यकरणी शुभ ओषधि दिली. त्या सामर्थ्यसंपन्न औषधीनें तो तत्काल शल्यरहित झाला.

( ३ ) त्यानंतर आल्हादकारक प्रभात झाली असतां व्यूहविशारद भीष्मानें आपल्या सैन्याचा मंडलाकार व्यूह रचला. तें मंडल नानाप्रकारच्या शस्त्रांनीं व्याप्त होतें. हत्ती, पदाति, मुख्य मुख्य योद्धे व अनेक सहस्र रथ, त्याचप्रमाणें ऋष्टि व तोमर धारण करणारे अश्वसादींचे समूह यांनीं तें समंततः परिवेष्टित केलें होतें. त्या मंडलांत प्रत्येक गजाच्या मागें सात रथ होते, प्रत्येक रथाच्या मागें सात अश्व होते, प्रत्येक अश्वाच्या मागें दहा धनुर्धर होते, एकेका धनुर्धराच्या मागें ढाली धारण करणारे होते. याप्रमाणें त्या महारथानें तुझ्या सैन्याचा व्यूह रचला व भीष्मानें ज्याचें रक्षण केलें आहे, त्या सैन्यांत युद्धासाठीं तुझे पुत्र सज्ज होऊन उभे राहिले. त्यांच्याबरोबर दहा हजार गज आणि तेवढेच अश्व व रथ होते. ते सर्व चित्रसेनादि वीर पितामहाचें रक्षण करीत होते.

याप्रमाणें ते महाबलाढ्य शूर राजे भीष्माचें संरक्षण करीत असतां दुर्योधन कवच धारण करून रथांत बसला. त्यावेळीं तो आपल्या राजैश्वर्यानें शक्राप्रमाणें शोभला. इतक्यांत तुझ्या पुत्रांनीं फार मोठा सिंहनाद केला. रथनेमींचा निःस्वन व रणवाद्यांचा घोष सुरू झाला. भीष्मानें पश्चिमाभिमुख रचलेला शत्रूंचा नाश करणारा तो अभेद्य व्यूह अतिशय शोभत होता.

( ४ ) कौरवांचा तो अतिशय दुर्जय व्यूह पाहून धर्मराजानें ' वज्र-'नामक व्यूह रचला. याप्रमाणें दोन्ही सैन्यांची व्यूहरचना झाल्यानंतर रथी व सादी आपापल्या नियत स्थानीं स्थित झाले. त्यांनीं उच्च स्वरानें सिंहनाद केला व परस्परांच्या व्यूहाचा भेद करण्याच्या इच्छेनें ते सर्व युद्धोत्सुक वीर आपापल्या सैन्यांसह पुढें सरसावले.

( ५ ) द्रोण विराटावर चालून गेला, अश्वत्थामा शिखंडीवर धांवला, दुर्योधन धृष्टद्युम्नावर, नकुल-सहदेव शल्यावर व उभय विंदानुविंद इरावतावर तुटून पडले. इतर सर्व नृपालांनीं धनंजयाशीं युद्ध आरंभिलें. भीमसेनानें रणांत धांवून येणाऱ्या हार्दिक्याचें निवारण केलें. अभिमन्यूनें चित्रसेन, विकर्ण, व दुर्मर्षण या तुझ्या पुत्रांचें निवारण केलें. एका मत्त गजानें दुसऱ्या मदोन्मत्त गजावर जसें धांवून जावें, तसा महाधनुर्धर प्राग्जोतिषाधिप घटोत्कचावर वेगानें तुटून पडला. अलंबुषानें सैन्यासह सात्यकीवर चाल केली. भूरिश्रव्यानें धृष्टकेतूशीं युद्ध आरंभिलें. राजा युधिष्ठिरानें श्रूतायूशीं युद्ध आरंभिलें. चेकितान व कृपाचार्य यांचें युद्ध जुंपलें. अवशिष्ट राहिलेले वीर महारथ भीष्मावर धांवून गेले. कौरव वीरांनीं शक्तितोमरादि आयुधें घेऊन अर्जुनाला परिवेष्टित केलें.

त्यावेळीं अर्जुनानें क्रुद्ध होऊन कृष्णाला म्हटलें—"हे माधवा, व्यूह विशारद महात्म्या गांगेयानें कशी व्यूहरचना केली आहे, ती पहा. हे युद्धोत्सुक शूर योद्धे कवचें चढवून युद्धार्थ सज्ज झाले आहेत. त्रिगर्तराज आपल्या भ्रात्यांसह स्थित आहे. तो पहा. हे केशवा, युद्धाच्या इच्छेनें येथें आलेल्या या सर्व वीरांचा आज मी तुझ्या समक्ष नाश करीन."

हे महाराज, असें बोलून धनंजयानें आपल्या धनुष्याच्या दोरीवरून हात फिरवला. व शत्रूपक्षांतील नृपालांच्या समूहावर शरवृष्टि आरंभिली. तेव्हां वर्षाऋतूंत मेघ जसे जलधारांनीं तडाग भरून टाकितात, तसें त्या नरेंद्रांनीं अर्जुनाला शरांनीं आच्छादित केलें. त्यावेळीं तुझ्या सैन्यांत फार मोठा हाहाकार झाला. कृष्णार्जुन बाणांनीं आच्छादित झालेले पाहून देवर्षि, गंधर्व व उरग यांसह देव परम विस्मय पावले.

तेव्हां क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें ऐंद्रास्त्राचा प्रयोग करून असंख्य वीरांनीं सोडलेल्या शरजालांचें निवारण केलें. त्यावेळीं अर्जुनाचा अद्भुत पराक्रम

आमच्या दृष्टीं पडला. धनंजयानें ज्याला क्षतविद्ध केलें नाहीं, असा एकहि वीर मला तेथें दिसला नाहीं. अर्जुनानें दोन-दोन, तीन-तीन शरांनीं सहस्रावधि राजे, गज व अश्व यांना विद्ध केलें. तेव्हां अर्जुनाकडून पीडित झालेले ते योद्धे भीष्माच्या आश्रयाला गेले. अगाध समुद्रांत बुडणाऱ्या त्यांना भीष्म नौकेप्रमाणें झाला. त्याप्रमाणें प्रभग्न झालेलें तुझें सैन्य इतस्ततः पळत असतां तें वायूनें क्षुब्ध झालेल्या महासागराप्रमाणें भासलें. ६. ४. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ पितामहाचें रक्षण करण्याविषयीं दुर्योधनाची सुशर्माला आज्ञा. २ भीष्म व अर्जुन, द्रोण व विराट, शिखंडी व अश्वत्थामा, कृतवर्मा व भीम यांचें द्वैरथ युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें घनघोर संग्राम प्रवृत्त झाला होता, सुशर्मा युद्धापासून निवृत्त झाला होता, महात्म्या पार्थानें तुझ्या वीरांना जर्जर करून टाकिलें होतें, तुझी सागरासारखी सेना क्षुब्ध झाली होती व गांगेय अर्जुनावर चालून गेला होता. अशा वेळीं राजा दुर्योधन पार्थाचा युद्धांतील पराक्रम पाहून मोठ्या त्वरेनें त्या सर्व नृपांच्या समीप आला व त्यांच्या समक्ष त्यांचा प्रमुख वीर जो महाबलाढ्य सुशर्मा, त्याला सैन्याच्या मध्यभागीं स्थित होऊन मोठ्या हर्षानें असें वचन बोलला— " आज हा शान्तनव भीष्म आपलें सर्व बल खर्च करून धनंजयाला जिंकण्याच्या इच्छेनें जीवावर उदार होऊन निघाला आहे. यास्तव तुम्ही सर्व सैन्यासह त्या वीराबरोबर जा व अतिशय सावध राहून पितामहाचें रक्षण करा. "

तेव्हां ' ठीक आहे ' असें बोलून त्या सर्व नरेंद्रांच्या सैन्यानें पितामहाला सर्वशः परिवेष्टित केलें.

( २ ) इतक्यांत मेघगर्जनेसारखा प्रचंड घोष करीत अर्जुनाचा रथ येत असलेला दृष्टीं पडला. त्या रथाला प्रचंड श्वेत अश्व जोडलेले असून तो वानरकेतूनें युक्त होता. अशा प्रकारच्या त्या सुशोभित रथांत बसून येत असलेल्या धनंजयाला पाहून भीष्म मोठ्या त्वरेनें त्याच्यावर धांवून गेला. त्यावेळीं किरीटीला पाहून भयभीत झालेल्या तुझ्या सैन्यांत तुमुल नाद झाला. हातांत अश्वांच्या रश्मि धारण केलेला कृष्ण आपल्या तेजानें माध्याह्नींचा दुसरा

सूर्यच भासत होता. त्याच्याकडे पहाण्यास प्रतिपक्षांतील कोणीहि समर्थ झाला नाहीं. त्याचप्रमाणें श्वेतधनुष्य धारण करणारा व श्वेत अश्वांनीं युक्त असलेला शान्तनव शुक्राच्या शुभ्र ग्रहाप्रमाणें तेजस्वी दिसत होता. त्याच्याकडे पांडव पाहूंहि शकले नाहींत. त्यावेळीं त्या पितामहाला महात्म्या त्रिगर्तांनीं आणि भ्राते, पुत्र व अन्य महारथ यांनीं परिवेष्टित केलें होतें.

इकडे भारद्वाज द्रोणानें मत्स्यराजाला एका शरानें विद्ध केलें. एका शरानें त्याच्या ध्वजाचा छेद केला व एका बाणानें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां त्या सेनापति विराटानें तें तुटलेलें धनुष्य टाकून दिलें व दुसरें भार सहन करणारें दृढ धनुष्य सत्वर घेऊन द्रोणावर तीन बाण सोडले. ते सर्पाकार जळजळीत शर पन्नगासारखेच होते. अशा प्रकारच्या तीक्ष्ण शरांनीं विराटानें द्रोणाचा ध्वज पाडविला. पांच बाणांनीं सारथ्याला विद्ध केलें व एका बाणानें त्याच्या धनुष्याचा छेद केला.

तेव्हां तो द्विजश्रेष्ठ क्रुद्ध झाला व त्या द्रोणानें आठ नतपर्व बाणांनीं त्याच्या अश्वांचा वध केला व एका बाणानें त्याच्या सारथ्याला गतप्राण केलें. तेव्हां सारथि हत झाला असतां त्या रथिश्रेष्ठ विराटानें मोठ्या वेगानें आपल्या अश्वरहित रथांतून उडी टाकली व तो आपल्या पुत्राच्या रथावर चढला. नंतर एकाच रथांत स्थित झालेल्या त्या दोघां पिता-पुत्रांनीं फार मोठी शरवृष्टि करून द्रोणाचें निवारण केलें. त्यावेळीं क्रुद्ध झालेल्या द्रोणानेंहि शंखावर एक सर्पासारखा प्राणघातक बाण सोडला. तेव्हां तो शर शंखाच्या हृदयाचा भेद करून, त्याचें रक्त प्राशन करून रक्तानें माखला व धरणीचें विदारण करून आंत शिरला आणि भारद्वाजाच्या बाणानें हत झालेला तो विराटाचा पुत्र गतप्राण होऊन भूमीवर पडला. त्याच्या हातांतील धनुष्यबाण पित्याच्या समीपच गळून पडले. अशाप्रकारें आपल्या पुत्राचा वध झालेला पाहून विराट भयभीत झाला व मुख पसरलेल्या अंतकासारख्या द्रोणाला सोडून त्यानें रणांगणांतून पलायन केलें. तेव्हां भारद्वाजानें पांडवांच्या सहस्रावधि सैन्याचें विदारण केलें.

हे महाराज, इकडे शिखंडीनें रणांगणांत अश्वत्थाम्याला गांठलें व त्याच्या भुंवयांच्या मध्यभागीं तीन नाराच बाणांचा वेध केला. तेव्हां ललाटावर रुतलेल्या त्या तीन बाणांनीं तो, कांचनाच्या तीन शिखरांनीं युक्त असलेल्या

मेरुपर्वताप्रमाणें शोभला. त्यावेळीं अश्वत्थामा अतिशय संतप्त झाला. त्यानें एका निमिषार्धांत शिखंडीचा ध्वज, सूत, अश्व व आयुधें यांना अनेक शरजालांनीं आच्छादित केलें व तें सर्व भूमीवर पाडविलें. तेव्हां अश्व मरण पावले असतां रथिश्रेष्ठ शिखंडीनें रथांतून उडी टाकली व तो शत्रुतापन पांचाल्य हातांत चकचकीत ढाल व खड्ग धारण करून त्या रणांगणावर श्येनपक्ष्याप्रमाणें संचार करूं लागला. त्यामुळें हातीं खड्ग घेऊन युद्धांत भ्रमण करणाऱ्या त्या शिखंडीवर प्रहार करण्यास द्रौणीला अवसरहि सांपडत नाहीं. इतक्या वेगानें तो फिरत होता. तो एक अद्भुतच प्रकार घडला.

तेव्हां परम क्रोधी अश्वत्थाम्यानें त्याच्यावर सहस्रावधि शरांची वृष्टि केली. परंतु त्या अतिशय दारुण शरवृष्टीचा शिखंडीनें आपल्या तीक्ष्ण धारेच्या तलवारीनें छेद केला. तेव्हां द्रौणीनें त्याची ढाल व खड्ग या दोहोंचेहि तुकडे केले. शिखंडीची ती ढाल शंभर मनोरम चंद्रांनीं चिह्नित केलेली होती. नंतर अनेक तीक्ष्ण बाणांनीं त्याला विद्ध केलें. तेव्हां शिखंडीनेंहि तत्काल आपल्या हातांतील तुटलेलें खड्ग गरगर फिरवून मोठ्या वेगानें अश्वत्थाम्यावर फेकलें. तें तुटलेलें खड्ग संतप्त सर्पाप्रमाणें दिसत होतें. त्याची प्रभा प्रलयाग्नीप्रमाणें होती. असें तें खड्ग मोठ्या वेगानें आपल्याकडे येत आहे, असें पाहून अश्वत्थाम्यानें आपलें अप्रतिम हस्तलाघव प्रकट करीत त्याचे मार्गांतच तुकडे करून टाकले व अनेक शरांनीं शिखंडीला विद्ध केलें. तेव्हां तीक्ष्ण शरांनीं पीडित होत असतां शिखंडी मोठ्या वेगानें महात्म्या माधवाच्या रथावर चढला.

राजा, क्रुद्ध झालेल्या सात्यकीनें क्रूर अलंबुश राक्षसाला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. तेव्हां त्या राक्षसेंद्रानें त्याचें धनुष्य अर्धचंद्र बाणानें तोडून टाकिलें व सात्यकीलाहि शरांनीं विद्ध केलें. नंतर त्यानें राक्षसी माया पसरून शरांची वृष्टि केली. त्यावेळीं आम्हीं त्या शैनेयाचा अद्भुत पराक्रम पाहिला. शरांचा वर्षाव होत असतां तो यत्किंचित्‌हि भ्रान्त झाला नाहीं. त्यानें तत्काल ऐंद्रास्त्राची योजना केली व तत्क्षणीं त्या अस्त्रानें राक्षसी मायेला तात्काल भस्मसात् करून टाकिलें. हें ऐंद्रास्त्र सात्यकीला अर्जुनापासून प्राप्त झालें होतें. नंतर वर्षाऋतूंत मेघ जसे पर्वताला जलधारांनीं सर्व बाजूंनीं भिजवून टाकतात, तसें सात्यकीनें अलंबुश राक्षसाला शरवृष्टीनें सर्वतः झांकून टाकिलें. तेव्हां यशस्वी सात्यकीकडून अशा प्रकारें पीडित झालेला तो राक्षस भयानें

रणांगण सोडून पळाला. तो राक्षसेंद्र युद्धांत साक्षात् इंद्रालाहि दुर्जय होता. तथापि सात्यकीनें त्यालाहि तुझ्या योद्ध्यांच्या समक्ष जिंकलें व मोठ्यानें सिंहनाद केला. नंतर त्या सत्यविक्रम सात्यकीनें तुझ्याकडील अनेक वीरांना तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें, तेव्हां ते सर्व भयार्त होऊन तेथून पळून गेले.

हे महाराज, धृष्टद्युम्नानेंहि तुझ्या पुत्राला नतपर्व बाणांनीं आच्छादित केलें. परंतु धृष्टद्युम्नाच्या त्या विशिख बाणांनींहि तुझा पुत्र व्यथित झाला नाहीं. त्यानें धृष्टद्युम्नावर तीनशें साठ बाण सोडून त्याला विद्ध केलें. त्यावेळींहि एक अद्भुत प्रकार घडला. त्या क्रुद्ध झालेल्या सेनापतीनें त्याच्या धनुष्याचा छेद केला. चारी अश्व मारले व त्याच्यावर सात तीक्ष्ण बाण सोडले. तेव्हां आपले अश्व हत झालेले पाहातांच त्या महाबलाढ्य महाबाहूनें रथांतून मोठ्या त्वरेनें खालीं उडी टाकली व आपली तलवार उगारून तो पायांनींच पार्षतावर धांवून गेला. इतक्यांत त्या राजावर लोभ करणारा शकुनि तेथें आला व त्यानें त्या सर्व लोकांच्या राजाला आपल्या रथावर घेतलें. याप्रमाणें तुझ्या पुत्राचा पराभव करून, असुरांचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें पार्षतानें तुझ्या सैन्याचा संहार चालविला.

हे प्रभो, कृतवर्म्यानें रवीला आच्छादित करणाऱ्या महामेघाप्रमाणें भीमाला शरांनीं झांकून टाकिलें. तेव्हां परंतप भीमसेनानें हंसतच कृतवर्म्यावर बाण सोडिले. तथापि तो अतिरथ सात्वतश्रेष्ठ यत्किंचित्हि कंपित झाला नाहीं. त्यानें उलट भीमाला तीक्ष्ण बाणांनीं झांकून टाकलें. तेव्हां भीमानें त्याचे चारी अश्व मारले, त्याचा भूषविलेला ध्वज आणि सारथि यांनाहि पाडविलें व कृतवर्म्यावर असंख्य बाण सोडून त्याचें सर्वांग क्षतयुक्त करून टाकिलें. तेव्हां अश्वहीन झालेला तो आपला रथ सोडून दुर्योधनाच्या समक्ष तुझा मेहुणा जो वृषक त्याच्या रथांत जाऊन बसला. त्यावेळीं क्रुद्ध झालेला भीमसेन हातांत कालदंड घेतलेल्या अंतकाप्रमाणें तुझ्या सैन्यावर तुटून पडला व त्यानें त्यांचा संहार चालविला. ६. ४. ८२.

## अध्याय ८३ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें दृष्टान्तपूर्वक उत्तर. ३ द्वैरथयुद्धाचें वर्णन.]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, पांडुपुत्राचीं माझ्या पुत्रांशीं अनेक विचित्र द्वैरथ युद्धें झालीं, असें तुला बोलतांना मीं अनेकदा ऐकलेलें आहे. तथापि माझे पुत्र हृष्ट होऊन परत आल्याचें कधींच सांगत नाहींस. उलट पांडव विजयी झाल्याचें मात्र वारंवार सांगत असतोस, ते संतुष्ट होत्साते अक्षत शरीरानें परत आले म्हणून त्यांची प्रशंसा करीत असतोस. माझे पुत्र युद्धांत पराभव पावून खिन्न मनानें शिबिराकडे परत फिरले, असेंच नित्य म्हणतोस, तेव्हां दैवच तसें आहे, यांत संशय नाहीं.

( २ ) **संजय**—हे पुरुषश्रेष्ठा, तुझे पुत्र अतिशय उत्साहानें व आपली सर्व शक्ति खर्च करून युद्ध करीत असतात. त्याचप्रमाणें आपला पुरुषार्थहि प्रकट करतात. तथापि देवलोकींच्या गंगानदीचें जल स्वभावतःच मधुर असतें, परंतु ती नदी समुद्राला जाऊन मिळतांच तें उदक जसें खारट होतें, तसें तुझे पुत्र जरी पराक्रमी आहेत, तरी पांडुपुत्रांच्या संग्रामांत त्यांचा सर्व पुरुषार्थ व्यर्थ होतो. राजा, तुझे पुत्र प्रयत्नपूर्वक दुष्कर कर्म करीत आहेत त्यांना दोष देणें योग्य नव्हे. हे विशांपते, यांत वस्तुतः तुझाच दोष आहे. तूं स्वतःच्या अपराधामुळें स्वपुत्रांसह पृथ्वीचा घोर क्षय आरंभिला आहेस व यमलोकाची वृद्धि करीत आहेस. आत्मदोषानें उद्भवलेल्या या दारुण अनर्थाविषयीं तुला शोक करणें योग्य नाहीं.

आतां हे सर्व राजे जीवावर उदार झाले आहेत. ते स्वर्गाची इच्छा करणारे वसुधाधिप स्वतःच्या जीविताचें रक्षण करण्यासाठीं युद्धपराङ्मुख कदापि होणार नाहींत. ते शत्रुसैन्यांत शिरून युद्ध करीत आहेत. आतां सातव्या दिवसाच्या प्रातःकालींच जो फार मोठा जनक्षय प्रवृत्त झाला, त्या देवासुरतुल्य संग्रामाचें वर्णन करतों, तें एकाग्र चित्तानें ऐक.

( ३ ) हे महाराज, महाबलाढ्य दोघे आवन्त्य राजपुत्र इरावानावर धांवून गेले व त्या दोघांचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. क्रुद्ध झालेल्या इरावानानें त्या दोघां देवरूपी भ्रात्यांवर तीक्ष्ण धारेचे नतपर्व बाण सोडले. तेव्हां विचित्र युद्ध करणाऱ्या त्या दोघांनीं त्याला उलट विद्ध केलें. ते विंदानुविंद व इरावान् हे सारखेच युद्धकुशल असल्यामुळें परस्परांच्या नाशाचा

यत्न करीत होते. प्रतिपक्षाचा पराभव करण्यास उद्युक्त झालेले ते वीर तुल्य-बल असल्यामुळें त्यांतील एकहि योद्धा दुसऱ्या योद्धयाहून विशेष पराक्रमी असल्याचें दिसलें नाहीं.

इरावानानें चार बाणांनीं अनुविंदाच्या चारी अश्वांना यमसदनीं पाठविलें. तीक्ष्ण भल्लबाण सोडून त्याचा ध्वज व धनुष्य यांचा छेद केला. त्या वेळीं अनुविंद भार सहन करणारें दृढ धनुष्य हातांत घेऊन स्वतःचा रथ सोडून विंदाच्या रथांत शिरला व एका रथांत स्थित झालेल्या त्या दोघां वीरांनीं महात्म्या इरावानावर शरांची वृष्टि चालविली. त्यांचे ते सुवर्णानीं भूषविलेले शर अतिशय वेगवान् होते. ते दिवाकराच्या मार्गापर्यंत जाऊन पोंचले व त्यांनीं सर्व आकाश आच्छादित केलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या इरावानानें त्या दोघां महारथ भ्रात्यांवर शरवर्षाव करून त्यांचा सारथि पाडविला. याप्रमाणें सारथि गतप्राण होऊन पडतांच अश्व भ्रांत झाले व त्याचा रथ घेऊन दशदि-शांत पळत सुटले. याप्रमाणें उलूपीपुत्र इरावानानें त्या दोघां भ्रात्यांस जिंकून आपला पराक्रम प्रस्थापित केला व तुझ्या सैन्याचा संहार चालविला. त्यावेळीं रणांगणांत मारली जाणारी ती धार्तराष्ट्राची महाचमू विषप्राशन केलेल्या मानवाप्रमाणें अनेक प्रकारें विह्वल होऊं लागली.

हे राजा, राक्षसश्रेष्ठ घटोत्कच भगदत्तावर धांवला. त्या वेळीं तो आदित्या-सारख्या देदीप्यमान रथांत बसला होता व त्याच्या रथावर श्रेष्ठ ध्वज शोभत होता आणि पूर्वी तारकासुराच्या संग्रामांत इंद्र जसा श्रेष्ठ ऐरावतावर आरूढ होऊन निघाला होता, तसा तो प्राग्ज्योतिषाधिप भगदत्त श्रेष्ठ गजावर आरूढ झाला होता. त्या दोघांचें युद्ध पहाण्यास गंधर्वांसह देव व ऋषि अंतरिक्षांत जमा झाले.

त्या दोघांच्या द्वैरथ युद्धांत अधिक श्रेष्ठ कोण हें कांहीं दिसून आलें नाहीं. ते दोघेहि योद्धे प्रतिस्पर्ध्यांस जिंकण्यास समर्थ होते. त्यावेळीं दानवांना त्रस्त करणाऱ्या शक्राप्रमाणें भगदत्तानें पांडवसेनेला पळवून लावलें. तेव्हां दश-दिशांत पळणाऱ्या त्या पांडवसेनेचें रक्षण करणारा कोणीच दिसला नाहीं. एकटा घटोत्कच तेवढा आपल्या रथांत निर्भयपणें स्थित होता. इतर सर्व महा-रथ असूनहि खिन्न होऊन पळत सुटले. पण ते लगेच परत फिरले. तें पाहून तुझी सेना व्यथित झाली व हाहाकार करूं लागली.

त्यानंतर घटोत्कचानें त्या महारणांत भगदत्ताला शरांनीं झांकून टाकिलें. तेव्हां भगदत्तानें राक्षसाच्या धनुष्यापासून सुटलेल्या त्या सर्व शरांचा छेद करून त्या भैमसेनीच्या मर्मांवर ताडन केलें. तथापि अनेक नतपर्व शरांचे प्रहार होत असतांहि तो राक्षसेंद्र यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. तो पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. तेव्हां भगदत्तानें क्रुद्ध होऊन त्याच्यावर चौदा तोमर सोडले असतां राक्षसानें तत्काल त्याचे तुकडे करून टाकिले. याप्रमाणें तीक्ष्ण शरांनीं तोमरांचा छेद करून घटोत्कचानें सात कंकपत्र बाणांनीं भगदत्ताला विद्ध केलें. तेव्हां त्या प्राग्ज्योतिषाधिपानें हंसतच बाण सोडले व त्याच्या चारी अश्वांना मारून टाकिलें.

ते अश्व मरून पडले असतांहि त्याच रथांत बसून त्या प्रतापवान् राक्षसेंद्रानें मोठ्या वेगानें भगदत्ताच्या गजावर शक्ति फेंकली. ती सुवर्णदंडानें युक्त असलेली शक्ति वेगानें येत असलेली पाहून भगदत्तानें तिचे तीन तुकडे करून टाकिले. तेव्हां ती भूमीवर पडली. आपल्या शक्तीचेहि तुकडे झालेले पाहून घटोत्कच भयभीत झाला व पूर्वीं देव-दानवांच्या युद्धांत इंद्राशीं युद्ध चाललें असतां नमुचिराक्षस जसा पळाला होता, तसें त्यानें तेथून पलायन केलें. याप्रमाणें पुरुषार्थाविषयीं प्रसिद्ध असलेल्या आणि यम व वरुण यांनाहि अजिंक्य असलेल्या शूर हैडिंबाला जिंकून भगदत्तानें आपल्या गजासह पांडव सैन्यांत प्रवेश केला व पद्मिनींना तुडविणाऱ्या वनगजाप्रमाणें त्यानें पांडवसेनेचें मर्दन आरंभिलें.

हे राजन्, मद्रेश्वर शल्यानें नकुल-सहदेवांशीं युद्ध चालविलें व त्या दोघांहि भागिनेयांना शरजालानें आच्छादून टाकिलें. तेव्हां सहदेवानेंहि आपला मातुल युद्धार्थ पुढें उभा असल्याचें पाहून त्याला मेघाच्छादित सूर्याप्रमाणें शरौघानें झांकून टाकिलें. माद्रेयाचा तो पराक्रम पाहून शल्य अतिशय संतुष्ट झाला. आपल्या भगिनीपुत्रांचें युद्धकौशल्य पाहून त्याच्या मनांत अधिकच प्रीति उत्पन्न झाली. नंतर त्यानें स्मितपूर्वकच चार बाण सोडून नकुलाच्या चारी अश्वांना यमसदनीं पाठविलें. तेव्हां अश्व हत झाले असतां त्या महारथानें आपल्या रथांतून उडी टाकली व तो आपल्या यशस्वी भ्रात्याच्या रथावर आरूढ झाला. नंतर एकाच रथांत स्थित असलेल्या त्या दोघां शूरांनीं आपलीं दृढ धनुष्यें आकर्ण ओढून एका क्षणांत मद्रराजाचा रथ अनेक नतपर्व शरांनीं आच्छादून टाकिला. तथापि भगिनीपुत्रांच्या प्रहारांनीं तो नरव्याघ्र यत्किंचित्‌हि

कंपित झाला नाहीं. पर्वताप्रमाणें अचल राहिला व त्यानें हंसतच त्या शर-वृष्टीचा नाश करून टाकिला.

त्यावेळीं क्रुद्ध झालेल्या पराक्रमी सहदेवानें एक तीक्ष्ण शर मद्रराजावर सोडला. तो गरुड व वायु यांच्यासारखा वेगवान् असलेला शर मद्रराजाच्या मर्मस्थलाचा भेद करून भूमीवर पडला. सहदेवाच्या शरानें गाढ विद्ध झालेला शल्य अतिशय व्यथित झाला, त्याला मूर्च्छा आली व तो रथांतच बसला. तेव्हां माद्रेयाकडून पीडित झालेल्या त्याला मूर्च्छित झालेलें पाहून त्याच्या सारथ्यानें रणांगणांतून रथ दूर नेला.

याप्रमाणें माद्रेयाचा रथ युद्धपराङ्मुख झालेला पाहून सर्व धार्तराष्ट्र 'हें चिह्न ठीक नव्हे' असा विचार करून खिन्न झाले. इकडे मातुलाला जिंकून महारथ माद्रीपुत्रांनीं अतिशय संतुष्ट होऊन शंख वाजविले व सिंहनाद केला. नंतर दैत्यांच्या सैन्यावर चाल करून जाणाऱ्या इंद्र व उपेंद्र यांच्याप्रमाणें ते दोघे मोठ्या हर्षानें तुझ्या सैन्यावर धांवून गेले. ६. ४. ८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ १ युधिष्ठिर श्रुतायुषाचें युद्ध. २ देवांनीं केलेलें स्वस्त्ययन. ३ श्रुतायुषाचा पराभव. ४ इतर वीरांचें द्वन्द्वयुद्ध. ५ सुशर्मा-अर्जुनसमागम. ]

( १ ) संजय—राजा, त्यानंतर सूर्य माध्याह्नीं आला असतां युधिष्ठि-रानें श्रुतायुषाकडे पाहून आपले अश्व त्याच्याकडे वळविले व तो नऊ नतपर्व बाण सोडीत त्याच्यावर धांवून गेला. तेव्हां धर्मपुत्राच्या त्या बाणांचें निवा-रण करीत श्रुतायुषानें कौंतेयावर सात बाण सोडिले. त्या बाणांनीं त्याच्या कवचाचा भेद करून त्याचें रक्त प्राशन केलें व त्या महात्म्याला देहांतील जणुकाय प्राणच ओढून काढल्याप्रमाणें क्लेश दिले. तेव्हां विद्ध झालेला तो पांडुपुत्र अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें वराहकर्ण बाण सोडून श्रुतायुषाच्या हृद-याला विद्ध केलें. नंतर दुसरा भल्लबाण सोडून त्या महात्म्याचा ध्वज तोडला व रथावरून भूमीवर पाडविला. आपला केतु पाडलेला पाहून श्रुतायुषानें सात तीक्ष्ण धारेचे विशिख बाण सोडून युधिष्ठिराला विद्ध केलें.

( २ ) त्यावेळीं धर्मपुत्र युधिष्ठिर क्रोधानें युगान्तीं सर्व भूतांना दग्ध कर-णाऱ्या अग्नीप्रमाणें संतप्त झाला. धर्मराजाला क्रुद्ध झालेलें पाहून देव, गंधर्व

आणि राक्षस व्यथित झाले व सर्व जगत् व्याकुल झालें. ' हा क्रुद्ध झालेला राजा आज त्रैलोक्याला दग्ध करील ' अशी सर्व प्राण्यांना चिंता वाटूं लागली व लोकांच्या स्वास्थ्यासाठीं देव आणि ऋषि यांनीं फार मोठें स्वस्त्ययन आरंभिलें. तो क्रुद्ध झालेला पांडव प्रलयकालीन आदित्याप्रमाणें घोर उग्ररूप धारण करून जिभल्या चाटूं लागला. तेव्हां तुझे सर्व सैनिक स्वतःच्या जीविताविषयीं निराश झाले.

( ३ ) तथापि त्या महा यशस्वी पांडवानें धैर्यानें आपला क्रोध आंवरला व श्रुतायुषाचें प्रचंड धनुष्य मुठीजवळच तोडून टाकिलें. त्याचें धनुष्य तोडून टाकल्यानंतर सर्व सैन्याच्या समक्ष 'नाराच बाणानें त्याचें वक्षःस्थल विद्ध केलें आणि लगेच तीक्ष्ण शरांनीं त्या महात्म्याचे अश्व व सारथि यांचा वध केला. तेव्हां धर्मराजाचा तो पराक्रम पाहून आपला अश्वरहित रथ सोडून श्रुतायुषानें मोठ्या वेगानें रणांगणांतून पाय काढला. याप्रमाणें त्या धनुर्धराला समरांत युधिष्ठिरानें जिंकलें असतां दुर्योधनाचें सर्व सैन्य पराङ्मुख झालें. अशा प्रकारें मुख पसरलेल्या कालाप्रमाणें धर्मपुत्र युधिष्ठिरानें तुझ्या सैन्याचा संहार चालविला.

( ४ ) वार्ष्णेय चेकितानानें रथिश्रेष्ठ कृपाला सर्व सैन्याच्या समक्ष शरांनीं आच्छादित करून टाकिलें. तेव्हां शारद्वत कृपानें त्या बाणांचें निवारण करून चेकितानाला शरांनीं विद्ध केलें. नंतर दुसऱ्या भल्ल बाणानें त्याचें धनुष्य तोडलें, सारथ्याला अश्वांसह गतप्राण केलें आणि त्याचे पृष्ठरक्षक व त्याचा सारथि यांचाहि वध केला. तेव्हां त्या सात्वतानें रथांतून उडी टाकली व त्या श्रेष्ठ गदाधरानें वीरांचा घात करणारी आपली गदा घेऊन गौतमाचे अश्व व सारथि यांवर प्रहार केला आणि त्यांस गतप्राण केलें. तेव्हां गौतमानें भूमीवर स्थित होऊन त्याच्यावर सोळा शर सोडिले. ते शर सात्वताला भेदून पृथ्वींत शिरले. त्यावेळीं वृत्रासुराच्या वधाची इच्छा करणाऱ्या इंद्राप्रमाणें चेकितान अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें कृपाच्या वधेच्छेनें मोठ्या वेगानें त्याच्यावर गदा फेंकली. परंतु ती वज्रतुल्य उज्ज्वल गदा आपल्या अंगावर येत आहे, हें पहांताच कृपानें सहस्रावधि शरांनीं त्या गदेचें निवारण केलें.

तेव्हां चेकितान क्रोधानें आपलें खड्ग उगारून धांवला, परंतु गौतमानें अतिशय चपलतेनें तेथून दूर होऊन त्याचा प्रहार चुकविला व आपलें धनुष्य

टाकून खड्ग धारण केलें. याप्रमाणें सज्ज होऊन तो अतिशय वेगानें चेकितानावर धांवून गेला. ते दोघेहि वीर असियुद्धांत प्रवीण होते, बलाढ्य होते व खड्गधारी होते. ते आपल्या तीक्ष्ण धारेच्या चकचकीत तलवारी उपसून परस्परांवर धांवले व एकमेकांचे देह क्षतविद्ध करूं लागले. याप्रमाणें अन्योन्यावर प्रहार करणारे ते वीर शेवटीं सर्वभूतांच्या आश्रयस्थानीं असलेल्या धरणीवर पडले. ते दोघेहि श्रांत झाल्यामुळें मोहित झाले व गात्रें लीन होऊन मूर्च्छित होऊन पडले. तेव्हां चेकितानाची ती अवस्था पहातांच शिशुपालपुत्र करकर्ष स्नेहभावानें तेथें मोठ्या त्वरेनें धांवतच आला व त्यानें सर्व सैन्यासमक्ष त्याला उचलून आपल्या रथांत घेतलें. त्याचप्रमाणें हे राजा, शकुनीनेंहि कृपाचार्याला तत्काल आपल्या रथांत घेतलें.

हे महाराज, इकडे महाबलाढ्य धृष्टकेतूहि क्रुद्ध झाला होता. त्यानें नव्वद बाण सोडून सौमदत्तीचें वक्षःस्थल विद्ध केलें. तेव्हां माध्याह्नीच्या किरणांनीं प्रकाशित होणाऱ्या आदित्याप्रमाणें तो सौमदत्ति त्या हृदयस्थ बाणांच्या योगानें शोभला. शूर भूरिश्रवानें श्रेष्ठ बाणांनीं महारथ धृष्टकेतूचा सारथि व अश्व यांचा नाश करून त्याला विरथ करून टाकिलें आणि याप्रमाणें अश्व व सारथि यांचा वध करून विरथ झालेल्या त्या योद्ध्याला शरवृष्टीनें झांकून टाकिलें. तेव्हां तो उदार मनाचा धृष्टकेतू आपल्या रथांतून उतरला व शतानीकाच्या रथांत चढला.

हे राजन्, त्याचप्रमाणें चित्रसेन, विकर्ण व दुर्मर्षण हे सुवर्णाचीं कवचें घातलेले तिघे वीर एकट्या अभिमन्यूवर धांवून गेले, तेव्हां शरीराचें जसें वात-कफ-पित्त या तीन विकारांशीं युद्ध चालतें, तसें अभिमन्यूचें त्या तिघां योद्ध्यांशीं घोर युद्ध प्रवृत्त झालें. त्या कुमारानें तुझ्या त्या तिन्ही पुत्रांना विरथ केलें. पण ‘सर्व धार्तराष्ट्रांचा मी वध करीन’ हें भीमसेनाचें वचन स्मरून त्यानें त्यांस गतप्राण केलें नाहीं.

इतक्यांत देवांनाहि दुरासद असलेला भीष्म तुझ्या पुत्रांच्या रक्षणार्थ तेथें धांवून आला. असंख्य गज, अश्व व रथ यांनीं परिवेष्टित झालेल्या पितामहाला अभिमन्यूकडे येत असलेलें पाहून व तो बालमहारथ अगदीं एकटा आहे, हें जाणून श्वेतवाहन कौंतेय वासुदेवाला असें म्हणाला—“ हे हृषीकेशा, हे सर्व युद्धदुर्मद, शूर व कृतास्त्र योद्धे जेथें जमले आहेत, तेथें अश्व वळीव. ज्यायोगें

असंख्य रथ आपल्या सेनेचा नाश करणार नाहींत, तशाप्रकारें माझा रथ चालीव.''

कौंतेयाचें हें वचन ऐकतांच अमित ओजस्वी वार्ष्णेयानें श्वेतहयांनीं युक्त असलेला रथ रणांगणांत नेला. तेव्हां क्रुद्ध झालेला अर्जुन आपल्यावर चाल करून येत आहे, हें पहातांच तुझ्या सैन्यांत फार मोठा कोलाहल झाला.

( ५ ) नंतर भीष्माचें रक्षण करणाऱ्या राजांच्या समीप जाऊन अर्जुन सुशर्माला असें वचन बोलला—'हे सुशर्मन्, तूं अत्यंत श्रेष्ठ योद्धा आहेस व तुझें आमच्याशीं असलेलें पूर्ववैरहि मी जाणतों. तुझ्या त्या अपराधांचें दारुण फल भोगण्याचा प्रसंग आतां प्राप्त झाला आहे. आज मी तुला तुझ्या पूर्वजांचें दर्शन घडवितों.'

याप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या शत्रुसंहारक बीभत्सूचें हें कठोर वाक्य ऐकूनहि रथयूथप सुशर्मा शुभ किंवा अशुभ कांहींहि बोलला नाहीं. तो अनेक राजांनीं परिवेष्टित होत्साता अर्जुनावर धांवून गेला व त्यानें पुढून, मागून, बाजूंनीं सर्वतः त्याच्यावर शरांचा वर्षाव चालविला आणि मेघांनीं आच्छादित केलेल्या सूर्याप्रमाणें तुझ्या पुत्रांनीं पार्थाला शरजालांनीं झांकून टाकिलें व पांडव-कौरवांचा दारुण संग्राम प्रवृत्त होऊन रक्ताची नदी वाहूं लागली. ६. ४. ८४.

---

## अध्याय ८५ वा.

[ १ पार्थ-त्रिगर्त युद्ध. २ त्रिगर्तांच्या रथांचा पराजय. ३ पार्थ-भीष्म युद्ध. ४ इतर पांडवांचा कौरववीरांशीं संग्राम. ५ युधिष्ठिराचें शिखंडीला युद्ध-प्रोत्साहन. ]

**( १ ) संजय—**हे महाराज, धनंजय शरांनीं ताडित होत असतां, ज्याला पायानें डवंचिलें आहे, अशा नागाप्रमाणें फुत्कार टाकीत प्रत्येक बाणानें शत्रूंच्या महारथांचीं धनुष्यें तोडून टाकूं लागला. त्या राजांचीं धनुष्यें तोडून सर्वांना एका क्षणांत निःशेष करण्याच्या इच्छेनें महात्म्या कौंतेयानें त्या सर्वांस एकाच वेळीं विद्ध केलें. तेव्हां शक्रसुताकडून ताडित होणारे ते सर्व नृपाल रक्तानें माखले. त्यांचे अवयव छिन्न-भिन्न झाले, मस्तकें तुटून पडलीं. कवचांचे तुकडे झाले व ते सर्व योद्धे गतप्राण होऊन भूमीवर पडले. पार्थाच्या बलापुढें पराभव पावलेले ते सर्व भूपति धरणीवर पडून एकाच वेळीं नाश पावले.

(२) याप्रमाणें ते सर्व राजपुत्र युद्धांत हत झालेले पाहून तो त्रिगर्तराज तेथें रथानें आला. त्याच्याबरोबर बत्तीस पृष्ठरक्षकहि पार्थावर तुटून पडले. त्यांनीं पार्थाला चोहोंबाजूंनीं वेढून टाकिलें व फार मोठा शब्द करणारीं धनुष्यें आकर्ण ओढून पर्वतावर जलधारांची वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें त्याच्यावर शरवृष्टि केली. तेव्हां त्यांच्याकडून पीडित झालेला पार्थ क्रुद्ध झाला. त्यानें त्या पृष्ठरक्षकांवर साठ शर सोडिले व त्या रथ्यांना जिंकून तो यशस्वी धनंजय संतुष्ट झाला.

(३) याप्रमाणें शत्रुसैन्याचा संहार करून अर्जुन भीष्माकडे वळला. इतक्यांत आपल्या बंधुवर्गाचा पराभव झालेला पाहून त्रिगर्तराज नराधिपांना पुढें करून अर्जुनाच्या वधासाठीं धांवून आला. तेव्हां अस्त्रवेत्त्यांतील वरिष्ठ धनंजयावर शत्रूचे योद्धे चाल करून येत आहेतसें पाहून शिखंडिप्रभृति वीर आपलीं तीक्ष्ण धारेचीं शस्त्रें उगारून अर्जुनाच्या रथाभोंवतीं सज्ज होऊन उभे राहिले. त्यावेळीं त्रिगर्तराज नृपालांसह येत आहे, हें पाहून अर्जुनानें गाण्डीवापासून सुटलेल्या तीक्ष्ण शरांनीं त्या सर्व योद्ध्यांचा विध्वंस केला व तो भीष्मावर धांवून गेला. तेव्हां मार्गांत दुर्योधन, जयद्रथादि राजे त्याच्या दृष्टीं पडले. ते भीष्माचे रक्षक आहेत, हें जाणून पार्थानें त्यांच्याशीं युद्ध आरंभिलें. त्यांच्याशीं मुहूर्तभर युद्ध झाल्यावर जयद्रथादि राजांना सोडून तो महा ओजस्वी अर्जुन हातांत आपलें श्रेष्ठ धनुष्य घेऊन भीष्माकडे आला.

(४) इतक्यांत महात्मा युधिष्ठिर अतिशय क्रुद्ध होऊन तेथें आला. त्या प्रबल पांडवानें मद्राधिश शल्याशीं युद्ध थांबविलें व त्याला रणांगणांत सोडून तो अनंतकीर्ति युधिष्ठिर, भीमसेन व दोघे माद्रेय यांसह शांतनवाशीं युद्ध करण्यासाठीं प्राप्त झाला. तेव्हां पांची पांडव आपल्यावर चाल करून येत आहेत हें पाहून विचित्रयुद्ध करणारा गांगेय यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. पण त्याचे रक्षक सत्यसंध व जयद्रथ हे दोघे पुढें सरसावले व त्यांनीं महारथ पांडवांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं.

क्रुद्ध झालेल्या दुर्योधनानें अग्नितुल्य बाणांची पांडुपुत्रांवर वृष्टि केली. कृप, शल्य, शल व त्याचप्रमाणें चित्रसेन यांनींहि त्या पांची पांडवांना तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें, तेव्हां ते वीर दैत्यांकडून पीडिल्या जाणाऱ्या देवांप्रमाणें शोभले.

(५) त्यावेळीं शांतनवानें शिखंडीचें धनुष्य तोडून टाकिलेलें पाहून महात्मा अजातशत्रु धर्मराज अतिशय क्रुद्ध झाला व शिखंडीला असें वचन

बोलला—" तूं आपल्या पित्याच्या समक्ष 'मी सूर्यतुल्य तेजस्वी शरांनीं महाव्रत भीष्माचा वध करीन हें मी सत्य सांगतों' अशी प्रतिज्ञा केली आहेस, तथापि ती तूं सफल केली नाहींस. तूं जर देवव्रताचा युद्धांत वध केला नाहींस, तर तुझी प्रतिज्ञा मिथ्या होईल. यास्तव हे वीरा, तूं सत्यप्रतिज्ञ हो आणि आपलें कुल, यश व स्वधर्म यांचें रक्षण कर. हा भीष्म पहा, त्याचा वेग अतिशय भयंकर आहे.

एका क्षणांत सव जगत् नष्ट करणाऱ्या प्रलयकालीन कालाप्रमाणें तो आपल्या अतिशय शीघ्रगामी प्रखर शरजालांनीं माझ्या सैन्यास तप्त करीत आहे. त्या प्रतापी शान्तनवानें युद्धांत तुझें धनुष्य तोडून तुझा पराभव केला आहे, अशा प्रसंगीं तूं आपल्या सोदर भ्रात्यांना व बांधवांना सोडून रणांगणां-तून कोठें निघून चाललास ! हें कृत्य तुला अनुरूप नाहीं. हे द्रुपदपुत्रा, तुझें मुख अप्रसन्न दिसत आहे. त्यावरून भीष्माचा अमित पराक्रम पाहून व त्यानें पराजित केलेलें सैन्य पळत असलेलें पाहून खरोखर तूं भ्याला आहेस असें मला वाटतें. तथापि हे वीरा, नरश्रेष्ठ धनंजय मार्गे राहून भीष्माशीं घोर संग्राम करीत या महायुद्धांत पराक्रम गाजवीत असतां तूं असा भय-भीत कां होतोस ! तुझ्या शूरत्वाची तर पृथ्वीतलावर ख्याति आहे."

धर्मराजाचें तें कठोर व विषादयुक्त भाषण ऐकून तो महात्मा ही आपली निर्भर्त्सनाच आहे, असें समजला आणि मोठ्या त्वरेनें भीष्मवधार्थ धांवला. तेव्हां शल्यानें घोर व दुर्जय अस्त्रानें त्याचें निवारण केलें. तथापि महेंद्रा-सारखा ज्याचा प्रभाव आहे, असा तो द्रुपदपुत्र प्रलयकालीन अग्नितुल्य प्रकाश असलेलें तें अस्त्र पाहून मोहित झाला नाहीं. तो महा धनुर्धर शिखंडी आपल्या जागेवरून हाललाहि नाहीं. तेथेंच स्थित होऊन त्यानें शरांनीं त्या अस्त्राला प्रतिबंध केला व त्या अस्त्राचा नाश करणारें वारुणास्त्र सोडलें. याप्रमाणें त्या अस्त्राचें अस्त्रानेंच विदारण होत असतां देव अंतरिक्षांतून व नृप भूमी-वरून पाहूं लागले.

हे महाराज, त्यांचें याप्रमाणें युद्ध प्रवृत्त झालें असतां भीष्मानें अजातशत्रु युधिष्ठिराचें धनुष्य व विचित्र ध्वज तोडून टाकला व मोठ्यानें सिंहनाद केला. तेव्हां तो ज्येष्ठ पांडुपुत्र धनुष्यबाण टाकून भयभीत होत्साता पराभव पावून रणांगणांतून निघून गेला.

त्यावेळीं भीमसेन हातीं गदा घेऊन पायांनींच निघाला व मोठ्या वेगानें जयद्रथावर तुटून पडला. तेव्हां गदाधर वृकोदर त्वरेनें आपल्यावर धांवून येत आहे, हें पाहून जयद्रथानें यमदंडासारखे घोर पांचशें बाण सोडून त्याला विद्ध केलें. तथापि क्रुद्ध झालेल्या वृकोदरानें त्या शरवृष्टीची गणनाहि न करतां त्या सिंधुराजाच्या रथाचे पारव्या रंगाचे अश्व एका क्षणांत मारून टाकिले.

तेव्हां भीमाचा अतुल पराक्रम पाहून तुझा पुत्र चित्रसेन भीमाच्या वधेच्छेनें आपल्या रथांत बसून त्याच्यावर धांवला. त्याला पहातांच इंद्रतुल्य भीमानें आपलें शस्त्र उगारून मोठ्यानें गर्जना केली व तो आपली उगारलेली गदा घेऊन त्याच्यावर धांवला. ती यमदंडासारखी गदा पाहून समंततः असलेले सर्व कौरव तुझ्या पुत्राला एकटाच सोडून त्या उग्र गदेचा प्रहार चुकविण्यासाठीं तेथून निघून गेले. त्या तुमुल युद्धांत तो दारुण प्रसंग अतिशय मोहित करणारा होता, तथापि तुझा पुत्र त्यावेळीं भ्रांत झाला नाहीं. भीमानें फेंकलेली ती महागदा आतां आपल्या रथावर येऊन पडणार, हें पहातांच तो रथांतून खालीं उतरला व पर्वतशिखरावरून खालीं उतरलेल्या सिंहाप्रमाणें हातांत ढाल व तरवार घेऊन अन्य प्रदेशीं स्थित झाला. इतक्यांत ती गदाहि त्याच्या रथावर मोठ्या वेगानें आपटली व अश्व आणि सारथि यांच्यासह रथाचे तुकडे करून, अंतरिक्षांतून च्युत होऊन पृथ्वींत शिरणाऱ्या प्रज्वलित उल्केप्रमाणें भूमीवर पडली. तेव्हां तुझ्या पुत्रांचें आश्चर्यकारक युद्धनैपुण्य पाहून तुझे सर्व सैनिक संतुष्ट झाले व त्यांनीं हर्षभरानें सर्व बाजूंनीं जयघोष करीत तुझ्या पुत्रांच्या शौर्याची प्रशंसा केली. ६. ४. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ भीष्माशीं पांडवांचें तुमुल युद्ध. २ व्यूहाचा व्यतिकर व संकुल युद्ध. ३ सप्तमदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे महाराज, इतक्यांत चित्ररथाला विरथ झालेला पाहून तुझ्या विकर्ण पुत्रानें त्याला आपल्या रथांत घेतलें. तेव्हां त्यांचें संकुल युद्ध चालू असतां शान्तनव भीष्म युधिष्ठिरावर धांवून गेला. तें पाहून ‘ आतां युधिष्ठिर मृत्यूच्या मुखांतच सांपडला आहे ’ असें मानून सर्व सृंजय रथ, गज

व अश्व यांच्यासह कंपित झाले. धर्मराजहि नकुल-सहदेवांसह नरव्याघ्र भीष्मावर तुटून पडला, त्या पांडवानें, आदित्याला झांकणाऱ्या मेघाप्रमाणें सहस्रावधि बाण सोडून भीष्माला आच्छादित केलें. परंतु युधिष्ठिराचें तें शास्त्रोक्तप्रकारें सोडलेलें शरजाल गांगेयानें सहस्रावधि शरांनीं मार्गांतच प्रतिबद्ध केलें. त्यावेळीं तो शरसमूह आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें भासला. निमेषार्धांतच भीष्मानें युधिष्ठिराला शरजालानें भागशः अदृश्य करून टाकिलें.

तेव्हां क्रुद्ध झालेल्या युधिष्ठिरानें महात्म्या पितामहावर सर्पतुल्य नाराच बाण सोडला. तथापि तो त्याच्यापर्यंत जाऊन पोंचण्याच्या आधींच भीष्मानें क्षुरप्र बाणानें त्याचा छेद केला व त्या कालासारख्या नाराच बाणाचे तुकडे करून धर्मराजाचे कांचनानें भूषविलेले अश्वहि गतप्राण केले. तेव्हां युधिष्ठिर त्या अश्वरहित रथांतून उतरून मोठ्या त्वरेनें नकुलाच्या रथांत चढला. त्यावेळीं क्रुद्ध झालेल्या भीष्मानें उभय माद्रेयांनाहि शरांनीं आच्छादित केलें. तेव्हां भीष्माच्या बाणांनीं पीडित झालेल्या त्या दोघां माद्रीनंदनांना पाहून भीष्मवधाविषयीं त्या कुंतीपुत्राच्या मनांत चिंता उत्पन्न झाली व त्यानें आपल्या वश असलेल्या सर्व नृपतींना 'तुम्हीं सर्व मिळून शान्तनव भीष्माचा वध करा' अशी आज्ञा केली.

युधिष्ठिराची आज्ञा ऐकून त्या सर्व पार्थिवांनीं प्रचंड रथसमुदायांसह पितामहाला परिवेष्टित केलें; पण सर्व बाजूंनीं वेढला गेलेला तो भीष्म जणुकाय क्रीडाच करीत आपल्या धनुष्यानें महारथांना पटापट गतप्राण करूं लागला. तो कौरव रणांगणांत संचार करीत असतां वनामध्यें मृगांच्या कळपांत प्रवेश करणाऱ्या सिंहाप्रमाणें शोभला. तो वीर रणांमध्यें शस्त्र उगारून योद्धयांना धाक दाखवीत होता व आपल्या बाणांनीं त्यांना त्रस्त करीत होता, तेव्हां सिंहाला पाहून पळणाऱ्या मृगगणांप्रमाणें पांडवांचे योद्धे भयभीत झाले. वायूचें साह्य असतांना अग्नि जसा तृणाला दग्ध करीत जातो, तशी त्या क्षत्रियांना शत्रुसैन्याला ताप देणाऱ्या त्या भारतसिंहाची हतगति भासली. तालवृक्षांवरून परिपक्क फळें जशीं पडावीं तशीं त्या युद्धकुशल वीरानें रथ्यांचीं मस्तकें पाडविलीं. तीं शिरें भूमीवर पडत असतां उंचावरून पडणाऱ्या पाषाणाप्रमाणें प्रचंड आवाज होत होता.

( २ ) याप्रमाणें तें भयानक तुमुल युद्ध चाललें असतां सर्व सैन्यांचा फार मोठा व्यतिकर झाला. त्या दोन्ही सैन्यांच्या व्यूहांचा भेद झाला असतां ते

सर्व क्षत्रिय परस्परांस आह्वान करून एकेकटेच युद्धाला उभे राहिले. तेव्हां शिखंडीनें भरताच्या पितामहाला 'थांब थांब' असें बोलून युद्धाचें आह्वान केलें, परंतु शिखंडीचें पूर्वीचें स्त्रीत्व स्मरून भीष्मानें त्याच्या आह्वानाची उपेक्षा केली व तो क्रुद्ध होऊन सृंजयांवर धांवला. तेव्हां भीष्म आपल्याकडे येत आहे, हें पाहून सृंजयांनीं शंखध्वनींनीं मिश्रित असे विविधप्रकारें सिंहनाद केले.

त्यावेळीं भगवान् अंशुमालि पश्चिम दिशेकडे चालला असतांहि त्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. त्या रणधुमाळींत रथ व गज यांची गर्दी झाली होती. पांचाल्य धृष्टद्युम्न व महारथ सात्यकि या दोघांनीं शक्ति व तोमर यांच्या वृष्टींनीं तुझ्या सैन्याला अतिशय पीडा दिली व अनेक प्रकारच्या शस्त्रांनीं त्यांचा संहार चालविला. अशाप्रकारें शस्त्रप्रहार होत असतांहि तुझ्या योद्धयांनीं रणांगण सोडलें नाहीं. त्यांनीं यथाशक्ति युद्ध करण्याचा निश्चय केला व ते सर्व आपापल्या उत्साहानुरूप युद्ध करूं लागले.

त्यावेळीं महात्मा पार्षत तुझ्या सैन्याला व्यथित करीत असतां कौरव-सैन्यांत फार मोठा आक्रोश झाला. आपल्या सैन्याचा तो घोर शब्द ऐकून अवंतीचे अधिपति विंदानुविंद पार्षतावर धांवून आले. त्या दोघां महारथांनीं प्रथम मोठ्या त्वरेनें पार्षताच्या अश्वांना गतप्राण केलें व त्याला शरवृष्टींनीं झांकून टाकिलें. तेव्हां महाबलाढ्य पांचाल्य मोठ्या त्वरेनें रथांतून उडी टाकून महात्म्या सात्यकीच्या रथांत शिरला.

इतक्यांत फार मोठ्या सेनेनें आवृत्त झालेला राजा युधिष्ठिर त्या दोघां आवंत्याधिपांवर धांवून आला. तें पाहून तुझा पुत्र दुर्योधनहि आपल्या सर्व सेनेसह विंदानुविंदांना परिवेष्टित करून उभा राहिला.

दुसरीकडे असुरांचा नाश करणाऱ्या वज्रपाणि इंद्राप्रमाणें अर्जुन क्रुद्ध होऊन सर्व क्षत्रियांना विह्वल करीतच होता. तुझ्या पुत्रांचें प्रिय करणारा द्रोणहि कापसाच्या राशीला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें सर्व पांचालांना शरांनीं पीडा देत होता. दुर्योधनप्रभृति तुझे पुत्र रणांगणांत भीष्माच्या सभोंवार उभे राहून त्याचें रक्षण करीत पांडवांशीं युद्ध करीत होते.

( ३ ) हे महाराज, त्यानंतर सूर्य आरक्त होऊं लागला असतां दुर्योधनानें आपल्या सैनिकांना 'त्वरा करा' अशी आज्ञा केली. तरीहि ते युद्ध करणारे

योद्धे, भास्कर अस्ताचलीं जाऊन प्रकाश नाहींसा होईपर्यंत दुष्कर कर्म करीतच होते.

त्यावेळीं तेथें रक्ताची घोर नदीचें[1] प्रवृत्त झाली होती. तिच्या सभोंवार गोमायूंचा समुदाय जमला होता. अशुभ शब्द करणाऱ्या भालू भेसूर रोदन करीत होत्या. भूतगणांनीं तो प्रदेश व्यापला होता व राक्षस, पिशाच आणि अन्य मांसभक्षक सहस्रावधि प्राणी सर्वतः पसरलेले दिसत होते.

तेव्हां अर्जुन सुशर्मादि राजांना त्यांच्या अनुयायांसह जिंकून आपल्या शिबिरांत आला. राजा युधिष्ठिरहि रात्र पडल्यामुळें आप्तांसह सेनेनें आवृत्त होऊन आपल्या शिबिराकडे वळला. भीमसेन दुर्योधनादि रथांना जिंकून त्यालाच अनुसरला. त्याचप्रमाणें दुर्योधन शान्तनव भीष्माला परिवेष्टित करून त्या महारणांतून परत फिरला. तेव्हां द्रोण, द्रौणि, कृप, शल्य, कृतवर्मा व सात्वत सर्व सैन्यांसह आपापल्या शिबिरांत गेले. सात्यकि व धृष्टद्युम्नहि इतर योद्ध्यांसह शिबिराकडे वळले.

हे महाराज, याप्रमाणें त्या रात्रीं तुझे पुत्र पांडवांसह रणांगणांतून परत फिरले व आपापल्या शिबिरांत जाऊन त्यांनीं स्व-स्व योद्ध्यांची प्रशंसा केली. त्या शूरांनीं सैन्याच्या प्रवेशद्वारीं रक्षकांची योजना करून शिबिराच्या सुरक्षिततेची यथायोग्य व्यवस्था केली. नंतर त्या सर्व योद्ध्यांनीं आपल्या शरीरांत रुतलेलीं शल्यें काढून टाकिलीं, विविध प्रकारच्या जलांनीं स्नान केलें व स्वस्त्ययन करून ते सर्व विश्रांति घेऊं लागले. तेव्हां स्तुतिपाठक बंदिजन स्तुति गाऊं लागले. जेथें तेथें गायन-वादनाचा शब्द ऐकूं येऊं लागला व घटका भरतांच त्या प्रदेशाला प्रति स्वर्गाचेंच स्वरूप प्राप्त झालें. त्यावेळीं त्या महारथांतील कोणीहि युद्धाच्या गोष्टी बोलले नाहींत. याप्रमाणें त्या रात्रीं कांहीं काल चित्तरंजनानें श्रमपरिहार झाल्यावर, श्रांत झालेल्या गजाश्वांसह ते सर्व असंख्य सैनिक निद्रित झाले असतां अतिशय प्रेक्षणीय दृश्य दिसलें. ६. ४. ८६.

---

१ या रक्ताच्या नदीचें रूपक पूर्वी अनेकदा आलें आहे, म्हणून येथें त्याचा संक्षेप केला आहे.

## अध्याय ८७ वा.

[१ आठव्या दिवसाची व्यूहरचना. २ पांडवांचा शृंगाटकव्यूह. ३ युद्धारंभ.]

(१) संजय—हे महाराज, ती रात्र निघून गेली असतां ते सर्व जनेश्वर उत्साहयुक्त झाले व ते कौरव-पांडव पुनः युद्धाला निघाले. तेव्हां सागरासारखी ती प्रचंड सेना रणांगणाकडे चालली असतां तुमुल शब्द झाला. राजा दुर्योधन, चित्रसेन, विविंशति, रथिश्रेष्ठ भीष्म व भारद्वाज द्रोण, या सर्वांनीं एकत्र जमून कौरवांच्या महाचमूचा व्यूह रचला. ते सर्व वीर कवचें चढवून सज्ज झाले व भीष्मानें सागरासारख्या अफाट सेनेचा महाव्यूह रचिला. अश्वगजादि वहानें त्या सैन्यसागराच्या ऊर्मीच होत्या. सर्व सैन्याच्या अग्रभागीं मालव, दाक्षिणात्य व आवंत्य राजे यांच्यासह शांतनव निघाला. त्यांच्या मागें पुलिंद, पारद व क्षुद्रक, मालव यांसह भारद्वाज चालला. द्रोणाच्या पाठोपाठ मागध, कलिंग व पिशाच यांच्यासह प्राग्ज्योतिषाधिप प्रतापवान् भगदत्त स्थित झाला. त्यांच्या मागून कोसलाधिपति बृहद्बल मेकल, कुरुविंद व त्रैपुर यांसह निघाला. त्यांच्या मागें प्रस्थलाधिप शूर त्रिगर्त कांबोज व सहस्रावधि यवन यांसह चालला आणि शूर अश्वत्थामा आपल्या सिंहनादानें पृथ्वी निनादित करीत त्याला अनुसरला. त्याच्या मागें सर्व सोदर भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेला राजा दुर्योधन आपल्या सर्व सैन्यासह चालला व दुर्योधनाच्या मागोमाग कृप निघाला. याप्रमाणें तो सागरोपम महाव्यूह श्वेतच्छत्रें, पताका, चित्रविचित्र धनुष्यें व वीरांचीं मूल्यवान् बाहुभूषणें यांनीं अतिशय शोभला.

(२) हे महाराज, तुझा हा महाव्यूह पाहून युधिष्ठिर सेनापति पार्षताला म्हणाला—' हे पार्षता, हा शत्रूंचा सागरोपम व्यूह पहा आणि तूंहि सत्वर प्रतिव्यूहाची रचना कर.'

तेव्हां त्या क्रूर पार्षतानें परव्यूहाचा नाश करणारा 'शृंगाटक'-नामक अति दारुण व्यूह रचिला. त्या व्यूहाच्या दोन टोकांना शृंगांच्या ठिकाणीं अनुक्रमें भीमसेन व सात्यकि अनेक सहस्र रथ, अश्व व पदाति यांच्यासह स्थित झाले. त्या दोहोंच्या मध्यें कृष्णसारथि पार्थ उभा राहिला. मध्यभागीं नकुल-सहदेवांसह राजा युधिष्ठिर स्थित झाला. त्यांच्या पुढें व्यूहविशारद नराधिप आपापल्या सैन्यांसह व्यूहाची पूर्तता करण्यासाठीं उभे राहिले. त्यांच्या मागें अभिमन्यु, विराट, द्रौपदीचे पांच पुत्र व घटोत्कच राक्षस क्रमानें स्थित झाले.

याप्रमाणें व्यूह रचून ते जयेच्छु पांडव सज्ज होऊन समरांगणांत आले. त्या वेळीं शंखध्वनीनें मिश्र झालेला भेरीचा शब्द, वीरांच्या गर्जना व आस्फोटनें इत्यादिकांनीं सर्व दिशा निनादित झाल्या.

( ३ ) हे महाराज, याप्रमाणें तीं दोन्ही सैन्यें रणभूमीवर एकत्र जमलीं असतां त्यांतील वीरांनीं प्रथम स्थिर नेत्रांनीं परस्परांचें अवलोकन केलें. नंतर त्यांनीं आपल्या प्रतियोद्धयांना त्यांच्या नांवांनीं युद्धार्थ आव्हान केलें व त्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. मुख पसरलेल्या घोर सर्पांप्रमाणें नाराच बाणांची परस्परांवर वृष्टि झाली. मेघांतून उत्पन्न होणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें तीक्ष्ण धारांच्या शक्ति चमकूं लागल्या. तेथें पर्वतशृंगांचीच ज्यांना उपमा शोभेल, अशा शुभ गदा जोरानें एकमेकींवर आदळत असलेल्या दिसत होत्या. त्या सर्व सुवर्णानें भूषविलेल्या पट्टयांनीं अलंकृत केल्या होत्या. त्याचप्रमाणें निर्मल आकाशासारख्या नीलवर्ण तरवारी चमकत होत्या व शतचंद्रांनीं चिह्नित झालेल्या चित्र-विचित्र ढाली सर्वतः पडल्या होत्या. त्यामुळें तें रणांगण फार शोभत होतें. परस्परांशीं युद्ध करणारीं तीं दोन्ही सैन्यें देव-दैत्यांच्या सेने-प्रमाणें शोभलीं.

रथ्यांनीं आपले रथ शत्रूंच्या रथांशीं भिडविले. त्यांचीं जुवेंहि एकमेकांत अडकूं लागलीं व त्या पार्थिवांचें युद्ध जुंपलें. युद्ध करणाऱ्या गजांचे दांत प्रतिस्पर्धी गजांच्या दातांवर जोरानें घांसूं लागले. त्या संघर्षणामुळें अग्नि उत्पन्न झाला व सर्व दिशा धूमयुक्त झाल्या. कांहीं गजारोह्यांवर प्रासांचे प्रहार होऊन ते गजांवरून खालीं पडले. तेव्हां ते पर्वतशिखरांवरून पडणाऱ्या वृक्षांप्रमाणें भासले. नखर, प्रास यांनीं युद्ध करणारे व चित्र-विचित्र वेष धारण केलेले पदाति परस्परांचा वध करीत असलेले दिसत होते. कौरव-पांडवांच्या त्या सैनिकांनीं नानाविध घोर अस्त्रांनीं परस्परांस यमालयीं पाठविलें.

त्यानंतर शान्तनव भीष्म आपल्या रथघोषानें रणांगण निनादित करीत व आपल्या धनुष्याच्या टणत्कारानें पांडुपुत्रांना मोहित करीत पुढें आला. तेव्हां धृष्टद्युम्नपुरःस्सर पांडवांचे वीरहि सज्ज होऊन भयंकर गर्जना करीत धांवून आले आणि नर, अश्व, रथ व गज यांनीं व्याप्त असलेल्या त्या दोन्ही सैन्यांचें घोर युद्ध प्रवृत्त झालें. ६. ४. ८७.

---

## अध्याय ८८ वा.

[ भीष्माचा पराक्रम. २ भीष्म-भीमयुद्ध व सुनाभाचा वध. ३ सात धार्तराष्ट्रांशीं भीमाचें युद्ध व त्यांचा वध ४. विदुरवचनाचें स्मरण. ५ दुर्योधनाचा भीष्माला दोष व भीष्माची स्पष्टोक्ति. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्यावेळीं क्रुद्ध झालेला भीष्म रणांगणांत समंततः फिरत असतां आपल्या तेजानें अतिशय प्रकाशत होता. त्यामुळें माध्याह्नींच्या तळपणाऱ्या सूर्याप्रमाणें पांडव त्याच्या मुखाकडे पाहूं शकले नाहींत. परंतु सर्व सैन्यें धर्मपुत्राच्या आज्ञेनें गांगेयावर धांवून गेलीं व त्यांनीं तीक्ष्ण शरांनीं त्याला जर्जर केलें. तेव्हां समरश्लाघी भीष्मानें सोमकांसह सृंजय व पांचाल यांना आपल्या बाणांनीं विद्ध केलें. परंतु ते मृत्यूचें भय सोडून मोठ्या वेगानें भीष्मावर धांवून गेले. तेव्हां भीष्मानें कित्येकांचे बाहु व मस्तकें खालीं पाडविलीं आणि कांहींना विरथ केलें. त्यावेळीं भीष्माच्या अस्त्रांनीं मोहित झालेल्या अश्वसार्दींचीं मस्तकें तुटून अश्वांवरून खालीं पडत होतीं. पर्वतोपम मातंग निश्चेष्ट होऊन रणांगणावर शयन करीत असलेले दिसत होते.

( २ ) त्या प्रसंगीं एकट्या रथिश्रेष्ठ महाबलाढ्य भीमसेनाखेरिज पांडवांचा एकहि योद्धा तेथें उभा राहिला नाहीं. त्या वीरानें मात्र भीष्मावर धांवत जाऊन त्यास ताडन केलें व त्या दोघां भीष्म भीमांचा दारुण संग्राम प्रवृत्त झाला. सर्व सैन्यांचें स्वरूप घोर दिसूं लागलें. त्यावेळीं हृष्ट झालेल्या पांडवांनीं सिंहनाद केला. याप्रमाणें रणांगणांत जनक्षय चालला असतां भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेल्या दुर्योधनानें भीष्माचें रक्षण केलें. त्या वेळीं रथिश्रेष्ठ भीमानें भीष्माच्या सारथ्याला गतप्राण केलें असतां त्याच्या रथाचे अश्व समन्ततः धांवूं लागले. नंतर वृकोदरानें अतिशय तीक्ष्ण धारेच्या बाणानें सुनाभाचा शिरश्छेद केला, तेव्हां तो तुझा पुत्र गतप्राण होऊन भूमीवर पडला. त्याचा वध त्याच्या सोदर भ्रात्यांना सहन झाला नाहीं. आदित्यकेतु, बह्वाशी, कुण्डधार, महोदर, अपराजित, पण्डितक व विशालाक्ष हे युद्धाची इच्छा करणारे सात भ्राते विचित्र कवचें धारण करून सज्ज झाले व ध्वजांनीं युक्त होऊन त्या पांडवावर धांवून गेले.

( ३ ) नमुचि दैत्याला विद्ध करणाऱ्या इंद्राप्रमाणें महोदरानें भीमावर वज्रतुल्य नऊ बाण सोडले. आदित्यकेतूनें सत्तर, बह्वाशीनें पांच, कुण्डधारानें

नन्दव व विशालाक्षानें पांच शर सोडिले आणि अपराजितानें महारथ भीमाला अनेक बाणांनीं विद्ध केलें. पंडितकानें तीन बाण सोडले. शत्रूकडून होणारी ती बाणवृष्टि भीमाला सहन झाली नाहीं. त्यानें आपल्या डाव्या हातानें एक नतपर्व बाण सोडिला व पराजिताचें कुंडलांनीं शोभणारें मस्तक भूमीवर पाडविलें. नंतर महारथ कुण्डधाराला भल्लबाणानें सर्व लोकांच्या समक्ष मृत्युलोकीं पाठविलें. त्यानंतर शिलीमुख बाणानें पण्डितकाला विद्ध केलें. तेव्हां कालानें प्रेरित केलेला सर्प मनुष्याला मारून जसा आपल्या बिळांत प्रवेश करितो, तसा तो शर त्याचे प्राण हरण करून भूमींत शिरला. त्याच्या मागून त्या अमेयात्मा भीमानें पूर्वीचे क्लेश स्मरून तीन शरांनीं विशालाक्षाचें मस्तक भूतलावर पाडविलें. नंतर महोदराच्या वक्षःस्थलाला विद्ध करून त्याला गतप्राण केलें. तो खालीं पडतांच आदित्यकेतूचा ध्वज तोडला व एक तीक्ष्ण भल्लबाण सोडून त्याचा शिरश्छेद केला आणि शेवटीं क्रुद्ध झालेल्या भीमानें एक नतपर्व शर सोडून तुझ्या बह्वाशी पुत्राला यमसदनीं पाठवून दिलें. तेव्हां भीमाच्या सभेंतील भाषणाचें सत्यत्व प्रत्ययास आलेलें पाहून तुझ्या दुसऱ्या पुत्रांनीं तेथून पलायन केलें.

( ४ ) त्यावेळीं भ्रात्यांच्या वधानें व्यथित झालेला दुर्योधनराजा तुझ्या योद्ध्यांना म्हणाला—' अरे, या भीमाचा अगोदर वध करा. '

भ्रात्यांचा संहार झालेला पाहून पूर्वीं दिव्यदर्शी विदुरानें जो हितावह व अनामय उपदेश केला होता, त्याचें तुझ्या पुत्रांना स्मरण झालें व त्याच्या वचनाप्रमाणें सर्व घडून येत असल्याचा प्रत्यय आला. त्याचप्रमाणें हे महाराज, तूंहि लोभ-मोहांत आसक्त होऊन पुत्रप्रेमाला बळी पडलास व त्या महाप्राज्ञानें जें यथार्थ व सत्य वचन सांगितलें, तें अजुनहि तूं लक्षांत घेत नाहींस. ज्याअर्थीं हा महाबाहु भीम कौरवांचा संहार करीत आहे, त्याअर्थीं तुझ्या पुत्रांच्या वधासाठींच पांडवांचा जन्म आहे असें वाटूं लागतें.

( ५ ) त्यानंतर दुर्योधन भीष्माजवळ गेला. त्यावेळीं तो धार्तराष्ट्र अतिशय शोकमग्न होऊन विलाप करूं लागला. तो दुःखानें म्हणाला—' हे पितामह माझ्या शूर भ्रात्यांचा भीमसेनानें युद्धांत संहार चालविला आहे. त्याचप्रमाणें यत्नपूर्वक युद्ध करणाऱ्या इतर सर्व सैनिकांचाहि तो वध करीत आहे आणि आपण तर मध्यस्थ राहून नित्य आमची उपेक्षाच करीत अहां. काय माझें दैव आहे पहा ! मी उन्मार्गांत स्थित झालों आहें, हेंच खरें. '

दुर्योधनाचें हें कठोर वचन ऐकून तुझा देवव्रतपिता अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्याला असें प्रतिवचन बोलला—" अरे बाबा, हें मीं तुला पूर्वींच सांगितलें होतें. केवल मींच नव्हे, तर द्रोण, विदुर व यशस्विनी गांधारी यांनींहि तुला हाच उपदेश केला होता. पण तूं त्याकडे लक्ष दिलें नाहींस. 'तूं मला किंवा द्रोणाचार्याला या युद्धांत नियुक्त करूं नकोस' असा माझा संकेत मीं तुला पूर्वींच सांगितला होता. वृकोदर ज्या ज्या धार्तराष्ट्राला रणांगणावर पाहील, त्या त्या प्रत्येकाचा तो नित्य वध करील, हें मी तुला सत्य सांगतों. यास्तव हे राजन्, तूं स्थिर हो, युद्धाविषयीं दृढनिश्चय कर व स्वर्गपरायण होऊन पांडवांशीं युद्ध कर. इंद्रासह सुरासुर जरी आले, तरीहि त्यांना पांडवांस जिंकतां येणें शक्य नाहीं. तस्मात् युद्धाविषयीं स्थिर मति करून युद्धाला सज्ज हो." ६. ४. ८८.

---

## अध्याय ८९ वा.

[ १ कौरवांचा पराजय ऐकून धृतराष्ट्राचा उद्वेग. २ संजयाचें उत्तर. ३ संकुल युद्धाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, एकट्या भीमानें माझ्या अनेक पुत्रांचा युद्धांत वध केलेला पाहून भीष्म, द्रोण व कृप यांनीं काय केलें ! तें मला सांग. प्रत्येक दिवशीं माझ्या पुत्रांचाच क्षय होत आहे. ज्याअर्थीं माझे सर्व पुत्र जिंकले जात आहेत, विजयी होत नाहींत, त्याअर्थीं माझें दैवच प्रतिकूल आहे. हे सुता, जेथें भीष्म, द्रोण, कृप, सौमदत्ति, दोघे भगदत्त वीर व अश्वत्थामा या व अशाच युद्धांतून कधीं परत न फिरणाऱ्या अन्य शूर महात्म्यांच्या मध्यभागीं असलेल्याहि ( त्यांच्याकडून संरक्षित असलेल्या ) माझ्या पुत्रांचा वध होत आहे, तेथें दैवावांचून दुसरें काय बलवत्तर असणार !

मंदबुद्धि दुर्योधनानें पूर्वीं कोणाचेंच वचन उन्मत्तपणानें मानलें नाहीं. मीं, भीष्म, विदुर, व गांधारी यांनीं हितेच्छेनें युद्धापासून त्याचें सतत निवारण केलें. तथापि त्यानें मोहामुळें तें ऐकलें नाहीं. क्रुद्ध झालेला भीमसेन समरामध्यें प्रत्येक दिवशीं माझ्या पुत्रांना यमसदनीं पाठवीत आहे, हेंहि त्याचेंच फल आहे.

---

१. ६५ व्या अध्यायांत याच अर्थाचें धृतराष्ट्राचें भाषण व संजयाचें उत्तर आहे. यास्तव त्या श्लोकांच्या अर्थाची येथें पुनरुक्ति केली नाहीं.

( २ ) संजय—हे विभो, विदुरानें तुझ्या हिताचें उत्तम वचन तुला सांगितलें असतां, तें तूं मानलें नाहींस, त्याचेंच फल आज तुला भोगावें लागत आहे. 'द्यूतापासून पुत्रांचें निवारण कर, पांडवांशीं द्रोह करूं नको' असें तुझ्या हिताची इच्छा करणाऱ्या सुहृदांचें वचन तूं ऐकलें नाहींस. मरणाऱ्या माणसाला जसें औषध पथ्यकर वाटत नाहीं, त्याप्रमाणें तुला त्यांचा सदुपदेश रुचला नाहीं. विदुर, द्रोण, भीष्म, व इतरहि हितचिंतक यांच्या सद्वचनांचा अव्हेर केल्यामुळें कौरवांचा नाश होणार, विरोधाचा हा असा परिणाम होणार, हें तुला पूर्वींच कळलेलें होतें. त्याविषयीं आतां विषाद करून काय उपयोग ! यास्तव आतां युद्धाचा पुढील वृत्तान्त सांगतों, तो ऐक—

( ३ ) हे राजन्, माध्याह्नीं सर्व लोकांचा क्षय करणारें अतिशय घोर युद्ध प्रवृत्त झालें. धर्मपुत्राच्या आज्ञेनें पांडवांचीं सर्व सैन्यें क्षुब्ध होऊन भीष्माच्या वधेच्छेनें त्याच्यावर धांवून गेलीं. ससैन्य धृष्टद्युम्न, शिखंडी, महारथ सात्यकि, सर्व सोमकांसह विराट, द्रुपद, केकय, धृष्टकेतु, सैन्यासह सज्ज झालेला कुंतिभोज, हे सर्व भीष्मावरच तुटून पडले. अर्जुन, पांच द्रौपदेय व चेकितान राजा दुर्योधनानें युद्धार्थ आज्ञा दिलेल्या सर्व कौरवांवर धांवून गेले. शूर अभिमन्यु, घटोत्कच व भीमसेन हे तिघेहि कौरवांवरच धांवले. याप्रमाणें त्रिधा विभागलेल्या पांडवांनीं कौरवांचा युद्धांत वध चालविला.

त्याचप्रमाणें कौरवांनींहि रणांत शत्रूंचा संहार मांडला होता. क्रुद्ध झालेल्या द्रोणानें सृंजयांसह रथिश्रेष्ठ सोमकांना यमसदनीं पाठविलें. त्या वेळीं धनुर्धर भारद्वाजाकडून वध पावणाऱ्या महात्म्या सृंजयांनीं फार मोठा आक्रोश केला. त्या रणांगणांत द्रोणाचार्यांनीं विद्ध केलेले क्षत्रिय व्याधिग्रस्त पुरुषांप्रमाणें तळमळत असलेले दिसत होते. कोणी मंद अस्पष्ट स्वरानें विव्हळत होते, कित्येक मोठ्यानें आक्रोश करीत होते. कांहीं उच्च स्वरानें कण्हत होते. क्षुधेनें पीडलेल्या नरांप्रमाणें तेथें सतत आर्त शब्द ऐकूं येत होता.

महाबलाढ्य भीमसेनानेंहि कौरवांच्या सैन्याचें घोर कदन आरंभिलें. त्या वेळीं तो क्रुद्ध झालेला पांडव दुसरा मृत्युच भासला. त्या महारणांत परस्परांच्या सैन्याचा संहार चालला असतां रक्ताची घोर नदी प्रवृत्त झाली.

यमाच्या राज्याची वृद्धि करणारा तो कुरु-पांडवांचा संग्राम अतिशय घोर स्वरूपाचा झाला. त्यावेळीं क्रुद्ध झालेल्या व विशेषतः वेगवान् असलेल्या

भीमानें गजसैन्याला मृत्युमुखीं पाठविलें. तेव्हां भीमानें नाराच बाणांनीं विद्ध केलेले गज चीत्कार करीत, गडबडां लोळत दश-दिशांत भ्रमण करूं लागले. कांहीं गजांच्या शुंडा तुटल्या होत्या. कित्येक महागजांचीं मस्तकें तुटलीं होतीं. ते सर्व पीडित झालेले हत्ती क्रौंचपक्ष्यांप्रमाणें आक्रोश करीत भीतीनें भूमीवर पडले होते. नकुल व सहदेव हे दोघे अश्वसैन्यांवर धांवून गेले. ते सर्व अश्व सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषविलेले होते. असे सहस्रावधि अश्व मरून पडलेले दिसत होते. त्यांनीं तें रणांगण व्यापून टाकिलें होतें. त्यांतील कांहीं अश्व धापा टाकीत होते, कांहीं कण्हत होते, कांहींचे प्राण निघून जात होते. त्यामुळें त्यावेळीं ती भूमि नानारूपधारिणी दिसली.

त्याचप्रमाणें अर्जुनानें वध केलेल्या नृपालांचे मृतदेह जेथें तेथें पडले होते. त्यामुळें तें रणांगण भयंकर दिसत होतें. भग्न झालेले रथ, ध्वज, चामरें, व्यजनें, प्रभायुक्त छत्रें, हार, निष्क, केयुर व कुंडलें यांसह मस्तकें, अश्वांच्या रज्जु इत्यादि अनेक वस्तु तेथें सर्वत्र पसरल्या होत्या. त्यांच्या योगानें ती वसुधा वसंतऋतूंतील पुष्पांनीं आच्छादिलेल्या भूमीप्रमाणें शोभली.

याप्रमाणें शान्तनव भीष्म, रथश्रेष्ठ द्रोण, अश्वत्थामा, कृप व कृतवर्मा यांनीं पांडवांच्या सैन्याचा नाश केला व क्रुद्ध झालेल्या पांडवांनींहि तुझ्या सैन्याचा क्षय केला. ६. ४. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ शकुनीची पांडवसैन्यावर चाल. २ इरावानाचा पूर्वेतिहास. ३ इरावानाच्या अश्वांनीं केलेला कौरवसेनेचा पराभव. ४ इरावानाशीं सौबलांचें युद्ध. ५ राक्षसाचें मायावी युद्ध व इरावानाचा वध. ]

( १ ) **संजय**—हे राजन्, अशा प्रकारचा तो श्रेष्ठ वीरांचा क्षय करणारा भयंकर संग्राम चालू असतां सौबल शकुनि पांडवांवर धांवून गेला. त्याचप्रमाणें परवीरांचा संहार करणारा सात्वत हार्दिक्य पांडवांच्या सेनेवर तुटून पडला. तें पाहून अर्जुनाचा पुत्र इरावान् मोठ्या सैन्यासह कौरवसैन्यावर चालून आला. तो कांबोजदेशांतील नदीतीरावर उत्पन्न झालेले, आरट्ट देशांतील महीज, सिंधुदेशांताल वनायुज शुभ्र व पर्वतवासी, अशा भिन्न भिन्न देशांतील अनेक प्रकारच्या असंख्य अश्वांनीं परिवेष्टित होता. त्याशिवाय

वायूसारखे वेगवान् ( तित्तिर देशांत उत्पन्न झालेले ) व सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषविलेले अश्व व त्यांवर आरूढ झालेले कवचधारी योद्धे त्याला समंततः वेढून उभे होते.

( २ ) राजा, त्या पार्थपुत्राचा वृत्तान्त असा आहे—हा इरावान् नागराजाच्या स्नुषेला अर्जुनापासून झाला होता. ऐरावतनागाच्या पुत्राला गरुडानें मारला असतां त्याची पत्नी पतिविरहानें दीन व हतबुद्ध झाली. तेव्हां अपत्यहीन झालेल्या ऐरावतानें ती आपली स्नुषा पार्थाला अर्पण केली व धनंजयानें त्या कामविह्वल झालेल्या स्त्रीचा भार्यार्थ स्वीकार केला. याप्रमाणें परक्षेत्रांत या अर्जुनात्मजाचा जन्म झाला व त्याच्या उलूपीमातेनें त्याला नागलोकांतच वाढविलें. पुढें त्याचा चुलता जो अश्वसेन, त्यानें अर्जुनाच्या द्वेषामुळें इरावानाला घालवून दिलें. त्यावेळीं अर्जुन इंद्रलोकीं असल्याचें कळतांच तो अमोघ पराक्रमी इरावान् इंद्रलोकीं गेला. तो उलूपीचा पुत्र रूपवान्, गुणवान् व बलसंपन्न होता. त्या सत्यविक्रमानें आपल्या पित्याच्या समीप जाऊन हात जोडून त्याला अभिवादन केलें व अव्यग्र चित्तानें आपण महात्म्या अर्जुनाचा पुत्र असल्याचें त्याला सांगितलें. नंतर तो विनयानें म्हणाला—" हे प्रभो, तुझें कल्याण असो. मी तुझा पुत्र इरावान् आहें. "

असें बोलून आपल्या मातेशीं त्याचा समागम कसा झाला, तो सर्व वृत्तान्त त्यानें त्याला निवेदन केला.

तेव्हां त्या पांडवाला सर्व पूर्ववृत्ताचें स्मरण झालें. त्यानें अतिशय प्रेमानें स्वसुताला आलिंगन दिलें व स्वसदृश गुणांनीं युक्त असलेल्या त्या स्वात्मजाला इंद्राच्या भुवनांत नेलें. त्यानंतर अर्जुनानें ' वत्सा, युद्धप्रसंगीं तूं आम्हांला साह्य कर ' अशी स्वकार्यार्थ त्या देवलोकीं त्याला प्रीतिपूर्वक आज्ञा केली. तेव्हां त्यानें ' ठीक आहे ' असें म्हटलें. त्याप्रमाणें हे प्रभो, तो इरावान् आतां येथें आलेला आहे.

( ३ ) तो पार्थाचा नंदन कामगामी व गतिमान् अशा अनेक अश्वांनीं आवृत्त झाला होता. ते सर्व अश्व नानावर्णाचे असून मनासारखे वेगवान् होते. त्यांच्या मस्तकांवर सुवर्णाचे तुरे शोभत होते. ते अश्व रणांगणांत येतांच महासागरांत बुड्या मारणाऱ्या हंसाप्रमाणें उड्या मारूं लागले. त्या चपळ अश्वांनीं कौरवसैन्यांतील अश्वांना छाती व नाक यांच्या योगानें टक्करा देतांच

त्यांचा वेग सहन न होऊन भूमीवर पडले. तुझ्या सैन्यांतील अश्व भूमीवर पडत असतां गरुडाची झडप पडल्यासारखा भयंकर शब्द झाला. त्यावेळीं तुझ्या अश्वसादींनींहि शत्रूंशीं भिडून घोर संग्राम केला. याप्रमाणें उभय सैन्यांचें तुमुल युद्ध चाललें असतां सहस्रावधि अश्व मरून पडले. योद्ध्यांचे बाण सरले, अश्व पडले व श्रांत झालेले वीर परस्परांवर प्रहार करीत तेथेंच विलय पावले.

( ४ ) हे भारता, याप्रमाणें कौरवांच्या हयसादींचा संहार चालला असतां त्यांतील अल्प अश्वसैन्य अवशिष्ट राहिलें आहे, हें पाहून सौबलाचे सहा शूर भ्राते पुढें झाले. गज, गवाक्ष, वृषभ, चर्मवान्, आर्जव आणि शुक हे सहाहि वीर बलाढ्य होते. त्यांचा स्पर्श व गति वेगवान् वायूप्रमाणें होती. ते अश्वारूढ होऊन मोठ्या वेगानें रणांगणावर आले. ते युद्धकुशल उग्ररूपी गांधार वीर कवचें चढवून सज्ज झाले असतां शकुनि व स्वपक्षीय महाबलाढ्य योद्धे यांनीं त्यांचें निवारण केलें. तथापि त्यांचें न ऐकतां ते युद्धदुर्मद विजयेच्छु वीर स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें परम दुर्जय व्यूहाचा भेद करून विपुल सैन्यासह शत्रुपक्षांत शिरले.

त्या गांधारांनीं आपल्या सैन्यांत प्रवेश केलेला पाहून पराक्रमी इरावान् आपलीं दारुण आयुधें धारण करून विचित्र युद्ध करणाऱ्या योद्ध्यांस म्हणाला—

" हे वीरहो, ज्यायोगें धार्तराष्ट्रांचे योद्धे त्यांचीं वहानें व अनुयायी यांच्यासह समरांत नाश पावतील, अशी कांहीं योजना करा. "

इरावानाची ती आज्ञा ऐकून ते सर्व योद्धे ' ठीक आहे ' असें म्हणाले व त्यांनीं शत्रूंचें दुर्जय असलेलें सैन्य समरांत गतप्राण करून टाकिलें. तेव्हां परसैन्यानें आपल्या सैन्याला पाडलेलें पाहून सुबलपुत्रांना तें सहन झालें नाहीं. त्यांनीं इरावानाला सर्वतः वेढून त्याच्यावर चाल केली. त्यावेळीं त्या शूरांनीं तीक्ष्ण धारेच्या प्रासांनीं ताडण करीत परस्परांस अतिशय व्याकुल केलें. त्या महात्म्यांनीं इरावानास तीक्ष्ण प्रासांनीं क्षतयुक्त केलें असतां त्याच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. तेव्हां तो अंकुशानें विद्ध झालेल्या गजाप्रमाणें शोभला. त्या एकट्या वीरावर पुढून, मागून व बाजूंनीं अनेकांकडून प्रहार होत असतांहि त्यानें ते धैर्यानें सहन केले. तो शूर योद्धा यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. त्या परपुरंजय इरावानानें क्रुद्ध

होऊन त्या सर्वांना तीक्ष्ण शरांनीं विद्ध करून मोहित केलें. त्यानें स्वतःच्या शरीरांत रुतलेले प्रास मोठ्या वेगानें उपटून काढले व त्यांनींच सुबलपुत्रांना ताडण केलें. नंतर त्या अरिंदमानें आपलें खड्ग उगारलें, ढाल हातीं घेतली व सौबलांचा वध करण्याच्या इच्छेनें तो पायांनींच त्यांच्यावर धांवला.

इतक्यांत ते सर्व सुबलात्मज सावध होऊन देहभानावर आले व क्रुद्ध झालेले ते सर्व इरावानावर तुटून पडले. त्या वेळीं बलानें दृप्त झालेला इरावान्‌हि खड्गानें आपलें पाणिलाघव प्रकट करीत त्या सर्व सौबलांवर चालून गेला. ते सर्व सौबल शीघ्रगामी अश्वांवरून फिरत होते व इरावान् त्या रणांगणांत पायांनींच संचार करीत होता. तथापि त्याच्या चपलगतीनें व हस्तलाघवानें त्याच्यावर प्रहार करण्यास अवसरच मिळूं दिला नाहीं. त्या सर्व सौबलांनीं चोहोंबाजूंनीं वेढून त्याला धरण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या शत्रुकर्शनानें आपल्या उजव्या व डाव्या या दोन्हीं हातांनीं खड्ग चालवून समीप आलेल्या त्या सर्व सौबलांच्या गात्रांचा छेद केला. तेव्हां त्या सर्व योद्ध्यांचे आयुधें धारण केलेले व भूषणांनीं अलंकृत झालेले बाहू तुटून, त्यांचे देह छिन्नभिन्न झाले व ते मृत होऊन भूमीवर पडले. त्या सहा सौबल भ्रात्यांपैकीं एकटा वृषभ तेवढा जिवंत राहिला. तेव्हां तो वीरांचा संहार करणारा भयंकर संग्राम सोडून निघून गेला.

( ५ ) त्या सर्व सौबलांना पडलेलें पाहून दुर्योधन भयभीत झाला व आर्ष्यशृंगी राक्षसाकडे गेला. त्या मायावी राक्षसाचें स्वरूप घोर असून पूर्वीं बकवधाच्या प्रसंगीं भीमसेनानें त्याचें वैर संपादन केलें होतें. त्या धनुर्धराजवळ जाऊन दुर्योधन म्हणाला—" बा वीरा, हा पहा, फाल्गुनाचा बलाढ्य व मायावी पुत्र माझ्या सैन्याचा नाश करून माझें विप्रिय करण्यास प्रवृत्त झाला आहे. तूं कामगामी असून मायास्त्रांत विशारद आहेस. शिवाय पार्थाशीं तुझें पूर्ववैर आहे. तस्मात् तूं या अर्जुनात्मजाचा युद्धांत वध कर. "

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून तो विकराल राक्षस सिंहनाद करीत निघाला व जेथें तो कुमार होता तेथें आला. विमल प्रास धारण केलेले, प्रहार करण्यांत प्रवीण, युद्धकुशल व अश्वारूढ झालेल्या वीरांनीं युक्त, अशा स्वसैन्यानें तो परिवेष्टित होता. त्याच्या सैन्यांत अवशिष्ट राहिलेले दोन हजार श्रेष्ठ अश्व होते. इरावान्‌हि पराक्रमी होता. त्यानें राक्षस आपल्या अंगावर येत आहे, असें पाहून मोठ्या त्वरेनें त्याच्यावर चाल केली.

क्रुद्ध झालेला इरावान् धांवून येत असलेला दिसतांच राक्षसानें आपल्या मायेचा प्रयोग करून मायावी अश्व निर्माण केले. त्या अश्वांवर शूल व पट्टिश धारण केलेले क्रूर राक्षस आरूढ झालेले होते. ते दोन सहस्र प्रहार करणारे योद्धे परस्परांवर तुटून पडले व अल्पावधींतच यमालयीं गेले. याप्रमाणें उभय पक्षांतील सैन्य मृत्युमुखीं पडलें असतां, ते दोघे वीर ( इरावान् व राक्षस ) इंद्र व वृत्र या दोघांप्रमाणें समरांगणांत स्थित झाले.

युद्धदुर्मद राक्षस आपल्या अंगावर धांवून येत आहेसें पाहून महाबलाढ्य इरावान्‌हि क्रुद्ध होऊन त्याच्यावर धांवला व त्यानें आपल्या खड्गानें त्या दुर्मतीचें धनुष्य व दीप्त भाते यांचा छेद केला. तेव्हां आपलें धनुष्य तुटलेलें पहातांच त्या राक्षसानें आपल्या मायेनें इरावानाला मोहित करीत अंतरिक्षांत उड्डाण केलें. इरावान्‌हि कामरूपी व सर्वमर्मज्ञ होता. त्या दुरासदानें उड्डाण करून आपल्या मायेनें राक्षसाला मोहित केलें व बाणांनीं त्याचीं गात्रें विच्छिन्न केलीं.

तथापि राक्षसांची माया विलक्षण असते. त्यांना आपल्या इच्छेप्रमाणें वय व स्वरूप सहज धारण करतां येतें. त्यामुळें तो राक्षस इरावानाच्या बाणांनीं विद्ध होत असतांहि व्यथित न होतां उलट यौवनसंपन्न दिसूं लागला. तें पाहून इरावान् अधिकच क्रुद्ध झाला. त्यानें राक्षसाचें अंग छिन्न-विच्छिन्न केलें आणि तीक्ष्ण परशूनें पुनः पुनः त्याला विद्ध केलें, तेव्हां बलाढ्य इरावानाकडून विद्ध केला जाणारा तो राक्षस घोर आक्रोश करीत असतां फार मोठा शब्द झाला.

परशूनें छिन्न-भिन्न झालेल्या त्या राक्षसाच्या अंगांतून रक्ताचा प्रवाह वाहूं लागला. तेव्हां शत्रूचें सामर्थ्य पाहून आर्ष्यशृङ्गी अतिशय संतप्त झाला व त्यानें घोर विक्रालरूप धारण करून अर्जुनाच्या त्या यशस्वी वीरपुत्राला धरण्याचा प्रयत्न केला. त्या राक्षसानें सर्वांच्या समक्ष संग्रामांत प्रकट केलेली ती माया पाहून इरावान्‌हि क्रोधसंतप्त झाला व त्यानें आपली माया निर्माण केली. त्यावेळीं युद्धांतून परत न फिरणाऱ्या त्याच्या साह्यार्थ त्याच्या मातृकुलांतील सर्व नाग तेथें जमले. तेव्हां अनेक नागांनीं परिवेष्टित झालेल्या त्या इरावानानें 'अनन्त'-नामक विशाल नागाचें रूप धारण केलें व त्या बहुविध नागांनीं राक्षसाला झांकून टाकलें. तेव्हां सर्पांकडून आच्छादित झालेल्या त्या

राक्षसश्रेष्ठानें क्षणभर ध्यान करून गरुडाचें रूप धारण केलें व त्या सर्व सर्पांना भक्षण करून टाकिलें. याप्रमाणें इरावानाचा सर्व मायावी मातृवंश मायेनेंच नष्ट करून त्या राक्षसानें आश्चर्यानें मोहित झालेल्या इरावानावर असिप्रहार करून त्याचें चंद्राप्रमाणें कांतिमान् व मुकुट-कुंडलांनीं भूषित असलेलें मस्तक तोडून भूतलावर पाडविलें.

अशा प्रकारें त्या राक्षसानें अर्जुनात्मजाचा वध केला असतां सर्व धार्तराष्ट्र आपल्या पक्षांतील राजांसह निर्भय झाले. तो घोर संग्राम चालू असतां उभय सैन्यांचा फार मोठा व्यतिकर झाला. त्यांत गज, अश्व व पदाति हे परस्परांत मिश्र झाले असतां दंतयुक्त विशाल गजांनीं त्यांना गतप्राण केलें. कांहीं पदातींनीं रथ अश्व व हत्ती यांचा वध केला. रथ्यांनीं अनेक रथादि सैन्यांचा संहार केला.

हे महाराज, आपला औरस पुत्र मृत्युमुखीं पडल्याचें अर्जुनाला कळलें नव्हतें. त्यामुळें त्या पांडवानें भीष्माचें रक्षण करणाऱ्या वीरांचा समरांत संहार चालविला होता. त्याचप्रमाणें तुझ्या पक्षांतील राजे व सहस्रावधि सृंजय हे जणुं काय आपल्या प्राणांची आहुतिच देत होत्साते परस्परांवर प्रहार करीत होते. त्यांचे केस मोकळे सुटले होते, कवचें तुटून पडलीं होतीं, धनुष्यें मोडलीं होतीं व ते विरथ झाले होते. अशा स्थितींतहि ते परस्परांशीं बाहु-युद्ध करीत होते.

त्याचवेळीं परंतप भीष्म आपल्या मर्मभेदी बाणांनीं पांडवांच्या महारथांचा वध करीत होता. त्यानें पांडवांच्या सेनेला त्या समरांत कंपित केलें व युधि-ष्ठिराच्या सेनेंतील असंख्य मानव, सादी व गज इत्यादिकांस गतप्राण केलें. भीष्माचा तो शक्रतुल्य पराक्रम पाहून आम्हांला फार आश्चर्य वाटलें.

त्याचप्रमाणें धनुर्धर सात्यकि, धृष्टद्युम्न व भीमसेन यांनींहि त्या दिवशीं भयंकर युद्ध केलें. द्रोणाचा पराक्रम पाहून तर पांडवपक्ष भयभीत झाला. 'हा एकटाच वीर सर्व सैन्याचा संहार करण्यास समर्थ आहे, मग पृथ्वींतील या सर्व शूर योद्ध्यांनीं परिवेष्टित असल्यावर काय सांगावें' असें द्रोणाच्या बाणांनीं पीडित झालेले पांडव आपसांत बोलूं लागले.

अशा प्रकारें तो घोर संग्राम चालला असतां उभय सैन्यांनीं परस्परांची यत्किंचित्‌हि उपेक्षा केली नाहीं. ते दोन्ही पक्षांतील वीर राक्षस किंवा

पिशाच यांचा संचार झाल्याप्रमाणें देहभान विसरून युद्ध करीत होते. तें महायुद्ध दैत्यांच्या संग्रामासारखें भासलें. वीरांचा क्षय करणारा तो संग्राम चालला असतां एकहि वीर युद्धपराङ्मुख होऊन स्वतःच्या प्राणांचें रक्षण करीत असलेला दृष्टीं पडला नाहीं. ६. ४. ९०.

---

## अध्याय ९१ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ घटोत्कचयुद्ध. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, इरावानाचा वध झालेला पाहून महारथ पार्थांनीं काय केलें ? तें मला सांग.

( २ ) **संजय**—हे राजन्, संग्रामांत इरावान् पडल्याचें पहातांच भीमसेनाचा पुत्र घटोत्कच फार मोठी गर्जना करीत तेथें आला. त्याच्या त्या गगनभेदी गर्जनेनें वन व पर्वत यांसह सागरांबरा समग्र पृथ्वी अतिशय कंपित झाली. सर्व दिशा, प्रदिशा व अंतरिक्ष निनादित झालें. ती प्रचंड गर्जना ऐकून तुझे सैनिक थरथरां कापूं लागले. त्यांच्या शरीराला घाम सुटला व त्यांचे पाय जागच्या जागीं खिळले. याप्रमाणें ते सर्व दीन होऊन सिंहाला भ्यालेल्या गजांप्रमाणें सर्वतः पळूं लागले. त्यावेळीं तो राक्षस विजेच्या कडकडाटासारखी प्रचंड गर्जना करीत भीषण रूप धारण करून अनेकविध आयुधांनीं युक्त असलेल्या श्रेष्ठ राक्षसांनीं परिवेष्टित झाला. त्यानें प्रज्वलित शूल हातीं घेतला व काल, यम किंवा अंतक यांच्याप्रमाणें शत्रूंचा संहार चालविला. क्रुद्ध झालेल्या त्याचें तें घोर रूप पाहून त्याच्या भयानें प्रायः बहुतेक सैन्य युद्धापासून पराङ्मुख झालें.

तें पाहून राजा दुर्योधन आपलें प्रचंड धनुष्य घेऊन वारंवार सिंहासारखी गर्जना करीत घटोत्कचावर धांवला. त्याच्या मागोमाग वंगाचा अधिपति आपल्या दहा सहस्र गजांसह आला. ते सर्व गज पर्वतांसारखे प्रचंड असून त्यांच्या गंडस्थलांतून मदाचा स्राव होत होता. तेव्हां गजसैन्यानें परिवेष्टित झालेला तुझा पुत्र चाल करून येत आहे, हें पाहून तो निशाचर क्रुद्ध झाला आणि त्या राक्षसाचें व बलाढ्य दुर्योधनाचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. उदय पावणाऱ्या मेघवृन्दाप्रमाणें शोभणारी ती गजसेना पाहून हातांत शस्त्र घेतलेले राक्षस धांवून आले. ते विद्युद्युक्त मेघांच्या गडगडाटासारखी प्रचंड गर्जना

करीत शर, शक्ति, ऋष्टि, नाराच यांनीं गजयोद्ध्यांचा संहार करूं लागले. त्यांनीं भिन्दिपाल, शूल, मुद्गर, परशु, पर्वताचीं शिखरें व वृक्ष इत्यादि विविध आयुधांनीं त्या महागजांवर प्रहार केले. हे महाराज, त्यावेळीं निशाचरानें विद्ध केलेल्या त्या गजांचीं मस्तकें व गात्रें छिन्नभिन्न झालीं असून त्यांच्या शरीरांतून रक्ताचा प्रवाह वहात असलेला आम्हीं पाहिला.

याप्रमाणें गजांचा क्षय झालेला व गजयोद्ध्यांचा पराभव होत असलेला पाहून दुर्योधन क्रुद्ध झाला व त्या राक्षसांवर धांवला. त्या अमर्षी कौरवानें स्वतःच्या जीवावर उदार होऊन राक्षसांवर तीक्ष्ण धारेचे बाण सोडले व मुख्य मुख्य राक्षसांचा वध केला. तुझ्या त्या महाबलाढ्य पुत्रानें चार बाण सोडून वेगवान्, महारौद्र, विद्युज्जिह्व व प्रमाथी या चार राक्षसांना गतप्राण केलें. नंतर त्या अमेयात्म्यानें निशाचराच्या सेनेवर दुरासद शरांची वृष्टि केली. तुझ्या पुत्राचें तें महत्कर्म पाहून महाबलाढ्य घटोत्कच क्रोधानें संतप्त झाला व ज्याची प्रभा इंद्राच्या वज्रासारखी आहे, असें आपलें श्रेष्ठ धनुष्य आकर्ण ओढून मोठ्या वेगानें दुर्योधनावर धांवला. त्यावेळीं तो कालानेंच प्रेरणा केलेल्या अंतकाप्रमाणें दिसत होता. तथापि तो राक्षस आपल्या अंगावर धांवून येत आहे, असें पाहून दुर्योधन यत्किंचित्हि व्यथित झाला नाहीं.

त्यावेळीं तो क्रूर राक्षस क्रोधानें नेत्र आरक्त करून दुर्योधनाला म्हणाला— "हे कुलाधमा, मी आज मातेच्या व पित्याच्या ऋणांतून मुक्त होईन. तूं अतिशय निर्दयपणानें पांडवांना दीर्घकाल वनांत संचार करावयास लाविलेंस, कपटद्यूतानें पराजित केलेंस व एकवस्त्रा द्रौपदीला सभेंत आणून तिला अतिशय क्लेश दिलेस. त्याचप्रमाणें तुझें प्रिय करण्याच्या इच्छेनें दुरात्म्या जयद्रथानें माझ्या पित्याचा व पितृव्यांचा अनादर करून द्रौपदीला स्पर्श केला. पण हे दुर्बुद्धे, तूं जर आतां रणांगण सोडून गेला नाहींस, तर त्या व तुझ्या इतरहि दुसऱ्या सर्व अपराधांचा मी आज सूड उगवीन" असें बोलून घटोत्कचानें आपले ओंठ चांवले, जिभल्या चाटल्या व जलधारांनीं पर्वताला सर्वतः भिजवून टाकणाऱ्या मेघाप्रमाणें आपलें धनुष्य आकर्ण ओढून फार मोठ्या शरवृष्टीनें दुर्योधनाला आच्छादित केलें. ६. ४. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ घटोत्कचाचा पराक्रम. ]

( १ ) संजय—हे महाराज, घटोत्कचाची ती शरवृष्टि दानवांनाहि दुःसह होती, तथापि पर्जन्यवृष्टि सहन करणाऱ्या महागजाप्रमाणें तुझा पुत्र निश्चल उभा राहिला, त्यानें अतिशय क्रुद्ध होऊन सर्पाप्रमाणें निश्वास सोडले. अतिशय साशंक मनानें पंचवीस तीक्ष्ण बाण त्या राक्षसश्रेष्ठावर सोडिले. ते शर, गंधमादन पर्वतावर पडणाऱ्या क्रुद्ध सर्पांप्रमाणें त्या राक्षसावर पडले. त्या शरांनीं विद्ध झालेल्या त्या राक्षसाच्या अंगांतून देहभग्न झालेल्या गजाप्रमाणें रक्तस्राव होऊं लागला. तेव्हां त्या मांसभक्षक राक्षसानें दुर्योधनाचा वध करण्याचा विचार केला व पर्वताचेंहि विदारण करणारी महाशक्ति त्यानें हातीं घेतली. ती शक्ति महा उल्केप्रमाणें प्रदीप्त व अशनीप्रमाणें प्रज्वलित दिसत होती. त्या महाबाहूनें तुझ्या पुत्राच्या वधेच्छेनें उद्युक्त केलेली ती शक्ति पहातांच वंगाधिपतीनें आपल्या पर्वततुल्य प्रचंड गजाला मोठ्या त्वरेनें चोदना केली व जेथें दुर्योधनाचा रथ होता, तेथें आपला गज वळवून त्या बलाढ्य वंगराजानें तुझ्या पुत्राच्या रथाकडे येण्याचा मार्ग अडवून टाकिला. याप्रमाणें बुद्धिमान् वंगाधिपानें रथमार्गाचा निरोध केलेला पाहून घटोत्कच अतिशय क्रोधसंतप्त झाला व त्यानें ती उद्युक्त केलेली महाशक्ति त्या गजावर सोडिली. तेव्हां त्या शक्तीनें विद्ध झालेला तो गज रक्तानें माखला, धरणीवर पडला व मरण पावला. गज पडतांच वंगाधीश त्वरेनें उडी मारून भूमीवर उतरला. त्यावेळीं श्रेष्ठ गज मृत होऊन पडलेला पाहून व स्वसैन्य प्रभग्न झालेलें अवलोकन करून दुर्योधनहि अत्यंत व्यथित झाला. वस्तुतः तो प्रसंग पलायन करण्याचाच होता, तथापि राजा दुर्योधन स्वतःचा अभिमान स्मरून व क्षत्रधर्माचा पुरस्कार करून त्या बिकट समयींहि पर्वताप्रमाणें अचल राहिला. तो अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें कालाग्नीसारखा एक तेजस्वी बाण धनुष्याला जोडून तो त्या घोर निशाचरावर सोडला. तो बाण आपल्याकडे येत आहेसें पाहून महात्म्या घटोत्कचानें इंद्राच्या अशनितुल्य प्रभा असलेला एक बाण दुर्योधनावर सोडिला व क्रोधानें नेत्र आरक्त करून भयंकर गर्जना केली. त्याची ती घोर गर्जना ऐकून प्रलयकालच्या मेघगर्जनेनें लोक जसे भयभीत होतात, तसे ते सर्व सैनिक त्रस्त झाले.

त्या राक्षसाची ती प्रचंड गर्जना ऐकून शान्तनव भीष्म द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्यांस म्हणाला—" हे आचार्य, ज्याअर्थी या राक्षसाचा घोर शब्द ऐकूं येत आहे, त्याअर्थी हा घटोत्कच दुर्योधनाशीं युद्ध करीत आहे, यांत शंका नाहीं. त्याला युद्धांत जिंकण्यास कोणतेंहि भूत समर्थ नाहीं. यास्तव आपण तेथें जा व त्या राजाचें रक्षण करा. तो महात्मा राक्षस त्याच्यावर तुटून पडला आहे. अशा वेळीं राजाचें संरक्षण करणें, हेंच आम्हां सर्वांचें श्रेष्ठ कर्तव्य आहे."

पितामहाचें हें वचन ऐकून ते सर्व कौरव अतिशय वेगानें निघाले व जेथें तो कौरव होता, तेथें आले. हे महाराज, द्रोण, सोमदत्त, कृप, भूरिश्रवा, शल्य, आवंत्य, बृहद्बल, अश्वत्थामा, विकर्ण, चित्रसेन, विविंशति व त्यांचे सहस्रावधि अनुयायी राक्षसांनीं वेढलेल्या दुर्योधनाच्या संरक्षणार्थ धांवले. तेव्हां महारथांनीं ज्याचें संरक्षण केलें आहे, असें तें दुर्धर्ष व आततायी सैन्य आपल्या अंगावर चालून येत आहे, हें पाहूनहि तो भीमसेनाचा पुत्र यत्किंचित्हि कंपित झाला नाहीं. तो मैनाकपर्वताप्रमाणें अचल राहिला. शूल, मुद्गर इत्यादि विविध प्रकारचीं आयुधें धारण करणाऱ्या आपल्या ज्ञातिबांधवांकडून ( राक्षसांकडून ) तो परिवेष्टित होता. त्या हैडिंबानें आपलें प्रचंड धनुष्य हातांत घेतलें व त्या राक्षसांचें व दुर्योधनाच्या सेनेचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. त्यावेळीं धनुष्यांच्या टणत्कारांचा शब्द सर्व बाजूंनीं ऐकूं येऊं लागला. तो अग्नीमध्यें टाकलेल्या वेळूच्या आवाजाप्रमाणें भासला. वीरांच्या अंगांतील कवचांवर शस्त्रांचे प्रहार होत असतां होणारा शब्द ऐकून जणु काय पर्वतच विदीर्ण होत आहेत कीं काय असें वाटलें. वीरांच्या हातांतून सुटलेले तोमर अंतरिक्षांतून जात असतां वेगवान् सर्पांप्रमाणें दिसले.

नंतर त्या राक्षसश्रेष्ठानें क्रुद्ध होऊन आपलें महद्धनुष्य आकर्ण ओढलें व भयंकर गर्जना करून आचार्यांच्या धनुष्याचे अर्धचंद्र बाणानें तुकडे केले. एक भल्लबाण सोडून सोमदत्ताचा ध्वज खालीं पाडविला. पुनः मोठ्यानें गर्जना केली व तीन बाणांनीं बाल्हीकाचें वक्षःस्थल विद्ध केलें. एका बाणानें कृपाला व तीन शरांनीं चित्रसेनाला विद्ध केलें. एका बाणानें विकर्णाच्या जत्रुदेशीं ताडन केलें. तेव्हां तो रक्तानें माखून स्वरथांतच बसला. नंतर घटोत्कचानें भूरिश्रव्यावर पंधरा बाण सोडले. ते त्याच्या कवचाचा भेद करून भूमींत शिरले. विविंशति व अश्वत्थामा यांच्या सारथ्यांना ताडन केलें, तेव्हां ते

आपल्या हातांतील अश्वांच्या रश्मि सोडून खालीं बसले. त्यानें एक अर्धचंद्र बाण सोडून सिंधुराजाचा वराहचिन्हांकित सुवर्णानें भूषविलेला ध्वज खालीं पाडविला; दुसरा एक बाण सोडून त्याचें धनुष्य तोडलें. नंतर क्रोधानें नेत्र आरक्त केले व नाराच बाण सोडून महात्म्या आवंत्यराजपुत्राच्या चारी अश्वांना गतप्राण केलें. तीक्ष्ण धारेच्या विषारी बाणानें बृहद्बलाला ताडन केलें, तेव्हां अतिशय विद्ध झालेला तो विह्वल होऊन रथांत बसला. तरीहि तो राक्षसश्रेष्ठ घटोत्कच क्रोधानें संतप्त होऊन शरवृष्टि करीतच होता. त्यानें स्वरथांत बसून सर्पतुल्य तीक्ष्ण बाण युद्धविशारद शल्यावर सोडले व त्याला अतिशय पीडा दिली. ६. ४. ९२.

---

## अध्याय ९३ वा.

[ १ घटोत्कचाचें कौरवांशीं युद्ध. २ भीमादिकांचें त्याच्या साह्यार्थ गमन. ३ रणांगणाचें वर्णन. ]

( १ ) संजय—हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें तुझ्या सर्व वीरांना परत फिरवून दुर्योधनाच्या वधाची इच्छा करणारा तो राक्षस त्याच्याकडे धांवला. तो आपल्या राजावर अतिशय वेगानें येत आहेसें पाहून तुझे युद्धदुर्मद वीर त्याच्या वधेच्छेनें त्याच्यावर चालून गेले. त्या वीरांच्या हातांत सहा हात लांबीचीं धनुष्यें होतीं. ते सर्व सिंहाच्या संघांप्रमाणें मोठ्यानें गर्जना करीत धांवले व घटोत्कचावर तुटून पडले. पर्वताला परिवेष्टित करणाऱ्या मेघांप्रमाणें त्यांनीं त्या राक्षसाला बाणवृष्टीनें आच्छादित केलें. तेव्हां अंकुशाच्या प्रहारानें व्यथित होणाऱ्या गजाप्रमाणें घटोत्कच त्रस्त झाला व त्यानें गरुडाप्रमाणें अंतरिक्षांत उड्डाण केलें आणि शरत्कालीन मेघाप्रमाणें प्रचंड गर्जना करून आकाश, दिशा व उपदिशा निनादित केल्या. त्या राक्षसाचा ध्वनि भयंकर होता.

त्याचा तो शब्द ऐकून राजा युधिष्ठिर अरिंदम भीमसेनाला म्हणाला— "ज्याअर्थी ही भयंकर गर्जना ऐकूं येत आहे, त्याअर्थी घटोत्कच महारथ कौरवांशीं युद्ध करीत आहे, यांत संशय नाहीं. त्या राक्षसेंद्रावर अतिशय भार पडला आहे, असें मला दिसतें. पितामह अतिशय क्रुद्ध होऊन पांचालांचा वध करण्यास उद्युक्त झाला आहे. यास्तव त्या पांचालांच्या रक्षणार्थ शत्रूंशीं युद्ध

करण्यांत फाल्गुन गुंतला आहे. हीं दोन कार्यें उपस्थित झालीं आहेत, हें जाणून तूं सत्वर जा व घटोत्कचाचें रक्षण कर. तो हैडिंब अतिशय संकटांत सांपडलेला आहे.

( २ ) भ्रात्याचें हें वचन ऐकून वृकोदर आपल्या सिंहनादानें सर्व पार्थिवांना त्रस्त करीत त्वरेनें निघाला. त्यावेळीं पर्वकालीन समुद्राच्या वेगाप्रमाणें त्याचा वेग प्रचंड होता. भीमसेनाच्या मागोमाग सत्यधृति, सौचिति, श्रेणिमान्, वसुदान, काश्याचा पराक्रमी पुत्र, अभिमन्यु व द्रौपदेय इत्यादि महारथ, पराक्रमी क्षत्रदेव, तसाच क्षत्रधर्मा, स्वसैन्यासह अनूपाधिप व नील हे सर्व फार मोठ्या रथसमुदायासह निघाले व सहा हजार मदोन्मत्त गजांनीं घटोत्कचाला परिवेष्टित करून त्यांनीं समंततः त्या राक्षसेंद्राचें रक्षण केलें. ते महारथी चालले असतां त्यांचा प्रचंड सिंहनाद, त्यांच्या अश्वांच्या खुरांचा शब्द व रथचक्रांचा निःस्वन यांनीं पृथ्वी कंपित झाली.

हे महाराज, त्या चाल करून येणाऱ्या पांडवसैन्याचा प्रचंड निर्घोष ऐकून तुझे सर्व सैनिक भीमसेनाच्या भयानें उद्विग्न झाले. त्यांचीं मुखें विवर्ण म्ह० निस्तेज झालीं आणि ते घटोत्कचाला सोडून परत फिरले. त्यावेळीं युद्धापासून निवृत्त न होणारे तुझ्या पक्षांतील जे महात्मे तेथें राहिले होते, त्यांचें व पांडवांचें युद्ध जुंपलें. त्या उभय सैन्यांतील महारथांनीं परस्परांवर नानाप्रकारचीं शस्त्रें सोडलीं व एकमेकांवर धांवून शस्त्रांचे प्रहार केले. त्यांचा तो भयंकर संग्राम भीरूंचें भय वाढविणारा होता. अश्वांवर गज धांवून गेले. पदाति व रथी यांचें युद्ध जुंपलें. ते सर्व योद्धे परस्परांस आह्वान करून त्यांच्यावर चालून जात होते. गज, अश्व व रथ यांच्या पदन्यासांनीं व रथनेमींच्या वेगानें अतिशय धूली उडत होती. त्या धूसर ताम्र धूलीच्या योगानें ती रणभूमि आच्छादित झाली. त्यामुळें पिता पुत्राला व पुत्र पित्याला ओळखूं येत नव्हता. स्वपक्षाचा कोण व शत्रूचा कोण हेंहि ओळखूं येईनासें झालें.

( ३ ) याप्रमाणें अंगावर रोमांच आणणारें तें अमर्याद युद्ध चाललें असतां, शस्त्रांचा खणखणाट व मनुष्यांच्या गर्जना यांचा प्रचंड कोलाहल यमपुरींतील प्राण्यांच्या आक्रोशाप्रमाणें भासला. हे राजा, तेथें गज, अश्व व नर यांच्या रक्ताची नदीच प्रवृत्त झाली होती, त्यांचे केस शेवाळाप्रमाणें त्या नदींत तरंगत होते.

योद्धयांच्या देहापासून तुटून खालीं पडणाऱ्या मस्तकांचा उंचावरून भूमीवर पडणाऱ्या पाषाणांप्रमाणें प्रचंड शब्द होत होता. ज्यांचीं मस्तकें तुटून पडलीं आहेत, अशीं मनुष्यें, ज्यांचीं गात्रें छिन्नभिन्न झालीं आहेत, असे गज, ज्यांचे देह विच्छिन्न झाले आहेत असे अश्व, यांनीं ती सर्व भूमि व्याप्त झाली होती. ते महारथ आपापलीं शस्त्रें उगारून प्रहार करण्यासाठीं परस्परांवर धांवत होते. अश्वसादी अश्वांवर प्रहार करीत होते. योद्धे क्रोधानें नेत्र लाल करून योद्धयांच्या वक्षःस्थलांशीं भिडले व त्या आघातानीं परस्परांचा वध करूं लागले. माहूतांनीं आपले गज शत्रूच्या गजांवर घालून त्यांच्या दंताघातांनीं त्यांना विद्ध केलें. तेव्हां त्यांच्या अंगांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या असतां ते पताकांनीं अलंकृत असलेले गज विद्युद्युक्त मेघांप्रमाणें शोभले. कांहीं गज दंतांनीं विद्ध झाले होते, कित्येकांचीं गंडस्थलें तोमरांनीं भग्न झालीं होतीं. ते त्रस्त झालेले गज चीत्कार करीत इतस्ततः भटकूं लागले. कित्येकांच्या शुंडा मध्यें चिरून त्या दुभागल्या होत्या, त्यामुळें ते गज पंख तोडलेल्या पर्वताप्रमाणें भूमीवर पडले. कांहीं छिन्न-भिन्न होऊन पडत होते. कित्येक हत्तींच्या बाजू मत्त हत्तींनीं विदारण केल्यामुळें, धातूचा ( गेरूचा ) स्राव करणाऱ्या पर्वतांप्रमाणें, त्यांच्या कुशींतून रक्त वाहूं लागलें. कांहीं नाराच बाणांनीं हत झाले, कित्येक तोमरांनीं विद्ध झाले. कांहींच्या पाठीवरील योद्धे गतप्राण होऊन पडल्यामुळें ते गज विशृंग ( शिखरहीन ) पर्वतांप्रमाणें पळत सुटले. कित्येक मदान्ध हत्ती क्रुद्ध होऊन आवरेनासे झाले व रथ, अश्व, पदाति यांना तुडवीत चालले.

त्याचप्रमाणें प्रास, तोमर इत्यादिकांनीं विद्ध झालेले अश्वहि शत्रुसैन्याला तुडवीत चालले असतां सर्व दिशा व्याकुल झाल्या. स्वतःच्या जीवावर उदार झालेले सत्कुलांतील कित्येक वीर आपलें सर्व बल खर्च करून निर्भयपणें शत्रूंशीं युद्ध करूं लागले. हे महाराज, ते युद्धदुर्मद वीर ‘यशस्वी तरी होऊं किंवा स्वर्ग तरी मिळवूं’ असा संकल्प करून स्वयंवरांतील विवाहेच्छु क्षत्रियांप्रमाणें परस्परांवर प्रहार करीत होते. अशा प्रकारचा तो अंगावर रोमांच आणणारा संग्राम चालला असतां धार्तराष्ट्राचें महत् सैन्य प्रायः विमुख होऊन स्थित झालें. ६. ४. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १ भीम-दुर्योधन युद्ध. २ द्रोणाचें दुर्योधनाच्या साह्यार्थ महारथ प्रेषण. ३ द्रोण-भीमांचा संग्राम, द्रोणाची मूर्च्छा. ४ अश्वत्थामा व नील यांचें युद्ध. ५ राक्षसांची माया व कौरवांचा पराभव. ]

( १ ) **संजय**—हे धृतराष्ट्र महाराज, याप्रमाणें स्वसैन्याचा वध होत असलेला पाहून दुर्योधन राजा, क्रुद्ध होऊन भीमावर धांवला. त्यानें इंद्राच्या वज्राप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे, असें आपलें प्रचंड धनुष्य घेऊन फार मोठ्या शरवृष्टीनें त्या पांडवाला झांकून टाकिलें. त्यानें अतिशय तीक्ष्ण असा अर्धचन्द्र बाण काढून तो धनुष्याला जोडला व क्रोधाविष्ट होऊन भीमसेनाचें धनुष्य तोडून टाकिलें. भीमाचें धनुष्य तुटलें आहे, असें पाहून त्या महारथानें पर्वतांचेंहि विदारण करील, असा तीक्ष्ण बाण सोडून भीमाच्या वक्षःस्थलावर ताडन केलें. त्या प्रहारानें विद्ध झालेला भीम अतिशय व्यथित झाला व जिभल्या चाटीत आपल्या सुवर्णभूषित ध्वजस्तंभाच्या आधारानें उभा राहिला.

( २ ) भीमसेनाला भ्रान्त झालेलें पहातांच घटोत्कच अग्नीप्रमाणें क्रोधसंतप्त झाला व पांडवांचे अभिमन्युप्रभृति महारथहि गर्जना करीतच धांवून आले. ते सर्व क्रुद्ध झालेले वीर येत आहेतसें पाहून द्रोणाचार्य तुझ्या महारथांना म्हणाला—" हे वीरहो, सत्वर जा व राजाचें रक्षण करा. संकटार्णवांत बुडणाऱ्या त्याच्या जीविताविषयीं अतिशय संशय उत्पन्न झाला आहे, पांडवांचे हे सर्व क्रुद्ध झालेले महारथ भीमसेनाला पुढें करून दुर्योधनावर धांवून येत आहेत. त्यांनीं जयप्राप्तीसाठीं धारण केलेलीं नानाप्रकारचीं शस्त्रें सोडीत भयंकर गर्जनेनें सर्व भूपालांना त्रस्त करून सोडिलें आहे."

द्रोणाचार्याचें हें वचन ऐकून सौमदत्तिप्रभृति तुझ्या पक्षांतील वीर पांडवांच्या सेनेवर तुटून पडले. कृपाचार्य, भूरिश्रवा, शल्य, द्रोणपुत्र विविंशति, चित्रसेन, विकर्ण, सैन्धव, बृहद्बल व दोघे आवन्त्य भ्राते या वीरांनीं दुर्योधनाला समंततः वेष्टित करून त्याचें रक्षण केलें. ते सुमारें वीस पावलें पुढें गेले व परस्परांच्या वधाची इच्छा करणाऱ्या त्या कौरव-पांडवांनीं प्रतिपक्षावर प्रहार करण्यास आरंभ केला.

( ३ ) द्रोणाचार्यानेंहि आपल्या योद्धयांना असें सांगून आपलें दृढ धनुष्य आकर्ण ओढलें व भीमावर सव्वीस बाण सोडले. जलधारांनीं पर्वताला समंततः भिजवून टाकणाऱ्या वर्षाकालीन मेघाप्रमाणें त्यानें भीमसेनाला शर-

जालानें झांकून टाकिलें. तेव्हां वृकोदरानें अतिशय त्वरेनें दहा शिलीमुख बाण सोडून द्रोणाच्या डाव्या बाजूला विद्ध केलें. त्या मर्मान्तक शरांनीं तो वयोवृद्ध आचार्य अतिशय विह्वल झाला व चेतनाशून्य होऊन रथाच्या पुढल्या भागावर एकदम बसला.

आपला गुरु विद्ध होऊन तीव्र वेदनेनें संज्ञाशून्य झाला आहे, हें पहातांच दुर्योधन व अश्वत्थामा हे दोघे क्रोधसंतप्त होऊन भीमावर धांवून गेले. कालान्तक यमाचीच ज्यांना उपमा शोभेल, असे ते दोघे आपल्याकडे धांवून येत आहेत, हें पहातांच महाबाहु भीमानें सत्वर आपली गदा घेऊन रथां-तून उडी टाकली व तो पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. आपली यम-दण्डतुल्य लोखंडी गदा उगारून रणांगणांत उभा असलेला तो पांडव शृंग-वान् कैलास पर्वताप्रमाणें शोभला. त्याला गदा उगारून उभें असलेलें पहा-तांच अश्वत्थामा व दुर्योधन हे दोघे त्याच्यावर धांवले व तो वृकोदरहि त्या दोघांवर तुटून पडला.

तो भीमदर्शन भीमसेन त्या दोघांवर धांवून गेलेला पहातांच द्रोणप्रभृति कौरवांचे सर्व महारथ भीमाच्या वधेच्छेनें अतिशय त्वरेनें चाल करून गेले. त्या सर्वांनीं मिळून नानाविध शस्त्रांनीं भीमाचें वक्षःस्थल विद्ध केलें. त्यांनीं सर्व बाजूंनीं त्या पांडवाला अतिशय पीडित केलें. भीमसेन शत्रूकडून पीडिला जात आहे व त्याच्या जीविताविषयीं संशय प्राप्त झाला आहे, हें पाहून अभिमन्युप्रभृति पांडवांचे महारथ स्वतःच्या दुस्त्यज्य प्राणांवर उदार होऊन त्याच्या साह्यार्थ धांवले.

(४) 'नीलांबुद' या नांवानें प्रसिद्ध असलेला भीमाचा प्रिय सखा अनूपाधिपति नील क्रुद्ध होऊन द्रौणीवर धांवला. तो धनुर्धर द्रोणपुत्राशीं नित्य स्पर्धा करीत असे. त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून द्रौणीला विद्ध केलें. पूर्वी देवतांना भयंकर वाटणाऱ्या ज्या 'विप्रचित्ति'-नामक दानवानें त्रैलोक्य त्रस्त करून सोडलें होतें, त्याला क्रुद्ध झालेल्या शक्रानें आपल्या तेजानें जसें विद्ध केलें, त्याप्रमाणें नीलानें सोडलेल्या बाणानें तो द्रोणपुत्र रक्तानें माखला व अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें आपलें विचित्र धनुष्य आकर्ण ओढलें. त्या धनुष्याचा टणत्कार इंद्राच्या अशनीप्रमाणें होता. त्या बुद्धि-मानांतील श्रेष्ठ वीरानें नीलाचा नाश करण्याचा विचार मनांत आणला.

त्यानें तीक्ष्ण धारेचे पाजळलेले भल्लबाण धनुष्याला जोडले आणि त्या शरांनीं नीलाचे चार अश्व आणि ध्वज यांना खालीं पाडविलें. सातव्या भल्ल बाणानें नीलाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. त्या बाणानें अतिशय विद्ध झालेल्या नीलाला मूर्छा आली व तो एकदम रथांत बसला.

मेघाप्रमाणें नीलवर्ण असलेल्या नीलाला मोहित झालेलें पहातांच घटोत्कच आपल्या ज्ञातिबांधवांनीं ( राक्षसांनीं ) परिवेष्टित होत्साता द्रौणीवर वेगानें धांवून गेला. त्याच्याबरोबर इतर सर्व राक्षसहि त्या द्रोणपुत्रावर तुटून पडले. तो युद्धदुर्मद राक्षस आपल्या अंगावर चालून येत आहे, हें पहातांच तेजस्वी अश्वत्थाम्यानें त्वरेनें घटोत्कचाच्या पुरोगामी असलेल्या राक्षसांना शरवृष्टीनें विद्ध करून त्यांचा पराभव केला.

( ५ ) अश्वत्थाम्याच्या बाणानें विद्ध झालेले ते राक्षस युद्धविमुख झालेले पाहून तो प्रचंड देहधारी घटोत्कच संतप्त झाला. त्या मायावी राक्षसानें घोररूपी दारुण माया पसरली व त्याला मोहित केलें. तें पाहून तुझ्या पक्षांतील सर्व योद्धे मायेनें युद्धविमुख झाले. ते सर्व परस्परांस भूमीवर छिन्न-विछिन्न होऊन पडलेले, रक्तानें माखलेले व दीन होऊन तळमळत असलेले असे दिसले. द्रोण, दुर्योधन, शल्य, अश्वत्थामा आणि प्रायः सर्वच प्रमुख कौरव पळत आहेत; रथी विध्वस्त झाले आहेत; सर्व राजे विद्ध होऊन पडले आहेत; सहस्रावधि अश्व व अश्वसादी छिन्न-भिन्न झाले आहेत, असें त्यांच्या दृष्टीं पडलें. तें दृश्य पहातांच तुझें सर्व सैन्य भयभीत होऊन स्वशिबिराकडे पळत सुटलें.

त्यांना मी आणि पितामह भीष्म, अशा आम्हीं दोघांनीं परत फिरविण्याचा यत्न केला. 'ही सर्व घटोत्कचानें निर्माण केलेली माया आहे. तुम्ही पळूं नका. युद्ध करा.' असें आम्हीं त्यांना कंठशोष करून ओरडून सांगितलें. तथापि त्या मोहित झालेल्या सैन्यानें आमचा तो आक्रोश न ऐकतां तेथून पलायन केलें. भयभीत झालेल्या त्यांनीं आमच्या वचनावर विश्वास ठेविला नाहीं.

याप्रमाणें तुझ्या सेनेला पळतांना पाहून पांडव विजयी झाले. घटोत्कचासह सर्वांनीं सिंहनाद केला. समंततः शङ्ख दुन्दुभींचा निर्घोष होऊं लागला. याप्रमाणें सूर्यास्तसमयीं दुरात्म्या हैडिम्बानें तुझ्या सर्व सैन्याला प्रभग्न केलें असतां तें दश-दिशांत पळून गेलें. ६. ४. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ दुर्योधन व भीष्म यांचा संवाद. २ भगदत्ताला घटोत्कचावर चालून जाण्याची आज्ञा. ३ भगदत्ताचें घटोत्कचाशीं युद्ध. ४ घटोत्कच व भगदत्त यांचा पराक्रम. ५ पांडवांशीं युद्ध. ]

(१) संजय—महाराज, तो घोर संग्राम चालला असतां राजा दुर्योधनानें गाङ्गेयाजवळ येऊन त्याला विनयपूर्वक अभिवादन केलें व घडलेला सर्व वृत्तान्त कथन केला. घटोत्कचाचा विजय व आपला पराजय सांगून पुनः पुनः दीर्घ निश्वास सोडले व पितामहास म्हटलें—"हे प्रभो, आपला आश्रय करून मीं वासुदेवाशीं आणि पांडवांशीं वैर करून घोर युद्ध आरंभिलें. हे परंतपा, माझें अकरा अक्षौहिणी सैन्य माझ्यासह तुझ्या आज्ञेंत स्थित आहे. असें असतां भीमसेन ज्यांच्या पुरोगामी आहे, अशा पांडवांनीं घटोत्कचाच्या साह्यानें युद्धांत माझा पराभव केला. त्यामुळें वायूनें दग्ध होणाऱ्या शुष्कवृक्षांप्रमाणें माझीं गात्रें जळत आहेत. यास्तव हे पितामह, आपणा दुर्धर्षाच्या बलावर मी स्वतः त्या राक्षसाचा वध करूं इच्छितों. ती इच्छा तुझ्या प्रसादानें पूर्ण व्हावी. तूं एवढें कार्य माझ्या हातून पार पाडविण्यास समर्थ आहेस."

दुर्योधनाचें हें भाषण ऐकून भीष्म म्हणाला—हे राजन्, तूं कसें वागावेंस हें मी तुला सांगतों, तें ऐक. सर्व प्रसंगीं आत्मरक्षण करणें हें युद्धांतील आद्यकर्तव्य आहे. त्याचप्रमाणें राजधर्माला अनुसरून राजानें राजाशींच युद्ध करावें, यास्तव तूं सर्वदा धर्मराजाशींच युद्ध करीत जा. फार तर अर्जुन, भीमसेन व नकुल-सहदेव यांच्याशीं युद्धाला उभा रहा. मी, द्रोण, कृप, अश्वत्थामा, कृतवर्मा, सात्वत, शल्य, सौमदत्ति, विकर्ण आणि दुःशासनप्रभृति तुझे श्रेष्ठ महारथ भ्राते असे आम्ही सर्व मिळून त्या महाबलाढ्य राक्षसाशीं युद्ध करूं. किंवा तुला जर त्या क्रूर राक्षसेंद्राचा पराजय न झाल्यामुळें पश्चात्ताप वाटत असेल, तर या भगदत्त महीपालाला त्या दुर्मतीवर जाऊं दे. तो राजा संग्रामांत इंद्रतुल्य आहे.

(२) असें बोलून तो वक्त्यांतील श्रेष्ठ भीष्म सर्व राजांच्या समक्ष भगदत्ताकडे वळून असें म्हणाला—"हे नृपाला, युद्धदुर्मद हैडिंबावर सत्वर चालून जा आणि पूर्वी इंद्रानें तारकासुराचें जसें निवारण केलें, त्याप्रमाणें तूं सर्व धनुर्धरांच्या समक्ष दक्षतेनें त्या राक्षसाला पराभूत कर. तूं दिव्य अस्त्रांनीं

युक्त आहेस, तुझा पराक्रम प्रसिद्ध आहे. तूं पूर्वी अनेक वेळां देवांशींहि युद्ध केलेलें आहेस. यास्तव या महायुद्धांत त्या राक्षसाला तूंच प्रतियोद्धा योग्य आहेस. तूं आपल्या बलाच्या आश्रयावर आज त्या राक्षसाला गतप्राण कर."

( ३ ) सेनापति भीष्माचें हें भाषण ऐकून भगदत्त सिंहनाद करीत मोठ्या त्वरेनें शत्रूच्या संमुख गेला. तेव्हां गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें तो येत आहे हें पाहून भीमसेन, अभिमन्यु, घटोत्कच, द्रौपदीचे पांच पुत्र, सत्यधृति, क्षत्रदेव, चेदिपति, वसुदान व त्याचप्रमाणें दाशार्णाधिपति हे पांडवांकडील महारथ त्याच्यावर धांवले. त्यांना पाहून भगदत्त आपल्या 'सुप्रतिक'-नामक गजावर आरूढ होऊन त्यांच्यावर चालून गेला आणि पांडवांचें भगदत्ताशीं यमपुरीची वृद्धि करणारें भयानक घोर युद्ध प्रवृत्त झालें.

हे महाराज, त्या संग्रामांत रथ्यांच्या वेगवान् बाणांनीं गज विद्ध झाले, मत्तगजांनीं आपल्या गंडस्थलांनीं परस्परांवर प्रहार केले व दंतांनीं एकमेकांचें विदारण केलें. त्याचप्रमाणें सहस्रावधि पदाति तोमर, शक्ति इत्यादि शस्त्रांनीं शत्रूसैन्याला विद्ध करून व त्यांच्याकडून स्वतः विद्ध होऊन भूमीवर पडले होते. याप्रमाणें त्या समरांगणांत वीरांचा वध करून योद्धे मोठ्यानें सिंहनाद करूं लागले.

अशा प्रकारचें अंगावर रोमांच आणणारें तें महायुद्ध प्रवृत्त झालें असतां भगदत्त भीमावर चालून गेला. त्यावेळीं त्याच्या गजाच्या गंडस्थलांतून सप्तधा मदस्राव होत असल्यामुळें, सर्वथा जलाचा प्रवाह वहाणाऱ्या पर्वताप्रमाणें तो दिसला. अशा प्रकारच्या त्या 'सुप्रतीक'-नामक गजावर तो आरूढ झाला होता. ऐरावतस्थ इंद्र जसा सहस्रावधि जलधारांची वृष्टि करितो, तसा सुप्रतिकाच्या पाठीवर आरूढ झालेला भगदत्त भीमावर शरवृष्टि करूं लागला.

तेव्हां क्रुद्ध झालेल्या भीमानेंहि भगदत्ताच्या शेकडों पादरक्षकांचा संहार चालविला. तें पाहून भगदत्तानें आपला 'सुप्रतीक' गज भीमाच्या रथावर घातला. त्यानें सोडलेला तो गज धनुष्यापासून सुटलेल्या शराप्रमाणें वेगानें भीमावर धांवला. तो बलाढ्य गज भीमावर चाल करून येत आहेसें पहातांच पांडवांचे महारथी अतिशय त्वरेनें त्याच्याकडे वळले. पांच द्रौपदेय, केकय, अभिमन्यु,

१ अशा प्रकारचीं युद्धाचीं वर्णनें पूर्वी अनेकदां होऊन गेल्यामुळें त्यांचा येथें संक्षेप केला आहे.

शूर दशार्णाधिप, क्षत्रदेव, चेदिप व चित्रकेतु हे सर्व बलाढ्य वीर आपापलीं उत्तम व दिव्य अस्त्रें दर्शवीत त्याच्यासमीप आले. त्या सर्वांनीं मिळून त्या एका गजाला वेढून टाकिलें व त्या महागजाला सर्वतः विद्ध केलें. तेव्हां त्याच्या अनेक क्षतांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या व तो गज गेरूनें माखलेल्या पर्वताप्रमाणें शोभला.

हे महाराज, दशार्णाधिपतिहि पर्वतोपम गजावर आरूढ होऊन भगदत्ताच्या मत्त गजावर धांवला. परंतु समुद्राला अडवून धरणाऱ्या तीराप्रमाणें सुप्रतिकानें त्या गजाला अडवून धरलें. तेव्हां महात्म्या दशार्णाच्या हत्तीचें त्या गजेंद्रानें निवारण केलेलें पाहून पांडवांच्या सैनिकांनींहि 'धन्य धन्य' म्हणून त्याचा गौरव केला.

इतक्यांत क्रुद्ध झालेल्या प्राग्ज्योतिषाधिप भगदत्तानें त्या गजावर चौदा तोमर सोडिले. ते त्याच्या सुवर्णानें भूषविलेल्या कवचांचा भेद करून बिळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें त्या गजाच्या अंगांत शिरले. त्या क्षतांनीं विह्वल होऊन त्याचा मद कमी झाला व तो मत्त गज वेदनांनीं व्याकुल होऊन वृक्षांना पाडविणाऱ्या वायूप्रमाणें सैन्य तुडवीत व चीत्कार करीत रणांगणांतून पळून गेला. याप्रमाणें आपल्याच गजाचा पराभव झाला असतां पांडवांचे महारथ मोठ्यानें सिंहनाद करीत युद्धाला सज्ज होऊन पुढें सरसावले व भीमाला पुढें करून नानाविध शस्त्रें व शर यांचा वर्षाव करीत भगदत्तावर चालून गेले.

( ४ ) ते सर्व वीर क्रुद्ध होऊन येत आहेतसें पाहून भगदत्तानें आपल्या सुप्रतिक गजाला पुनः प्रेरणा केली. अंकुश व अंगुष्ठ यांनीं डवंचलेला तो गज प्रलयकालीन अग्नीप्रमाणें अतिशय उग्र दिसूं लागला. चवताळलेला तो इतस्ततः फिरत असतां सहस्रावधि रथसंघ, गज, अश्वांसह सादी, पदाति इत्यादि सर्वांस पायांनीं तुडवून टाकीत होता. त्या गजानें सैन्याला तुडविलें असतां पांडवांचें सैन्य अग्नींतील चर्माप्रमाणें संकोच पावलें.

याप्रमाणें धीमान् भगदत्तानें आपल्या सैन्याला भग्न केलेलें पाहून घटोत्कच क्रुद्ध होऊन त्याच्यावर धांवला. त्यावेळीं त्याचें स्वरूप उग्र व भीषण दिसत होतें. त्याचे नेत्र आरक्त झाले होते व मुखांतून उष्ण ज्वाला निघत होत्या. असें विकराल रूप धारण करून त्यानें पर्वताचेंहि विदारण करील असा तीक्ष्ण शूल हातांत घेतला आणि त्या राजाच्या वधेच्छेनें तो त्यावर फेंकला.

तो शूल येत आहेसें पहातांच भगदत्तानें एक अर्धचंद्राकृति उग्र बाण सोडला. तो शर अतिशय दारुण, तीक्ष्ण व प्रेक्षणीय होता. त्या शरानें घटोत्कचाच्या त्या महाशूलाचे तुकडे करून टाकिले. तेव्हां आकाशांतून पडणाऱ्या महा अशनीप्रमाणें त्या शूलाचीं दोन शकलें होऊन भूमीवर पडलीं.

तो सुवर्णानें भूषविलेला शूल द्विधा छिन्न होऊन खालीं पडलेला पहातांच भगदत्तानें रुक्मदंडानें शोभणारी महाशक्ति हातीं घेतली व 'थांब थांब' असें बोलून ती अग्नीच्या ज्वालेप्रमाणें असलेली शक्ति त्या राक्षसावर सोडली. आकाशस्थ अशनीप्रमाणें ती शक्ति येत आहे, असें पाहून घटोत्कचानें उड्डाण केलें. त्या शक्तीला अंतरिक्षांतच अडविलें व गर्जना करून आपल्या जानूच्या आघातानें तिचे तुकडे करून टाकिले. भगदत्ताच्या समक्ष हा अद्भुत प्रकार घडला. राक्षसाचें हें दुष्कर कर्म पाहून स्वर्गांतील देव, गंधर्व व मुनि विस्मित झाले आणि भीमसेनपुरस्सर पांडवांनीं 'धन्य धन्य' अशा ध्वनीनें पृथ्वी निनादित केली.

(५) हृष्ट झालेल्या पांडवांचा तो जयघोष प्रतापवान् भगदत्ताला सहन झाला नाहीं. त्यानें इंद्राच्या अशनीप्रमाणें असलेलें आपलें धनुष्य आकर्ण ओढलें व पांडवांच्या महारथांना अनुलक्षून तीक्ष्ण नाराच बाण सोडले. ते सर्व अग्नीप्रमाणें प्रज्वलित होते. त्यानें भीमावर एक, राक्षसावर नऊ, अभिमन्यूवर तीन व केकयांवर पांच बाण सोडले. आपलें धनुष्य पुनः आकर्ण ओढून एका नतपर्व बाणानें क्षत्रदेवाचा दक्षिण बाहु विद्ध केला. तेव्हां त्याचें श्रेष्ठ धनुष्य शरांसह एकदम गळून पडलें. नंतर पांच द्रौपदेयांना पांच पांच बाणांनीं ताडन केलें. क्रोधयुक्त होऊन भीमसेनाच्या अश्वांना गतप्राण केलें. तीन बाणांनीं त्याचा सिंहाच्या चिह्नानें अलंकृत असलेला ध्वज पाडविला आणि तीन बाणांनीं सारथ्याला विद्ध केलें. भगदत्ताच्या बाणांनीं विशोक सारथि अत्यंत व्यथित होऊन एकदम रथांत बसला. तेव्हां विरथ झालेला भीम आपली श्रेष्ठ गदा हातीं घेऊन रथांतून खालीं उतरला. त्यावेळीं पर्वताच्या शिखराप्रमाणें गदा उगारून उभ्या असलेल्या भीमाला पाहून तुझें सैन्य भयभीत झालें.

इतक्यांत कृष्णसारथि पार्थ शत्रूंचा वध करीत, जेथें भीम व घटोत्कच हे दोघे पिता-पुत्र भगदत्ताशीं युद्ध करीत होते, तेथें आला व युद्ध करीत अस-

लेल्या आपल्या महारथ आप्तांना पाहून त्यानेंहि शरवृष्टीनें युद्ध आरंभिलें. अर्जुनाला पहातांच दुर्योधनानें आपल्या अश्व-गजयुक्त सेनेला प्रेरणा केली. कौरवांची ती चतुरंग सेना आपल्याकडेच वळत आहे, हें पहातांच धनंजय तिच्यावर धांवला आणि इकडे भगदत्त आपल्या हत्तीच्या पायांखालीं पांडव-सैन्याला तुडवीत युधिष्ठिरापाशीं येऊन पोंचला. तेव्हां पांचाल, केकय व पांडव यांचें भगदत्ताशीं युद्ध प्रवृत्त झालें व त्याचवेळीं भीमसेनानें इरावानाच्या मृत्यूची वार्ता कृष्णार्जुनांस कळविली. ६. ४. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ इरावानाचें निधन ऐकून अर्जुनाचा विलाप. २ पार्थाचा रथ पाहून कौरव-सैन्याचा कोलाहल. ३ पार्थाचा भीष्माशीं संग्राम. ४ कौरव-पांडवांचें संकुलयुद्ध व अष्टमदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे महाराज, आपला पुत्र इरावान् हत झाला, हें दुःखद वृत्त कानीं पडतांच धनंजय शोकानें अतिशय व्याकुल झाला व तो सर्पाप्रमाणें निश्वास टाकूं लागला. नंतर त्या रणांगणांत वासुदेवाला म्हणाला—" हे मधुसूदना, कौरव-पांडवांचा या युद्धांत घोर क्षय होईल, हें महाप्राज्ञ विदुरानें पूर्वींच जाणलें होतें. त्या महामतीनें धृतराष्ट्राचें युद्धापासून निवारण करण्याचाहि यत्न केला. परंतु त्या जनेश्वरानें त्यावेळीं तें ऐकलें नाहीं. त्यामुळें हा दारुण प्रसंग ओढवला आहे. माझ्या या पुत्राप्रमाणेंच आणखीहि अनेक वीरांना कौरवांनीं युद्धांत गतप्राण केलें आहे व आम्हींहि कौरवपक्षाचा संहार चालविला आहे. खरोखर केवल अर्थांसाठीं–संपत्तीसाठीं[१] श्रेष्ठ मनुष्यहि निंद्य कर्मे करीत असतो. अरे अरे, ज्ञातिक्षय करणाऱ्या या द्रव्यलोभाला धिक्कार असो. ज्ञातिवध करून धन मिळविण्यापेक्षां निर्धन राहून मरणें श्रेयस्कर होय. हे कृष्णा, येथें जमलेल्या या सर्व ज्ञातिबांधवांचा वध करून आपल्याला काय मिळणार आहे ! सौबल शकुनि व दुर्योधन यांच्या अपराधामुळें व कर्णाच्या दुर्मतित्वामुळें हे सर्व क्षत्रिय प्राणांस मुकत आहेत !

हे माधवा, राजा युधिष्ठिरानें ' राज्यार्ध किंवा निदान पांच ग्राम आम्हांला देऊन शम करावा ' अशी जी दुर्योधनापाशीं याचना केली होती, तें केवढें

---

१ अर्थहेतोर्नरश्रेष्ठ क्रियते कर्म कुत्सितम् ।

सुकृत होतें, हें आतां माझ्या लक्षांत आलें. तथापि त्या दुर्मतीनें शम केला नाहीं, पण या सर्व शूर क्षत्रियांना गतप्राण होऊन भूतलावर पडलेलें पाहून मला स्वतःची अतिशय निंदा करावीशी वाटते. धिक्कार असो या क्षत्रियजीविकेला ! मला ज्ञातिजनांशीं युद्ध करणें मुळींच रुचत नाहीं. परंतु हे सर्व रणांगणांत जमलेले क्षत्रिय मला असमर्थ समजतील, म्हणून मी युद्धाला उभा राहिलों आहें. आतां हा उपस्थित झालेला काल व्यर्थ घालविणें योग्य नव्हे, यास्तव हे कृष्णा, अश्वांना प्रेरणा कर व माझा रथ धार्तराष्ट्रांच्या सैन्याकडे ने. मला आपल्या बाहूंनीं हा समररूपी सागर तरून परतीराला गेलेंच पाहिजे. "

( २ ) अर्जुनाचें हें भाषण ऐकतांच परवीरांचा नाश करणाऱ्या केशवानें वायूप्रमाणें वेगवान् असलेल्या शुभ्र अश्वांना प्रेरणा केली. पार्थाचा रथ वायुवेगानें येत आहेसें पहातांच तुझ्या सैन्यांत फार मोठा कोलाहल झाला. तो पर्वकालीं वादळानें उठणाऱ्या समुद्राच्या निर्घोषाप्रमाणें प्रचंड होता.

( ३ ) त्यानंतर अपराह्णकालीं भीष्माचा पार्थाशीं घनघोर संग्राम प्रवृत्त झाला. त्यावेळीं त्यांच्या धनुष्यांचा पर्जन्याप्रमाणें निर्घोष होत होता. इंद्राला परिवेष्टित करून युद्ध करणाऱ्या वसूंप्रमाणें तुझे पुत्र द्रोणाला समंततः वेढून भीमसेनावर धांवले. शान्तनव भीष्म, कृप, भगदत्त व सुशर्मा हे धनंजयावर चालून गेले. हार्दिक्य व बाल्हिक हे दोघे सात्यकीवर तुटून पडले. राजा अंबष्टक अभिमन्यूवर धांवून गेला. इतर सर्व वीर अवशिष्ट राहिलेल्या महारथांना जाऊन भिडले आणि दारुण संग्राम प्रवृत्त झाला.

तुझ्या पुत्रांना पाहून घृतयुक्त वह्नीप्रमाणें भीमसेन संतप्त झाला. तुझ्या पुत्रांनीं पर्वताला समंततः जलानें सिक्त करणाऱ्या वर्षाकालीन मेघाप्रमाणें भीमाला शरवृष्टीनें झांकून टाकिलें. याप्रमाणें तुझ्या पुत्रांकडून शरांनीं आच्छादित झालेला भीम दृप्त सिंहाप्रमाणें गर्जना करीत व जिभल्या चाटीत पुढें सरसावला. त्यानें व्यूढोरस्कावर एक तीक्ष्ण बाण सोडला, त्यामुळें मर्मघातक शरानें विह्वल झालेला तुझा पुत्र गतप्राण होऊन खालीं पडला. नंतर त्यानें दुसरा एक विषारी बाण कुंडलीवर सोडला व सिंह जसा क्षुद्र मृगावर झडप घालतो, तसें त्या शरानें त्याला विद्ध करून पाडविलें. त्यानंतर शिलीमुख बाणांनीं तुझ्या अनेक पुत्रांना व्यथित केलें. भीमसेनाच्या त्या तीक्ष्ण

बाणांनीं अनाधृष्टि, कुंडभेदी, वैराट, दीर्घलोचन, दीर्घबाहु, सुबाहु आणि कनकध्वज हे सर्व तुझे महारथ पुत्र पटापट रथांतून खालीं पडले. ते सर्व वीर वसंतऋतूंतील मोहोरानें युक्त असलेल्या आम्रवृक्षांप्रमाणें भूमीवर पडत असलेले दिसले.

हे महाराज, याप्रमाणें भ्रात्यांचा वध झालेला पाहून तुझे अवशिष्ट राहिलेले पुत्र भीमसेनाला साक्षात् कालच समजून समरांगणांतून पळून गेले. परंतु भीमसेन तुझ्या पुत्रांना शरांनीं दग्ध करीत आहे, हें पाहतांच द्रोणानें पर्वताला सिक्त करणाऱ्या जलधारांप्रमाणें शरवृष्टि करून त्याला झांकून टाकिलें. त्यावेळीं त्या कुंतीपुत्राचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. द्रोण त्याचें निवारण करीत असतांहि तो तुझ्या पुत्रांचा संहार करीतच होता. आकाशांतून पडणाऱ्या जलधारा अंगावर घेणाऱ्या मत्त वृषभाप्रमाणें भीमानें द्रोणाचे शर अंगावर घेत तुझ्या पुत्रांचा वध चालविला व द्रोणाचेंहि निवारण केलें. हें वृकोदराचें कृत्य अद्भुत होतें. ज्याप्रमाणें महाबलाढ्य व्याघ्र मृगांच्या कळपांत संचार करून त्यांना खेळवीत असतो, तसा वृकोदर तुझ्या वीर पुत्रांशीं युद्धांत क्रीडाच करीत होता. किंवा पशूंच्या समूहांत शिरलेला वृक जसा त्यांना भीतीनें पळावयास लावितो, त्याप्रमाणें वृकोदरानें तुझ्या पुत्रांना युद्धांतून पळवून लाविलें.

इकडे गांगेय, भगदत्त व गौतम या महारथांनीं अर्जुनाचें निवारण केलें. तथापि त्या अतिरथानें अस्त्रांचें अस्त्रांनींच निवारण करून तुझ्या सेनेंतील प्रमुख वीरांस मृत्यूच्या स्वाधीन केलें. अभिमन्यूनें आपल्या शरांनीं लोकविश्रुत अंबष्ठराजाला विरथ केलें, तेव्हां विरथ झालेल्या त्या रथिश्रेष्ठानें 'आपणहि प्राणास मुकूं या भीतीनें रथांतून उडी टाकून महात्म्या सौभद्रेयावर आपलें खड्ग उडविलें व हार्दिक्याच्या रथाचा आश्रय केला. पण युद्धमार्गांत विशारद असलेल्या आर्जुनीनें त्या खड्गाचें निवारण करून आपलें हस्तलाघव प्रकट केलें. त्याचें तें हस्तकौशल्य पाहून सैन्यांतून 'धन्य धन्य' असे प्रशंसोद्गार निघाले.

(४) धृष्टद्युम्नादि इतर वीर तुझ्या सैन्याशीं व तुझे वीर पांडवांच्या सैन्याशीं युद्ध करीत होते. त्यावेळीं तुझ्या व त्यांच्या सैन्यांत फार मोठी रणगर्जना ऐकूं येत होती. परस्परांचा वध करून दुष्कर कर्में करणारे योद्धे मोठ्यानें सिंहनाद करीत होते. ते शूर सैनिक एकमेकांस केंस धरून ओढीत होते. कित्येक मानी

वीर नख, दांत, मुष्टि, जानु, तलाघात व खड्ग धारण केलेले बाहू यांनीं परस्परांवर प्रहार करीत होते व प्रतिस्पर्ध्यांचें छिद्र दिसतांच त्याला यमसदनीं पाठवीत होते. पिता पुत्रावर आणि पुत्र पित्यावर शस्त्रप्रहार करीत होते. ज्यांचीं सर्व अंगें व्याकुल झालीं आहेत, असे ते सर्व योद्धे युद्ध करीत होते.

त्या रणांगणांत हत झालेल्या योद्ध्यांचीं विविध शस्त्रें, अलंकार, भूषणें व ध्वज-चामरादि वस्तु सर्वत्र पसरल्या होत्या. कांहीं मृत होऊन पडलेल्या वीरांच्या हातांत उगारलेलीं शस्त्रें तशींच असल्यामुळें ते सजीव असल्याप्रमाणें भासत होते. अश्व-गजादिकांच्या पायांनीं तुडविलेले व अवयव तुटून छिन्न-भिन्न झालेले अनेक पुरुष त्या रणभूमीवर शयन करीत होते. अश्वगजांच्या प्रचंड शरीरांनीं आच्छादित झालेली ती भूमि पर्वतांनीं व्यापलेल्या प्रदेशाप्रमाणें भासत होती. असंख्य आयुधें व शस्त्रांनीं विद्ध झालेलीं शरीरें इतस्ततः पसरलीं होतीं. कांहीं प्राणी शब्द करीत होते. कोणी स्तब्ध होते, तर कित्येक गतप्राण झाले होते. रक्तानें माखलेल्या मनुष्यांनीं ती भूमि व्यापून गेली होती. तेथें पडलेल्या विविध प्रकारच्या असंख्य वस्तूंनीं ती रणभूमि एखाद्या अलंकारांनीं भूषविलेल्या प्रमदेप्रमाणें शोभली. त्या रणांगणाच्या एका भागांत विद्ध झालेले गज चीत्कार करीत पडले होते. तें स्थान चलपर्वतांनीं युक्त असल्याप्रमाणें भासलें. योद्ध्यांचीं विविध प्रकारचीं मूल्यवान् वस्त्रें, नानाप्रकारचीं आयुधें, छत्रें, चामरें, ध्वज इत्यादि असंख्य वस्तु, मृत वीरांचीं चंद्रतुल्य मुखकमलें, कुंडलांनीं अलंकृत असलेलीं मस्तकें इत्यादि अनेक प्रकारच्या विविध पदार्थांनीं ती रणभूमि नक्षत्रांनीं युक्त असलेल्या आकाशाप्रमाणें शोभली.

हे महाराज, याप्रमाणें त्या दोन्ही सैन्यांनीं परस्परांचा संहार चालविला. त्यांतील कांहीं योद्धे श्रांत झाले, कित्येक भग्न झाले व कोणी गतप्राण झाले. इतक्यांत रात्र पडली व कोणी कोणास दिसेनासें झालें. आपला पाठलाग कोण करीत आहे हें कळेनासें झालें. तेव्हां कौरव-पांडवांनीं सैन्यांचा अवहार केला व रजनीच्या त्या भयानक अंधकारांत आपापल्या शिबिरांत जाऊन दोन्ही पक्षांनीं यथाकालीं विश्रांति घेतली. ६. ४. ९६.

---

१ वीरांचीं भूषणें व आयुधें यांचें सविस्तर वर्णन पूर्वी होऊन गेलेलें आहे. म्हणून येथें त्याचा संक्षेप केला आहे. २ या वर्णनाचाहि येथें संक्षेप केला आहे.

## अध्याय ९७ वा.

[ १ दुर्योधनाचा कर्णादिकांशीं संकेत. २ कर्णाची भीष्माच्या शस्त्रत्यागाविषयीं प्रेरणा. ३ दुर्योधनाचें भीष्मशिबिरांत गमन व भाषण. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर दुर्योधन, शकुनि, दुःशासन व कर्ण हे चौघे एकत्र जमले व पांडवांना त्यांच्या परिवारांसह कसें जिंकावें याचा विचार करूं लागले. तेव्हां राजा दुर्योधन कर्ण व शकुनि यांना उद्देशून सर्व मंत्र्यांना असें म्हणाला—" या युद्धांत द्रोण, भीष्म, कृप, शल्य व सौमदत्ति हे पांडवांचा पराजय कां करीत नाहींत, याचें कारण मला कळत नाहीं. परंतु पांडव अवध्य राहिल्यामुळें माझ्या सैन्याचा क्षय करीत आहेत. मी क्षीणबल व क्षीणशस्त्र झालों आहें आणि देवांनाहि अजिंक्य असलेले शूर पांडव माझा नित्य पराजय करीत आहेत. तस्मात् हे कर्णा, त्यांना रणामध्यें कसें पराभूत करतां येईल, याविषयीं मला मोठा संशय वाटत आहे."

( २ ) त्यावर सूतपुत्र कर्ण म्हणाला—हे भरतश्रेष्ठा, तूं शोक करूं नको. मी तुझें प्रिय करीन. परंतु अगोदर हा शान्तनव रणांगण सोडून जाऊं दे. एकदां भीष्म शस्त्रत्याग करून युद्धापासून निवृत्त झाला कीं, मी गांगेयाच्या समक्ष सर्व सोमकांसह पार्थांचा संहार करीन. हें मी तुला सत्याची शपथ घेऊन सांगत आहें. हा भीष्म नित्य पांडवांची दयाच करीत असतो. शिवाय पांडव महारथ असून सुदृढ आहेत व भीष्म अशक्त आहे. तो त्यांना जिंकण्यास कसा समर्थ होईल ! भीष्माला स्वतःच्या शौर्याचा अभिमान असून, तो नित्य रणप्रिय आहे. तथापि एकत्र जमलेल्या बलाढ्य पांडवांना तो वृद्ध कसा जिंकूं शकणार ! यास्तव बा दुर्योधना, तूं सत्वर भीष्माच्या शिबिरांत जा. त्या वृद्ध पितामहाची अनुमति घे आणि त्याच्याकडून शस्त्रत्याग करवून ये. भीष्मानें शस्त्रन्यास करतांच सर्व बांधव व सुहृद यांच्यासह पांडवांचा वध माझ्या एकट्याच्या हातून झालेला तूं पहाशील.

कर्णाचें हें भाषण ऐकून तुझा पुत्र दुर्योधन दुःशासनाला म्हणाला—" माझे सर्व अनुयायी मजबरोबर येण्यास सज्ज होऊं देत. त्वरा करा." दुःशासनाला असें बोलून तो जनेश्वर कर्णाला पुनः म्हणाला—" हे अरिंदमा, मी नरश्रेष्ठ भीष्माची अनुमति घेऊन सत्वर तुझ्याकडे येतों. तो शान्तनव एकदा समरांगणांतून दूर झाला कीं, तूं तुमुल युद्ध आरंभ.

हे महाराज, कर्णाला असें बोलून दुर्योधन आपल्या भ्रात्यांसह बाहेर पडला. त्यावेळीं तो कौरव देवांनीं परिवेष्टित असलेल्या इंद्राप्रमाणें शोभला. त्या व्याघ्रतुल्य पराक्रमी दुर्योधनाला दुःशासनानें मोठ्या त्वरेनें अश्वयुक्त रथांत बसविलें. तो राजा मार्गानें चालला असतां त्याचें मस्तक मुकुटानें व बाहु बाहुभूषणें, वलयें आणि मुद्रिका यांनीं शोभत होते. त्यानें अंगाला मंजिष्ठपुष्प, किंवा तप्तसुवर्ण यांच्यासारखी रक्तवर्ण चंदनाची उटी लावली होती. त्याचीं वस्त्रें धूलिरहित निर्मल असून, त्याची गति सिंहासारखी होती. याप्रमाणें तो राजा रथांतून त्वरेनें निघाला असतां आपल्या प्रभेनें आकाशांतील सूर्याप्रमाणें शोभला. तो नरव्याघ्र भीष्माच्या शिबिराकडे चालला असतां इंद्राला अनुसरणाऱ्या देवांप्रमाणें त्याचे भ्राते व लोकप्रसिद्ध धनुर्धर त्याच्या मागोमाग गेले. त्यांतील कोणी अश्वावर व कोणी गजावर आरूढ झाले होते. कित्येक रथांतून निघाले. कांहीं सुहृदांनीं राजाच्या संरक्षणार्थ हातांत शस्त्रें घेऊन, इंद्राच्या सभोंवार असणाऱ्या स्वर्गांतील देवांप्रमाणें त्याला परिवेष्टित केलें.

मार्गांतून सर्व दिशांतील लोक हात जोडून त्या राजाला प्रणाम करीत होते. त्यावेळीं दुर्योधन शस्त्रादि शिक्षणांत संपन्न असलेला आपला दक्षिण-बाहु उचलून त्यांच्या प्रणामाचा स्वीकार करीत होता. त्याचा तो उजवा हात गजशुंडेप्रमाणें दीर्घ, पुष्ट व शत्रुवधांत तत्पर होता. नानादेशांतील लोकांच्या मधुर वाणी त्याच्या कानीं पडत होत्या. सूत व मागध त्याची स्तुति करीत होते व तो जनेश्वर त्या सर्वांचा सत्कार करीत होता. ज्यांत सुवासिक तेल घातलें आहे, अशा सुवर्णाच्या प्रज्वलित पंचारत्या घेऊन कांहीं पुरुष त्या राजाच्या भोंवतीं जमले असतां, प्रदीप्त महाग्रहांनीं परिवेष्टित असलेल्या चंद्राप्रमाणें तो शोभला. त्यावेळीं सोनेरी शिरस्त्राणें घातलेले वेत्र-धारी मार्गांतील लोकांना विनयानें सावकाश बाजूला करीत होते. त्यांचे हात वेत्रदंडांनीं आकुल झाले होते. याप्रमाणें कौरवांनीं ज्याचा सन्मान केला आहे, असा तो बलाढ्य कौरवेश्वर आपले अनुयायी व सोदर भ्राते यांनीं परिवेष्टित होत्साता यशस्वी गांगेयाच्या शिबिरापाशीं येऊन पोंचला.

(३) भीष्माच्या शुभ सदनासमीप येतांच तो रथांतून सत्वर खालीं उत-रला, शिबिरांत प्रवेश करून भीष्माच्या सन्निध गेला व त्याला अभिवादन

करून विषण्ण मनानें श्रेष्ठ आसनावर बसला. तें उच्चासन सुवर्णाचें असून त्यावर मूल्यवान् आस्तरण घातलेलें होतें.

नंतर दुर्योधन हात जोडून अश्रुयुक्त नेत्रांनीं व सद्गदित कंठानें भीष्माला म्हणाला—"हे पितामह, तुझा आश्रय करून आम्ही इंद्रासह देवासुरांनाहि जिंकण्यास समर्थ आहों. मग सुहृद्गण व बांधव यांसह असलेल्या पांडव वीरांची काय कथा! तस्मात्, हे प्रभो, महेंद्रानें जसा दानवांचा नाश केला, तसा तूं वीर पांडुपुत्रांचा संहार कर. 'मी सोमक, पांचाल व केकयांसह करूषक यांचा वध करीन.' हें तुझें वचन सत्य होऊं दे. धनुर्धर, सोमक व पार्थ यांचा वध करून तूं सत्यवाक् हो. परंतु हे महाराज, तूं पांडवांच्या दयेमुळें व मजवरील द्वेषामुळें किंवा माझ्या मन्दभाग्यामुळें जर पांडवांचें रक्षण करीत असशील, तर कर्णाला युद्धाची अनुज्ञा दे. तो पांडवांना त्यांच्या सर्व सुहृद्गणांसह व बांधवांसह रणांत जिंकील."

याप्रमाणें सत्यविक्रम भीष्माला सांगून तुझा पुत्र दुर्योधन पुढें अधिक कांहीं न बोलतां स्वस्थ बसला. ६. ४. ९७

---

## अध्याय ९८ वा.

[ १ भीष्माचें दुर्योधनाला उत्तर. २ दुर्योधनाचें स्वशिबिरांत आगमन. ३ दुर्योधनाचें दुःशासनाला सर्ववृत्तकथन व वीरांना युद्धार्थ आज्ञा. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, तुझ्या पुत्रानें वाक्शल्यानें विद्ध केलेला तो उदार मनाचा भीष्म अतिशय दुःखी झाला, तरी त्यानें यत्किंचित्‌हि अप्रिय शब्द उच्चारला नाहीं. दुर्योधनाच्या कठोर वाणीनें खिन्न व क्रुद्ध झालेला तो महात्मा बराच वेळ सर्पाप्रमाणें उष्ण निश्वास सोडीत विचार करीत बसला. नंतर त्यानें नेत्र वर करून पाहिलें, तेव्हां तो क्रोधानें देवासुर व गंधर्व यांसह सर्व लोकांस दग्ध करीत आहे कीं काय असें भासलें. तो पितामह सामपूर्वक दुर्योधनाला म्हणाला—"दुर्योधना, तूं मला असा वाक्शल्यानें कां टोंचीत आहेस! मी तुझें प्रिय करण्याचा यथाशक्ति यत्न करीत आहें. तुझ्या इष्टप्राप्तीसाठीं मी समरांमध्यें प्राणांची आहुति देण्यासहि तयार आहें. असें असतांना पांडवांचा पराजय होत नाहीं, म्हणून तूं मलाच दोष देत आहेस! तथापि एकट्या धनंजयानें इंद्राचाहि पराभव करून अग्नीला खांडववन

समर्पण केलें. या व पुढील प्रसंगांचें केवल स्मरणच त्याच्या पराक्रमाचें निद-र्शन करण्यास पुरेसें आहे.

हे महाबाहो, तुला जेव्हां गंधर्वांनीं पराभूत करून बांधून नेलें, तेव्हां तुझे सर्व सोदर भ्राते व कर्ण यांनीं पलायन केलें असतां महात्म्या अर्जुनानेंच तुला त्यांच्या हातून मुक्त केलें. गोग्रहणप्रसंगीं विराटनगरींत तो एकटा पार्थच आपणां सर्वांवर चालून आला. त्यानें द्रोणाचार्यांचा व माझा पराजय करून तुम्हां सर्वांचीं वस्त्रें नेलीं. तसेंच कृप व द्रौणि यांनाहि जिंकून अभिमानी कर्णाचाहि पराभव केला आणि त्याचें वस्त्र उत्तरेला नेऊन दिलें. वासवालाहि दुर्जय असलेल्या निवातकवचांना युद्धांत पराभूत केलें. अशा प्रकारच्या त्या पांडु-पुत्राला युद्धांत जिंकण्यास कोण समर्थ आहे! शिवाय त्याचा रक्षक जगद्गोप्ता वासुदेव आहे. तो शङ्ख-चक्र-गदाधर अनन्तशक्ति सर्वेश्वर सृष्टिसंहारकारक आहे. तो सनातन परमात्मा त्याचें संरक्षण करीत असतां, त्याचा वध करण्यास कोण समर्थ आहे! हे सुयोधना, नारदादि महर्षींनीं तुला अनेक प्रकारें उपदेश केला असतां तूं मोहानें त्यांचें वचन ऐकलें नाहींस व आतां मला अवाच्य शब्द ऐकवीत आहेस!

मरणोन्मुख मनुष्य जसा सर्व वृक्षांना सुवर्णमय समजतो, तसा तूंहि सर्व विपरीत पहात आहेस. हे गांधारीपुत्रा, ज्याअर्थी तूंच स्वतः सृंजयांसह पांड-वांशीं फार मोठें वैर केलें आहेस. त्याअर्थी आतां त्यांच्याशीं युद्ध करून आपला पुरुषार्थ प्रकट कर.

शिखंडी खेरिज करून पांचालांसह सर्व सोमकांचा मी वध करीन. त्यांच्या-कडून हत झालेला मी यमालयीं जाईन. किंवा त्यांना मारून तुझें प्रिय तरी करीन. शिखंडी पूर्वी राजगृहांत जन्म पावला, तेव्हां स्त्री होता. पुढें यक्षाच्या वरदानानें पुरुष झाला. यास्तव पूर्वी स्त्री असलेल्या या शिखंडीवर मी प्राण गेला तरी कदापि शस्त्र उचलणार नाहीं. विधात्यानें त्याला ज्याअर्थी स्त्री-देहांत निर्माण केलें, त्याअर्थी तो स्त्रीच होय. हे गांधारे, जा, आतां सुखानें शयन कर. ज्या घोर संग्रामाचें जगाच्या अंतापर्यंत लोक कथन करतील, असें दारुण युद्ध मी उद्यां करीन!"

(२) भीष्माचें हें भाषण ऐकून तो जनेश्वर पितामहाला शिरसा वंदन करून आपल्या शिबिरांत परत आला व आपल्याबरोबर आलेल्या सर्व परिवारांस स्वगृहीं जाण्याची अनुज्ञा देऊन तो स्वतःच्या शयनगृहाकडे वळला.

ती रात्र जाऊन दिवस उजाडतांच तो नृपति प्रातःकालीं उठला व 'सेना सज्ज करा,' अशी राजांना आज्ञा करीत म्हणाला—"भीष्म अतिशय क्रुद्ध झाला आहे. तो आज युद्धांत सोमकांचा वध करणार आहे."

त्या रात्रीं दुर्योधनानें भीष्मापाशीं ज्या अनेक प्रकारें वल्गना केल्या, ती आपली स्तुति नसून निर्भर्त्सनाच होय, हें जाणून तो वृद्ध पितामह अतिशय खिन्न झाला. त्यानें स्वतःच्या पारतंत्र्याची निंदा केली व रणांगणांत अर्जुनाशीं प्रसंग आहे, हें जाणून तो दीर्घकाल विचारमग्न होऊन बसला.

(३) इकडे दुर्योधनानें भीष्म कसला विचार करीत आहे, हें मनानें जाणून दुःशासनाला अशी आज्ञा केली—"हे दुःशासना, भीष्माचें रक्षण करण्यासाठीं रथी सज्ज कर. आपलीं सर्व बावीस सैन्यें युद्धार्थ सज्ज होऊं देत. सैन्यांसह पांडवांचा वध करून त्यांचें राज्य आपल्याला प्राप्त व्हावें अशी जी फार वर्षांपासूनची माझी इच्छा, ती पूर्ण होण्याची वेळ आज आली आहे. यास्तव आज भीष्माचें रक्षण करणें, हें आपलें आद्यकर्तव्य आहे. आम्हीं साह्य केलें असतां तो आमचें रक्षण करून पांडवांचा संहार करील. त्या सरल मनाच्या महात्म्यानें आम्हांला स्पष्ट सांगितलें आहे कीं, शिखंडी पूर्वीं स्त्री होता म्हणून मी त्याच्यावर रणांत केव्हांहि शस्त्र उचलणार नाहीं. कारण मी युद्धांत स्त्रीला वर्ज्य समजतों. मीं जर या माझ्या प्रतिज्ञेचें पालन न केलें तर पित्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें मीं जो समृद्ध राज्य व स्त्री यांचा पूर्वीं त्याग केला, तो व्यर्थ होईल व त्याचें स्मरण देऊन लोक माझी निंदा करतील. यास्तव मी युद्धांत स्त्रीचा किंवा पूर्वीं जो स्त्री होता त्याचा वध कदापि करणार नाहीं. (उद्योगपर्वांत) 'उद्योग'-प्रसंगीं मीं सांगितलेलें वृत्त तुम्हांला स्मरत असेलच. हा शिखंडी जन्मतः स्त्री असून पुढें पुरुष झाला आहे. यास्तव तो माझ्याशीं युद्धाला उभा राहिल्यास मी त्याच्यावर कदापि बाण सोडणार नाहीं. त्याच्या वांचून इतर कोणीहि जयाची इच्छा करणारे पांडवांकडील क्षत्रिय युद्धांत माझ्या संमुख आले असतां मी त्यांचा क्षय करीन हें माझें वचन तुम्हा लक्षांत असेलच."

दुःशासना, याप्रमाणें शास्त्रवेत्त्या गांगेयानें मला स्पष्ट सांगितलें आहे. यास्तव आपण सर्वांनीं मिळून दक्षतेनें पितामहाचें रक्षण केलें पाहिजे, असें मी समजतों.

अरक्षित असलेल्या सिंहालाहि वृक मारूं शकतो, त्याप्रमाणें भीष्म जर संरक्षित नसला, तर या महायुद्धांत शिखंडीरूपी वृक त्याचा वध करील. यास्तव शकुनि, शल्य, कृप, द्रोण व विविंशति या सर्वांनीं मिळून भीष्माचें रक्षण करावें. तो महाधनुर्धर सुरक्षित असला कीं आपला जय निश्चित आहे."

दुर्योधनाचें हें वचन ऐकून तुझे सर्व पुत्र फार मोठ्या रथसमुदायांसह मोठ्या संतोषानें भीष्माला परिवेष्टित करून निघाले. ते जात असतां त्यांच्या पदन्यासांनीं पृथ्वी, आकाश व पांडवांचीं हृदयें हादरून सोडिलीं. कवचें घालून सज्ज झालेल्या त्या वीरांनीं रथ व गज यांना व्यवस्थित उभे करून भीष्माला वेढून टाकिलें. देवासुरांच्या युद्धांत इंद्राला परिवेष्टित करणाऱ्या देवांप्रमाणें ते पितामहाचें समंततः रक्षण करूं लागले.

तेव्हां दुर्योधन पुनः भ्रात्याला म्हणाला—हे दुःशासना, तो पहा, धनंजय शिखंडीचें रक्षण करीत आहे. त्याच्या डाव्या रथचक्राशीं युधामन्यु व उजव्या रथचक्राशीं उत्तमौजा स्थित आहे. याप्रमाणें ते शिखंडीचें संरक्षण करीत आहेत. यास्तव आपल्या वीरांना दक्षतेनें भीष्माचें रक्षण करण्यास सांग. तो शिखंडीच्या हातीं सांपडतां कामां नये.

भ्रात्यांचें हें भाषण ऐकून दुःशासन भीष्मांना पुढें करून सर्व सैन्यांसह निघाला. तेव्हां कौरवांच्या रथसमूहाच्या मध्यभागीं भीष्माला पाहून रथिश्रेष्ठ अर्जुन धृष्टद्युम्नाला म्हणाला—" हे पांचाला, आज नरव्याघ्र शिखंडीला भीष्माच्या समोर नेऊन उभें कर. मी स्वतः त्याचें रक्षण करितों." ६. ४. ९८.

---

## अध्याय ९९ वा.

[ १ कौरवांच्या सर्वतोभद्र व्यूहाचें वर्णन. २ पांडवांचा महाव्यूह. ३ दोन्ही सैन्यांचें युद्धार्थ निर्गमन. ४ उत्पातदर्शन.]

( १ ) **संजय**—हे महाराज, त्यानंतर शान्तनव भीष्म सेनेसह रणांगणांत आला व त्यानें ' सर्वतोभद्र '-नामक व्यूह रचला. त्या व्यूहाच्या अग्रभागीं कृपाचार्य, कृतवर्मा, शैब्य, शकुनि, जयद्रथ व सुदक्षिण कांबोज हे सर्व भीष्म आणि तुझे पुत्र यांसह स्थित झाले. द्रोण, भूरिश्रवा, शल्य व भगदत्त हे कवचें घालून उजव्या बाजूला उभे राहिले. अश्वत्थामा, सोमदत्त व

दोघे आवंत्य भ्राते यांनीं डाव्या बाजूचें रक्षण केलें. त्रिगर्तांनें ज्याला समंततः वेढलें आहे, असा दुर्योधन पांडवांशीं संग्राम करण्यासाठीं सैन्याच्या मध्यभागीं स्थित झाला. अलंबुषराक्षस व श्रुतायु कवचें घालून व्यूहाच्या पृष्ठभागाच्या रक्षणार्थ सज्ज झाले. याप्रमाणें तुझे योद्धे व्यूह रचून उभे राहिले असतां प्रज्वलित अग्नीप्रमाणें शोभले.

( २ ) त्यांचा हा व्यूह पाहून पांडवांनींहि महाव्यूहाची रचना केली व राजा युधिष्ठिर, भीमसेन, नकुल-सहदेव कवचें घालून सर्व सैन्याच्या अग्रभागीं स्थित झाले. धृष्टद्युम्न, विराट व सात्यकि हे मोठ्या सेनेसह त्यांच्यामागें उभे राहिले. त्यांच्या बाजूला शिखंडी, विजय, घटोत्कच, चेकितान व वीर्यवान् कुंतिभोज हे प्रचंड सैन्यांसह स्थित झाले. त्यांच्यामागें अभिमन्यु, द्रुपद, युयुधान, युधामन्यु व केकयभ्राते हे सर्व सज्ज होऊन युद्धार्थ उभे होते.

( ३ ) हे नृपाला, त्यानंतर ज्यांच्या अग्रभागीं भीष्म आहे, असे तुझे सर्व योद्धे आपापल्या सैन्यासह पांडवांवर चाल करून गेले. त्याचप्रमाणें भीष्माशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें पांडवहि भीमाला पुढें करून रणांगणांकडे निघाले. त्यावेळीं वीरांचे सिंहनाद, शंख, क्रकच, गोशृंग, भेरी, मृदंग, पणव, पुष्कर इत्यादिकांचा फार मोठा निर्घोष झाला. तो ऐकून कौरवांनींहि क्रुद्ध होऊन तशाच प्रकारच्या पृथक् पृथक् वाद्यांचा घोष केला व वीरांनीं अनेक प्रकारें सिंहनाद केले.

( ४ ) हे महाराज, त्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें असतां दोन्ही पक्षांतील वीर प्रतिपक्षांवर प्रहार करूं लागले. त्यांच्या रणगर्जनेनें वसुंधरा कंप पावली. पक्षी घोर शब्द करीत भ्रमण करूं लागले. उदय पावतांना तेजस्वी असलेला सूर्यहि निष्प्रभ झाला. महद्भयसूचक वायु वाहूं लागले. घोर स्वरूपी भालु भीषण शब्द करीत ‘ फार मोठा अनर्थ ओढवणार आहे ’ असें सूचवूं लागल्या. दश दिशा प्रज्वलित दिसूं लागल्या. रक्त व हाडें यांची वृष्टि होऊं लागली. धूळी उधळूं लागली. गज-अश्वादि वहानें जागच्याजागीं स्थित होऊन देहधर्म करूं लागलीं. त्यांच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. नरभक्षक राक्षसांचे भयंकर ध्वनि कानीं पडूं लागले. कोल्हे, कावळे इत्यादि मांसभक्षक पशु-पक्षी तेथें जमूं लागले. श्वान विविध प्रकारें अशुभ स्वरानें रोदन करूं लागले व महद्भयसूचक प्रज्वलित उल्का सूर्यावर आदळून भूमीवर पडूं लागल्या.

राजा, अशा त्या भयानक प्रसंगीं शंख-भेरींच्या ध्वनींनीं कौरव-पांडवांची प्रचंड सेना, वायूनें हालवून सोडलेल्या वनाप्रमाणें कांपूं लागली. त्या अशुभ वेळीं तीं क्षुब्ध झालेली दोन्हीं सैन्यें परस्परांच्या संमुख येत असतां त्यांचा झंझावातानें खवळणाऱ्या सागराप्रमाणें प्रचंड घोष झाला. ६. ४. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १ अभिमन्यूचा पराक्रम. २ दुर्योधनाची अलंबुषाला सौभद्राशीं युद्ध करण्याची आज्ञा. ३ अलंबुषाच्या गर्जनेनेंच पांडवसेनेचें पलायन. ४ राक्षस व द्रौपदेय यांचा संग्राम. ५ राक्षस व सौभद्रेय यांचें युद्ध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर अभिमन्यु आपल्या पिंगट वर्णाच्या रथांत बसून निघाला व त्यानें जलाची वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें शरवृष्टि करीत ( दुर्योधनावर ) चाल केली. तो शत्रुहंता सौभद्र क्रुद्ध होऊन शस्त्रौघाचा वर्षाव करीत तुझ्या अक्षय सेनासागरांत जेव्हां शिरला, तेव्हां त्याला स्वपक्षीय कोणीहि प्रतिबंध करूं शकला नाहीं. त्यानें सोडलेल्या शत्रुसंहारक बाणांनीं अनेक शूर क्षत्रियांना यमराजाच्या गृहीं पोंचविलें. राजा, त्या क्रुद्ध झालेल्या आर्जुनीनें समरांत यमदण्डोपम घोर, प्रज्वलित व सर्पतुल्य बाण सोडले. त्या वीरानें रथांसह रथ्यांस, अश्वांसह सादींस आणि गजांसह गजारोहींस विदीर्ण करून टाकिलें. त्याचें तें महत कर्म पाहून हृष्ट झालेल्या राजांनीं त्या अर्जुनपुत्राची प्रशंसा केली. वायु जसा कापसाच्या राशीला सर्व दिशांत उडवून देतो, तसें सौभद्रानें तुझ्या सैन्याला दाही दिशांत पळवून सोडिलें. त्या कुमारानें पळविलेल्या तुझ्या सैन्याली पंकांत रुतलेल्या गजांप्रमाणें कोणी त्राता मिळाला नाहीं.

याप्रमाणें तुझ्या सैन्याला पळवून लावून अभिमन्यु धूमरहित प्रज्वलित अग्नीप्रमाणें स्थित झाला. हे राजन्, कालानेंच प्रेरणा केलेल्या पतंगांना जसा अग्नि सहन होत नाहीं, तसा तो तेजस्वी अभिमन्यु तुझ्या सैन्याला असह्य झाला. हातांत वज्र धारण केलेल्या इंद्राप्रमाणें तो पांडवांचा महारथ सर्व शत्रूंवर प्रहार करीत असलेला दिसत होता. तो दाही दिशांत भ्रमण करीत असतां त्याचें तें सुवर्णपृष्ठयुक्त धनुष्य मेघांतील विद्युल्लेखेप्रमाणें चमकत होतें आणि त्या धनुष्यापासून सुटणारे तीक्ष्ण धारेचे बाण, ज्यांतील वृक्ष

पुष्पांनीं प्रफुल्ल झाले आहेत, अशा वनांतून गुंजारव करणाऱ्या भ्रमराच्या समूहाप्रमाणें शोभले.

तो सुभद्रापुत्र आपल्या सुवर्णयुक्त रथांतून संचार करीत असतां, कृप, द्रोण, अश्वत्थामा, बृहद्बल व जयद्रथ यांना आपल्या लाघवानें मोहित करीत होता. तो सूर्यमंडलाप्रमाणें शत्रुसैन्याला दग्ध करीत असतां त्याचें मंडलाकार धनुष्य आमच्या दृष्टीं पडत होतें. त्या कुमाराचें तें दुष्कर कर्म, हस्तलाघव व युद्धकौशल्य पाहून या लोकीं दोन अर्जुन आहेत, असेंच सर्व क्षत्रियांनीं मानिलें. त्या वीरानें जर्जर केलेली ती भारतीसेना मदानें मोहित झालेल्या एखाद्या प्रमदेप्रमाणें जागच्या जागीं स्थिर उभी राहिली.

त्या प्रचंड सैन्याला पळावयास लावून त्या पांडववीरानें, मयासुराला जिंकून देवगणांना संतोष देणाऱ्या वासवाप्रमाणें, आपल्या सुहृद्गणांना संतुष्ट केलें. त्या अर्जुनानें पळवून लावलेलें तें कौरवांचें सैन्य, मेघगर्जनेप्रमाणें दारुण आक्रोश करूं लागलें.

( २ ) पर्वकालीं वायूनें क्षुब्ध केलेल्या सागराच्या प्रचंड निर्घोषाप्रमाणें स्वसैन्याचा तो आर्तस्वर ऐकून दुर्योधन अलंबुषराक्षसाला म्हणाला—" हे महाबाहो, हा अभिमन्यु जणुकाय दुसरा धनंजयच असल्याप्रमाणें युद्ध करीत आहे. त्यानें देवसेनेला पळवून लावणाऱ्या वृत्रासुराप्रमाणें माझ्या सेनेला पळवून लाविलें आहे. हे राक्षसश्रेष्ठा, तूं सर्वविद्याविशारद आहेस. तुझ्यावांचून या संग्रामांत मला दुसरा कोणी समर्थ दिसत नाहीं. याचा विनाश करण्यास तूंच एक महत् औषधि आहेस. यास्तव हे वीरा, तूं सत्वर जा व युद्धांत त्या सौभद्राचा वध कर. आम्ही भीष्म-द्रोणांस पुढें करून अर्जुनाला गतप्राण करितों."

( ३ ) दुर्योधनाची ही आज्ञा ऐकतांच तो प्रतापवान् राक्षसेंद्र गर्जना करीतच रणांगणांत आला. त्याची ती गर्जना ऐकून वायूनें हलणाऱ्या समुद्राच्या ऊर्मीप्रमाणें पांडवांची सेना कंपित झाली. कांहीं सैनिक तर त्याच्या त्या भयंकर गर्जनेनें भयभीत होऊन आपल्या प्रिय प्राणांस मुकले व भूमीवर पडले. परंतु त्या राक्षसाला पाहून अभिमन्यु अतिशय हृष्ट झाला. तो आपलें शरांसह धनुष्य घेऊन जणुकाय नृत्य करीतच राक्षसावर धांवला. तेव्हां राक्षसहि संतापून त्याच्यावर तुटून पडला व त्यानें तेथें जवळ असलेली पांडवसेना पळवून

लावली. देवसेनेला जसें बलदैत्यानें पराभूत केलें, तसें त्या राक्षसानें पांडवांच्या सेनेला जर्जर केलें. तो राक्षस युद्ध करीत असतां पांडवसेना अतिशय व्यथित झाली. त्यानें आपला पराक्रम प्रदर्शित करीत सहस्रावधि बाण सोडून त्या सैन्याला उधळून लाविलें. तेव्हां पांडवसेनेनें त्या घोर राक्षसाच्या भयानें रणांगणांतून पलायन केलें.

( ४ ) याप्रमाणें सेनेचें मर्दन करून तो राक्षस पांच द्रौपद्रेयांकडे वळला. त्याला पाहतांच पांच ग्रह जसे रवीवर धांवतात, तसे ते पांच राजपुत्र त्याच्यावर तुटून पडले आणि घोर प्रलयकालीं चंद्राला पीडणाऱ्या पांच ग्रहांप्रमाणें त्या तेजस्वी द्रौपदेयांनीं राक्षसाला पीडा दिली.

प्रथम युधिष्ठिराच्या पराक्रमी प्रतिविंध्य पुत्रानें तीक्ष्ण बाणांनीं राक्षसाला विद्ध केलें. त्यामुळें त्याच्या कवचाचे तुकडे झाले व तो राक्षस सूर्यकिरणांनीं युक्त असलेल्या मेघाप्रमाणें शोभला. सोनेरी पिच्छयुक्त बाण अंगांत रुतल्यामुळें अलंबूष आर्ष्यशृंगी पर्वताच्या प्रज्वलित शृंगाप्रमाणें दिसूं लागला. नंतर त्या पांची भ्रात्यांनीं सुवर्णानें भूषविलेले दीप्त शर राक्षसावर सोडिले. ते शर क्रुद्ध सर्पासारखे घोर होते. त्यांनीं व्यथित झालेला तो राक्षस नागेंद्राप्रमाणें संतप्त झाला. त्या महारथांनीं पीडिलेल्या त्याच्या डोळ्यांपुढें अंधकार पसरला व तो क्षणभर मूर्च्छित होऊन रथांत बसला.

नंतर सावध होतांच अलंबुषाचा क्रोध पूर्वीपेक्षां द्विगुणित झाला. त्यानें त्या पांची वीरांचीं धनुष्यें, बाण व ध्वज यांचा छेद केला. नंतर त्या प्रत्येकावर पांच पांच बाण सोडून आपल्या रथांत जणुं काय नृत्यच करीत त्या महा बलाढ्य वीरांचे अश्व व सारथि यांचा वध केला आणि अनेक आकारांचे सहस्रावधि शर सोडून त्या विरथ झालेल्या राजपुत्रांच्या वधेच्छेनें तो राक्षस धांवून गेला.

( ५ ) तो दुरात्मा राक्षस आपल्या भ्रात्यांना व्यथा देत आहे, हें पहातांच अभिमन्यु मोठ्या त्वरेनें राक्षसावर धांवला. त्या दोघांचें वृत्र-वासवांप्रमाणें घोर युद्ध जुंपलें. तें पांडव व तुझे वीर पहातच राहिले. ते दोघेहि क्रोधानें संतप्त झाले होते. त्यांचे नेत्र आरक्त दिसत होते व ते कालाग्नीप्रमाणें परस्परांकडे पहात होते. पूर्वीं देवासुरांच्या युद्धप्रसंगीं झालेल्या शक्र-शंबरांच्या संग्रामाप्रमाणेंच या दोघां बलाढ्य वीरांचें घोर व उद्वेगजनक युद्ध जुंपलें. ६.४.१००.

---

## अध्याय १०१ ला.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ सौभद्रेय-अलंबुषांच्या युद्धाचें वर्णन. ४ राक्षसाचा पराभव व पलायन. ५ भीष्माची अभिमन्यूवर चाल. ६ भीष्मादिकांचें संकुलयुद्ध. ७ सात्यकि-द्रौणि संग्राम. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, शूर अभिमन्यु महारथांचाहि संहार करीत असतां, अशा धनुर्धराशीं अलंबुषानें कसें युद्ध केलें ? आणि शत्रूंच्या वीरांचा संहार करणाऱ्या सौभद्रेयानें त्याच्याशीं प्रतियुद्ध कसें केलें ? त्याचप्रमाणें धनंजय रथिश्रेष्ठ भीम, राक्षसश्रेष्ठ घटोत्कच, नकुल, सहदेव आणि महारथ सात्यकि यांनीं माझ्या सैन्याची युद्धांत काय अवस्था केली ? हें सर्व मला तत्त्वतः सांग. तूं वर्णन करण्यांत कुशल आहेस, यास्तव युद्धांतील सविस्तर वृत्तान्त मला कथन कर.

( २ ) **संजय**—महाराज, ठीक आहे. सौभद्र व अलंबुष यांचा अंगावर रोमांच आणणारा संग्राम कसा झाला, तें मी तुला सांगतों ऐक. त्याचप्रमाणें अर्जुन, भीम, नकुल व सहदेव यांनीं रणांत केलेला पराक्रम व भीष्म-द्रोणादि वीरांनीं निर्भयपणें केलेलीं विचित्र कर्में यांचें समग्र वर्णन मी तुला सांगतों. तें ऐक.

( ३ ) अलंबुष राक्षस मोठ्यानें गर्जना करीत महारथ सौभद्राला 'थांब, थांब, उभा रहा' असें वारंवार बजावीत मोठ्या वेगानें त्याच्यावर चालून गेला. तेव्हां अभिमन्युहि आपल्या पित्याचा वैरी जो आर्ष्यशृंगी राक्षस, त्यावर धांवला. ते दोघे रथिश्रेष्ठ मोठ्या वेगानें आपले रथ घेऊन देव-दानवांप्रमाणें परस्परांवर तुटून पडले. तो राक्षसश्रेष्ठ मायावी होता व अर्जुनपुत्र दिव्यास्त्रसंपन्न होता. हे महाराज, सौभद्रेयानें प्रथम तीन तीक्ष्ण बाण व त्याच्या मागोमाग पांच बाण राक्षसावर सोडले. राक्षसानेंहि त्या पांडवेयाच्या हृदयावर नऊ बाण सोडले व अंकुशानें जसें महाद्वीपाला टोंचावें, तसें त्याला विद्ध केलें. नंतर सहस्रावधि शरांची वृष्टि करून त्या निशाचरानें अर्जुनाच्या पुत्राला पीडा दिली.

त्यावेळीं क्रुद्ध झालेल्या अभिमन्यूनें नऊ नतपर्व शर सोडून त्या राक्षसाचें वक्षःस्थल विद्ध केलें. ते बाण राक्षसाच्या मर्मांचा भेद करून त्याच्या देहांत

रुतले. त्यामुळें क्षतयुक्त झालेल्या त्याच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें व त्यामुळें तो प्रचंड राक्षस प्रफुल्ल पलाशवृक्षांनीं व्यापलेल्या पर्वताप्रमाणें शोभला. किंवा त्याच्या शरीरांत रुतलेल्या त्या सुवर्णपुंखयुक्त शरांनीं तो ज्वालामुखी पर्वतासारखा दिसला.

तो राक्षस अतिशय क्षुब्ध झाला व त्यानें त्या महेंद्रतुल्य फाल्गुनीला शरवृष्टीनें आच्छादित केलें. त्याचे ते यमदंडतुल्य बाण अभिमन्यूला विद्ध करून पृथ्वींत शिरले. त्याचप्रमाणें आर्जुनीच्या विशिख बाणांनींहि राक्षसाला भेदून धरणींत प्रवेश केला. नंतर मयाला पराभूत करणाऱ्या वासवाप्रमाणें अभिमन्यूनें नतपर्व बाणांनीं त्या राक्षसाला युद्धविमुख केलें.

( ४ ) त्यावेळीं राक्षसानें शत्रूला ताप देणारी तामसी महामाया प्रकट केली. त्यामुळें सर्वत्र गाढ अंधकार पसरला. अभिमन्यु किंवा स्वतःचे व शत्रूचे लोक दिसेनासे झाले. तेव्हां अभिमन्यूनें तें घोर महत्तम पाहून 'भास्कर'-नामक उग्र अस्त्र अभिमंत्रित केलें. त्यानें त्या मायिक अंधकाराचा नाश होऊन सर्व जगत् प्रकाशयुक्त झालें. याप्रमाणें त्या कार्ष्णीनें राक्षसाची माया नष्ट करून त्याला नतपर्व बाणांनीं आच्छादित केलें. त्यानंतर राक्षसानें अनेक प्रकारच्या माया प्रकट केल्या, पण सर्वास्त्रवेत्त्या फाल्गुनीनें त्या सर्व मायांचें निवारण केलें. आपल्या सर्व माया नाश पावून उलट आपल्यावरच शरवृष्टि होत आहे, हें पाहून तो घोर राक्षस भयभीत झाला व आपला रथ तेथेंच टाकून रणांगणांतून पळून गेला.

(५) याप्रमाणें कपटयुद्धनिपुण राक्षसाला पराभूत करून तो आर्जुनि, पद्मयुक्त पद्मिनीला आपल्या पदाघातानें तुडविणाऱ्या मदोन्मत्त गंधनागेंद्राप्रमाणें तुझ्या सैन्याचा संहार करूं लागला. तेव्हां आपलें सैन्य भीतीनें पळत आहे, हें पाहून शान्तनव भीष्मानें फार मोठा शरवर्षाव करून अभिमन्यूचें निवारण केलें. कौरवांच्या महारथ्यांनीं त्याला समंततः परिवेष्टित केलें व त्या एकट्या वीराला अनेक वीरांनीं शरांनीं झांकून टाकिलें. पण पितृतुल्य पराक्रमी असलेल्या त्या रथिश्रेष्ठाचें बल व विक्रम वासुदेवाच्या सदृश होतीं. त्या शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ वीरानें आपला पिता व मातुल या उभयतांच्या तुल्य अनेक प्रकारें दुष्कर कर्म करून दाखविलें.

( ६ ) इतक्यांत तुझ्या सैनिकांचा संहार करणारा धनंजय पुत्राचें रक्षण

करण्याच्या इच्छेनें भीष्माजवळ येऊन पोंचला. तेव्हां सूर्याला ग्रासणाऱ्या राहूप्रमाणें तुझा देवव्रत पिता अर्जुनाकडे वळला. तें पाहून तुझे पुत्र रथ, अश्व व गज यांसह भीष्माला वेढून त्याचें रक्षण करूं लागले आणि पांडवहि सज्ज होऊन मोठ्या दक्षतेनें धनंजयाचें संरक्षण करूं लागले. नंतर भीष्माच्या संमुख स्थित असलेल्या पार्थाला कृपाचार्यांनें विद्ध केलें. तेव्हां पांडवांचें प्रिय करण्याच्या इच्छेनें हत्तीवर उडी टाकणाऱ्या सिंहाप्रमाणें सात्यकीनें कृपाला तीक्ष्ण शरांनीं व्यथित केलें. कृपानें त्वरा करून सात्यकीच्या हृदयावर नऊ बाण सोडले. सात्यकीनें क्रुद्ध होऊन धनुष्य आकर्ण ओढलें व कृपाचा अंत करणारा तीक्ष्ण बाण सोडला. त्या इंद्राच्या अशनीसारखा प्रज्वलित शराचा अश्वत्थाम्यानें अंतरिक्षांत द्विधा छेद केला.

नंतर तो रथिश्रेष्ठ सात्यकि कृपाला सोडून चंद्रावर धांवणाऱ्या राहूप्रमाणें द्रौणीवर धांवला. द्रोणपुत्रानें त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे केले व शरांनीं त्याला ताडन केलें. तेव्हां सात्यकीनें दुसरें धनुष्य घेतलें व द्रौणीच्या बाहूंवर आणि हृदयावर सहा बाण सोडले. त्या बाणांनीं विह्वल झालेल्या द्रौणीला मूर्च्छा आली व तो ध्वजयष्टीच्या आधारानें रथांत बसला.

क्षणभरानें अश्वत्थामा सावध झाला व त्यानें क्रोधसंतप्त होऊन सात्यकीवर नाराच बाण सोडला. तो बाण त्याला विद्ध करून वसंतऋतूंत बिळांत शिरणाऱ्या बालसर्पाप्रमाणें भूमींत शिरला. नंतर अश्वत्थाम्यानें दुसरा एक भल्लबाण सोडून सात्यकीचा ध्वज खालीं पाडविला, मोठ्यानें सिंहनाद केला आणि ग्रीष्मऋतूंत सूर्याला आच्छादित करणाऱ्या मेघांप्रमाणें घोर शरांच्या वृष्टीनें त्याला झांकून टाकिलें. परंतु सात्यकीनें त्या सर्व शरांचा छेद करून द्रौणीलाच अनेक शरांनीं आच्छादित केलें आणि तो अभ्रांतून बाहेर पडलेल्या सूर्याप्रमाणें शरजालांतून मुक्त होऊन द्रौणीला ताप देऊं लागला. त्यानें त्याच्यावर पुनः सहस्रावधि बाण सोडले व मोठ्यानें सिंहनाद केला.

( ७ ) राहूनें ग्रासलेल्या चंद्राप्रमाणें आपल्या पुत्राला पीडिलेलें पाहून प्रतापवान् द्रोण शैनेयावर धांवून गेला. सात्यकीनें त्रस्त केलेल्या आपल्या पुत्राच्या संरक्षणासाठीं द्रोणानें तीक्ष्ण 'पृषत्क' बाण सात्यकीवर सोडला. तेव्हां सात्यकीनें द्रोणपुत्राला सोडून दिलें व द्रोणाला वीस पोलादी बाणांनीं विद्ध केलें.

याच संधीस अमेयात्मा अर्जुन चवताळून द्रोणावर धांवला. हे महाराज, त्यावेळीं अंतरिक्षांतील बुध-शुक्रांच्या युतीप्रमाणें ते दोघे द्रोण-पार्थ परस्परांच्या समीप शोभूं लागले. ६. ४. १०१.

---

## अध्याय १०२ रा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ द्रोण-पार्थसंग्राम. ४ पार्थाचें त्रिगर्ताशीं अस्त्रयुद्ध. ५ पांडवांचें निरोधन. ६ भीमानें केलेला गजसैन्याचा पराभव. ]

**धृतराष्ट्र**—हे संजया, धनुर्धर द्रोण व धनंजय हे दोघेहि पुरुषव्याघ्र सज्ज होऊन रणांगणांत परस्परांच्या समीप कसे आले, तें मला सांग. धीमान् द्रोणाचार्याला पार्थ सर्वदा प्रिय आहे व पार्थाची द्रोणाचार्यावर अतिशय भक्ति आहे. असें असतां मदोन्मत्त सिंहासारखे ते दोघे हृष्ट चित्तानें व उत्साहानें परस्परांवर कसे चालून गेले ? तें कथन कर.

( २ ) **संजय**—हे महाराज, त्या संग्रामांत द्रोणानें 'हा पार्थ आपला प्रिय शिष्य आहे' याची ओळख दिली नाहीं, किंवा पार्थानें 'हा द्रोण आपला आचार्य आहे,' याचीहि क्षात्रधर्माला अनुसरून जाणीव दाखविली नाहीं. कारण हे राजा, क्षत्रिय रणामध्यें आपल्या प्रिय आप्तजनांसहि वर्ज्य करीत नसतात. ते पिता, भ्राता, यांच्याशींहि अमर्याद युद्ध करीत असतात.

( ३ ) हे भारता, पार्थानें प्रथम द्रोणावर तीन बाण सोडले, तथापि द्रोणानें त्या पार्थचापापासून सुटलेल्या शरांकडे लक्षहि दिलें नाहीं. तेव्हां पार्थानें पुनः शरवृष्टीनें त्याला आच्छादित केलें. तें पाहून तो आचार्य प्रज्वलित अग्नीप्रमाणें संतप्त झाला व त्यानें नतपर्व बाणांचा वर्षाव करून अर्जुनाला तत्काल झांकून टाकिलें.

इतक्यांत दुर्योधनानें सुशर्म्यास द्रोणाच्या बाजूला राहून त्याचें रक्षण करण्याची आज्ञा केली. तत्काल क्रुद्ध झालेला सुशर्मा पुढें सरसावला व त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून पार्थावर बाणांची वृष्टि केली. त्यावेळीं द्रोण व सुशर्मा यांनीं सोडलेले ते शर अंतरिक्षांत शरत्कालीं संचार करणाऱ्या हंसांच्या समुदायाप्रमाणें शोभले. ते बाण मधुर फलांनीं युक्त असलेल्या वृक्षावर तुटून पडणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें पार्थावर येऊन पडले.

तथापि अर्जुनानें त्या सर्वांचें निवारण करून मोठ्यानें सिंहनाद केला व सुशर्म्यास त्याच्या पुत्रांसह विद्ध केलें. प्रलयकालीन कालाप्रमाणें पार्थ जरी त्यांचा संहार करण्यास उद्युक्त झाला होता, तरी ज्यांनीं मरणाचा कृतनिश्चयच केला आहे, असे ते योद्धे पार्थाच्या समीप येत होते. त्यांनीं धनंजयाच्या रथावर शरवृष्टि केली असतां, जलवृष्टि धारण करणाऱ्या पर्वताप्रमाणें पार्थानें तिचें धारण केलें व आपल्या शरौघानें त्या शरजालाला अंतरिक्षांतच नष्ट केलें. त्यावेळीं पार्थाचें विलक्षण हस्तलाघव आमच्या दृष्टीं पडलें. अनेक योद्धे त्याच्यावर दुरासद शरवृष्टि करीत होते व तो एकटा पांडुपुत्र त्या सर्वांचें, अभ्रांना उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें निवारण करीत होता. पार्थाचें तें दुष्कर कर्म पाहून देव-दानवहि संतुष्ट झाले.

( ४ ) त्यानंतर त्या कौंतेयानें त्रिगर्तांवर वायव्यास्त्र सोडलें, त्यामुळें तत्काल प्रचंड वायु वाहूं लागले. नभस्तल क्षुब्ध झाले, वृक्ष उन्मुळून पडले आणि सैनिकांचा संहार झाला. तें दारुण वायव्यास्त्र पाहून द्रोणानें घोर शैलास्त्र सोडलें. द्रोणाच्या त्या पर्वतास्त्रानें वायु तत्काल शांत झाला व सर्व दिशा प्रसन्न दिसूं लागल्या.

धनंजयानें त्रिगर्तांच्या श्रेष्ठ रथ्यांना निरुत्साह व पराक्रमशून्य करून त्यांना पराभूत केलें. त्यांना युद्धपराङ्मुख झालेलें पाहून दुर्योधन, कृप, अश्वत्थामा, शल्य, काम्बोज, सुदक्षिण, आवंत्य भ्राते, विन्दानुविंद आणि बाह्लिकवीरांसह बाह्लिकाधिप या सर्वांनीं मिळून प्रचंड रथसमुदाय बरोबर घेऊन पार्थाच्या सर्व दिशा निरुद्ध केल्या.

( ५ ) त्याचप्रमाणें महाबलाढ्य भगदत्त व श्रुतायु यांनीं गजसैन्याच्या योगानें भीमाला समंततः वेढून टाकलें. भूरिश्रवा, शल व सौबल यांनीं तीक्ष्ण शरजालांनीं उभयतः माद्रीपुत्रांना झांकून टाकिलें आणि कौरवसेनेसह भीष्मानें युधिष्ठिराला सर्व बाजूंनीं वेढा दिला. आपल्याला गजसैन्य वेढून टाकीत आहे, हें पाहून भीमसेन, अरण्यांतील सिंहाप्रमाणें जिभल्या चाटूं लागला. नंतर त्यानें हातांत गदा घेऊन रथांतून उडी टाकली व तुझ्या सैन्याला भयभीत केलें.

( ६ ) गदाधर वृकोदराला सज्ज झालेलें पाहून सर्व गजसादींनीं दक्षतेनें त्याला सर्वतः वेढून टाकिलें. त्यावेळीं गजसैन्याच्या मध्यभागीं स्थित असलेला

भीमसेन अभ्रांनीं परिवेष्टित झालेल्या सूर्याप्रमाणें शोभला आणि अभ्रांना उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें भीमानें आपल्या गदाघातांनीं तें गजसैन्य छिन्नविछिन्न करून टाकिलें.

बलाढ्य भीमसेनाकडून वध पावणारें तें गजसैन्य आर्तस्वर करूं लागलें असतां त्यांचा तो चीत्कार मेघगर्जनेप्रमाणें भासला. त्या मत्त गजांनीं वृकोदरावर आपल्या दंतांनीं व शुंडांनीं प्रहार केले होते, त्या क्षतांतून रक्त वहात होतें. त्यामुळें तो पांडुपुत्र फुललेल्या अशोकवृक्षाप्रमाणें शोभला.

त्या बलाढ्य वृकोदरानें कित्येक गजांचे दांत धरून ते उपटून टाकिले. कांहींचे दंत भग्न झाले. कांहींच्या मस्तकांवर त्या दांतांनींच प्रहार करून हातांत दंड धारण करणाऱ्या अंतकाप्रमाणें त्यांस गतप्राण करून खालीं पाडविलें. त्यावेळीं मेद व मज्जा यांनीं लिप्त झालेला व रक्तानें जणुं काय स्नानच केलेला भीमसेन रक्तानें माखलेली गदा हातांत घेऊन उभा असतां साक्षात् रुद्राप्रमाणें दिसला.

राजा, याप्रमाणें भीमानें संहार चालविला असतां अवशिष्ट राहिलेले कांहीं मत्त गज दश दिशांत पळून गेले व पळत असतां आपलेंच सैन्य पायांखालीं तुडवूं लागले. याप्रमाणें गजसैन्याचा पराभव होऊन महागजांनींहि रणांगणांतून पलायन केलेलें पाहून दुर्योधनाचें सर्व सैन्य पुनः युद्धपराङ्मुख झालें. ६. ४. १०२.

---

## अध्याय १०३ रा.

[ १ भीष्माचें पांडवांच्या वीरांशीं संकुल युद्ध. २ कौरववीरांचें पांडवांच्या योद्ध्यांशीं युद्ध. ३ रणांगणाचें वर्णन. ४ संजयानें कथन केलेलें धृतराष्ट्राच्या अन्यायाचें फल. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, मध्याह्नसमयीं भीष्माचा सोमकाशीं लोकक्षयकर क्रूर संग्राम प्रवृत्त झाला. रथिश्रेष्ठ गांगेयानें सहस्रावधि तीक्ष्ण बाण सोडून पांडवांच्या सेनेला क्षतविद्ध केलें व शेतांतील धान्याच्या राशीला वृषभ जसे तुडवितात, तसें तुझ्या देवव्रत पित्यानें पांडवसैन्याचें मर्दन चालविलें.

धृष्टद्युम्न, शिखंडी, विराट व द्रुपद यांनीं महारथ भीष्मावर शर सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां भीष्मानें धृष्टद्युम्न व विराट यांना तीन तीन शरांनीं विद्ध करून, द्रुपदावर एक नाराच बाण सोडला. शत्रूंचें कर्शन करणाऱ्या धनुर्धर भीष्मानें विद्ध केलें असतां, पायानें डवंचलेल्या सर्पांप्रमाणें ते वीर क्रुद्ध झाले व शिखंडीनें पितामहाला विद्ध केलें. परंतु हा शिखंडी 'स्त्री' होता, हें मनांत आणून भीष्मानें त्यावर उलट प्रहार केला नाहीं.

धृष्टद्युम्नानें प्रज्वलित अग्नीप्रमाणें संतप्त होऊन पितामहाचे दोन बाहू व हृदय यांवर तीन बाण सोडले. द्रुपदानें पंचवीस व विराटानें दहा शर सोडले आणि शिखंडीनें भीष्माला पंचवीस बाणांनीं विद्ध केलें. त्यावेळीं अतिशय विद्ध झालेल्या त्या वृद्ध पितामहाचा क्षतयुक्त देह, वसंतऋतूंतील तांबड्या रंगाच्या प्रफुल्ल अशोकवृक्षाप्रमाणें शोभला. भीष्मानें त्यांच्यावर सरळ जाणारे तीन तीन बाण सोडले. त्यानें भल्लबाणानें द्रुपदाचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां त्यानें दुसरें धनुष्य घेऊन भीष्मावर पांच बाण सोडले व तीन बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें.

( २ ) त्यानंतर युधिष्ठिराला पुढें करून भीम, द्रौपदीचे पांच पुत्र, पांच केकयभ्राते, सात्वतश्रेष्ठ सात्यकि व धृष्टद्युम्न हे सर्व गांगेयावर धांवून गेले आणि धृष्टद्युम्नादिक पांचालाच्या रक्षणार्थ सज्ज झाले. त्याचप्रमाणें भीष्माचें रक्षण करण्यासाठीं तुझ्या पक्षांतील वीरहि पुढें सरसावले व सैन्यासह पांडव-सेनेवर चालून गेले. तेव्हां त्यांच्या व तुझ्या पक्षांतील नर, अश्व, गज व रथ यांचें तुमुल युद्ध जुंपलें. तो त्यांचा संग्राम यमराज्याची वृद्धि करणारा होता. रथी, अश्वसादी, गजारोही व पदाति प्रतिस्पर्ध्यांवर प्रहार करून त्यांस यम-लोकीं पाठवीत होते. योद्धे विविध प्रकारचे शर परस्परांवर सोडीत होते. सारथि, हत झालेले अश्व, ज्यांतील रथी वध पावले आहेत, अशा रथांना ओढीत दशदिशांत पळत सुटले. त्यांनीं अनेक नर व अश्व यांचें मर्दन चालविलें. ते प्रचंड रथी अतिशय वेगानें पळत असल्यामुळें आकाशांतील गंधर्वनगराप्रमाणें भासले.

( ३ ) तसेच अनेक नृपति व रथी रथहीन होऊन सामान्य प्राकृतजनां-प्रमाणें पळतांना दिसत होते. ते कवचयुक्त असून कुंडलें, शिरस्त्राणें व बाहु-भूषणें यांनीं अलंकृत होते. त्या सर्वांची कांति देवपुत्रांसारखी होती. युद्धां-

तील पराक्रम शक्रासारखा होता. ते आपल्या ऋद्धीनें कुबेराचें व नयानें बृहस्पतीचें अतिक्रमण करणारे होते.

ज्यांच्या पाठीवरील योद्धे हत झाले आहेत, असे श्रेष्ठ गज आपलेंच सैन्य पायांखालीं तुडवीत इतस्ततः धांवत होते. चित्रविचित्र कवचें, शुभ्र छत्रें व चामरें सर्वतः पसरलीं होतीं. ते प्रचंड गज नवमेघाप्रमाणें घननील असून मेघगर्जनेसारखाच चीत्कार करीत होते.

सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषविलेले व नानादेशांतून आलेले अश्व वायुगतीनें समंततः धांवत होते. त्याचप्रमाणें ज्यांचे अश्व गतप्राण झाले आहेत, असे अश्वसादी हातांत खड्ग घेऊन इतस्ततः भटकत होते. अश्व, गज, रथ, पुढें जें येईल त्यांस तुडवीत चालले होते. अशा प्रकारें दारुण संग्राम प्रवृत्त झाला. तेथें रक्ताची नदीच निर्माण झाली. ही नदी यमराष्ट्राचें विवर्धन करणारी होती. अनेक महारथ शूर क्षत्रिय या नदीला रथ-अश्व-गजरूपी नौकांतून निर्भयपणें तरून गेले. परंतु जे भीरु होते, ते मूर्च्छेनें आकुल झाले व मृतांना यमलोकीं नेणाऱ्या वैतरणीप्रमाणें या नदींत वाहून गेले.

तो प्राणांचा नाश करणारा भयंकर संग्राम पाहून तेथें जमलेले क्षत्रिय आक्रोश करीत परस्परांस 'अरे अरे, दुर्योधनाच्या अपराधानें या सर्व क्षत्रियांचा क्षय होत आहे. लोभानें मोहित झालेल्या पापात्म्या धृतराष्ट्राजानें गुणवान् पांडुपुत्रांशीं द्वेष तरी कसा केला?'—असें म्हणूं लागले.

याप्रमाणें पांडवांची स्तुति व तुझ्या पुत्रांची दारुण निंदा सर्व योद्ध्यांच्या मुखानें सर्वत्र ऐकूं येत होती. ती ऐकून सर्व जगताचा अपराधी दुर्योधन उद्वेग पावला व भीष्म, द्रोण, कृप व शल्य यांना म्हणाला—"अहंकार सोडून युद्ध करा, व्यर्थ वेळ कां घालवितां?"

दुर्योधनाचे ते शब्द ऐकतांच द्यूतांतील अक्षांमुळें उद्भवलेला तो घोर संग्राम पुनः प्रवृत्त झाला.

(४) हे वैचित्रवीर्या, पूर्वीं अनेक महात्म्यानीं तुझें निवारण केलें असतांहि तूं तें ऐकलें नाहींस. त्याचें हें दारुण फल कसें प्राप्त झालें आहे, पहा! पांडव, त्यांचें सैन्य व अनुयायी यांतील कोणीच आपल्या प्राणांची पर्वा करीत नाहींत.

---

१ येथील रक्ताच्या नदीचें सर्व रूपक गाळलें आहे. कारण तें पूर्वीं पुष्कळदां येऊन गेलें आहे.

त्याचप्रमाणें कौरवहि जीवावर उदार होऊन युद्ध करीत आहेत. तस्मात्, हे महाराज, दैवामुळें म्हण किंवा तुझ्या अन्यायामुळें म्हण, पण हा स्वजनांचा विनाश करणारा घोर संग्राम प्रवृत्त झाला आहे खरा ! ६. ४. १०३.

---

## अध्याय १०४ था.

[ १ कौरवसेनेचें पलायन. २ दुर्योधनाचें सुशर्म्याच्या रक्षणार्थ गमन. ३ भीष्मार्जुन युद्ध. ४ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—हे राजन्, नरव्याघ्र अर्जुनानें तीक्ष्ण बाण सोडून सुशर्म्याच्या अनुयायी नृपांना यमसदनीं पाठविलें. सुशर्म्यानेंहि पार्थाला बाणांनीं विद्ध केलें. त्यानें वासुदेवावर सात व पार्थावर नऊ शर सोडिले. परंतु त्या इंद्रपुत्र धनंजयानें त्या सर्वांचें शरौघानें निवारण केलें. सुशर्म्याच्या योद्ध्यांना गतप्राण केलें. प्रलयकालच्या अंतकाप्रमाणें पार्थाकडून वध पावणारे ते महारथ भयभीत होऊन पळूं लागले. कोणी आपले अश्व सोडून, कित्येक गजांचा त्याग करून, तर कांहीं रथांतून उतरून दाहीं दिशांत अतिशय त्वरेनें पळत सुटले. पदातिहि हातांतील शस्त्रें टाकून निराशेनें भिन्न भिन्न मार्गानें पलायन करूं लागले. सुशर्मा व इतर पार्थिव यांनीं त्यांचें निवारण केलें, तथापि ते युद्धाला उभे राहिले नाहींत.

( २ ) याप्रमाणें स्वसैन्य युद्धांतून पळत आहे, हें पाहून दुर्योधन त्रिगर्तांच्या रक्षणासाठीं भीष्माला पुढें करून अवशिष्ट राहिलेल्या सर्व सैन्यासह पार्थावर धांवला. त्यावेळीं एकटा धनंजय आपल्या भ्रात्यांसह रणांगणांत स्थित होता व नानाविध शरांची वृष्टि करीत होता. पांडवांवांचून इतर सर्व योद्धे रणांगणांतून पळून गेले होते.

( ३ ) दुर्योधन आपल्यावर चालून येत आहे, हें पहातांच सर्व पांडुपुत्र सज्ज होऊन धनंजयाचें रक्षण करीत जेथें भीष्म होता, तेथें आले. अर्जुनाचें घोर सामर्थ्य जरी ते जाणत होते, तरीहि हाहाकारानें ज्यांचा उत्साह वाढला आहे, असे होत्साते ते भीष्माच्या संमुख गेले. तालध्वजानें युक्त असलेल्या गांगेयानें नतपर्व बाणांनीं पांडवांच्या सेनेला आच्छादित केलें.

( ४ ) याप्रमाणें कौरव-पांडव एकत्र जमून त्यांचें युद्ध जेव्हां प्रवृत्त झालें तेव्हां सूर्य मध्यावर आला होता. शूर सात्यकीनें कृतवर्म्यावर पांच बाण सोडले व नंतर सहस्रावधि बाणांची वृष्टि करीत तो समरांगणांत स्थित झाला. द्रुपदानें

तीक्ष्ण शरांनीं द्रोणाला विद्ध केलें व पांच बाणांनीं त्याच्या सारथ्याला क्षतयुक्त केलें. भीमानें आपल्या प्रपितामह बाह्लीकराजाला विद्ध करून, अरण्यांतील सिंहाप्रमाणें प्रचंड गर्जना केली. अभिमन्यु चित्रसेनाचे अनेक शर सहन करून त्याला उलट सहस्रावधि बाणांच्या वृष्टीनें आच्छादित करीत रणांत स्थित झाला. त्यानें चित्रसेनाला तीन बाणांनीं विद्ध केलें. ते दोघे श्रेष्ठ योद्धे एकत्र जमले असतां आकाशांतील बुध व शनि यांच्या युतीप्रमाणें अतिशय घोर दिसूं लागले. परवीरहा सौभद्रानें नऊ बाण सोडून त्याचे चार अश्व व सारथि यांस गतप्राण केलें व मोठ्यानें सिंहनाद केला. अश्व हत झाले असतां चित्रसेनानें आपल्या रथांतून उडी टाकली व दुर्मुखाच्या रथांत मोठ्या त्वरेनें प्रवेश केला.

द्रोणानें नतपर्व बाणांनीं द्रुपदाला विद्ध करून त्याच्या सारथ्यालाहि क्षतविद्ध केलें. तेव्हां आचार्यांकडून पीडला जाणारा तो राजा पूर्वीचें वैर स्मरून आपले वेगवान् अश्व घेऊन तेथून परत फिरला. भीमसेनानें एका क्षणांत बाह्लीकाला त्याचे अश्व, सारथि व रथ यांनीं रहित करून टाकिलें. तेव्हां बाह्लीक भयभीत व भ्रांत झाला आणि भूमीवर उडी टाकून लक्ष्मणाच्या रथावर चढला.

सात्यकि अनेक बाणांनीं कृतवर्म्याचें निवारण करून पितामहाच्या समीप आला व लोमांचा छेद करणारे साठ तीक्ष्ण बाण सोडून हातांतील धनुष्य हालवीत जणुकाय रथाग्रावर नृत्यच करूं लागला. तेव्हां पितामहानें अतिशय वेगवान् महाशक्ति सोडली. ती नागकन्येसारखी चपल व सुवर्णानें चित्रित होती. ती मृत्युतुल्य दुर्जय शक्ति आपल्या अंगावर येत आहे, हें पाहून यशस्वी वृष्णीनें मोठ्या लाघवानें मार्गांतच उडवून दिली. तेव्हां ती परम दारुण शक्ति सात्यकीपर्यंत न येतां एखाद्या उल्केप्रमाणें भूमीवर पडली.

नंतर सात्यकीनें आपली महाप्रभेनें युक्त असलेली शक्ति पितामहाच्या रथावर सोडली. ती शक्ति कालरात्रीप्रमाणें मोठ्या वेगानें भीष्माकडे जात असतां पितामहानें तीक्ष्ण क्षुरप्र बाण सोडून मार्गांतच दोन तुकडे करून तिला खालीं पाडविलें. नंतर भीष्मानें हंसतच सात्यकीच्या हृदयावर नऊ बाण सोडले. त्यावेळीं पांडवांकडील वीरांनीं सात्यकीच्या रक्षणार्थ आपल्या चतुरंग सेनेसह भीष्माला वेढून टाकिलें व जयाची इच्छा करणाऱ्या त्या कौरवपांडवांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. ६. ४. १०४.

---

## अध्याय १०५ वा.

[ १ भीष्माचें रक्षण करण्याविषयीं दुर्योधनाची दुःशासनाला आज्ञा. २ कौरव-सेनेचा पराजय. ३ शल्याचें पांडवांशीं युद्ध. ]

( १ ) **संजय**—महाराज, ग्रीष्मऋतूच्या शेवटीं मेघ जसे भास्कराला समंततः आवृत्त करितात, तसे त्या रणांगणांत क्रुद्ध झालेल्या भीष्माला पांडवांनीं परिवेष्टित केलेलें पाहून दुर्योधन दुःशासनाला असें म्हणाला—" हे वीरा, शूर पांडवांनीं भीष्माला समंततः वेढलें आहे. यास्तव त्या महात्म्याचें तूं रक्षण कर. आपण त्याचें रक्षण केलें असतां, तो पांचालांसह पांडवांचा नाश करील. त्या पितामहाचें रक्षण करणें, हें आपलें अतिशय महत्त्वाचें कर्तव्य आहे, असें मी समजतों. कारण तो महाव्रत आमचा त्राता आहे. तस्मात् तूं सर्व सैन्यासह जाऊन समरांगणांत दुष्कर कर्म करणाऱ्या भीष्माचें रक्षण कर."

दुर्योधनाचें हें भाषण ऐकून दुःशासनानें फार मोठें सैन्य बरोबर घेतलें व भीष्माला परिवेष्टित केलें. शकुनीनें आपल्या सेनेसह नकुल, सहदेव व धर्मराज यांना वेढा दिला. सौबलाचें तें सैन्य दहा हजार अश्वसादींनीं युक्त होतें. ते सर्व सैनिक युद्धविशारद असून पताकांनीं शोभत होते. त्यांचा वेष चित्ताकर्षक होता. त्यांनीं हातांत ऋष्टि, प्रास व तोमर धारण केले होते. शिवाय दुर्योधनानें पांडवांचें निवारण करण्यासाठीं दहा हजार शर व युद्धनिपुण अश्वसादी पाठविले. ते गरुडासारखे वेगवान् अश्व रणांगणांत आले, तेव्हां त्यांच्या खुरांच्या आघातानें भूमि कंपित होऊन निनादित झाली. त्यांच्या खुरांचा शब्द, वणवा लागलेल्या पर्वतावरील वेळूंच्या ध्वनीसारखा भासला. ते अश्व धांवत असतां त्यांच्या पदन्यासांनीं उडालेली धूलि सूर्याच्या रथापर्यंत जाऊन तिनें आदित्याला झांकून टाकिलें. वेगवान् हंस जसे सरोवराला हालवून सोडतात, तसें त्या अश्वांच्या वेगानें पांडवसैन्य क्षुब्ध झालें. त्या अश्वांच्या खिंकाळण्यापुढें कांहीं ऐकूंहि येईना.

( २ ) त्यानंतर वर्षाऋतूंत पर्वकालीं जलाची समृद्धि झालेल्या सागराचा वेग मर्यादा जशी मागें हटविते, तसा युधिष्ठिर व दोघे माद्रीपुत्र यांनीं मोठ्या त्वरेनें त्या अश्वसादींचा वेग मागें परतविला. त्या रथिश्रेष्ठांनीं नतपर्व शरांनीं त्या अश्वसादींचीं मस्तकें तोडलीं, तेव्हां गजांकडूनच हत होऊन गिरी-

गव्हरांत पडणाऱ्या गजांप्रमाणें ते अश्वसादी मृत होऊन भूमीवर पडले. तरी पांडव त्यांच्यावर प्रास व तीक्ष्ण शर यांची वृष्टि करीतच होते. त्यांच्या प्रहारांनीं पडणारीं योद्धयांचीं मस्तकें, वृक्षांवरून गळून पडणाऱ्या फळांप्रमाणें भासलीं. त्या रणांगणांत सर्वत्र हयसादि अश्वांसह क्षतविद्ध होऊन पडलेले व पडत असलेले दिसत होते. सिंहाच्या समीप आलेले मृग स्वतःचा प्राण वांचविण्यासाठीं जसे पळत सुटतात, तसे पांडवांकडून वध केले जाणारे अश्व भयभीत होऊन पळूं लागले. त्या महायुद्धांत शत्रूंना जिंकून पांडवांनीं शंख वाजविले व भेरींचा प्रचंड शब्द केला.

( ३ ) याप्रमाणें स्वसैन्याचा पराभव झालेला पाहून दीन झालेला दुर्योधन मद्रराजाला असें म्हणाला—" हे महाबाहो, हा ज्येष्ठ कुंतीपुत्र उभयतः माद्रीपुत्रांसह आमच्या सेनेला आमच्या समक्ष पळवून लावीत आहे. यास्तव समुद्राच्या तीराप्रमाणें तूं त्याचें निवारण कर. तुझें बल व पराक्रम अप्रतिम असून तूं शत्रूंना असह्य आहेस अशी तुझी प्रसिद्धि आहे."

हे महाराज, तुझ्या पुत्राचें हें वचन ऐकून प्रतापी शल्य, जेथें राजा युधिष्ठिर होता तेथें आपल्या रथसमूहासह आला. शल्याची प्रचंड सेना आपल्याकडे येत आहे, हें पाहून युधिष्ठिरानें त्या महा ओघाचें निवारण केलें व मद्रराजाच्या वक्षःस्थलावर दहा बाण सोडले. नकुल-सहदेवांनीं सरळ जाणारे सात बाण सोडले. मद्रराजानेंहि उलट त्या सर्वांवर तीन तीन बाण सोडले व पुनः युधिष्ठिराला साठ बाणांनीं विद्ध केलें आणि श्रांत झालेल्या दोघां माद्रेयांना दोन दोन बाणांनीं ताडन केलें.

इतक्यांत कालमुखांत पडल्याप्रमाणें युधिष्ठिर मद्रराजाच्या हातीं सांपडत आहे, असें भीमाच्या दृष्टीं पडलें व तो मोठ्या त्वरेनें त्याच्या संरक्षणार्थ तेथें आला. त्यावेळीं सूर्य पश्चिमेकडे चालला होता, तरीहि त्यांचें दारुण युद्ध प्रवृत्त झालें. ६. ४. १०५.

---

## अध्याय १०६ वा.

[ १ भीष्माचें पांडवांशीं युद्ध. २ अग्नीचें रूपक. ३ भीष्मानें केलेला पांडवसेनेचा पराभव. ४ कृष्णाची भीष्मवध करण्याविषयीं पार्थाला प्रेरणा. ५ अर्जुनाची भीष्मवधाविषयीं प्रतिज्ञा. ६ पार्थाचें हस्तलाघव पाहून भीष्मानें केलेली त्याची प्रशंसा. ७ श्रीकृष्णाची भीष्मवधार्थ उद्युक्तता. ८ पार्थानें केलेलें त्याचें निवारण. ९ पांडवसेनेचा पराभव. १० नवमदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे राजन्, त्यानंतर तुझा पिता शान्तनव अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें ससैन्य पांडवांवर तीक्ष्ण बाणांची समंततः वृष्टि केली. त्या गांगेयानें भीमाला बारा, सात्यकीला नऊ, नकुलाला तीन व सहदेवाला सात शरांनीं विद्ध केलें. युधिष्ठिराचे बाहू व हृदय यांवर बारा बाण सोडले व धृष्टद्युम्नालाहि विद्ध करून मोठ्यानें सिंहनाद केला.

तेव्हां पितामहावर उलट नकुलानें बारा, सात्यकीनें तीन, धृष्टद्युम्नानें सत्तर, भीमानें सात आणि युधिष्ठिरानें बारा बाण सोडले. तेव्हां द्रोण पुढें सरसावला व त्यानें प्रत्येकावर पांच पांच तीक्ष्ण बाण सोडून सात्यकि व भीमसेन यांना विद्ध केलें. आचार्यांचे ते बाण यमदंडोपम प्राणहारक होते. त्या दोघां वीरांनींहि सरळ जाणारे तीन तीन शर सोडून, अंकुशानें जसें मत्त गजाला टोचावें, तसें ब्राह्मणश्रेष्ठ द्रोणाला विद्ध केलें.

सौवीर, कितव, प्राच्य, प्रतीच्य, उदीच्य, मालव, अभिषाह शूरसेन व वसाति हे तीक्ष्ण शरांनीं विद्ध होत होते, तरी भीष्माला सोडून गेले नाहींत. त्याचप्रमाणें नानादेशांतून जमलेले महीपाल हातांत विविध आयुधें घेऊन व पांडवांच्या सभोंवार राहून युद्ध करीत होते. पांडवांनीं भीष्माला रथसमूहानें वेढलें असतां, दवानल जसा अधिकच प्रज्वलित होऊन सर्व वनाला दग्ध करितो, तसा तो पितामह अधिकच क्रुद्ध होऊन शत्रुसैन्याचा संहार करूं लागला.

( २ ) हे राजा, रथ हेंच त्याचें अग्न्यगार होतें. धनुष्य ही ज्वाला, खड्ग हीच शक्ति, गदा हें इंधन व शर हे विस्फुलिंग होते. याप्रमाणें तो भीष्मरूपी अग्नि सर्व क्षत्रियश्रेष्ठांना दग्ध करूं लागला. त्या गांगेयानें अतिशय तीक्ष्ण कर्णि, वालिक व नाराच बाण सोडून पांडवसैन्याला आच्छादित केलें. ते सर्व बाण सुवर्णपुंखयुक्त असून गृध्रपक्ष्याच्या पिसांनीं अलंकृत होते.

भीष्मानें तीक्ष्ण शरांनीं रथी व ध्वज यांना खालीं पाडवून पांडवांच्या रथसमूहाला अग्ररहित तालवनासारखें केलें. त्या महाबाहूनें रथ, अश्व व गज यांना निर्मनुष्य करून टाकिलें. विद्युल्लतेच्या गर्जनेप्रमाणें त्याच्या धनुष्याचा टणत्कार व तलहाताचे निर्घोष ऐकून सर्व भूतें कंपित झालीं.

( ३ ) पितामहाचा एकहि बाण व्यर्थ गेला नाहीं. भीष्माच्या धनुष्यापासून सुटलेले शर योद्धयांचीं कवचें फोडून निघून जात. ज्यांतील योद्धे हत झाले आहेत, अशा रथांना, वेगवान् अश्व ओढून नेत असलेले आमच्या दृष्टीं पडले. चेदि, काशि व करूषक यांच्या कुलांतील प्रसिद्ध महारथ प्राणांवर उदार होऊन पुढें आले. ते युद्धपराङ्मुख न होणारे वीर आपले ध्वज हालवीत मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें पितामहाच्या समीप आले असतां आपले अश्व, गज व रथ यांसह परलोकीं गेले. सहस्रावधि भग्न झालेले रथ तेथें पसरले होते. गदा, भिंदिपाल, चक्र, तीक्ष्ण शर, धनुष्यें इत्यादि आयुधें व कुंडलांसह मस्तकें, तलत्राणें, तुटलेलीं कवचें व ध्वज, यांनीं तें रणांगण सर्वतः व्यापून गेलें होतें. भग्न झालेल्या धनुष्यांचे तुकडे सर्वत्र पसरले होते. ज्यावरील योद्धे हत झाले आहेत, असे सहस्रावधि गज व अश्व मरून पडले होते. भीष्माच्या बाणांनीं पीडित झालेले जे महारथ रणांगणांतून पळून जात होते, त्यांचें निवारण करण्यास ते वीर समर्थ झाले नाहींत.

महेंद्रतुल्य पराक्रमी भीष्म त्या महाचमूचा संहार करीत असतां ती सेना उधळून गेली व दोन योद्धेहि एकत्र धांवतांना दृष्टीं पडले नाहींत. पांडवांच्या सेनेंतील रथ, अश्व व गज यांचा नाश झाला व ध्वज तुटून पडले. अशी ती चेतनाशून्य झालेली आपली सेना पाहून पांडवांच्या वीरांनीं हाहाकार केला.

तो तुमुल संग्राम प्रवृत्त झाला असतां दैवघटनेमुळें पिता पुत्रावर व पुत्र पित्यावर प्रहार करीत होते, प्रियसखा आपल्या जिवलग मित्रावर शस्त्र उगारीत होता व त्याच्या नांवानें आक्रोश करीत होता. पांडवांचे कित्येक सैनिक आपलीं कवचें टाकून व केस पिंजारून धांवत असलेले दृष्टीं पडत होते. त्या वेळीं आर्तस्वर काढणारें तें पांडवसैन्य, मानेवरील जुवें पडल्यामुळें भयभीत होऊन पळणाऱ्या वृषभांच्या संघाप्रमाणें भासलें.

( ४ ) आपलें सैन्य उधळलेलें पाहून रथाचें नियमन करीत यादवनंदन कृष्ण पार्थाला म्हणाला—" हे अर्जुना, तूं ज्याची अपेक्षा करीत होतास, तो

काल आतां प्राप्त झाला आहे. यास्तव तूं जर मोहानें विमूढ झाला नसशील, तर या महारथांवर प्रहार कर. बा धनंजया, पूर्वी विराटनगरींत तूं संजयाच्या समक्ष ' संग्रामांत भीष्म-द्रोणप्रमुख धार्तराष्ट्रांचे जे वीर माझ्याशीं युद्ध करतील, त्या सर्वांचा मी वध करीन ' अशी जी प्रतिज्ञा केली होतीस, ती आज सत्य कर. क्षत्रधर्माला स्मरून तूं शोकरहित होऊन युद्ध कर."

(५) वासुदेवाचें हें वचन ऐकून अधोमुख झालेल्या बीभत्सूनें तिर्यग्दृष्टीनें कृष्णाकडे पाहिलें व जणुकाय निष्काम असल्याप्रमाणें त्यास असें म्हटलें— "हे कृष्णा, अवध्य असलेल्यांचा वध करून ' नरक ' हेंच ज्याचें फल आहे, असें राज्य मिळविणें व वनांतील दुःखें भोगणें, या दोहोंतील कशानें माझें कल्याण होईल! असो. मी तुझें वचन पूर्ण करितों. अश्वांना प्रेरणा कर व माझा रथ भीष्मरथापाशीं ने. आज मी दुर्धर्ष पितामहाला रणांत पाडविल्यावांचून रहात नाहीं!"

तेव्हां माधवानें तत्काल पार्थाच्या रौप्यतुल्य शुभ्र अश्वांना प्रेरणा केली व सूर्याप्रमाणें दुष्प्रेक्ष्य असलेल्या भीष्माकडे रथ वळविला. अर्जुन पितामहावर चाल करून जाण्यास उद्युक्त झाला आहे, हें पहातांच युधिष्ठिराची सेना रणांगणाकडे परत फिरली. अर्जुन आपल्याकडे येत आहे, हें पाहून भीष्मानें सिंहासारखी गर्जना केली व धनंजयाचा रथ शरांनीं झांकून टाकिला. त्यामुळें एका क्षणांत अश्व व सारथि यांसह तो रथ दिसेनासा झाला. तेव्हां वासुदेवानें भ्रांत न होतां भीष्मशरांनीं विद्ध झालेल्या अश्वांना मोठ्या धैर्यानें पुढें नेलें.

(६) इतक्यांत पार्थानें मेघाप्रमाणें शब्द करणारें आपलें धनुष्य घेऊन तीक्ष्ण शर सोडले व भीष्माच्या धनुष्याचा छेद केला. तेव्हां शान्तनवानें दुसरें दृढ धनुष्य घेऊन तें निमिषमात्रांत सज्ज केलें व मेघगर्जनेसारखा त्याचा टणत्कार केला. परंतु क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें तेंहि धनुष्य छेदून टाकिलें. धनुर्धरश्रेष्ठ पार्थाचें तें हस्तलाघव पाहून पितामहानें त्याची प्रशंसा करीत म्हटलें—" धन्य, धन्य, हे महाबाहो कुंतीपुत्रा, तुझी धन्य आहे."

अर्जुनाचा असा सत्कार करून पितामहानें दुसरें श्रेष्ठ धनुष्य घेतलें व पार्थाच्या रथावर शरांची वृष्टि केली. त्यावेळीं वासुदेवानें पार्थाचा रथ इतक्या लाघवानें मंडलाकार फिरविला कीं त्यामुळें भीष्माचे शर अर्जुनाच्या रथावर न पडतां व्यर्थ जाऊं लागले. पितामहाच्या शरांनीं विद्ध झालेले ते दोघे

कृष्णार्जुन रक्तानें माखल्यामुळें, शिंगांनीं माती उकरून चिह्नित झालेल्या क्रुद्ध वृषभांप्रमाणें भासले.

( ७ ) त्या वेळीं वासुदेवानें पाहिलें कीं, अर्जुन मृदुयुद्ध करीत आहे व भीष्म दोन्ही सेनेच्या मध्यभागीं स्थित होऊन आदित्याप्रमाणें ताप देत सतत शर-वृष्टि करीत आहे. कृतान्तकालाप्रमाणें गांगेय पांडवांच्या सैन्यांतील श्रेष्ठ श्रेष्ठ योद्धयांचा संहार करीत आहे. महाबाहु माधवाला हें सहन झालें नाहीं. तो मधुसूदन पार्थाच्या रजततुल्य अश्वांच्या रश्मि सोडून रथांतून खालीं उतरला व हातांत प्रतोद घेऊन वारंवार सिंहनाद करीत भीष्माच्या रथाकडे धांवला. बाहुबल हेंच ज्याचें आयुध आहे, असा तो कृष्ण क्रोधानें नेत्र आरक्त करून पायांनीं पृथ्वीचें विदारण करीतच निघाला. माधव भीष्माच्या वधेच्छेनें त्याच्या रथासमीप आलेला पहातांच तुझे वीर भयभीत झाले व 'भीष्म हत झाला, भीष्माचा वध झाला' असे उद्गार सर्वत्र ऐकूं येऊं लागले. हे महाराज, इंद्रनीलमण्याप्रमाणें श्यामवर्ण असलेला जनार्दन पीतांबर धारण करून भीष्मावर चालून जात असतां विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघाप्रमाणें शोभला.

गजावर धांवून जाणाऱ्या सिंहाप्रमाणें, किंवा मत्त वृषभ सामान्य वृषभा-वर जसा तुटून पडतो, तसा तो यादवश्रेष्ठ गर्जना करीत भीष्मावर धांवला. पण पुंडरीकाक्ष आपलेकडे धांवून येत आहे, हें पाहून भीष्म भ्रांत झाला नाहीं. तो आपलें श्रेष्ठ धनुष्य ओढून शांत चित्तानें गोविंदाला म्हणाला— "पुंडरीकाक्षा, ये ये. हे देवदेवा, तुला नमस्कार असो. मला या महायुद्धांत गतप्राण कर. ' हे निर्मल देवा, रणांत तुझ्या हातानें मला मृत्यु आल्यास या लोकीं माझें श्रेयच होईल. तूं माझा हा सन्मानच केला आहेस. मी तुझा दास आहें. मजवर यथेच्छ प्रहार कर."

इतक्यांत महाबाहु अर्जुनानें कृष्णाच्या मागोमाग जाऊन त्याला पाठी-मागून दोन्ही हातानें विळखा घातला व आंवरून धरलें. परंतु राजीवलोचन पुरुषोत्तम कृष्णानें पार्थाला आपल्या बरोबर ओढीत नेलें. तथापि पार्थानें आपले दोन्ही पाय भूमीवर दृढ ठेवून, दहाव्या पावलाला त्याला अडविलें.

( ८ ) त्या वेळीं कृष्णाचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते व तो सर्पाप्रमाणें फूत्कार टाकीत होता. तेव्हां त्याचा प्रिय सखा प्रेमानें म्हणाला—"हे महा-बाहो, परत फिर. 'मी युद्ध करणार नाहीं,' असें जें तूं पूर्वीं म्हटलें होतेंस, तें

आपलें वचन सत्य कर. नाहीं तर हे केशवा, लोक तुला मिथ्यावादी म्हणतील. हा सर्व भार मजवर आहे. मी पितामहाचा वध करीन. शस्त्र, सत्य व सुकृत या तिहींची शपथ घेऊन सांगतों कीं, मी शत्रूंचा अंत करीन. युगान्त समयीं यदृच्छेनें अस्त पावणाऱ्या पूर्णचंद्राप्रमाणें तो महारथ आज माझ्या हातून पतन पावलेला तूं पहाशील."

महात्म्या फाल्गुनाचें हें वचन ऐकून माधव कांहींहि न बोलतां क्रोधानेंच आपल्या रथावर चढला. नंतर शान्तनवानें त्या दोघांहि रथस्थ वीरांवर पर्वतावर जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें पुनः शरवृष्टि केली. ग्रीष्मऋतूंत रस शोषण करणाऱ्या सूर्याप्रमाणें पितामहानें प्रतियोद्धयांच्या प्राणांचें कर्षण केलें. पांडवांनीं युद्धांत जसा कौरवसेनेचा पराभव केला, तसा भीष्मानें पांडवांच्या सेनेला भग्न केलें. पांडवांचें कांहीं सैन्य हत झालें व कांहींनीं पलायन केलें. त्यामुळें पांडव निरुत्साह व श्रांत झाले.

( ९ ) त्या वेळीं भीष्म मध्याह्नीच्या सूर्याप्रमाणें स्वतेजानें तळपत होता. भयार्त झालेले पांडव त्याच्याकडे पहाण्यासहि समर्थ झाले नाहींत. भीष्म अतिमानुष कर्म करून सहस्रावधि पांडववीरांचा संहार करीत असतां, ते वीर भयभीत झाले व कांहीं हालचाल न करतां स्वस्थ पहात उभे राहिले. पांडवसैन्य पळत असतां त्यांना कोणीहि त्राता मिळाला नाहीं. कर्दमांत रुतलेल्या धेनूप्रमाणें ते असहाय झाले. बलाढ्य भीष्मानें तें सैन्य मुंग्यांप्रमाणें चिरडून टाकिलें.

( १० ) सूर्यतुल्य प्रतापी शान्तनव दुष्प्रकंप्य होता. तो आपल्या शररूपी किरणांनीं पांडवांच्या नरेंद्रांना ताप देत असतां, ते वीर त्याच्याकडे पाहूंहि शकले नाहींत. याप्रमाणें पराक्रमी पितामहानें पांडवसेनेचा संहार चालविला असतां भगवान् सहस्ररश्मि अस्ताचलीं गेला. तेव्हां श्रांत झालेल्या दोन्हीं सैन्यांनीं मनांत युद्ध थांबविण्याचा विचार केला. ६. ४. १०६.

## अध्याय १०७ वा.

[ १ उभयसैन्यांचा अवहार. २ कौरव-पांडवांचें स्व-स्व शिबिरांत प्रयाण. ३ पांडवांचा कृष्णाशीं संकेत. ४ युधिष्ठिराचा विषाद. ५ कृष्णाचें सान्त्ववचन. ६ भीष्मवधाचा उपाय विचारण्यासाठीं त्याच्याकडे जाण्याची युधिष्ठिराची प्रेरणा. ७ भीष्मशिबिरांत गमन. ८ भीष्माचें उपायकथन. ९ अर्जुनाचा खेद. १० कृष्णानें केलेलें समाधान. ]

( १ ) संजय—हे राजन्, कौरव-पांडवांच्या त्या दोन्ही सैन्यांचें युद्ध चाललें असतां घोर संध्याकाळ झाला. त्यामुळें आम्हांला रणांगणहि दिसेनासें झालें. तेव्हां राजा युधिष्ठिरानें पाहिलें कीं, आतां संध्यासमय झाला आहे, आपलें सैन्य भीष्मानें पीडिल्यामुळें भयविह्वल झालें आहे व तें शस्त्रत्याग करून पलायनपरायण झालेलें दिसत आहे. भीष्म क्रोधसंतप्त होऊन महारथांना त्रस्त करीत आहे व सोमकांना जिंकल्यामुळें ते सर्व महारथ निरुत्साह झाले आहेत. यास्तव आतां युद्ध थांबवावें, हें बरें. असा विचार करून युधिष्ठिरानें आपल्या सैन्याचा अवहार केला. तें पाहून तुझ्या सैन्यालाहि भीष्मानें युद्ध थांबवून परत फिरण्याची आज्ञा केली.

( २ ) स्वसैन्याचा अवहार करून पांडव आपल्या शिबिरांत गेले. ते सर्व महारथ शरविद्ध झाले होते. भीष्माच्या बाणांनीं प्रपीडित झालेल्या त्यांच्या मनाला भीष्माचा पराक्रम स्मरून यत्किंचित्हि शांति वाटली नाहीं. ( ते अतिशय अस्वस्थ झाले. ) इकडे सृंजयांसह पांडवांचा त्या दिवसाच्या युद्धांत पराजय केल्याबद्दल तुझ्या पुत्रांनीं पितामहाचा सत्कार केला व सर्व भूतांना प्रमोहित करणारी रात्र झाली असतां त्या सर्व कौरवांनीं हृष्ट चित्तानें विश्रांति घेतली.

(३) तथापि ती घोर रात्र प्रवृत्त झाली असतांहि पांडवांनीं शयन केलें नाहीं. सृंजय व वृष्णि यांसह दुराधर्ष पांडव संकेत करावयास बसले. मंत्रनिश्चय-कोविद असलेले ते महाबलाढ्य महात्मे त्यावेळीं 'आपल्याला श्रेयस्कर काय आहे' याचा अव्यग्र चित्तानें विचार करूं लागले.

( ४ ) राजा युधिष्ठिर बराच वेळ विचार करून वासुदेवाकडे पहात असें वचन बोलला—"हे कृष्णा, महात्म्या भीष्माचा भयंकर पराक्रम पहा. तो श्रेष्ठ धनुर्धर नलाच्या वनाला तुडविणाऱ्या गजांप्रमाणें माझ्या सैन्याचें मर्दन करीत

आहे. तो महात्मा सैन्यामध्यें प्रवृत्त झालेल्या अग्नीप्रमाणें जिभल्या चाटीत असतां त्याच्याकडे पहाण्यासहि आम्ही समर्थ होत नाहीं. क्रुद्ध झालेला प्रतापवान् भीष्म हातांत धनुष्य घेऊन शर सोडूं लागला, म्हणजे विषारी गरळ ओकणाऱ्या घोर महानाग तक्षकाचाच भास होतो. क्रुद्ध झालेल्या यमाला जिंकतां येईल, वज्रधर इंद्राचा पराजय करतां येईल, पाशधारण करणारा वरुण किंवा गदायुक्त धनेश्वर कुबेराचाहि पराभव संभवेल, परंतु क्रुद्ध झालेल्या भीष्माला या महायुद्धांत जिंकणें शक्य नाहीं. हे केशवा, मी स्वतःच्या बुद्धिदौर्बल्यामुळें भीष्माशीं संग्राम करण्यास उद्युक्त होऊन अशाप्रकारें शोकसागरांत निमग्न झालों आहें.

हे कृष्णा, मला हें युद्ध रुचत नाहीं. भीष्माकडून आमचा सर्वदा पराभव होत असतो. हें युद्ध करण्यापेक्षां मी वनांत निघून जातों. मला वनवास श्रेयस्कर वाटत आहे. प्रज्वलित अग्नीवर झडप घालणारा पतंग जसा केवळ मृत्यूलाच प्राप्त होतो, तसा मी भीष्माच्या समीप जातांच नाश पावेन. राज्यलाभासाठीं मी या युद्धांत प्रवृत्त झालों, पण उलट माझ्या सेनेचा क्षयच होत आहे. माझे शूर भ्राते पराक्रमी असून, तेहि भीष्माच्या बाणांनीं अतिशय पीडिले जात आहेत.

हे मधुसूदना, मजवरील प्रेमामुळें माझे हे भ्राते राज्यभ्रष्ट झाले व त्यांना वनांत जावें लागलें, त्याचप्रमाणें कृष्णेलाहि मजसाठींच असह्य क्लेश भोगावे लागले. बा कृष्णा, मी जीवित अतिशय मूल्यवान् समजतों, पण आज तेंच (जीवित) दुर्लभ होण्याचा प्रसंग आला आहे. मी जर जिवंत राहिलों, तर अवशिष्ट राहिलेलें आयुष्य श्रेष्ठ धर्माचरणांत तरी घालवीन. यास्तव, हे जनार्दना, तुला जर मी भ्रात्यांसह अनुग्राह्य वाटत असेन, तर ज्याचा स्वधर्माशीं विरोध येणार नाहीं, असें हितवचन मला सांग."

(५) हे महाराज, युधिष्ठिराचें हें कारुण्ययुक्त विस्तृत भाषण ऐकून कृष्ण त्याचें सान्त्वन करीत असें प्रतिवचन बोलला—

"हे सत्यसंगर धर्मपुत्रा, व्यर्थ विषाद पावूं नको. ज्या तुझे शत्रूंचा संहार करणारे, दुर्जय व शूर भ्राते आहेत, त्यानें असें खिन्न होण्याचें काय कारण! भीमार्जुन तर वायु व अग्नि यांप्रमाणें तेजस्वी आहेत. उभय माद्रीपुत्र देवांच्या ईश्वरांप्रमाणें—देवेंद्राप्रमाणें पराक्रमी आहेत. शिवाय मी तुझा सुहृ-

द्च आहे. तुझी जर इच्छा असेल, तर मी युद्धांत भीष्माचा वध करतों. तूं आज्ञा केल्यावर तुझ्यासाठीं मी कोणतें दुष्कर कर्म करणार नाहीं! हे महाराज, केवल भीष्म मृत झाला असतां जय प्राप्त होईल, असें जर तुला वाटत असेल व फाल्गुन जर पितामहाचा वध करण्यास इच्छित नसेल, तर मी आज रणांत भीष्माला युद्धाचें आह्वान करून धार्तराष्ट्रांच्या समक्ष त्याला मृत्यूच्या स्वाधीन करतों. मी एकटा एकरथानें कुरुवृद्ध पितामहाचा वध करीन. माझा पराक्रम पहा ! युद्धामध्यें महेंद्राप्रमाणें महास्त्रें सोडून मी त्या शान्तनवाला रथांतून खालीं पाडवीन. पांडुपुत्रांचा जो शत्रु, तो निःसंशय माझाहि शत्रु आहे. तुझे जे अनुयायी ते माझेच आहेत व माझे अनुचर तुजसाठींच आहेत.

युधिष्ठिरा, हा तुझा भ्राता धनंजय माझा सखा आहे, आप्तसंबंधी ( भगिनी-पति ) आहे व शिवाय माझा प्रिय शिष्य आहे. या अर्जुनासाठीं मी माझ्या अंगाचें मांसहि काढून देईन आणि हा नरव्याघ्र मजकरितां आपल्या प्राणांचाहि त्याग करील. 'आम्ही परस्परांचें रक्षण करूं' असा आमचा संकेत ठरलेला आहे. यास्तव हे राजेंद्रा, तूं मला आज्ञा कर म्हणजे मी युद्धार्थ सज्ज होतों. तथापि पूर्वी उपप्लव्य नगरींत पार्थानें 'मी गांगेयाचा वध करीन' अशी सर्व लोकांसमक्ष प्रतिज्ञा केली होती. त्या धीमान् कौंतेयानें तें आपलें वचन पाळावें, हें बरें. पण पार्थ जर मला अनुज्ञा देत असेल, तर मी तें भीष्मवधाचें कार्य करतों. अथवा हा सर्व भार अर्जुनावर आहे. तो परपुरंजय भीष्माचा रणांत वध करील. सज्ज झालेला पार्थ रणांत अशक्य कर्महि करूं शकेल. तो युद्धामध्यें दैत्य-दानवांसह देवांचाहि पराभव करण्यास समर्थ आहे, मग भीष्माची काय कथा! शान्तनव जरी महापराक्रमी असला, तरी आतां त्याची बुद्धि मंद झाली आहे. सामर्थ्य कमी झालें आहे व वार्धक्यामुळें त्याला स्वकर्तव्य कळेनासें झालें आहे.''

(६) **युधिष्ठिर**—हे महाबाहो, तूं म्हणतोस तें खरें आहे. तुझ्या एकटाच्या शक्तीला हे सर्व कौरवहि पुरे पडणार नाहींत. हे पुरुषश्रेष्ठा, माझ्या पक्षांत तूं अवस्थित असल्यामुळें माझें सर्व ईप्सित पूर्ण होईल व नियत असलेलें सर्व मला प्राप्त होईल. हे श्रेष्ठ विजयप्रद गोविंदा, तूं आमचा नाथ असल्यावर आम्ही इंद्रासह देवांनाहि जिंकूं, मग महारथ भीष्माची काय कथा ! तथापि स्वतःच्या गौरवासाठीं मी तुला मिथ्याचरण करण्यास—युद्ध न करण्याची

प्रतिज्ञा मिथ्या करण्यास सांगणें योग्य नव्हे. यास्तव हे माधवा, तूं म्हटल्याप्रमाणें स्वतः युद्ध न करतां आम्हांला साह्य कर, युद्धाच्या आरंभीं पितामहानें माझ्याशीं असा संकेत केला होता कीं, मी तुझ्या हिताचा तुला उपदेश करीन; परंतु तुझ्या बाजूनें कदापि युद्ध करणार नाहीं. दुर्योधनाच्या पक्षानें युद्ध करीन. हें मी तुला सत्य सांगतों. हे माधवा, देवव्रतच माझा राज्यदाता व मंत्रदाताहि आहे. तस्मात् हे मधुसूदना, तुझ्यासह आम्ही सर्व भीष्माकडे जाऊं या व त्याला त्याच्या वधाचा उपाय विचारूं. तो नरश्रेष्ठ आपल्याला तत्काल हित वचन सांगेल, यांत संशय नाहीं. पितामह जसें सांगेल, तसें मी संग्रामांत करीन. तो दृढव्रत महात्मा आम्हांला जय देणारा व हितवचन सांगणारा आहे. हे कृष्णा, आम्ही बाल असतांना, पितृहीन झालेल्या आमचें त्यानेंच संवर्धन केलें बरें ! आणि आतां मीं त्याच वृद्ध पितामहाच्या वधाची इच्छा करावीना ! अरे अरे, हा आमचा पितामह माझ्या पित्याला अतिशय प्रिय होता. त्याचा आम्ही वध करणार आहोंत ! धिक्कार असो, या क्षत्रधर्माला ! !

संजय—युधिष्ठिराचे हे खेदयुक्त उद्गार ऐकून वार्ष्णेय त्याला म्हणाला—" हे महाप्राज्ञा, तुझें भाषण मला रुचलें. देवव्रत अतिशय युद्धनिपुण आहे. तो केवल दृष्टिक्षेपानेंहि शत्रूला दग्ध करण्यास समर्थ आहे. यास्तव आपण सर्व त्या गंगापुत्राकडे जाऊं व त्यालाच त्याच्या वधाचा उपाय विचारूं. तो आपल्याला सत्य सांगेल. विशेषतः तूं विचारलें असतां तर निश्चयानेंच सांगेल. तस्मात् आपण सर्व वृद्ध कुरुपितामहाजवळ जाऊन त्याचा विचार घेऊं आणि तो आपल्याला जसा उपदेश करील त्याप्रमाणें आपण शत्रूशीं युद्ध करूं.

( ७ ) याप्रमाणें संकेत करून त्या वीरांनीं आपलीं शस्त्रें व कवचें काढून ठेविलीं आणि ते सर्व पांडुपुत्र वासुदेवासह भीष्माकडे जावयास निघाले. हे महाराज, भीष्माच्या शिबिरांत प्रवेश करतांच त्या सर्वांनीं पितामहाला शिरसा वंदन केलें, त्याचा सत्कार केला व शिरसाष्टांग नमस्कार करून ते त्याला शरण गेले.

तेव्हां कुरुपितामह त्यांना म्हणाला—' हे वार्ष्णेया, तुझें स्वागत असो. त्याचप्रमाणें युधिष्ठिरा, भीमा, धनंजया व नकुल-सहदेवांनो, तुम्हां सर्वांचें

स्वागत असो. हे वत्सांनो, तुम्हांला प्रिय असलेलें असें तुमचें मी कोणतें कार्य करूं तें सांगा. तुमचें तें कार्य कितीहि दुष्कर असलें तरी मी तें जीवावर उदार होऊन करीन.'

असें प्रीतियुक्त वचन पुनः पुनः बोलणाऱ्या गांगेयाला दीन झालेला युधिष्ठिर प्रेमल शब्दांनीं असें म्हणाला—"हे पितामह, आपण सर्वज्ञ आहां. ( आपण सर्व जाणतांच. ) यास्तव, आमचा जय कसा होईल व आम्हांला राज्यप्राप्ति कशी होईल आणि प्रजेची हानि कशानें थांबेल, तें मला सांगा. त्याचप्रमाणें हे प्रभो, आपल्या वधाचा उपायहि मला कथन करा. युद्धामध्यें आपण जेव्हां मंडलाकार धनुष्य फिरवीत असतां, तेव्हां शर जोडण्यांत व ते सोडण्यांत सूक्ष्म अंतरहि दिसत नाहीं, आपण धनुष्यावर शर जोडतां केव्हां, ते ओढतां केव्हां व सोडतां केव्हां हेंहि कळत नाहीं. अशा तुज अप्रतिम धनुर्धराशीं युद्ध करण्यास आम्ही कसे समर्थ होऊं !

हे महाबाहो, आपण रथामध्यें प्रतिसूर्यच भासतां. रथ-अश्व-नर-गज यांचा संहार करीत असतां, आपल्याला जिंकण्यास कोणता पुरुष समर्थ होईल ! आपल्या शरवृष्टीनें अतिशय प्राणहानि केली आहे. माझ्या प्रचंड सैन्याचा केवढा क्षय झाला आहे, पहा ! यास्तव हे पितामह, ज्या उपायानें मी तुला युद्धांत जिंकूं शकेन, मला सत्वर राज्यप्राप्ति होईल आणि ज्या योगानें माझ्या सैन्याचें क्षेम होईल, तो उपाय मला सांग."

( ८ ) त्यावर भीष्म म्हणाला—हे कौंतेया, मी जिवंत असेपर्यंत तुम्हांला कदापि जय प्राप्त होणार नाहीं, हें मी तुला सत्य सांगतों. युद्धांत मला जिंकलें असतां तुम्हां पांडवांचा तत्काल जय होईल, यास्तव तुम्हांला जर जयाची इच्छा असेल तर सत्वर माझा वध करा. मी तुम्हांला अनुज्ञा देतों. तुम्ही मजवर यथेष्ट प्रहार करा. तुम्ही माझें अजेयत्व जाणलेंत, हेंच मी मोठें भाग्य समजतों. एकदा माझा वध झाला कीं, सर्वांचाच विनाश झाला असें समजा व त्याप्रमाणें करा.

युधिष्ठिर—हे पितामह, युद्धामध्यें आम्ही कोणत्या उपायानें आपल्याला जिंकण्यास समर्थ होऊं, तें मला सांगा. आपण कालदंड धारण केलेल्या अंतकाप्रमाणें क्रुद्ध होऊन समरांगणांत स्थित झालांत कीं, सुरासुरांसह इंद्रहि आपणास जिंकण्यास समर्थ होणार नाहीं. यम, वरुण व इंद्र यांनाहि जिंकतां येईल, पण आपल्याला जिंकतां येणें शक्य नाहीं !

भीष्म—हे पांडवा, तूं म्हणतोस तें खरें आहे. इंद्रासह देव-दानवांनाहि मी अजिंक्य आहें. मी हातांत धनुष्य घेऊन व शस्त्रधारण करून युद्धार्थ सज्ज झालों असतां मला पराभूत करणें शक्य नाहीं. यास्तव मी शस्त्रत्याग केला असतां तुझ्या महारथांनीं मला विद्ध करावें. कारण जो पळत आहे, भ्याला आहे, 'मी तुझा आहें' म्हणून शरण आला आहे, ज्यानें शस्त्रत्याग केला आहे, जो पडला आहे, कवच व ध्वज यांनीं रहित आहे, जो विकलांग आहे, पित्याचा एकटाच पुत्र आहे, स्त्री आहे, किंवा, 'स्त्री'-संज्ञक आहे आणि अप्रशस्त पुरुष आहे, अशा प्रतियोद्ध्यांशीं युद्ध करणें मला रुचत नाहीं.

हे राजेंद्रा, मीं पूर्वींपासून जो एक संकल्प करून ठेवला आहे, तो तुला सांगतों. ऐक. अमंगल ध्वज दृष्टीं पडला असतां मी कदापि युद्ध करीत नाहीं. तुझ्या सैन्यांतील महारथ द्रुपदपुत्र शूर आहे, युद्धोत्सुक आहे व विजयी आहे. तथापि तो शिखंडी प्रथम 'स्त्री' असून नंतर पुरुषत्वाला प्राप्त झाला आहे. तो सर्व वृत्तान्त तुम्हीहि जाणतांच. त्या शिखंडीला पुढें करून अर्जुनानें मजवर तीक्ष्ण विशिख बाण सोडावे. पूर्वीं स्त्री असलेला तो शिखंडी अशुभ चिह्नाप्रमाणें पुढें आला असतां मी युद्ध करणार नाहीं व अर्जुनाचा विजय होईल. उद्यतशस्त्र असलेल्या मजवर कोणीहि प्रहार करूं शकणार नाहीं. एक धनंजय किंवा वासुदेव हे दोघेच माझ्याशीं प्रतियुद्ध करण्यास समर्थ आहेत.

यास्तव श्रेष्ठ धनुष्य धारण करणाऱ्या पार्थानें शिखंडीला पुढें करून मजवर शर सोडावे. अशा रीतीनें मी पडलों म्हणजे तुम्हांला निश्चयानें जय प्राप्त होईल. सुव्रता कौंतेया, तूं रणांगणांत याप्रमाणें घडवून आण व नंतर जमलेल्या सर्व धार्तराष्ट्रांचा सहज संहार कर.

संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें भीष्माचा वधोपाय समजून घेऊन त्या पार्थांनीं महात्म्या कुरु पितामहाला अभिवादन केलें व ते सर्व आपल्या शिबिरांत परत आले. परलोकाची दीक्षा घेण्यास उद्युक्त झालेल्या गांगेयाचें तें भाषण ऐकून अर्जुन अतिशय दुःखी झाला व त्याला लज्जाहि वाटली. तो खिन्न होऊन म्हणाला—

( ९ ) "हे माधवा, भीष्म आमचा गुरु आहे. तो कुरुवृद्ध महात्मा कृतप्रज्ञ व धीमान् आहे. त्या पितामहाशीं मी संग्रामांत कसें युद्ध करूं? हे

वासुदेवा, मी बालपणीं क्रीडा करीत असतां धूलियुक्त देहानें त्या महात्म्याच्या मांडीवर लोळून त्याचें अंग मलिन व रूक्ष करीत असें, पण तो उदार मनाचा महात्मा मजवर कधींहि क्रुद्ध झाला नाहीं. महात्म्या पांडूच्या या पित्याला मी 'तात, तात' असें म्हणत असें. तेव्हां 'वत्सा, मी तुझा 'तात' नाहीं. तुझ्या पित्याचा 'तात' आहें. असें जो मला माझ्या बालपणीं म्हणत असे, त्या पितामहाचा वध मी कसा बरें करूं ! माझ्या सैन्याचा यथेष्ट वध होऊं दे, पण मी कांहीं त्या महात्म्याशीं युद्ध करणार नाहीं. मग माझा जय होवो किंवा वध होवो. कृष्णा, तुला काय वाटतें ?"

( १० ) वासुदेव—हे पार्था, भीष्माचा युद्धांत वध करण्याची तूं पूर्वी प्रतिज्ञा केली आहेस, मग क्षात्रधर्मांत स्थित असलेल्या तुला त्याचा वध न करून कसें चालेल ! यास्तव त्या युद्धोत्सुक क्षत्रियाला तूं रथांतून खालीं पाडीव. गांगेयाचा पराभव केल्यावांचून युद्धांत तुझा जय होणार नाहीं. भीष्माचा वध देवांनीं पूर्वींच नियत केलेला आहे. त्याप्रमाणें आतां घडून आलेंच पाहिजे. तें भवितव्य अन्यथा कसें होईल ! मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें असलेल्या या भीष्माशीं युद्ध करण्यास तुजवांचून अन्य कोणी—साक्षात इंद्रहि समर्थ नाहीं. यास्तव स्थिरचित्त होऊन युद्ध कर व भीष्माला जिंक.

धनंजया, मी तुला एक प्रमाण वचन सांगतों तें ऐक—पूर्वी एकदा धीमान् बृहस्पतीनें इंद्राला असें सांगितलें होतें कीं, आपल्याला घातक असलेला शत्रु आपल्याहून ज्येष्ठ असला, किंवा अनेक गुणांनीं युक्त जरी असला तरी तो जर आपल्यावर चालून आला तर त्याचा वध करावा. युद्ध, प्रजेचें रक्षण व यज्ञादि कर्मे हीं असूयारहित होऊन करावीं. हा क्षत्रियांचा शाश्वत धर्म आहे.

अर्जुन—कृष्णा, यावरून शिखंडी निश्चयानें भीष्माच्या निधनाला कारण होणार, असेंच दिसत आहे. त्या पांचाल्याला पहातांच भीष्म सर्वदा परत फिरतो. यास्तव आपण शिखंडीला भीष्माच्या संमुख करून या उपायानें त्यास पाडावें असें मला वाटतें. मी शरवृष्टीनें इतर धनुर्धर योद्धयांचें निवारण करीन व शिखंडीनें श्रेष्ठ योद्धया गांगेयावर शरवृष्टि करावी. 'शिखंडी प्रथम स्त्री असून नंतर पुरुष झाल्यामुळें, त्याच्यावर मी बाण सोडणार नाहीं.'

असें भीष्माच्या मुखानें आपण ऐकलेंच आहे. यास्तव शिखंडीचीच भीष्मवधाकडे योजना करावी.

याप्रमाणें निश्चय करून व पितामहाची अनुमति घेऊन माधवासह नरश्रेष्ठ पांडवांनीं हृष्टचित्तानें आपल्या शयनगृहांत जाऊन सुखानें शयन केलें. ६. ४. १०७.

---

## अध्याय १०८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा दहाव्या दिवसाच्या युद्धाविषयीं प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ पांडवांची व्यूहरचना. ४ कौरवांचा व्यूह. ५ युद्धारंभ. ६ धृतराष्ट्राचा संग्रामाविषयीं पुनः प्रश्न, संजयानें केलेलें वर्णन. ७ भीष्म-शिखंडीसंवाद. ८ पार्थाची शिखंडीला भीष्मवधाविषयीं प्रेरणा. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, शिखंडी भीष्मावर कसा चालून गेला ! आणि गांगेयानें पांडवांशीं कसें युद्ध केलें, तें मला सांग.

( २ ) संजय—हे राजन्, दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होतांच भेरि, मृदंग, इत्यादि वाद्यांचा निर्घोष होऊं लागला, दह्यासारखे पांढरे शुभ्र शंख समंततः वाजूं लागले व पांडव शिखंडीला पुढें करून रणांगणाकडे निघाले.

( ३ ) त्यांनीं आपल्या सैन्याचा शत्रूंचा संहार करणारा व्यूह रचिला. त्या व्यूहांत शिखंडी अग्रभागीं होता. भीम व धनंजय त्याच्या रथचक्राचें रक्षण करीत होते. पांच द्रौपदेय व सौभद्रेय पृष्ठभागीं स्थित होते आणि महारथ सात्यकि व चेकितान त्यांचें रक्षण करीत होते. त्यांच्यामागें पांचालांसह धृष्टद्युम्न होता.

याप्रमाणें व्यूहरचना करून दोघां माद्रेयांसह ज्येष्ठ कौंतेय राजा युधिष्ठिर आपल्या सिंहनादानें पृथ्वी निनादित करीत सर्वांच्या पुढें निघाला, त्याच्यामागें आपल्या सैन्यांसह राजा विराट चालला, राजा द्रुपद त्याला अनुसरला व केकय भ्राते आणि धृष्टकेतु यांनीं सैन्याच्या पृष्ठभागाचें रक्षण केलें.

( ४ ) अशाप्रकारें आपल्या सेनेचा व्यूह रचून पांडव जीवावर उदार होऊन कौरवांवर धांवून गेले. तेव्हां कौरवहि सर्व सैन्याच्या अग्रभागीं भीष्मांना स्थित करून पांडवांवर चालून गेले. त्यावेळीं तुझे पुत्र दुराधर्ष गांगेयाचें रक्षण

करीत होते. त्यांच्या मागें बलाढ्य अश्वत्थाम्यासह द्रोण होता. त्यांच्या मागोमाग आपल्या सर्व गजसैन्यांसह भगदत्त चालला होता. कृप व कृतवर्मा त्यांच्यामागून चालले होते. नंतर सुदक्षिण, कांबोज, बृहद्बल हे क्रमानें त्यांस अनुसरले व शेवटीं सुशर्मप्रभृति अन्य नृपाल सैन्याच्या पृष्ठभागाचें रक्षण करीत होते. शान्तनव भीष्म नित्य युद्धामध्यें नवीन नवीन व्यूहरचना करीत असे. कधीं आसुरव्यूह, तर कधीं दैव, तर कधीं राक्षस व पैशाच अशा व्यूहांची तो रचना करीत असे.

( ५ ) याप्रमाणें उभय सैन्यें व्यूह रचून परस्परांच्या समीप आल्यावर त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें. त्या दिवसाचें तें युद्ध यमपुरीची वृद्धि करणारेंच होतें. अर्जुनादि पांडववीर शिखंडीला पुढें करून भीष्मावर विविध प्रकारच्या शरांची वृष्टि करूं लागले. भीमसेनाच्या शरांनीं विद्ध झालेले तुझे योद्धे रक्तानें माखून परलोकीं गेले. नकुल, सहदेव आणि सात्यकि यांनीं तुझ्या सैन्याला अतिशय पीडा दिली. पांडव तुझ्या सैन्याचा वध करीत असतां त्यांचें कोणीहि निवारण करूं शकला नाहीं. तेव्हां पांडवांच्या महारथांकडून पीडिलें जाणारें तें सैन्य दश-दिशांत पळत सुटलें. सृंजयांसह पांडवांच्या तीक्ष्ण शरांनीं विद्ध होणाऱ्या त्यांना कोणीहि त्राता भेटला नाहीं.

( ६ ) धृतराष्ट्र—हे संजया, आपलें सैन्य पार्थाकडून पीडिलें जात आहे, हें पाहून भीष्मानें काय केलें ? परंतप भीष्म क्रुद्ध होऊन सोमकांचा संहार करीत पांडवांवर कसा चालून गेला, तें सर्व मला सांग.

संजय—हे महाराज, पांडव-सृंजयांनीं तुझ्या सैन्याला पीडिलें असतां तुझ्या देवव्रत पित्यानें काय केलें, तें सांगतों ऐक. शूर पांडव तुझ्या पुत्रांच्या सैन्याचा संहार करीत असतां होणारा अश्व-गज व नर यांचा विनाश तुझ्या पित्याला सहन झाला नाहीं. त्या महात्म्यानें प्राणांवर उदार होऊन तत्काल नाराच, वत्सदंत व अंजलिक या तीक्ष्ण बाणांची पांडवसेनेवर वृष्टि केली. शस्त्रधारण केलेल्या त्या पितामहानें तीक्ष्ण शर सोडून मोठ्या यत्नानें पांडवांच्या पांच योद्ध्यांचें निवारण केलें. क्षुब्ध झालेल्या भीष्माला स्वसामर्थ्य व क्रोध यांच्या योगानें अतिशय आवेश आला होता. त्याच्या भरांत त्यानें नानाप्रकारच्या आयुधांनीं पांडवांचे असंख्य गज व अश्व यांचा संहार चालविला. अगणित रथ्यांना रथांतून खालीं पाडविलें. अश्वसादींना अश्वांच्या पाठीवरून व गजारोहींनाहि गजांवरून भूमीवर पाडविलें.

याप्रमाणें भीष्मानें सैन्याचा संहार चालविला असतां वज्रधर इंद्रावर चालून जाणाऱ्या असुराप्रमाणें पांडव पितामहावर तुटून पडले. इंद्राच्या अशनितुल्य तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत असतां गांगेयानें अतिशय भयंकर स्वरूप धारण केलें होतें. त्याचें इंद्राच्या चापाप्रमाणें असलेलें श्रेष्ठ धनुष्य मंडलाकार वांकत असलेलें दिसत असे. त्याचें तें दुष्कर कर्म पाहून पांडव अतिशय विस्मित झाले व त्यांनीं प्रशंसोद्गारांनीं पितामहाचा सत्कार केला. ते सर्व पांडुपुत्र विमनस्क झाले व पूर्वी विप्रचित्ति दानवाशीं युद्ध करतेवेळीं देव जसे किंकर्तव्यतामूढ झाले होते, तसे ते भीष्माच्या मुखाकडे पहातच राहिले.

( ७ ) हे महाराज, तो युद्धाचा दहावा दिवस होता. मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें शान्तनवाचें निवारण करण्यास कोणीहि समर्थ झाला नाहीं. अरण्याला जाळून भस्म करणाऱ्या अग्नीप्रमाणें भीष्मानें तीक्ष्ण बाण सोडून शिखंडीच्या सर्व रथसैन्याला दग्ध करून टाकिलें. त्या वेळीं तो शान्तनव सर्पाप्रमाणें क्रुद्ध झाला होता व कालानेंच ज्याला प्रेरणा केली आहे, अशा अंतकाप्रमाणें उग्र दिसत होता. शिखंडीनें त्याच्या वक्षःस्थलावर तीन बाण सोडिले. त्या बाणांनीं अतिशय विद्ध झालेला गांगेय जरी क्रुद्ध झाला होता, तरीहि शिखंडीवर प्रहार करण्याच्या अनिच्छेनें त्याला हंसतच असें म्हणाला —'तूं मजवर यथेच्छ प्रहार कर किंवा करूं नको. तुझ्या इच्छेस येईल तसें कर. परंतु मी तुझ्याशीं कदापि युद्ध करणार नाहीं. ज्याअर्थी विधात्यानें तुला स्त्रीदेह देऊन निर्माण केलें आहे, त्याअर्थी मी तुला अजुनहि शिखंडिनीच समजतों.'

भीष्माचे हे शब्द ऐकतांच शिखंडी क्रोधानें देहभान विसरला आणि जिभल्या चाटीत म्हणाला—"हे महाबाहो, तूं सर्व क्षत्रियांचा क्षय करणारा आहेस, हें मी जाणतों. तुझें जामदग्न्य रामाशीं झालेलें युद्धहि मीं ऐकलें आहे. त्याचप्रमाणें तुझा दिव्य पराक्रमहि अनेक प्रकारें माझ्या कानीं आलेला आहे. तथापि तुझा अलौकिक प्रभाव जाणत असूनहि मी पांडवांचें हित व माझें प्रिय करण्यासाठीं आज तुझ्याशीं युद्ध करणार आहें. मी आज तुझा निश्चित वध करीन, अशी तुझ्यासमक्ष सत्याची शपथ वहात आहें. हे पुरुषश्रेष्ठा, माझें हें वचन ऐकून तुला जें कांहीं योग्य वाटेल तें कर. तुझ्या इच्छेस येईल तर मजवर प्रहार कर किंवा करूं नको. मी तुला आज जिवंत सोडीत नाहीं.

यास्तव हे समितिंजया, हा लोक एकदा डोळे भरून पाहून घे. (कारण पुनः तो तुझ्या दृष्टीं पडणार नाहीं.)"

(८) संजय—हे धृतराष्ट्रा, असें बोलून वाग्बाणांनीं विद्ध केलेल्या भीष्मावर शिखंडीनें तीक्ष्ण धारेचे पांच नतपर्व शर सोडिले. त्याचे ते शब्द ऐकून 'हा भीष्माचा कालच आहे' असें महारथ सव्यसाचीनें जाणलें व शिखंडीला अशी प्रेरणा केली—"हे वीरा, मी शरवृष्टीनें शत्रूला त्रस्त करीत तुझ्या मागोमाग रहातों व तूं अग्रभागीं स्थित होऊन भीमपराक्रमी भीष्मावर अतिशय आवेशानें चालून जा. पितामह कितीहि बलाढ्य असला तरी तो युद्धांत तुझ्यावर शस्त्र उचलणार नाहीं. तस्मात् मोठ्या यत्नानें आज त्याचा पराभव कर. हे मारिषा, आज जर तूं भीष्माला न जिंकता समरांतून परत फिरलास, तर सर्व लोकांच्या उपहासास माझ्यासह प्राप्त होशील. (लोक आपला दोघांचाहि उपहास करतील.) यास्तव या महायुद्धांत आपण उपहासाला पात्र होणार नाहीं, असा यत्न कर. मी सर्व रथ्यांचें निवारण करून युद्धांत तुझें रक्षण करीन. पण तूं मात्र आज पितामहाला पराभूत कर. पुत्रासह द्रोण, कृप, सुयोधन, चित्रसेन, विकर्ण, सैन्धव, जयद्रथ, विन्दानुविंद, सुदक्षिण, कांबोज, भगदत्त, मागध, सौमदत्ति, आर्ष्यशृंगि राक्षस आणि सर्व महारथांसह त्रिगर्तराज, त्याचप्रमाणें महाबलाढ्य योद्ध्यांसह युद्ध करणारे कौरव या सर्वांचें मी रणांत निवारण करीन. पण तूं पितामहाला युद्धांत जिंक. ६. ४. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १ भीष्म-शिखंडीच्या युद्धाविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ युद्धाचें वर्णन. ३ भीष्म-दुर्योधन संवाद. ४ भीष्मपराक्रम. ]

(१) धृतराष्ट्र—हे संजया, भीष्म धर्मात्मा व नियतव्रत आहे. त्या पितामहावर पांचाल्य शिखंडी कसा धांवून गेला ? पांडवसेनेंतील कोणते जयेच्छु महारथ वीर हातांत शस्त्रें घेऊन शिखंडीचें रक्षण करीत होते ? युद्धाच्या त्या दहाव्या दिवशीं महा पराक्रमी भीष्मानें सृंजयांसह पांडवांशीं कसें युद्ध केलें ? शिखंडीनें भीष्मावर प्रहार करावा, ही वार्ता मला सहन होत नाहीं. बा सूता, त्या माझ्या पराक्रमी पित्याचा रथ तर भग्न झाला नाहीं ना ? किंवा त्याचें धनुष्य तर तुटलें नाहींना ?

( २ ) संजय—हे भरतश्रेष्ठा, संग्रामांत युद्ध करणाऱ्या भीष्माचा रथहि मोडला नाहीं व धनुष्यहि तुटलें नाहीं. तुझ्या पक्षांतील सज्ज झालेले महारथ नतपर्व बाणांनीं शत्रूंच्या सहस्रावधि योद्ध्यांचें निर्दलन करीत होते. त्याचप्रमाणें सज्ज झालेलें गजसैन्य व अश्वसैन्य यांसह पितामहाला पुढें करून ते सर्व वीर युद्धाला पुढें सरसावले. हे राजा, भीष्म आपल्या 'समितिंजय'-नांवाप्रमाणेंच युद्धामध्यें पांडव सैन्याचा क्षय करीत होता. आपल्या शरांनीं शत्रुसैन्याचा संहार करीत युद्ध करणाऱ्या त्या महेष्वास भीष्माचें पांडवांसह ते सर्व पांचाल निवारण करूं शकले नाहींत. दहाव्या दिवसाच्या युद्धाला आरंभ होतांच पितामहानें असंख्य बाणांनीं शत्रुसेनेला झांकून टाकिलें. हातांत पाश घेतलेल्या अंतकाप्रमाणें भीष्म रणांगणांत स्थित असतां पांडव त्याला जिंकण्यास असमर्थ झाले.

त्यानंतर सव्यसाची धनंजय सिंहनाद करीत कालाप्रमाणें रणांगणांत संचार करूं लागला. तो अपराजित बीभत्सु धनुष्याची दोरी ओढून वारंवार टणत्कार करीत शरौघ सोडूं लागला. त्याच्या शब्दानें तुझे सर्व सैनिक त्रस्त झाले आणि सिंहाच्या गर्जनेनें पळणाऱ्या हरिणींप्रमाणें भयभीत होऊन पळूं लागले.

( ३ ) आपलें सैन्य अतिशय पीडिलें जात आहे व पांडवांचा विजय होत आहे, हें पाहून दुर्योधनाला अतिशय खेद झाला. तो उद्विग्न चित्तानें भीष्माला म्हणाला—"हे तात, वनाला जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें हा श्वेताश्व कृष्णसारथि पार्थ माझ्या सर्व सैन्याला दग्ध करीत आहे. हे गांगेया, पांडुपुत्रानें त्रस्त केलेली माझी सेना कशी पळत आहे पहा ! वनामध्यें पशुपाल जसा पशूंना दंडानें पिटाळीत असतो, तसा हा धनंजय माझ्या सैन्याला शरांनीं विद्ध करून पळवून लावीत आहे. पार्थाच्या बाणांनीं भग्न झालेलें माझें सैन्य इतस्ततः पळत आहे, तसाच भीमहि माझ्या सैन्याला पळवून लावीत आहे. सात्यकि, चेकितान, माद्रीपुत्र, अभिमन्यु, धृष्टद्युम्न आणि घटोत्कचराक्षस हे सर्व अतिशय विक्रान्त व शूर आहेत. या महारथ्यांच्या शरांनीं विद्ध झालेलें माझें सैन्य पलायन करीत आहे. हे पितामह, तुझा पराक्रम देवतुल्य आहे. या वेळीं यांच्यापुढें अवस्थित होऊन युद्ध करण्यास कोणी समर्थ नाहीं. त्यामुळें आम्हांला युद्धामध्यें तुजवांचून अन्य गति दिसत नाहीं. पांडवांचा पराभव करण्यास तूंच एकटा पुरेसा आहेस. यास्तव या वेळीं आम्हां पीडितांचा तूंच सत्वर आश्रय हो."

संजय—दुर्योधनाचें हें दीन वचन ऐकून तुझ्या देवव्रत पित्यानें क्षणभर विचार केला, मनाशीं कांहीं निश्चय ठरविला व तुझ्या पुत्राला आश्वासन देत असें म्हटलें—" राजा दुर्योधना, शांत हो आणि माझें म्हणणें ऐकून घे. मीं पूर्वी प्रतिज्ञा केली होती कीं, मी नित्य दहा हजार महात्म्या क्षत्रियांचा युद्धांत जेव्हां संहार करीन तेव्हां रणांगणांतून परत फिरेन; त्या प्रतिज्ञेप्रमाणें मीं प्रतिदिवशीं कर्म केलें आहे आणि आजहि तसेंच महत्कर्म करणार आहें. आज मी स्वतः तरी हत होऊन भूमीवर शयन करीन, किंवा पांडवांचा तरी वध करीन. हे राजन्, आजपर्यंत तूं माझें स्वामीप्रमाणें पोषण केलें आहेस. यास्तव सेनेच्या अग्रभागीं देहत्याग करून मी तुझ्या त्या ऋणांतून मुक्त होईन."

( ४ ) हे धृतराष्ट्रमहाराज, असें बोलून तो दुराधर्ष भरतश्रेष्ठ गांगेय शरांची वृष्टि करीत पांडवांच्या सैन्यांतील क्षत्रियांच्या समीप येऊन पोंचला. तेव्हां सूर्याप्रमाणें क्रुद्ध होऊन सैन्याच्या मध्यभागीं स्थित झालेल्या भीष्माचें पांडवांनीं निवारण केलें.

हे राजन्, युद्धाच्या या दहाव्या दिवशीं भीष्मानें आपली अलौकिक शक्ति प्रकट करून शत्रूचे दहा हजार योद्धे गतप्राण केले. सूर्य जसा आपल्या किरणांनीं जलाचें शोषण करितो, तसें भीष्मानें आपल्या शरांनीं पंचालाच्या महारथ राजपुत्रांचें तेज आकर्षण करून घेतलें. दहा हजार तरस्वी गज, तेवढेच सादीसह अश्व व वीस हजार पदाति यांचें निर्दालन करून भीष्म त्या रणांगणांत धूमरहित अग्नीप्रमाणें प्रज्वलित दिसत होता. त्यावेळीं उत्तरायण मार्गाचा आश्रय करून ताप देणाऱ्या सूर्याप्रमाणें दुर्निरीक्ष्य असलेल्या भीष्माकडे पहाण्यासहि पांडव समर्थ झाले नाहींत.

नंतर महारथ शान्तनवानें पीडिलेले पांडव अतिशय क्षुब्ध झाले व भीष्माच्या वधेच्छेनें सृंजयांसह त्याच्यावर धांवून गेले. तो गंगापुत्र अनेक वीरांशीं युद्ध करीत असतां, मेघांनीं वेष्टिलेल्या मेरूप्रमाणें शोभत होता. हे राजा, त्या वेळीं तुझ्या पुत्रांनीं फार मोठ्या सैन्यांसह भीष्माला परिवेष्टित केलें. व नंतर त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें. ६. ४ १०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १ भीष्मावर प्रहार करण्याविषयीं पार्थाची प्रेरणा. २ युद्धाचें सविस्तर वर्णन. ३ धृष्टद्युम्नाचें योद्धयांना प्रोत्साहन. ४ दुःशासन-अर्जुन युद्ध. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, भीष्माचा रणांतील पराक्रम पाहून अर्जुन शिखंडीला म्हणाला—"तूं पितामहावर चालून जा. भिऊं नकोस. तुला आज भीष्मापासून कांहींहि भीति नाहीं. मी आज त्याला तीक्ष्ण शरांनीं श्रेष्ठ रथांतून खालीं पाडवीन."

पार्थाचें हें वचन ऐकून शिखंडी मोठ्या वेगानें गांगेयावर धांवून गेला. त्याचप्रमाणें महारथ धृष्टद्युम्न व सौभद्रेय अर्जुनाचे हे शब्द ऐकतांच भीष्मावर तुटून पडले. वृद्ध विराट व द्रुपदराजा, सज्ज झालेला कुंतिभोज, नकुल, सहदेव, पराक्रमी धर्मराज व पांडवांचें इतर सर्व सैन्य हें तुझ्या पुत्रांच्या समक्ष शान्तनवावर चालून गेलें. याप्रमाणें पांडवांचे सर्व महारथ एकत्र जमून भीष्मावर चाल करीत आहेत, असें पहातांच तुझे सर्व वीर आपापल्या शक्तीप्रमाणें मोठ्या उत्साहानें त्यांच्यावर धांवले. त्यांचें सविस्तर वर्णन करून सांगतों तें ऐक.

( २ ) हे राजन्, मत्त वृषभावर तुटून पडणाऱ्या व्याघ्रशिशूप्रमाणें कृतवर्मा मोठ्या त्वरेनें धृष्टद्युम्नावर धांवला. गांगेयाच्या वधाची इच्छा करणाऱ्या क्रुद्ध भीमसेनाचें सौमदत्तीनें निवारण केलें. असंख्य शरांची वृष्टि करणाऱ्या नकुलाचें व भीष्माच्या रथाकडे धांवणाऱ्या सहदेवाचें शारद्वत कृपानें निवारण केलें. भीष्माच्या निधनाची इच्छा करणाऱ्या सात्यकीचें तुझ्या दुर्मुख पुत्रानें निवारण केलें. भीष्मरथाकडेच ज्याचें सर्व लक्ष लागलें आहे, अशा अभिमन्यूशीं कांबोजाधिपति सुदक्षिणानें युद्ध केलें. शत्रूंचा संहार करणाऱ्या विराट व द्रुपद या दोघां वृद्ध नृपालांवर क्रुद्ध अश्वत्थात्मा तुटून पडला. भीष्माला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या ज्येष्ठ पांडुपुत्राचें सज्ज झालेल्या द्रोणाचार्यांनें निवारण केलें. भीष्माला पराभूत करण्यासाठीं शिखंडीला पुढें करून स्वतेजानें दशदिशा प्रज्वलित करणाऱ्या वेगवान् धनंजयाला महाधनुर्धर दुःशासनानें प्रतिबंध केला. त्याचप्रमाणें भीष्माच्या संमुख जाणाऱ्या इतरहि पांडव वीरांचें तुझ्या योद्धयांनीं निवारण केलें.

( ३ ) तथापि संतप्त झालेला महारथ धृष्टद्युम्न मात्र एकटाच भीष्मावर चालून जात असतां पुनः पुनः गर्जना करून आपल्या योद्ध्यांना म्हणाला— " हा कुरुनंदन पार्थ भीष्मावर चालला आहे. यास्तव तुम्ही भिऊं नका. भीष्म आज तुमच्यापर्यंत पोंचत नाहीं. अर्जुन त्याचें निवारण करण्यास समर्थ आहे. सज्ज झालेल्या धनंजयापाशीं युद्ध करण्यास साक्षात् इंद्रहि समर्थ नाहीं. मग वृद्धत्वामुळें जो दुर्बल झाला आहे व ज्याचें आयुष्य संपत आलें आहे, अशा भीष्माची काय कथा ! "

आपल्या सेनापतीकडून असें प्रोत्साहन मिळतांच पांडवांचे महारथ हृष्ट झाले व मोठ्या आवेशानें भीष्माच्या रथाकडे धांवले. प्रलयकालच्या जलौघाप्रमाणें ते भीष्माकडे चालले असतां तुझ्या वीरांनीं मोठ्या उत्साहानें त्यांचें निवारण केलें. भीष्मजीविताच्या रक्षणाची आकांक्षा करणारा दुःशासन निर्भयपणें धनंजयावर धांवला. त्याचप्रमाणें महारथ पांडव भीष्मरथाचें रक्षण करीत असलेल्या तुझ्या पुत्रांवर तुटून पडले.

हे विशांपते, त्यावेळीं त्यांचा अभूतपूर्व संग्राम आमच्या दृष्टीं पडला. धनंजय दुःशासनाच्या रथापर्यंत जाऊन पोंचल्यावर पुढें जाण्यास समर्थ झाला नाहीं. क्षुब्ध झालेल्या समुद्राला मर्यादित करणाऱ्या तीराप्रमाणें तुझ्या पुत्रानें त्या विजयाला प्रतिबंध केला. ते दोघेहि रथिश्रेष्ठ दुर्जय होते. त्यांची दीप्ति व कांति चंद्र-सूर्यतुल्य होती व ते उभयतःहि परस्परांच्या वधाची इच्छा करीत होते. पूर्वीं जसे मयासुर व शक्र परस्परांच्या समीप आले होते, तसे हे दोघे वीर युद्धार्थ सज्ज होऊन उभे राहिले.

प्रथम दुःशासनानें अर्जुनावर तीन विशिख शर आणि कृष्णावर वीस बाण सोडले. कृष्णाला पीडिलेलें पाहून पार्थ अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें दुःशासनावर शंभर नाराच बाण सोडले. त्या शरांनीं दुःशासनाच्या कवचाचा भेद करून त्याचें रक्त प्राशन केलें. क्रुद्ध झालेल्या दुःशासनानें अर्जुनाच्या ललाटावर तीन नतपर्व बाण सोडले. तेव्हां तो इंद्रपुत्र तीन शृंगांनीं युक्त असलेल्या मेरूप्रमाणें भासला. नंतर तुझ्या पुत्रानें आणखीहि दुसरे बाण सोडून त्याला शरविद्ध केलें असतां रुधिरयुक्त झालेला तो पृथापुत्र पुष्पित पलाशवृक्षाप्रमाणें शोभला.

त्यानंतर पौर्णिमेच्या चंद्राला ग्रासणाऱ्या राहूप्रमाणें अर्जुनानें दुःशासनाला पीडिलें. तेव्हां बलाढ्य पार्थाकडून पीडिला जाणारा दुःशासन अतिशय क्रुद्ध

झाला व त्यानें पार्थाला तीक्ष्ण धारेच्या कंकपत्र बाणांनीं विद्ध केलें. धनंजयानें तत्काल शर सोडून तुझ्या पुत्राचें धनुष्य तोडून टाकिलें, तीन बाणांनीं त्याचा रथ भग्न केला व एक तीक्ष्ण बाण सोडून त्याला विद्ध केलें. तथापि दुःशासनानें भ्रांत न होतां दुसरें धनुष्य घेतलें व भीष्माच्या संमुख स्थित होऊन अर्जुनाचें बाहु व वक्षःस्थल यांवर पंचवीस शर सोडले. संतप्त झालेल्या अर्जुनानेंहि तुझ्या पुत्रावर असंख्य बाणांची वृष्टि केली. ते सर्व शर कालदंडोपम होते. पार्थानें अतिशय आवेशानें सोडलेले ते बाण येऊन पोंचण्यापूर्वींच तुझ्या पुत्रानें त्यांचा मार्गांतच छेद केला. तो प्रकार खरोखर अद्भुत होता. आपले बाण मार्गांतच तुटून पडलेले पाहून पार्थानें दुसरे तीक्ष्ण धारेचे सुवर्ण पंखयुक्त शर सोडून त्याला विद्ध केलें. ते बाण, सरोवरांत वेगानें प्रवेश करणाऱ्या हंसाप्रमाणें दुःशासनाच्या शरीरांत शिरले.

याप्रमाणें पार्थाच्या बाणांनीं विद्ध झालेला दुःशासन पार्थाला सोडून भीष्मरथाकडे वळला. तेव्हां अगाध संकटार्णवांत बुडत असलेल्या तुझ्या पुत्राचा भीष्म आश्रय झाला. ( भीष्मानें त्याला आश्रय दिला. ) क्षणभरानें दुःशासनाची मूर्च्छा जाऊन तो देहभानावर आला व तो तुझा पराक्रमी शूर पुत्र, वृत्राचें निवारण करणाऱ्या शक्राप्रमाणें पुनः अर्जुनावर धांवला. त्याच्या अतिशय तीक्ष्ण बाणांनीं अर्जुनाचें शरीर जरी विद्ध झालें, तरी तो महात्मा यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. ६. ४. ११०.

---

## अध्याय १११ वा.

[ १ भीष्मावर चालून जाणाऱ्या भिन्न भिन्न पांडववीरांचें निवारण व त्यांचें पृथक् पृथक् वीरांशीं युद्ध. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, सज्ज झालेला सात्यकि भीष्मावर जात आहे, असें पाहून आर्ष्यशृंगीनें त्याचें निवारण केलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या सात्यकीनें त्याच्यावर नऊ शर सोडले व हंसतच त्याला विद्ध केलें. राक्षसानेंहि उलट त्याच्यावर नऊ शर सोडले. सात्यकीनें बाणांची वृष्टीच आरंभिली, तेव्हां राक्षसानें तीक्ष्ण शरांनीं त्याला विद्ध करून मोठ्यानें गर्जना केली. सात्यकीनेंहि पुनः शरांचा वर्षाव करून मोठ्यानें हंसून सिंहनाद केला.

इतक्यांत भगदत्त पुढें सरसावला व अंकुशानें गजाला जसें टोचावें, तसें त्यानें तीक्ष्ण शरांनीं सात्यकीवर प्रहार केले. तेव्हां सात्यकीनें राक्षसाला सोडून दिलें व भगदत्तावर नतपर्व बाणांची वृष्टि चालविली. तेव्हां भगदत्तानें शतधार भल्ल बाणानें सात्यकीचें धनुष्य तोडून टाकिलें. सात्यकीनें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन त्याला विद्ध केलें. त्याच्या बाणानें विह्वल झालेल्या भगदत्तानें संतप्त होऊन जिभल्या चाटीतच पोलादी शक्ति हातीं घेतली. ती शक्ति कनकवैदूर्यभूषित असून यमदंडाप्रमाणें घोर होती. ती मोठ्या वेगानें सात्यकीवर फेंकिली असतां, त्या वृष्णिवीरानें आपल्याकडे येत असलेल्या तिला पहातांच तीक्ष्ण बाणानें तिचे मार्गांतच दोन तुकडे करून टाकिले. तेव्हां ती शक्ति निस्तेज होऊन महोल्केप्रमाणें भूमीवर पडली.

हे महाराज, भगदत्ताची शक्ति भग्न होऊन पडलेली पहातांच तुझ्या पुत्रानें प्रचंड रथसमूहासह सात्यकीला वेढून टाकिलें आणि वार्ष्णेयांचा तो महारथ प्रतिबद्ध झालेला पाहून दुर्योधन आपल्या सर्व भ्रात्यांना क्रोधानें असें म्हणाला— " हे कौरवहो, ज्या योगानें हा सात्यकि आपल्या या रथाच्या वेढ्यांतून जिवंत सुटणार नाहीं, असं करा. हा एकदा मृत झाला कीं पांडवांचें महद्बल नष्ट झालेंच म्हणून समजा.''

त्याचें तें वचन ऐकून ते 'ठीक आहे' असें म्हणाले आणि भीष्मवधाला उद्युक्त झालेल्या त्या शैनेयाशीं युद्ध करण्यास सज्ज झाले. बलवान् काम्बोजराजानें नतपर्व बाणांनीं अभिमन्यूला विद्ध केलें. नंतर चौसष्ट बाण सोडले व पुनः आणखी पांच बाणांनीं त्याला विद्ध केलें. नऊ बाणांनीं त्याच्या सारथ्याचा वध केला व त्यांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें.

इतक्यांत शिखंडी गांगेयावर धांवून गेलेला पाहून विराट व द्रुपद हे दोघे वृद्ध नृपति प्रचंड सेनेचें निवारण करीत पुढें सरसावले व ते महारथ भीष्मावर चालून गेले. तेव्हां अश्वत्थाम्यानें त्यांचा प्रतिकार केला असतां त्या दोघांचें द्रोणपुत्राशीं युद्ध जुंपलें. द्रुपदानें तीन व विराटानें दहा बाण सोडून त्या गुरुपुत्राला विद्ध केलें. अश्वत्थाम्यानेंहि भीष्मवधार्थ उद्युक्त झालेल्या त्या दोघां नृपालांवर तीक्ष्ण शरांची वृष्टि करून त्यांना विद्ध केलें. तथापि त्या वृद्धांनीं विह्वल न होतां अद्भुत पराक्रम दाखविला. गुरुपुत्राच्या घोर बाणांचेंहि त्यांनीं निवारण केलें.

इकडे कृप सहदेवावर धांवला, वनामध्यें एक मत्त गज दुसऱ्या गजावर जसा धांवतो, तसा कृपाचार्य शूर माद्रीपुत्रावर तुटून पडला व त्यानें त्याच्यावर सात सुवर्णभूषित बाण सोडिले. सहदेवानें तीक्ष्ण बाणानें कृपाचें धनुष्य द्विधा तोडून टाकिलें, तेव्हां शारद्वतानें दुसरें दृढ धनुष्य घेऊन हृष्टचित्तानें माद्रेयाच्या वक्षःस्थलावर दहा बाण सोडले. सहदेवानेंहि भीष्मवधाच्या आकांक्षेनें कृपाच्या हृदयावर प्रहार केला आणि त्या उभयतांचें भयंकर युद्ध जुंपलें.

महाबलाढ्य भीष्माचें रक्षण करणाऱ्या विकर्णानें नकुलावर साठ बाण सोडले. तुझ्या पुत्राच्या बाणांनीं विद्ध झालेल्या नकुलानें उलट त्याला सत्त्याहत्तर शिलीमुख बाणानें विद्ध केलें. त्यावेळीं क्षुब्ध झालेल्या त्या दोघांचें भीष्मासाठीं होणारें युद्ध गोठ्यांतील दोन मत्त वृषभांच्या संग्रामासारखें भासलें.

शत्रुसैन्याचें मर्दन करीत घटोत्कचानें रणांगणांत प्रवेश करतांच दुर्मुखानें त्याचें निवारण केलें. तो तुझा पुत्र भीष्माचें रक्षण करीत शत्रुतापन हैडिंबावर शर सोडूं लागला. तेव्हां राक्षसानें नतपर्व बाण सोडून दुर्मुखाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. तुझ्या पुत्रानेंहि उलट भीमपुत्रावर साठ सुमुख शर सोडून त्याला क्षतयुक्त केलें.

त्याचप्रमाणें भीष्मवधाकांक्षेनें धांवून येणाऱ्या रथश्रेष्ठ धृष्टद्युम्नाचें महारथ हार्दिक्यानें निवारण केलें. प्रथम पांच पोलादि बाणांनीं त्याला विद्ध केलें व नंतर 'थांब, थांब' असें बोलून पार्षतावर पन्नास बाणांची वृष्टि केली. तेव्हां त्या द्रुपदपुत्रानें कंकपत्रयुक्त व सरळ जाणारे नऊ तीक्ष्ण बाण सोडून हार्दिक्याला त्रस्त केलें. भीष्मासाठीं त्या दोघांचेंहि वृत्र-वासवांसारखें घनघोर युद्ध जुंपलें.

भीमसेन भीष्माच्या रथाकडे चालला असतां भूरिश्रव्यानें 'थांब थांब' असें म्हणत त्याचा मार्गांतच निरोध केला व सुवर्णपुंखयुक्त नाराच बाणांचा त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. त्या बाणानें, स्कंदाच्या शक्तीनें शोभणाऱ्या क्रौंचपर्वताप्रमाणें भीम शोभला. नंतर क्रुद्ध झालेले ते उभय वीर परस्परांवर तीक्ष्ण बाण सोडूं लागले. भीष्मवधाची इच्छा करणारा वृकोदर आणि भीष्माचें रक्षण करणारा भूरिश्रवा परस्परांशीं निकरानें युद्ध करूं लागले. ते दोघेहि सज्ज असून प्रतिस्पर्ध्यास हार न जाणारे होते.

राजा युधिष्ठिर प्रचंड सैन्यासह भीष्माच्या संमुख येत असतां द्रोणाचार्यांनें त्याचें निवारण केलें. हे राजा, मेघगर्जनेसारखा द्रोणरथाचा निर्घोष ऐकून प्रभद्रक भयानें कंपित झाले. युधिष्ठिराची ती सज्ज झालेली प्रचंड सेना, द्रोणानें प्रतिबंध करतांच, एक पाऊलहि पुढें टाकण्यास समर्थ झाली नाहीं.

भीष्मरथावर चालून येणाऱ्या चेकितानाचें चित्रसेनानें निवारण केलें. त्या तुझ्या पराक्रमी पुत्रानें भीष्मरक्षणार्थ आपली सर्व शक्ति प्रकट करून युद्ध केलें. चेकितान व चित्रसेन यांनीं परस्परांवर प्रहार केले आणि त्या दोघांचा संग्राम सुरू झाला.

तथापि अर्जुनानें मात्र अनेक प्रकारें निवारण केलें जात असतांहि तुझ्या पुत्राला पराङ्मुख करून कौरवसेनेचा संहार चालविला. पार्थाकडून भीष्माचा वध होऊं नये, या हेतूनें दुःशासनानें परम शक्तीनें त्याचें निवारण केलें. तथापि त्याला पराभूत करून पांडवांच्या श्रेष्ठ रथ्यांनीं तुझ्या सैन्याला व्याकुल करून सोडिलें. ६. ४. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १ द्रोणाचें अश्वत्थाम्याला दुश्चिह्नेंकथन, द्रोणाचा उद्वेग. २ त्याला शिखंडी-वर चालून जाण्याचा उपदेश. ]

( १ ) संजय—हे महाराज, ज्याचा पराक्रम मत्तगजतुल्य असून, जो मत्त वारणाचें निवारण करण्यासहि समर्थ आहे, असा महात्मा द्रोणाचार्य निमित्तज्ञ होता. ( त्याला अशुभ चिह्नें व शुभचिह्नें ओळखतां येत होतीं. ) तो नरश्रेष्ठ आपलें श्रेष्ठ धनुष्य आकर्ण ओढून पांडवसेनेला त्रस्त करीत असतां सभोंवार पसरलेलीं दुश्चिह्नें पाहून आपल्या पुत्राला म्हणाला—"वत्सा, ज्या दिवशीं महाबलाढ्य पार्थ भीष्मवधासाठीं युद्धांत पराकाष्ठेचा यत्न करणार आहे, तो आजचाच दिवस बरें ! हीं सर्व दुश्चिह्नें होत आहेत पहा. माझे बाण आपोआपच उसळत आहेत. धनुष्य स्फुरण पावत आहे. अस्त्रें एकरूप होत आहेत. माझी मति क्रूरकर्मांमध्यें आसक्त होत आहे. पशु-पक्षी घोर शब्द करीत दशदिशांत संचार करीत आहेत. गृध्रपक्षी भारतसेनेंत भूमीवर येऊन लपून बसत आहेत. सूर्य निस्तेज दिसत आहे. सर्व दिशा आरक्त झाल्या आहेत. भूमि जणू काय शब्दच करीत आहे व भयभीत होऊन कंप पावत

आहे. कंक, गृध्र व बक वारंवार अशुभ ध्वनि करीत आहेत. अमंगल भालु महद्भयसूचक घोर शब्द करीत आहेत.

बा अश्वत्थाम्या, आज सूर्यमंडलाच्या मध्यभागांतून फार मोठी उल्का पडलेली मीं पाहिली. आदित्याच्या सभोंवार कबंधांचें वर्तुळ दिसत आहे पहा! सूर्यचंद्रांच्या भोंवतीं पडलेलें घोर खळें नृपालांचा होणारा दारुण क्षय सुचवीत आहे. दुर्योधनाच्या देवालयांतील धृतराष्ट्राच्या देवता कंप पावत आहेत, हंसत आहेत, नृत्य करीत आहेत व रोदन करीत आहेत. सूर्याभोंवतीं फिरणारे ग्रह डावीकडून अशुभसूचक प्रदक्षिणा करीत आहेत. भगवान् चंद्र दोन्ही शृंगें अधोमुख करून उदय पावत आहे. धार्तराष्ट्राच्या सैन्यांतील सज्ज झालेले नृपति निस्तेज दिसत आहेत. उभय सैन्याच्या सभोंवार पांचजन्याचा निर्घोष व गांडीवाचा प्रचंड टणत्कार ऐकूं येत आहे. यावरून आज बीभत्सु श्रेष्ठ अस्त्रांचा प्रयोग करून कौरव योद्धयांना दूर सारील व पितामहाच्या समीप निश्चित जाऊन पोंचेल, असें स्पष्ट दिसत आहे.

(२) हे महाबाहो, आज होणाऱ्या भीष्मार्जुनसमागमाचा विचार मनांत येतांच माझ्या अंगावर रोमांच उभे रहातात व मन व्यथित होतें. त्या कपटनिपुण व पापबुद्धि पांचालाला पुढें करून पार्थ भीष्मावर चालून गेला आहे आणि भीष्मानें तर शिखंडीवर[1] शस्त्र न उगारण्याचा आपला निश्चय पूर्वींच सांगून ठेविला आहे. या अमंगलध्वजाप्रमाणें असलेल्या शिखंडीवर गंगासुत कदापि प्रहार करणार नाहीं. या विचारानें माझें मस्तक भ्रमण करूं लागतें व मला कांहीं सुचेनासें होतें.

पार्थ शस्त्र उगारून पितामहावर चालून गेलाच आहे. कधींहि क्रुद्ध न होणारा शांतवृत्तीचा युधिष्ठिर क्रोधसंतप्त दिसत आहे, भीष्मार्जुनांचें युद्ध जुंपलें आहे आणि माझीं नेहमीं उपस्थित असणारीं अस्त्रें आज संकल्पानेंहि उपस्थित होत नाहींत, हीं चिह्नें प्रजेचें निश्चित अकल्याण सूचवीत आहेत. अर्जुन विचारी व शूर आहे. तो कृतास्त्र असून लघुविक्रम आहे. तो बलाढ्य पांडव दूरवर लक्ष वेधणारा, दृढ शरसंधान करणारा आणि निमित्तज्ञ आहे.

---

१ शिखंडी जन्मतः स्त्री असून पुढें दैवयोगानें पुरुष झाल्याचा सविस्तर उल्लेख पूर्वी अनेकदा केलेला असल्यामुळें येथें त्याअर्थीच असलेल्या श्लोकांचा अर्थ गाळला आहे.

इंद्रासह देवांनाहि तो युद्धांत अजिंक्य आहे. तो बुद्धिमान् रथिश्रेष्ठ पार्थ जितक्लेश व विजयी असून त्याला भैरवास्त्र सतत उपस्थित आहे.

यास्तव हे नियतव्रत पुत्रा, सत्वर जा आणि त्याच्या मार्गाचा निरोध कर. आजच्या या महाघोर युद्धांत फार मोठा अनर्थ ओढवणार आहे. नतपर्व बाणांनीं शूरांचीं चित्रविचित्र मूल्यवान् सुवर्णकवचें विदीर्ण होत आहेत. पार्थाच्या शरांनीं तोमर, धनुष्यें व ध्वजाग्रें यांचा छेद होऊन तीं खालीं पडत आहेत. क्रुद्ध झालेला किरीटी विमल व तीक्ष्ण प्रास, सुवर्णाच्या उज्ज्वल शक्ति आणि गजांच्या वैजयंती यांचीं शस्त्रौघानें शकलें करीत आहे. असा हा बिकट समय प्राप्त झाला आहे. कौरवांचें अनुचर असलेल्या आपल्यासारख्या राजाश्रितांनीं स्वतःच्या प्राणांचें संरक्षण करण्याचा हा काल नाहीं. यास्तव हे वत्सा, तूं स्वर्गाचा पुरस्कार करून विजयार्थ जा आणि यशस्वी हो.

रथ-अश्व-गजरूपी आवर्तांनीं युक्त असलेली ही महाघोर दुस्तर संग्राम नदी हा कपिध्वज आपल्या रथानें तरून जात आहे. ब्राह्मणांविषयीं श्रद्धा, दम, दान आणि महत्तपश्चर्या हे गुण एकट्या युधिष्ठिराच्याच ठिकाणीं दिसून येतात. अशा त्या महात्म्याचा भ्राता धनंजय आहे. बलाढ्य भीमसेन आणि दोघे माद्रीपुत्र ज्याचे अनुज असून वासुदेव ज्याचा नाथ आहे, त्या धर्मात्म्या युधिष्ठिराला दुर्मति दुर्योधनानें क्लेश देऊन संतप्त केलें. त्याच्या कोपाचा हा परिणाम आहे, ज्यानें आपलें शरीर तपानें दग्ध केलें आहे, त्या तपस्वी पांडवाचा क्रोध भारतीसेनेला जाळून टाकील.

हा पहा ! कृष्णाचा आश्रय केलेला पार्थ कौरवांच्या सैन्याचें सर्वशः विदारण करीत आहे. धनंजयानें क्षुब्ध केलेली ही महासेना तिमिंगल माशानें क्षुब्ध करून सोडलेल्या तरंगयुक्त जलाशयाप्रमाणें दिसत आहे. सैनिकांच्या मुखांनीं होणारा हाहाकार सर्वत्र कानीं पडत आहे. तस्मात् तूं शिखंडीवर चालून जा. मी युधिष्ठिराकडे वळतों. अमित तेजस्वी युधिष्ठिराचा व्यूह दुर्गम आहे. त्याच्या आंत प्रवेश करणें कठीण आहे. व्यूहाच्या सभोंवार सर्वत्र पांडवांचे अतिरथ स्थित असल्यामुळें तो सागरकुक्षीप्रमाणें दुष्प्रवेश्य झाला आहे. सात्यकि, अभिमन्यु, धृष्टद्युम्न, वृकोदर नकुल आणि सहदेव युधिष्ठिराचें रक्षण करीत आहेत. सेनेच्या अग्रभागीं चाललेल्या या अभिमन्यूकडे पहा !

तो कृष्णासारखा श्यामवर्ण असून शालवृक्षासारखा उंच आहे. तो जणुंकाय दुसरा अर्जुनच भासत आहे.

बा अश्वत्थाम्या जा. उत्तम अस्त्रें व श्रेष्ठ धनुष्य घेऊन शिखंडीवर चालून जा आणि वृकोदराशीं युद्ध कर. आपला प्रियपुत्र दीर्घकाल जिवंत रहावा असें कोणाला वाटत नाहीं! तथापि क्षात्रधर्माकडे लक्ष देऊन मी आज तुला या युद्धांत नियुक्त करीत आहें. आज हा भीष्महि पांडवसेनेला दग्ध करीत आहे. वत्सा, तो गांगेय युद्धांत यम व वरुण यांच्या तुल्य पराक्रमी आहे." ६. ४. ११२.

---

## अध्याय ११३ वा.

[ १ भीमाचें कौरववीरांशीं युद्ध. २ भीमाचा पराक्रम. ३ अर्जुनाचें भीमसाह्यार्थ आगमन. ४ त्रिगर्तांची भीमार्जुनांवर चाल. ]

( १ ) संजय—हे राजन्, त्यानंतर भगदत्त, कृप, शल्य, कृतवर्मा, दोघे विंदानुविंद, जयद्रथ, चित्रसेन, विकर्ण आणि दुर्मर्षण हे तुझे दहा योद्धे भीमसेनावर चालून गेले. ते सर्व नाना देशांतून आलेल्या प्रचंड सेनेनें युक्त असून समरामध्यें भीष्माच्या यशाची प्रार्थना करीत होते. प्रथम शल्यानें नऊ बाणांनीं भीमसेनाला ताडन केलें. नंतर कृतवर्म्यानें तीन व कृपानें नऊ बाण सोडले आणि चित्रसेन, विकर्ण व भगदत्त या प्रत्येकानें भीमावर दहा, दहा बाणांचे प्रहार केले. सैंधवानें तीन बाण सोडले. दोघां विंदानुविंदांनीं पांच पांच शरांनीं आणि दुर्मर्षणानें वीस शरांनीं त्या पांडवाला विद्ध केलें.

परंतु हे महाराज, त्या सर्व कौरवांच्या श्रेष्ठ महारथांवर एकट्या भीमानें पृथक् पृथक् प्रहार केले. त्यानें शल्याला सात व कृतवर्म्याला आठ बाणांनीं विद्ध केलें. कृपाच्या धनुष्याचा शरांसह छेद केला व त्याला सात बाणांनीं विद्ध केलें.

उभय विंदानुविंदावर तीन तीन, दुर्मर्षणावर वीस, चित्रसेनावर पांच, विकर्णावर दहा व सैंधवावर पांच बाण सोडले, हृष्ट होऊन प्रचंड गर्जना केली व पुनः जयद्रथाला तीन शरांनीं विद्ध केलें.

इतक्यांत कृपाचार्यानें दुसरें धनुष्य घेऊन भीमावर दहा तीक्ष्ण बाण सोडिले. त्या शरांनीं विद्ध झालेला वृकोदर अंकुशानें टोचलेल्या मत्त गजाप्रमाणें क्रुद्ध होऊन गौतमावर अनेक शरांची वृष्टि करूं लागला. कृतान्त

कालाप्रमाणें संचार करणाऱ्या त्या पांडुपुत्रानें तीन शरांनीं जयद्रथाचा सारथि व अश्व यांना यमलोकीं पाठवून दिलें. अश्व व सारथि हत झाले असतां सैंधवानें रथांतून मोठ्या वेगानें उडी टाकून भीमसेनावर तीक्ष्ण शर सोडिले. परंतु भीमानें तत्काल दोन भल्ल बाणांनीं त्याच्या धनुष्याचा छेद केला. तेव्हां विरथ झालेल्या त्या योद्धयाचें धनुष्यहि तुटलें असतां तो मोठ्या त्वरेनें चित्रसेनाच्या रथावर आरूढ झाला.

याप्रमाणें त्या पांडवानें महारथांना शरांनीं विद्ध करून निवारिलें व सर्व लोकांच्या समक्ष सैंधवाला विरथ करून अद्भुत कर्म प्रकट केलें. भीमाचा तो पराक्रम शल्याला सहन झाला नाहीं. त्यानें 'थांब थांब' असें म्हणून तीक्ष्ण शरांनीं भीमाला विद्ध केलें. कृप, कृतवर्मा, भगदत्त, विन्दानुविंद भ्राते, चित्रसेन, दुर्मर्षण, विकर्ण व सिंधुराज हे सर्व वीर शल्याला साह्य करण्यासाठीं भीमावर तुटून पडले. परंतु भीमानें त्या सर्वांचें पांच पांच शरांनीं निवारण केलें. शल्याला सात शरांनीं विद्ध करून पुनः दहा शर सोडले. शल्यानें उलट नऊ व पुनः पांच बाण त्याच्यावर सोडिले व एका भल्ल बाणानें सारथ्याच्या मर्मावर प्रहार केला. आपला विशोक सारथि गाढ विद्ध झालेला पाहून भीमसेनानें मद्रराजाच्या बाहूंवर दोन व हृदयावर एक बाण सोडला. त्याचप्रमाणें इतरहि महेष्वास वीरांना तीन, तीन सरलगतीच्या बाणांनीं विद्ध करून मोठ्यानें सिंहनाद केला.

तेहि सर्व वीर युद्धविशारद होते. सज्ज झालेल्या त्या महारथांनीं भीमावर तीन, तीन बाण सोडिले. त्या सर्व शरांची गति अकुंठित होती. त्यांनीं भीमसेनाच्या मर्मावर प्रहार केले. तथापि त्या शरांनीं अतिशय विद्ध झालेला भीम यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं. समंततः जलधारांची वृष्टि होत असतां निश्चल रहाणाऱ्या पर्वताप्रमाणें तो निष्कंप राहिला. त्या महायशस्वी पांडवानें क्रुद्ध होऊन तीन शरांनीं मद्रेश्वराला विद्ध केलें. कृपावर नऊ बाण सोडले आणि प्राग्ज्योतिषाधिप भगदत्ताला शंभर शरांनीं विद्ध केलें. तीक्ष्ण धारेच्या क्षुरप्र बाणानें सात्वताचें सशर धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां त्यानें दुसरें धनुष्य घेऊन भीमाच्या दोन भुंवयांच्यामध्यें नाराच बाणानें प्रहार केला.

भीमानें उलट भगदत्तावर तीन, कृतवर्म्यावर साठ व कृपादि रथांवर प्रत्येकीं दोन-दोन शर सोडिले. त्यांनींहि वृकोदराला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. तथापि

त्या महारथ्यांच्या सर्व शस्त्रांनीं पीडिला जाणारा तो पांडुपुत्र यत्किंचित्‌हि व्यथा न पावतां त्यांना तृणवत लेखून रणांत संचार करूं लागला.

ते सर्व रथिश्रेष्ठहि अव्यग्र चित्तानें भीमावर सहस्रावधि तीक्ष्ण शरांचा वर्षाव करीत होते. महारथ भगदत्तानें महावेगवान् सुवर्णदंडयुक्त शक्ति त्याच्यावर सोडिली. सैंधवानें तोमर व पट्टिश, कृपानें शतघ्नी, शल्यानें शर आणि इतर वीरांनीं पांच-पांच शिलीमुख बाण भीमावर फेंकले. तथापि त्या वायुसुतानें एका क्षुरप्र बाणानें तोमराचीं दोन शकलें केलीं. पट्टिशाचे तिलकांडाप्रमाणें तीन तुकडे केले. नऊ कंकबाणांनीं शतघ्नीचा छेद केला. मद्रराजानें सोडलेल्या शक्तीला विदीर्ण करून टाकिलें. नतपर्व बाणांनीं इतरांनीं सोडलेल्या घोर बाणांतील प्रत्येकाचे तीन तीन तुकडे केले आणि शेवटीं त्या सर्वांवर तीन तीन शर सोडिले.

( ३ ) इतक्यांत भीम महारथांवर प्रहार करीत असून त्याचें त्यांच्याशीं युद्ध जुंपलें आहे, हें धनंजयाच्या दृष्टीं पडलें व तो त्या महारणांत उपस्थित झाला. त्या दोघां युद्धदुर्मद महात्म्या पांडवांना एकत्र पाहून तुझ्या वीरांची जयाची आशा कुंठित झाली. वास्तविक अर्जुन त्यावेळीं शिखंडीला पुढें करून भीष्मवधाच्या इच्छेनें महारथावर चालला होता. तथापि एकटा भीम दहा वीरांशीं युद्ध करीत आहे, तें पहातांच तो तिकडे वळला व भीमाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें त्या सर्व योद्धयांना त्यानें क्षतयुक्त केलें.

( ४ ) तें पाहून राजा दुर्योधनानें त्रिगर्ताधिपाला अशी आज्ञा केली.— "हे सुशर्मन्, त्वरा कर. मोठ्या सैन्यासह जा आणि या धनंजयवृकोदरांचा सत्वर वध कर.'

दुर्योधनाची ही आज्ञा ऐकतांच तो प्रस्थलाधिप त्रैगर्त भीमार्जुनावर धांवला. त्यानें सहस्रावधि रथसमुदायानें त्या दोघां पांडुपुत्रांना समंततः वेढून टाकिलें आणि अर्जुनाचें त्याच्याशीं युद्ध प्रवृत्त झालें. ६. ४. ११३.

## अध्याय ११४ वा.

[ १ अर्जुनाचें कौरवयोद्धयांशीं युद्ध. २ मागधाचा पराभव. ३ शिखंडीची भीष्मावर चाल व कौरव-पांडवांचें तुमुल युद्ध. ]

( १ ) **संजय**—हे राजेंद्रा, त्यानंतर अर्जुनानें महारथ शल्याला नतपर्व बाणांनीं आच्छादित केलें. सुशर्मा व कृप यांना तीन-तीन बाणांनीं विद्ध केलें. प्राग्ज्योतिषाधिप, जयद्रथ, चित्रसेन, विकर्ण, कृतवर्मा, दुर्मर्षण आणि दोघे आवंत्यभ्राते यांतील प्रत्येकावर तीन तीन कंकपत्रयुक्त बाण सोडले व तुझ्या सेनेला अतिशय पीडित केलें. तेव्हां जयद्रथानें चित्रसेनाच्या रथांतून भीम व अर्जुन या दोघांनाहि विद्ध केलें. त्याचप्रमाणें शल्य व कृप यांनींहि अनेक मर्मघातक शर सोडिले. तुझ्या चित्रसेनादि पुत्रांनीं पांच-पांच तीक्ष्ण शर सोडून भीमार्जुनावर प्रहार केले व ते दोघे रथिश्रेष्ठ त्रिगर्तांच्या महद्दलाला पीडा देत असतां सुशर्मानें नऊ शरांनीं त्यांना विद्ध केलें व प्रचंड सिंहनादानें त्यांच्या सैन्याला त्रस्त करून सोडिलें.

इतरहि शूर रथ्यांनीं भीमार्जुनांवर सुवर्णपुंखयुक्त सरलगतीनें जाणारे बाण सोडिले. त्यावेळीं गायींच्या कळपांत संचार करून आमिषाची इच्छा करणाऱ्या मदोन्मत्त सिंहाप्रमाणें ते दोघे बलाढ्य कुंतीपुत्र कौरवसेनेंत जणुकाय क्रीडाच करीत होते. त्या उभय पांडवांनीं अनेक शूरांचीं धनुष्यें व शर यांचा छेद करून शेकडों सैनिकांचीं मस्तकें खालीं पाडविलीं. असंख्य रथांना भग्न केलें, सहस्रावधि अश्वांना गतप्राण करून गजांना त्यांच्या सादींसह भूमीवर पाडविलें. हे राजन्, त्या रणांगणांत जेथें तेथें विद्ध झालेले रथी व सादी पडलेले दिसत होते. त्यांतील अनेक वीर क्षतयुक्त होऊन कंप पावत होते. हत झालेलीं अश्वादि वाहनें व भग्न झालेले रथ यांनीं ती रणभूमि आच्छादित झाली होती. विविध आयुधें, ध्वज आणि वीरांचीं गळून पडलेलीं नानाप्रकारचीं मूल्यवान् भूषणें व योद्धयांचे तुटलेले अवयव त्या भूमीवर सर्वत्र पसरलेले दिसत होते.

हे भारता, त्यावेळीं त्या कौरववीरांचें निवारण करून शरवृष्टींनीं त्यांना विद्ध करणाऱ्या अर्जुनाचा अद्भुत पराक्रम आमच्या दृष्टीं पडला. भीमार्जुनांचा तो पराक्रम पाहून तुझा पुत्र गांगेयाच्या रक्षणार्थ त्याच्या रथासमीप जाऊन स्थित झाला. कृप, कृतवर्मा, सिंधुराज व उभयतः आवन्त्यभ्राते यांनींहि आपलें स्थान सोडिलें नाहीं.

त्यानंतर बलाढ्य भीम व धनुर्धर फाल्गुन हे दोघे वीर कौरवांच्या घोर सेनेवर वेगानें धांवले. तें पाहून कौरवांच्या पक्षांतील भूपतींनीं मयूराच्या पिसांनीं सुशोभित केलेले लक्षावधि शर धनंजयावर सोडले, परंतु त्या पांडवानें शरजालानें त्यांचें निवारण करून महारथांना यमलोकीं पाठवून दिलें. तेव्हां शल्यानें जणुकाय सहज क्रीडा करीत असल्याप्रमाणें नतपर्व भल्ल बाणांनीं पार्थाच्या वक्षःस्थलावर प्रहार केले. पार्थानें तत्काल पांच पांच बाण सोडून मद्रेश्वराचें धनुष्य व हस्तावाप यांचा छेद केला. शल्यानें तत्काल दुसरें दृढ धनुष्य घेतलें, अर्जुनावर तीन आणि कृष्णावर पांच बाण सोडले व नऊ बाणांनीं भीमाचे बाहू व हृदय विद्ध केलें.

( २ ) इतक्यांत दुर्योधनाच्या आज्ञेवरून द्रोण व मागध, जेथें भीमार्जुन कौरवांच्या महासेनेचें मर्दन करीत होते, तेथें आले. मागध जयत्सेनानें भीमावर आठ तीक्ष्ण बाण सोडले. भीमानें उलट दहा व पुनः पांच शरांनीं त्याला विद्ध करून एका भल्लबाणानें त्याच्या सारथ्याला रथनीडावरून खालीं पाडविलें. तेव्हां सारथ्याच्या अभावीं भ्रांत झालेले अश्व रथ घेऊन समंततः भटकत सर्व सैन्याच्या समक्ष जयत्सेनासह पळत सुटले.

द्रोणांनीं संधि साधून पांसष्ट तीक्ष्ण बाणांची भीमावर वृष्टि केली. भीमानें तत्काल त्या समरश्लाघी गुरुवर तेवढेच बाण सोडले. अर्जुनानें सुशर्म्यावर अनेक पोलादी शर सोडले आणि वायूनें उडवून लावणाऱ्या अभ्रांप्रमाणें त्याचें सैन्य उधळून दिलें. तें पाहून भीष्म व बृहद्बल हे दोघे संतापून भीमसेन-धनंजयांवर धांवले. त्याचप्रमाणें शूर पांडव व धृष्टद्युम्न भीष्मावर चालून गेले. त्यावेळीं तो पितामह मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें क्रूर दिसत होता.

( ३ ) इतक्यांत शिखंडी महारथांचें भय सोडून हृष्टचित्तानें पितामहाच्या समीप येऊन पोंचला व युधिष्ठिरादि पार्थ सर्व सृंजयांसह शिखंडीला पुढें करून भीष्माशीं युद्ध करूं लागले. त्याचप्रमाणें तुझे सर्व योद्धे नियतव्रत भीष्माला पुढें करून शिखंडिप्रभृति पांडवांशीं युद्धाला सज्ज झाले आणि भीष्माच्या विजयासाठीं कौरवांचा पांडवांशीं भयावह संग्राम प्रवृत्त झाला.

राजा, त्यावेळीं तुझ्या पुत्रांनीं भीष्माला पणाला लावून जय किंवा अपजय

यांसाठीं तें एक युद्धरूपी द्यूतच आरंभिलें होतें. नंतर धृष्टद्युम्नानें सर्व सैन्याला अशी प्रेरणा केली—" हे रथिश्रेष्ठहो, भीऊं नका, भीष्मावर चालून जा."

सेनापतीची ही आज्ञा कानीं पडतांच पांडवांची सेना प्राणांवर उदार होऊन भीष्मावर वेगानें धांवून गेली. तेव्हां ढांसळून पडणाऱ्या तीराला समुद्र जसा अंगावर घेतो, तसा भीष्मानें त्या सेनेचा स्वीकार केला. ६. ४. ११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १ दहाव्या दिवसाच्या युद्धाविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ भीष्माची स्ववधार्थ युधिष्ठिराला आज्ञा. ४ कौरवपांडवांचें संकुल युद्ध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, महापराक्रमी भीष्मानें सृंजयांसह पांडवांशीं दहाव्या दिवशीं कसें युद्ध केलें ? आणि कौरवांनीं पांडवांचें निवारण कसें केलें ? संग्रामांत शोभणाऱ्या गांगेयाच्या महायुद्धाचा सर्व वृत्तान्त मला सांग.

( २ ) संजय—हे भारता, कौरवांनीं पांडवांबरोबर कसें युद्ध केलें, त्याचा यथार्थ वृत्तान्त तुला सांगतों ऐक. युद्धाला आरंभ झाल्यापासून प्रत्येक दिवशीं किरीटीनें तुझ्याकडील संतप्त झालेल्या महारथांना श्रेष्ठ अस्त्रांनीं परलोकाला पाठविलें. त्याचप्रमाणें भीष्मानेंहि आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें पांडवांच्या सेनेचा क्षय चालविला. त्यावेळीं तुझ्या पक्षांत कौरवांसह भीष्म युद्ध करीत होता आणि पांडवांच्या पक्षांत पांचाल्यासह अर्जुन स्थित होता. ते दोघेहि अलौकिक धनुर्धर असल्यामुळें कोणाचा विजय होईल, हें सांगतां येणें शक्य नव्हतें. उभय पक्षांना जयाविषयीं संशयच वाटत होता.

हे राजा, दहाव्या दिवशीं जेव्हां भीमार्जुनाचा संग्राम प्रवृत्त झाला तेव्हां तर सेनेचा भयंकर क्षय झाला. त्या दिवशीं परम अस्त्रवेत्त्या शान्तनवानें तर दश सहस्राहून अधिकच योद्ध्यांना गतप्राण केलें. त्यांतील असंख्य योद्ध्यांचीं नाम-गोत्रेंहि कोणाला ठाऊक नव्हतीं. ते सर्व युद्धापासून कधींहि निवृत्त न होणारे शूर असूनहि भीष्माच्या हातून हत झाले.

( ३ ) याप्रमाणें सतत दहा दिवस पांडवसेनेला ताप दिल्यावर धर्मात्म्या भीष्माला स्वतःचें जीवित नकोसें वाटूं लागलें व आपला आतां सत्वर वध व्हावा या इच्छेनें तो रणांत अग्रभागीं स्थित झाला.

या असंख्य मानवश्रेष्ठांचा वध करणें योग्य नव्हे, असा मनांत विचार करून तुझा देवव्रत पिता समीपच असलेल्या धर्मपुत्राला म्हणाला—“ बा युधिष्ठिरा, तूं महाप्राज्ञ आहेस. सर्व शास्त्रें तुला अवगत आहेत. यास्तव माझें हें धर्म्य व स्वर्गप्रद वचन ऐक. बाबारे, माझ्या आयुष्यांतील बहुतेक काल असंख्य प्राण्यांचा वध करण्यांत गेला आहे. आतां मला या जीविताची विरक्ति आली आहे. यास्तव तूं जर माझें कांहीं प्रिय इच्छीत असशील तर पांचाल व सृंजय यांच्यासह पार्थाला पुढें करून माझ्या वधाचा यत्न कर.”

हे राजन्, सत्यदर्शी पांडवानें भीष्माचा आशय जाणून त्याच्या इच्छेप्रमाणें सृंजयांसह संग्रामांत त्याच्याशीं युद्ध आरंभिलें. भीष्माचें तें वचन ऐकून धृष्टद्युम्न व युधिष्ठिर यांनीं आपल्या सेनेला अशी प्रेरणा केली—“ भीष्मावर धांवून जा, युद्ध करा आणि पितामहाला जिंका. भीऊं नका. सत्यसंध अर्जुन तुमचें रक्षण करीत आहे. हा आपला सेनापति पार्षत व भीमसेन हे दोघे समरांगणांत तुमचें रक्षण करतील. हे सृंजयहो, आज युद्धामध्यें तुम्हांला भीष्मापासून यत्किंचित्‌हि भय नाहीं. शिखंडीला पुढें करून आपण आज पितामहाला निश्चयानें जिंकूं. ”

याप्रमाणें संकल्प करून ते पांडव ब्रह्मलोकपर होऊन म्ह० श्रेष्ठ लोकप्राप्तीसाठीं यत्न करीत होत्साते दहाव्या दिवशीं एकत्र जमले. ते सर्व क्रोधानें संतप्त झाले आणि त्यांनीं शिखंडी व धनंजय या दोघांना पुढें करून भीष्माला युद्धांत पराभूत करण्याचा पराकाष्ठेचा यत्न आरंभिला. तें पाहून तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें दुःशासनानें पुत्रासह द्रोणाचार्यांना पुढें करून भीष्माचें संरक्षण केलें. अनेक देशांतील नृपति व दुर्योधनाचे सर्व सोदर भ्राते सैन्यासह भीष्माच्या रक्षणार्थ सज्ज होऊन स्थित झाले. नंतर महाव्रत भीष्माला पुढें करून तुझ्या सर्व योद्धयांनीं शिखंडीशीं युद्ध आरंभिलें.

( ४ ) हे महाराज, चेदि-पंचालासह वानरध्वज पार्थ शिखंडीला पुढें करून भीष्मावर चालून गेला; सात्यकि व अश्वत्थामा या दोघांचें युद्ध जुंपलें; धृष्टकेतु पौरवांवर धांवला; अमात्यासह दुर्योधनावर अभिमन्यु तुटून पडला. स्वसैन्यासह विराटराजानें वृद्धक्षत्राचा पुत्र जयद्रथ याच्याशीं युद्ध आरंभिलें. महाधनुर्धर युधिष्ठिर आपल्या सैन्यासह मद्रराज शल्यावर धांवून गेला. भीमसेन दक्षतेनें गजसैन्यावर धांवला. सोदर भ्रात्यांसह सज्ज झालेला धृष्ट-

द्युम्न अनिवार्य अश्वत्थाम्यावर गेला ( उलट पक्षी अभिमन्यूचें दुर्योधनाशीं युद्ध जुंपलेलें असतांहि ) ज्याचा ध्वज कर्णिकार आहे, अशा सौभद्रावर सिंह-केतु व राजपुत्र बृहद्बल हे दोघे धांवले. तुझे पुत्र सर्व राजांसह शिखंडी व अर्जुन यांच्या वधेच्छेनें त्यांच्यावर धांवले. त्यावेळीं उभय सैन्यांचा भयंकर संग्राम प्रवृत्त होऊन सैनिक इतस्ततः धांवत असतांना पृथ्वी कंप पावली.

शान्तनवाला रणांत पाहून तुझें व शत्रूचें सैन्य परस्परांत मिसळून गेलें. तीं दोन्ही सैन्यें क्रोधसंतप्त होऊन एकमेकांवर धांवत असतां होणाऱ्या कोला-हलानें सर्व दिशा दुमदुमल्या. त्यांतच शंख, दुंदुभि यांचा निर्घोष, हत्तींचा चीत्कार व सैनिकांचा सिंहनाद यांचा दारुण शब्द झाला. सर्व नृपालांच्या बाहुभूषणांची जी चंद्रतुल्य प्रभा पसरली होती ती निस्तेज दिसूं लागली. शस्त्रांच्या आघातानें उत्पन्न होणाऱ्या विद्युल्लतेनें युक्त असे रजोमेघ दिसूं लागले. धनुष्यांचा टणत्कार व रथनेमींचा निर्घोष व विविध रणवाद्यांचा निस्वन यांनीं उभय सैन्यें निनादित झालीं. पाश, ऋष्टि, शक्ति, बाण यांच्या संघानें आकाश आच्छादित झाल्यामुळें उभय सेनेंत अंधकार पसरला. गज गजांवर, पदाति पदातींवर आणि अश्व अश्वांवर धांवून गेले. दोन श्येनपक्षी आमिषासाठीं जसे भांडत असतात, तसें कौरव-पांडवांचें भीष्मासाठीं तुमुळ युद्ध जुंपलें. परस्परांच्या वधेच्छेनें जमलेल्या त्यांचा घनघोर संग्राम झाला. ६. ४ ११५.

---

## अध्याय ११६ वा.

[ १ अभिमन्यूचा पराक्रम. २ कौरव-पांडवांचें संकुल युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्या दिवसाच्या संग्रामांत अभिमन्यूनें तुझ्या ससैन्य पुत्राशीं भीष्माला जिंकण्यासाठीं युद्ध केलें. दुर्योधनानें त्याच्या वक्षः-स्थलावर नऊ नतपर्व बाण सोडून पुनः तीन सोडले. अभिमन्यूनें दुर्योध-नाच्या रथावर घोर शक्ति सोडली. ती जणुकाय मृत्यूची भगिनीच होती. ती दारुण स्वरूपाची शक्ति येत असलेली पाहून तुझ्या पुत्रानें क्षुरप्र बाणानें तिचे दोन तुकडे केले. आपली शक्ति द्विधा छेद होऊन पडलेली पाहून सौभद्रानें अतिशय क्रुद्ध होऊन दुर्योधनाच्या दोन बाहूंवर आणि हृदयावर तीन शर सोडले आणि पुनः दहा घोर शरांनीं त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केले.

भीष्माचा वध व पार्थाचा जय या इच्छेनें अभिमन्यूनें दुर्योधनाशीं जें घोर युद्ध केलें, तें नेत्रांना आल्हाद देणारें व सर्व पार्थिवांच्या गौरवाला पात्र होणारें झालें. दुर्योधन व अभिमन्यु यांचें तें युद्ध विचित्र स्वरूपाचें झालें.

इकडे अश्वत्थामा व सात्यकि या दोघांचें युद्ध जुंपलें. द्रौणीनें सात्यकीच्या वक्षःस्थलावर नाराच बाणानें प्रहार केला. शैनेयानेंहि नऊ कंक पुंखयुक्त बाण सोडून गुरुपुत्राच्या मर्मावर प्रहार केले व पुनः त्याचे बाहु व हृदय यांवर तीस बाण सोडले. द्रौणीनें विद्ध केलें असतां सात्यकीनें त्याच्यावर तीन बाण सोडले.

महारथ पौरवानें धृष्टकेतूला विद्ध केलें. तेव्हां धृष्टकेतूनें पौरवावर तीस बाण सोडले. पौरवानें धृष्टकेतूचें धनुष्य तोडून टाकिलें आणि मोठ्यानें सिंहनाद केला. त्यानें तत्काल दुसरें धनुष्य घेतलें व पौरवावर त्र्याहत्तर बाण सोडले. त्या दोघां महारथांनीं फार मोठ्या शरवृष्टीनें परस्परांस विद्ध केलें. परस्परांचीं धनुष्यें तोडलीं, अश्व मारले आणि विरथ झालेले ते दोघेहि खड्गयुद्ध करण्यासाठीं प्रतिस्पर्ध्यावर धांवून गेले. त्या दोघांनींहि वृषभाच्या चर्माच्या ढाली धारण केल्या. त्या शंभर तारका व शंभर चंद्र यांनीं चिह्नीत होत्या. ते उभय वीर विमल तलवारी घेऊन एकमेकांवर धांवले. त्यावेळीं ते महारण्यांत एका सिंहिणीसाठीं युद्ध करणाऱ्या दोघां सिंहांप्रमाणें भासले. त्यांनीं विचित्र मंडलें घेऊन संचार करीत व आपलें युद्धनैपुण्य प्रकट करीत परस्परांवर चाल केली. पौरवानें धृष्टकेतूच्या ललाटावर आपल्या तीक्ष्ण खड्गानें प्रहार करून त्याला ‘ थांब थांब ’ असें म्हटलें.

चेदिराजानेंहि तलवारीनें पौरवाच्या जत्रुप्रदेशीं प्रहार केला. ते दोघे परस्परांवर प्रहार करीत असतां मूर्छित होऊन पडले. तेव्हां तुझ्या जयत्सेन पुत्रानें पौरवाला आपल्या रथांत घेऊन रणांगणांतून दूर नेलें व चेदिराज धृष्टकेतूला सहदेवानें समरांतून दूर सारलें.

चित्रसेनानें पांडवपक्षीय वार्धक्षेमि सुशर्म्यावर असंख्य बाणांची वृष्टि केली. त्याच्यावर एकुणसत्तर बाण सोडले. तेव्हां संतप्त झालेल्या सुशर्म्यानें चित्रसेनावर वीस तीक्ष्ण शर सोडिले. चित्रसेनानें त्याच्यावर तीस बाण सोडले व सुशर्म्यानें पुनः त्याला प्रतिवेध केला.

( २ ) भीष्मवधार्थ चाललेल्या त्या संग्रामांत आपलें यश व मान वाढविणाऱ्या सौभद्रानें भीष्माशीं युद्ध करण्याचा अर्जुनाचा हेतु जाणून राजपुत्र

बृहद्बलाशीं युद्ध आरंभिलें. कोसलेंद्रानें आर्जुनीला पंचवीस बाणांनीं विद्ध केलें. सौभद्रानें त्यावर आठ तीक्ष्ण शर सोडले, तथापि तो कंपित झाला नाहीं. तेव्हां आर्जुनीनें कंकपत्र शरांनीं त्याच्या धनुष्याचा छेद करून त्याच्यावरहि प्रहार केले. राजपुत्र बृहद्बलानेंहि तत्काल दुसरें धनुष्य घेऊन फाल्गुनीवर अनेक शर सोडिले. ते दोघेहि वीर विचित्र युद्ध करणारे होते. देवासुरांच्या युद्धांतील बल व इंद्र यांच्याप्रमाणें त्या उभयतांचें भीष्मासाठीं तुमुल युद्ध जुंपलें.

भीमसेन गजसैन्याशीं युद्ध करीत असतां श्रेष्ठ पर्वतांचें विदारण करणाऱ्या वज्रधर इंद्राप्रमाणें शोभला. ते पर्वतप्राय गज भीमाच्या हातून हत होऊन भूमीवर पडत असतां होणाऱ्या प्रचंड शब्दानें पृथ्वी निनादित झाली. ते सर्व गज पर्वतासारखे प्रचंड व काजळाच्या राशीसारखे काळे होते. ते भूमीवर पडले असतां पसरलेल्या पर्वतांचाच भास झाला.

युधिष्ठिरानें मद्रराजाशीं युद्ध आरंभिलें. फार मोठ्या सेनेकडून रक्षण केल्या गेलेल्या त्या मद्राधीपाला त्यानें अतिशय पीडा दिली. भीष्माच्या रक्षणासाठीं मद्रेश्वरानेंहि धर्मपुत्राला शरांनीं पीडिलें. सैंधवानें विराटावर प्रथम नऊ व नंतर तीस नतपर्व बाण सोडिले. विराटानें सैंधवाच्या वक्षःस्थलावर तीस शर सोडिले. त्यावेळीं विविध प्रकारचीं धनुष्यें, खड्गें, कवचें नानाप्रकारचीं आयुधें आणि ध्वज धारण करणारे ते मत्स्य-सैंधव अतिशय शोभले.

द्रोणानें पांचाल्य धृष्टद्युम्नावर नतपर्व बाणांची वृष्टि केली. त्यानें पार्षताचें मोठें धनुष्य तोडून पन्नास बाणांनीं त्याला विद्ध केलें. तेव्हां धृष्टद्युम्नानें दुसरें धनुष्य घेऊन द्रोणाच्या समक्ष त्याच्यावर शरवृष्टि केली. द्रोणानेंहि बाणांचा छेद करून पांचाल्यावर उलट पांच बाण सोडले. तेव्हां धृष्टद्युम्नानें क्रुद्ध होऊन आपली यमदंडतुल्य गदा द्रोणावर फेंकली. ती सुवर्णाच्या पट्टयांनीं भूषविलेली गदा आपल्या अंगावर पडत आहे, असें पाहातांच द्रोणानें पन्नास बाण सोडून तिचीं शकलें करून टाकिलीं. तेव्हां तिचें चूर्ण भूमीवर इतस्ततः पसरलें. आपली गदा विदीर्ण झालेली दिसतांच पार्षतानें शुभ पारसवी शक्ति फेंकली. द्रोणानें त्या शक्तीचेहि नऊ बाणांनीं तुकडे केले आणि पार्षताला शरांनीं विद्ध केलें. याप्रमाणें द्रोण व पार्षत या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें.

हे महाराज, नंतर अर्जुनानें घोररूपी भयानक भीष्मापाशीं येऊन त्याला तीक्ष्ण शरांनीं पीडा दिली. वनांत एका मत्त गजावर धांवून जाणाऱ्या दुसऱ्या मदोन्मत्त गजाप्रमाणें सज्ज झालेला पार्थ भीष्मावर चालून गेला. इतक्यांत भगदत्त मदोन्मत्त गजावर आरूढ होऊन पुढें सरसावला. त्या हत्तीच्या गंडस्थलांतून तीन ठिकाणीं मदाच्या धारा वहात होत्या. तो ऐरावतासारखा प्रचंड गज आपल्या अंगावर येत आहे, हें पहातांच धनंजयानें मोठ्या यत्नानें त्याचें निवारण केलें. भगदत्तानें गजाच्या पाठीवरूनच अर्जुनावर शरवृष्टि करून त्याला झांकून टाकिलें. तेव्हां आपल्यावर चाल करून येणाऱ्या त्या गजाला पार्थानें तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. सव्यसाचीचे ते शर रजतोपम विमल होते. नंतर त्या कौंतेयानें शिखंडीला अशी प्रेरणा केली—' हे पांचाला, सत्वर पुढें हो, चल. त्वरा कर, भीष्मावर चालून जा व त्याचा वध कर. '

अर्जुनाचें हें वचन ऐकतांच भगदत्त पार्थाला सोडून द्रुपदराजाच्या रथावर चालून गेला आणि अर्जुन शिखंडीला पुढें करून त्वरेनें भीष्मावर धांवला व त्यांचें युद्ध प्रवृत्त झालें. तुझे सर्व शूर पुत्र आक्रोश करीत धनंजयावर धांवून गेले. त्यावेळीं अर्जुनानें तुझ्या पुत्रांच्या विविध सेनेला अंतरिक्षांतील अभ्रें उडवून देणाऱ्या महावायूप्रमाणें उधळून दिलें.

शिखंडीनें अव्यग्र चित्तानें पितामहाच्या संमुख जाऊन त्याला बाणांनीं आच्छादून टाकिलें. प्रज्वलित झालेला अग्नि तृणावर पडला असतां तो जसा वणवा पसरवीत जातो, तसा पांडवांच्या सेनेवर दिव्य अस्त्रें सोडीत असलेला भीष्म भासला. त्या भीष्मरूपी अग्नीचें रथ हेंच अग्न्यागार, धनुष्य याच अर्चि, खड्ग, शक्ति व गदा हेंच इंधन आणि शरसंघ याच महाज्वाला होत्या आणि सर्व क्षत्रियांना तो तृणवत् दग्ध करीत होता. भीष्मानें अर्जुनाला अनुसरणाऱ्या सोमकांना पराभूत करून पांडवांच्या सेनेचें निवारण केलें. गांगेयाच्या बाणांनीं सर्व दिशा व उपदिशा निनादित झाल्या. सादींसह अश्व व रथांतील रथि यांना गतप्राण करून त्या सैन्याला अभ्रें छाटून टाकलेल्या तालवनासारखें केलें व सर्व रथ, गज आणि अश्व यांना निर्मनुष्य करून सोडलें. शान्तनवाच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून सर्व सैन्य कंपित झालें.

त्या युद्धांत भीष्माचा एकहि बाण व्यर्थ गेला नाहीं. भीष्मचापापासून सुटलेला बाण योद्ध्यांच्या शरीरांत रुतल्यावांचून राहिला नाहीं. रथांतील

योद्धे हत झाल्यामुळें वेगवान् अश्व त्या निर्मनुष्य वहानांना ओढीत वायुवेगानें पळत असलेले आमच्या दृष्टीं पडले. चेदि, काशि व करुष यांचे महारथ कुलीन शूर व युद्धांतून पराङ्मुख न होणारे होते. त्या सर्वांचे ध्वज सुवर्णानें भूषविलेले असून ते चौदा हजार सुप्रसिद्ध वीर प्राणांवर उदार होऊन युद्ध करीत होते. परंतु मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें असलेल्या भीष्मापुढें युद्धाला उभें रहातांच ते सर्व आपल्या रथ-अश्व-कुंजरांसह यमलोकीं गेले. त्या संग्रामांत भीष्माशीं युद्ध करून जीविताची आशा ठेवणारा एकहि सोमक आमच्या दृष्टीं पडला नाहीं. शान्तनवाचा पराक्रम पाहून त्यांनीं आपल्या सर्व प्रतिपक्षीयांना परलोकीं पाठविलें असावें, असेंच आम्हीं समजलों. श्वेताश्व कृष्णसारथि अर्जुन व दुसरा शिखंडी या दोघावांचून अन्य कोणीहि भीष्माच्या संमुख जाण्यास धजला नाहीं. ६. ४. ११६.

---

## अध्याय ११७ वा.

[ १ शिखंडीचे भीष्मावर प्रहार. २ अर्जुनाची शिखंडीला युद्धाविषयीं प्रेरणा. ३ दुःशासनाचा पराक्रम. ४ दुर्योधनाची स्वसेनेला पार्थावर चालून जाण्याची आज्ञा. ५ पार्थानें केलेला त्यांचा पराभव. ६ रणांगणांतील दृश्याचें वर्णन. ]

( १ ) **संजय**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर शिखंडीनें भीष्माच्या समीप जाऊन त्यांच्या वक्षःस्थलावर दहा भल्ल बाण सोडिले. परंतु गांगेयानें त्याचें स्त्रीत्व स्मरून त्याच्यावर उलट प्रहार केला नाहीं. सर्व लोकांच्या समक्ष त्याच्याकडे क्रोधानें प्रदीप्त झालेल्या नेत्रानें पाहिलें. तेव्हां तर तो त्याला क्रोधाग्नीनें जणुं काय दग्धच करीत आहे कीं काय असें भासलें. तथापि तें शिखंडीच्या लक्षांत आलें नाहीं.

( २ ) इतक्यांत अर्जुन शिखंडीला म्हणाला—हे वीरा, भीष्मावर प्रहार कर आणि या पितामहाचा सत्वर वध कर. तूं विचार कसला करीत आहेस ? आणि तुला संशय तरी कसला वाटत आहे ? भीष्माशीं प्रतियुद्ध करण्यास समर्थ असा तुझ्यावांचून अन्य योद्धा मला युधिष्ठिराच्या सैन्यांत दिसत नाहीं. हें मी तुला सत्य सांगतों.

पार्थाचें हें भाषण ऐकतांच शिखंडीनें नाना प्रकारच्या शरांनीं पितामहाला झांकून टाकिलें. परंतु पितामहानें त्याच्या बाणांची उपेक्षा करून आपल्या

शरांनीं अर्जुनाचें निवारण केलें आणि बाणांनीं पांडवांची सर्व सेना परलोकीं पाठवून दिली. पांडवांनींहि सूर्याला आच्छादित करणाऱ्या मेघांप्रमाणें आपल्या सैन्यानें भीष्माला परिवेष्टित केलें. तेव्हां समंततः परिवेष्टित झालेल्या त्या शान्तनवानें वनाला दग्ध करणाऱ्या वह्नीप्रमाणें त्या शूरांना दग्ध केलें.

( ३ ) हे महाराज, त्यावेळीं तुझ्या पुत्रांनीं अद्भुत पराक्रम प्रकट करून पितामहाचें रक्षण व पार्थाचें निवारण केलें. दुःशासनाचें समरांतील तें दुष्कर कर्म पाहून सर्व लोक संतुष्ट झाले. तो एकटा वीर अर्जुनासह सर्व पांडवांशीं युद्ध करीत होता. तरीहि ते त्याचें निवारण करूं शकले नाहींत. त्या युद्धांत दुःशासनानें अनेक रथ्यांना विरथ केलें. धनुर्धर सादि व महाबलाढ्य हत्ती तीक्ष्ण शरांनीं छिन्न-भिन्न होऊन भूतलावर पडले होते. शरांनीं व्यथित झालेले कांहीं कुंजर दशदिशांत पळत होते. अग्नि इंधनाला जाळीत असतांना स्वतःहि जसा प्रदीप्त होतो, तसाच तुझा पुत्र पांडवसेनेला दग्ध करीत असतां स्वतेजानें तळपूं लागला. त्या भरतश्रेष्ठाला पांडवांच्या पक्षांतील महारथ जिंकूं शकले नाहींत व त्याच्याशीं युद्ध करण्यास धजले नाहींत. एकट्या इंद्रपुत्र अर्जुनावांचून त्याचा पराभव करण्यास दुसरें कोणीहि समर्थ नव्हतें. तेव्हां तो विजय पुढें सरसावला आणि त्यानें दुःशासनाला तत्काल जिंकून सर्व सैन्याच्या समक्ष भीष्मावर चाल केली.

तुझा पुत्र जरी पराजय पावला होता, तरी भीष्मबाहूंचा आश्रय केलेला तो मत्त कौरव पुनः पुनः सावध होऊन अर्जुनाशीं युद्ध करण्यास रणांगणांत पुढें येत होता. त्या संग्रामांत प्रहार करणारा अर्जुन अतिशय शोभत होता. शिखंडीनें अशनीसारख्या जळजळीत व सर्पविषतुल्य तीक्ष्ण शरांनीं पितामहाला विद्ध केलें, तथापि त्या शरांनीं तुझा तो देवव्रत पिता यत्किंचितहि व्यथित झाला नाहीं. उष्णतेनें तप्त झालेला मनुष्य जसा मोठ्या आनंदानें जलधारा अंगावर घेतो, तसा भीष्म शिखंडीची शरवृष्टि स्वीकारीत होता आणि सर्व क्षत्रियांच्या समक्ष पांडवसेनेला दग्ध करीत होता.

( ४ ) तें पाहून तुझा पुत्र दुर्योधन सर्व सैनिकांना म्हणाला—हे वीरहो, तुम्ही सर्व मिळून पार्थावर धांवून जा. धर्मवेत्ता भीष्म तुम्हां सर्वांचें संग्रामांत रक्षण करील. यास्तव तुम्ही निर्भयपणें पांडवावर चालून जा. सुवर्णतालध्वजानें युक्त असलेला पितामह तुमचें संरक्षण करण्यास समरांगणांत

स्थित आहे. आम्हां सर्व धार्तराष्ट्रांचें हित व रक्षण करणारा तोच आहे. त्या शान्तनवाला जिंकण्यास साक्षात् देवहि समर्थ नाहींत. मग पांडवांची काय कथा ! पांडव महाबलाढ्य जरी असले, तरी ते मर्त्यच आहेत. तस्मात् तुम्ही अर्जुनावर चालून जा. भीतीनें पळूं नका. तुम्हां सर्व पार्थिवांच्या साह्यानें मी आज सज्ज होऊन अर्जुनाशीं युद्ध करणार आहें.

तुझ्या धनुर्धर पुत्राचें तें वचन ऐकून ते सर्व महाबलाढ्य वीर अतिशय क्षुब्ध झाले. विदेह, कलिंग, दासेरकगण, निषाद, सौवीर, बाह्लीक, दरद, पूर्व व उत्तर दिशेंतील मालव, अभीषाह, शूरसेन, शिबि, वसति, शाल्व, शक, त्रिगर्त, केकयांसह अम्बष्ठ हे सर्व अग्नीवर झडप घालणाऱ्या पतंगाप्रमाणें पार्थावर तुटून पडले. तेव्हां धनंजयानें दिव्य अस्त्रांचें स्मरण करून तीं धनुष्यावर जोडलीं आणि त्या अस्त्रांनीं त्या सर्व महारथांना पंतगांना जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें दग्ध करून टाकिलें.

( ५ ) तो सव्यसाची आपल्या गांडीवापासून सहस्रावधि बाण निर्माण करीत असतां त्याचें तें धनुष्य आकाशामध्यें देदीप्यमान झालेलें दिसत होतें. अर्जुनाच्या शरजालांनीं पीडले जाणारे ते नृपाल त्या वानरध्वजावर उलट प्रहार करण्यास धजले नाहींत. एकत्र जमलेल्या त्या नृपतींचे ध्वज भग्न झाले. रथी ध्वजांसह व सादी अश्वांसह भूमीवर पडले. अर्जुनाच्या बाणांनीं व्यथित झालेले गजारोही गजांसह हत झाले. पार्थाच्या शरांनीं सर्व पृथ्वीला आच्छादित केलें. शिवाय त्यावेळीं राजांच्या पळणाऱ्या सैन्यांनींहि सर्व प्रदेश व्यापिला होता.

याप्रमाणें पार्थानें कौरवांच्या सेनेला पळवून लावून दुःशासनावर अनेक बाण सोडले. ते शर तुझ्या पुत्राला विद्ध करून बिळांत शिरणाऱ्या सर्पांप्रमाणें भूमींत शिरले. नंतर धनंजयानें दुःशासनाच्या सारथ्याला अश्वांसह गतप्राण करून वीस बाणांनीं विविंशतीला विरथ केलें आणि त्याच्यावर आणखी पांच बाण सोडले. त्याचप्रमाणें त्या श्रेष्ठ धनुर्धरानें कृप, विकर्ण व शल्य यांसहि तीक्ष्ण शरांनीं विरथ केलें. तेव्हां ते विरथ झालेले कृपाचार्य, शल्य, दुःशासन, विकर्ण आणि विविंशति अर्जुनाकडून पराभव पावून पळूं लागले.

( ६ ) हे महाराज, अशा प्रकारें तो श्वेतवाहन पार्थ पूर्वाह्णीं सर्व महारथांना जिंकून धूमरहित अग्नीप्रमाणें प्रज्वलित दिसूं लागला. तो किरणांनीं

युक्त असलेल्या भास्कराप्रमाणें आपल्या शरांनीं अन्य पार्थिवांना ताप देत होता. त्या कुंतीपुत्रानें आपल्या शरजालानें पांडव व कौरव यांच्या दोन सैन्यांच्या मध्यें रक्ताची नदीच निर्माण केली. त्या तुमुल संग्रामांत अनेक रथ्यांनीं गज व रथसंघ यांचा नाश केला. हत्तीनीं रथ्यांना तुडविलें व पदातींनीं अश्वांना गतप्राण केलें. ती रणभूमि योद्धयांचीं मस्तकें व भग्न झालेलीं शरीरें यांनीं आच्छादित झाली होती. तींत कुंडलें व बाहुभूषणें धारण केलेले योद्धे गतप्राण होऊन पडले होते. कांहीं सैनिक रथचक्रांखालीं चिरडले जात होते. कित्येक हत्तींच्या पायांखालीं सांपडून छिन्न-भिन्न होत होते. अश्वसादी, गजारोही व पदाति इतस्ततः धांवत होते. भग्न झालेले रथ व त्यांचे विविध भाग सर्वत्र मोडून पडले होते. गज, अश्व व रथी यांच्या रक्तानें सिक्त झालेली ती रणभूमि शरत्कालांतील रक्तवर्ण मेघांप्रमाणें भासली.

त्यावेळीं काक, श्वान, गृध्र, गोमायु, श्वापदें व हिंस्त्र पक्षी विपुल भक्ष्य मिळाल्यामुळें भीषण शब्द करीत तेथें जमले होते. सर्व दिशांमध्यें अनेक प्रकारचे वायु वाहूं लागले, राक्षस संचार करूं लागले व भूतें भयंकर शब्द करूं लागलीं. वायुवेगानें सुवर्णाच्या माला व पताका हेलकावे खाऊं लागल्या. श्वेत छत्रें व ध्वज यांनीं युक्त असलेले सहस्त्रावधि महारथ इतस्ततः पडलेले दिसत होते. पताकांनीं युक्त असलेले अनेक शरार्त गज दश-दिशांत पळत सुटले आणि गदा व शक्ति धारण केलेले धनुर्धर क्षत्रिय धरणीतलावर पडलेले दिसत होते.

त्यानंतर भीष्म दिव्य अस्त्राचें अभिमंत्रण करून सर्व धनुर्धरांच्या समक्ष कौंतेयावर धांवला. त्याला पहातांच सज्ज झालेला शिखंडी त्याच्यावर चालून गेला. तेव्हां भीष्मानें आपल्या अस्त्राचा उपसंहार करून त्याला शांत केलें आणि त्या श्वेतवाहनानें पितामहाला मोहित करून तुझ्या सैन्याचा संहार चालविला. ६. ४. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १ संकुल युद्धाचें वर्णन. २ पांडवांच्या सेनापतीची सोमकांना भीष्मावर चाल करण्याची आज्ञा. ३ भीष्मपराक्रमाचें वर्णन. ४ कृष्णाची भीष्मावर प्रहार करण्याविषयीं अर्जुनाला प्रेरणा. ५ भीष्माचें पांडववीरांशीं युद्ध ]

( १ ) **संजय**—हे महाराज, तीं उभय सैन्यें व्यूह रचून व्यवस्थित झाल्यावर, त्यांतील युद्धपराङ्मुख न होणारे योद्धे केवल ब्रह्मलोकपर होऊन रणांगणांत स्थित झाले. त्या संकुल युद्धांत रथी रथ्यांशीं, पदाति पदातींशीं, अश्व अश्वांशीं व गजारोही गज-योद्ध्यांशीं युद्ध करीत नव्हते. ते सर्व उन्मत्ताप्रमाणें जो कोणी पुढें येईल त्यावर प्रहार करीत होते. त्यामुळें त्या युद्धांत भयंकर स्वरूपाचा फार मोठा व्यतिकर झाला. त्यावेळीं नर, गज, असा भेद राहिला नाहीं. तो भयंकर क्षय चालला असतां कांहींच विशेष दिसला नाहीं. वाटेल त्यावर वाटेल तो प्रहार करूं लागला.

नंतर दुःशासन, विकर्ण, शल्य, कृप व चित्रसेन हे आपापल्या श्रेष्ठ रथांत बसून पांडवांच्या सेनेला भयकंपित करूं लागले. त्या महात्म्यांनीं पांडवांच्या सैन्यांवर शस्त्रांचे प्रहार चालविले असतां, वायूनें भ्रमण करावयास लावलेल्या जलांतील नौकेप्रमाणें तीं भ्रमण करूं लागलीं. ज्याप्रमाणें शिशिरऋतु गायींच्या मर्माचें कृन्तन करितो, तसा भीष्म पांडवांच्या मर्मांवर प्रहार करीत होता.

हे महाराज, त्यावेळीं पार्थानेंहि तुझ्या सैन्यांतील नवमेघासारखे कृष्णवर्ण प्रचंड गज व सेनानायक यांना पाडविलें. नाराच बाणांनीं विद्ध झालेले अनेक महागज आर्तस्वरानें चीत्कार करीत होते. कुंडलें व इतर अलंकार धारण केलेले महावीर त्या भूषणांसह गतप्राण होऊन पडल्यामुळें तें रणांगण अतिशय शोभत होतें. भीष्म व धनंजय यांचा अतुल पराक्रम पाहून तुझे पुत्र स्वर्गपरायण होऊन मरणाच्या इच्छेनेंच प्रचंड सैन्यांसह रणांगणांत आले व त्या श्रेष्ठ वीरांचा क्षय करणाऱ्या संग्रामांत पांडवांवर तुटून पडले. तें पाहून पांडवांना तूं व तुझ्या पुत्रांनीं दिलेल्या बहुविध क्लेशांचें स्मरण झालें व तेहि सर्व भय सोडून ब्रह्मलोकतत्पर होत्साते हृष्ट चित्तानें तुझ्या पुत्रांशीं युद्धाला सज्ज झाले.

( २ ) नंतर पांडवांच्या सेनापतीनें सोमकांना 'हे सोमकहो, तुम्ही सृंजयांसह गांगेयावर चालून जा' अशी आज्ञा केली. सेनापतीचें हें वचन ऐक-

तांच ते सर्व सृंजय व सोमक शत्रूंची शरवृष्टि सहन करीत शान्तनवावर चालून गेले. त्यांच्या शस्त्रप्रहारांनीं भीष्म क्रुद्ध झाला व तो सृंजयांवर तुटून पडला.

( ३ ) पूर्वी भार्गवरामानें त्या कीर्तिमान् वीराला शत्रु सैन्याचा नाश करणारी अस्त्रविद्या शिकविली होती. त्या विद्येचा आश्रय करून तो वृद्ध पितामह युद्धाच्या प्रत्येक दिवशीं दशसहस्र पांडवसेनेचा क्षय करीत असे आणि त्या दहाव्या दिवशीं तर मत्स्य व पंचाल यांच्याशीं युद्ध करीत असतां त्यानें एकट्यानें असंख्य गजाश्वांना गतप्राण केलें. शिवाय सात महारथी, पांच हजार रथी, चौदा हजार पदाति आणि सहस्रावधि गज व अश्व यांचा आपल्या विद्येच्या बलानें संहार केला. याप्रमाणें सर्व महीपालांच्या सेनेचा क्षय करून प्रतापवान् भीष्मानें विराटाचा प्रिय भ्राता शतानीक आणि सहस्रावधि राजे यांचा भल्ल बाणांनीं वध केला. त्यावेळीं ते सर्व योद्धे उद्विग्न होऊन धनंजयाच्या नांवानें आक्रोश करूं लागले. पार्थाच्या बरोबर जेवढे नृपति भीष्मावर चालून गेले होते, तेवढे सर्व भीष्मशरांनीं विद्ध होऊन यमलोकीं गेले.

हे राजन्, याप्रमाणें शान्तनव पांडवसेनेला शरजालांनीं दश-दिशांत पळवून लावून कौरवसेनेच्या अग्रभागीं स्थित झाला. युद्धाच्या त्या दहाव्या दिवशीं असें दुष्कर कर्म करून भीष्म दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं धनुष्य धारण करून उभा राहिला असतां नृपति त्याच्याकडे पहाण्यासहि समर्थ झाले नाहींत. ग्रीष्मऋतूंत आकाशांत मध्यावर येऊन तळपणारा भास्कर जसा दुर्निरीक्ष्य असतो, तसा भीष्म आपल्या तेजानें देदीप्यमान दिसत होता. दैत्यसैन्याला तप्त करणाऱ्या इंद्राप्रमाणें भीष्मानें पांडवसेनेला त्रस्त केलें.

( ४ ) याप्रमाणें भीष्माच्या पराक्रमानें पांडवसेना पराभूत होत आहे, असें पाहून देवकीनंदन पार्थाला प्रीतिपूर्वक असें म्हणाला—"हे अर्जुना! हा भीष्म दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं उभा आहे. यावेळीं जर तूं त्याचा वध करशील, तर तत्काल विजयी होशील. शान्तनव जेथून पांडवसैन्याचा भेद करीत आहे, तेथेंच त्याला अडवून ठेव. तुझ्यावांचून अन्य कोणीहि त्याचे शर सहन करण्यास समर्थ नाहीं."

कृष्णानें अशी प्रेरणा करतांच वानरध्वज पार्थानें भीष्माला त्याचा रथ, अश्व व ध्वज यांसह शरजालांनीं आच्छादित केलें. परंतु गांगेयानें अर्जुनाच्या शरजालांचा तत्काल शरजालानेंच छेद केला आणि पंचालराजा, धृष्टकेतु,

भीमसेन, पार्षत, दोघे माद्रेय, चेकितान, पांच केकय भ्राते, सात्यकि, सौभद्रेय, घटोत्कच, पांच द्रौपदेय, शिखंडी, कुंतिभोज, सुशर्मा, विराट आणि दुसरेहि कित्येक पांडवपक्षांतील वीर भीष्माच्या शरजालानें जर्जर झाले. शोकसागरांत निमग्न झालेल्या त्या सर्वांना फाल्गुनानें त्यांतून वर काढिलें. ( त्याच्या शरांचें निवारण करून त्यांना क्लेशांतून सोडविलें. )

नंतर किरीटी ज्याचें रक्षण करीत होता, तो शिखंडी श्रेष्ठ आयुध घेऊन भीष्मावर वेगानें धांवला. तेव्हां रणविभागवेत्त्या धनंजयानें प्रथम भीष्माच्या अनुचरांचा वध केला व मग तो अपराजित बीभत्सु पितामहावर चालून गेला. तेव्हां विराट, द्रुपद व दोघे माद्रीपुत्र, हे पार्थाकडून संरक्षित असलेले वीरहि भीष्मावर प्रहार करूं लागले. त्याचप्रमाणें अभिमन्यु आणि द्रौपदीचे पांच पुत्र सज्ज होऊन गांगेयावर तुटून पडले. हे सर्वहि दृढ धनुष्य धारण करणारे वीर कदापि युद्धपराङ्मुख होणारे नव्हते. त्या सर्वांनीं मिळून क्षत करणारे तीक्ष्ण बाण भीष्मावर सोडिले. तथापि त्या कुरुवृद्धानें त्या सर्व शरांना अंतरिक्षांतच तोडून उडवून दिले. त्या अक्षीण स्वभावाच्या शूर भीष्मानें त्या शरांचें निवारण करून निर्भयपणें पांडवांच्या सेनेंत संचार केला आणि त्या पितामहानें जणु काय सहज क्रीडा करीत असल्याप्रमाणें पांडवसेनेवर शरांचा वर्षाव चालविला.

त्यावेळीं शान्तनवानें शिखंडीचें स्त्रीत्व लक्षांत आणून त्याच्यावर मात्र बाण सोडिला नाहीं, तो कुरुश्रेष्ठ शिखंडीकडे पाहून वारंवार केवळ स्मित करीत असे.

त्यादिवशीं भीष्मानें द्रुपदाच्या सैन्यांतील सात महारथांना गतप्राण केलें. तेव्हां मत्स्य, पांचाल, चेदि यांचा एकट्या भीष्मावर चालून येत असतां सर्वत्र ‘ किलकिलाट ’ ऐकूं येऊं लागला. सूर्याला आच्छादित करणाऱ्या मेघाप्रमाणें त्या सर्वांनीं मिळून नर-अश्व-रथ यांच्या समूहांनीं त्या गंगापुत्राला परिवेष्टित केलें. त्यावेळीं त्या सर्व पार्थिवांचें आणि भीष्मांचें देवासुरोपम युद्ध जुंपलें असतां अर्जुनानें शिखंडीला पुढें करून पितामहावर शरवृष्टि आरंभिली. ६. ४. ११८.

## अध्याय ११९ वा.

[ १ भीष्मावर विविध शस्त्रांचे प्रहार. २ संकुल युद्ध. ३ भीष्मार्जुनयुद्ध. ४ भीष्माचा निकरानें युद्ध न करण्याचा निश्चय. ५ देववाणीची संमति. ६ भीष्माचें प्रतिकारशून्य युद्ध. ७ भीष्म-दुःशासनसंवाद. ८ अर्जुनाच्या शरांच्या तीव्रतेचें वर्णन. ९ तुमुल युद्ध. १० भीष्मपतन. ११ दक्षिणायनांत देहपात झाल्याबद्दल देवता व महर्षी यांचे आश्चर्योद्गार. १२ उत्तरायणापर्यंत प्राणधारण करण्याचा भीष्माचा संकल्प, कौरवांचा मोह व उभय सैन्यांचा विषाद. ]

( १ ) **संजय—**हे प्रभो, याप्रमाणें सर्व पांडवांनीं शिखंडीला पुढें करून भीष्माला समंततः वेढलें व अनेक प्रकारच्या शस्त्रांनीं त्याला विद्ध केलें. सर्व सृंजयांनीं एकत्र जमून घोर शतघ्नी, परिघ, परशु, मुद्गर, मुसलें, प्रास, सुवर्ण-पुंखयुक्त बाण, शक्ति, तोमर, कंपनें, नाराच वत्सदंत, भृशुंडी व इतरहि अनेक आयुधांची वृष्टि चालविली. त्या आयुधांच्या आघातांनीं पितामहाचें कवच विदीर्ण झालें व त्या शस्त्रप्रहारांनीं तो अतिशय पीडला जात होता, त्याच्या मर्मावर प्रहार होत होते, तथापि तो महात्मा व्यथित झाला नाहीं.

( २ ) त्यावेळीं तो नरश्रेष्ठ शत्रूंना प्रलयाग्नीप्रमाणें भासला. त्याचे धनुष्य-बाण हाच प्रदीप्त अग्नि; वेगवान् अस्त्रें हा साह्य करणारा वायु, रथचक्रांचा निर्घोष हा विस्फुलिंगाचा शब्द, दिव्यास्त्रांचा प्रकाश हीच ज्योति, विचित्र धनुष्यें याच महाज्वाला आणि वध पावणारे वीर हेच इंधन भासत होते. महारथ भीष्म क्षणांत रथसमूहांतून निघून नरेंद्रमंडलांत संचार करीत असलेला दिसत असे. पुनः दुसऱ्या क्षणीं तो रथसमुदायांत दृष्टीं पडे. नंतर पांचालराज व धृष्टकेतु यांची उपेक्षा करून भीष्मानें पांडवसेनेच्या मध्यभागीं संचार केला आणि सात्यकि, भीमसेन, धनंजय, द्रुपद, विराट व धृष्टद्युम्न या सहा वीरांवर अतिशय तीक्ष्ण बाण सोडले. ते शर महावेगवान्, भयंकर शब्द करणारे आणि शत्रूंच्या कवचांचा भेद करणारे होते. तथापि त्या महारथांतील प्रत्येकानें दहा दहा बाण सोडून भीष्मावर प्रहार केले. शिखंडीनें तीक्ष्ण धारेचे महाबाण सोडले. पण त्या सुवर्ण पुंखयुक्त बाणांनीं तो गांगेय यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं.

तें पाहून अर्जुन अत्यंत क्षुब्ध झाला व शिखंडीला पुढें करून त्यानें भीष्मा-वर शर सोडून त्याच्या धनुष्याचा छेद केला. भीष्माच्या धनुष्याचा छेद

झाला हें तुझ्याकडील महारथांना सहन झालें नाहीं. द्रोण, कृतवर्मा, सैन्धव, जयद्रथ, भूरिश्रवा, शल, शल्य आणि भगदत्त, हे सात वीर अतिशय क्रुद्ध होऊन अर्जुनावर धांवले. त्यांनीं अनेक प्रकारचीं दिव्य अस्त्रें प्रकट करून पार्थाला शरांनीं झांकून टाकिलें. त्यावेळीं क्षुब्ध झालेल्या त्यांच्या आयुधांचा शब्द, प्रलयकालीं क्षुब्ध होणाऱ्या समुद्राच्या निर्घोषाप्रमाणें भासला.

अर्जुनाच्या रथासमीप कौरव योद्ध्यांचा 'प्रहार करा, धरा, विद्ध करा' अशा प्रकारचा आक्रोश चालला होता. त्यांचा तो कोलाहल ऐकून पांडवांकडील महारथ पार्थाच्या रक्षणार्थ त्याच्या रथाकडे धांवले. सात्यकि, भीमसेन, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, घटोत्कच राक्षस आणि अभिमन्यु हे सात योद्धे विचित्र धनुष्यें धारण करून क्रोधानें कौरवांवर तुटून पडले. त्यांचा देव-दानवांच्या युद्धाप्रमाणें अंगावर रोमांच आणणारा तुमुल संग्राम सुरू झाला.

( ३ ) किरीटी ज्याचें रक्षण करीत होता, त्या शिखंडीनें छिन्नधन्वा भीष्मावर दहा बाण सोडले. दहा बाणांनीं त्याच्या सारथ्याला विद्ध केलें व एका बाणानें त्याचा ध्वज तोडला. तेव्हां गांगेयानें दुसरें दृढ व वेगवान् धनुष्य घेतलें. फाल्गुनानें तीक्ष्ण बाणानें त्याचाहि छेद केला. भीष्मानें पुनः श्रेष्ठ धनुष्य धारण केलें, तेंहि सव्यसाचीनें तोडून टाकिलें. आपलीं धनुष्यें पुनः पुनः छेदिलीं जातात हें पाहून पितामह क्रुद्ध झाला व त्यानें जिभल्या चाटीतच पर्वतांचेंहि विदारण करणारी दारुण शक्ति त्वरेनें हातीं घेतली व ती मोठ्या वेगानें अर्जुनाच्या रथावर सोडली. प्रज्वलित अशनीप्रमाणें ती शक्ति आपल्याकडे येत आहे, हें पहातांच त्या पांडुपुत्रानें तीक्ष्ण धारेचे पांच भल्ल बाण सोडून त्या शक्तीचे मार्गांतच पांच तुकडे करून टाकले. तेव्हां मेघमंडलांतून तुटून पडणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें ती भूमीवर पडली.

( ४ ) आपल्या शक्तीचे तुकडे झालेले पाहून भीष्म क्रुद्ध होऊन असा विचार करूं लागला—मी एका धनुष्यानें सर्व पांडवांचा संहार करण्यास समर्थ आहें. तथापि हा महाबलाढ्य कृष्ण त्यांचा रक्षक आहे. शिवाय याहि दोन कारणांचा विचार करून मला पांडवांशीं निकराचें युद्ध करतां येत नाहीं. एक तर पांडुपुत्र अवध्य आहेत हें व दुसरें शिखंडीचें स्त्रीत्व. ( यामुळें मला पांडवांना जिंकतां येत नाहीं. ) पूर्वी सत्यवतीच्या विवाहप्रसंगीं माझ्या पित्यानें संतुष्ट होऊन मला इच्छामरण आणि रणांत अवध्यत्व, असे दोन वर

दिले आहेत. तस्मात् आतां माझ्या मृत्यूचा समय समीप आला आहे, असेंच मला वाटतें.

( ५ ) अमित तेजस्वी भीष्मानें मनांत केलेला हा निश्चय जाणून आकाशस्थ ऋषि आणि वसु त्याला म्हणाले—“ बा देवव्रता, तूं जो निश्चय केला आहेस, तो आम्हांलाहि संमत आहे, त्याप्रमाणेंच वाग व युद्धापासून आपलें चित्त निवृत्त कर.”

ही आकाशवाणी संपतांच शुभ, अनुकूल, सुगंधयुक्त व शीतल वायु वाहूं लागले, देवदुन्दुभींचा निस्वन ऐकूं आला आणि भीष्मावर पुष्पवृष्टि झाली. देवांचें हें वचन एकट्या भीष्माला ऐकूं आलें व व्यासप्रसादानें मीं तें ऐकलें. आम्हां दोघांखेरीज तें भूलोकीं कोणाच्याहि कानीं पडलें नाहीं. सर्व लोकांना प्रिय असलेला भीष्म आज रथांतून पडणार, असें जाणून सर्व देव अतिशय भ्रान्त झाले.

( ६ ) देवगणांचें तें वाक्य ऐकतांच महातपस्वी भीष्मानें अर्जुनाशीं निकराचें युद्ध करण्याचें सोडून दिलें. अंगावरील सर्व आवरणांसह कवचांचें विदारण करून आंत शिरणारे तीक्ष्ण बाण अर्जुन सोडीत असतांहि पितामहानें त्यांस प्रतिकार केला नाहीं. शिखंडीनें संतप्त होऊन त्याच्यावर नऊ तीक्ष्ण बाण सोडले, तथापि तो गांगेय व्यथित न होतां भूकंपसमयीं अचल रहाणाऱ्या पर्वताप्रमाणें निष्कंप उभा राहिला.

तेव्हां अर्जुनानें हंसतच आपलें गाण्डीव धनुष्य आकर्ण ओढलें व भीष्मावर पंचवीस क्षुद्रक बाण सोडिले. क्रुद्ध झालेल्या पार्थानें पुनः पुनः शेकडों शरांचा वर्षाव करून पितामहाच्या मर्मांवर प्रहार केले व त्याचें सर्व अंग क्षतयुक्त केलें. पांडवांच्या इतर वीरांनींहि भीष्माला सहस्रावधि बाणांनीं विद्ध केलें. पण त्यांच्या शरांचें मात्र गांगेयानें नतपर्व बाणांनीं निवारण केलें. शिखंडीनें भीष्मावर जे तीक्ष्ण धारेचें सुवर्ण पुंखयुक्त बाण सोडले, त्या बाणांनीं पितामह यत्किंचित्‌हि व्यथित झाला नाहीं.

तेव्हां शिखंडीला पुढें करून अर्जुन पुनः भीष्मावर धांवला व त्यानें तीक्ष्ण शरानें भीष्माचें धनुष्य तोडलें. नऊ बाण सोडून त्याचा ध्वज पाडविला व दहा बाणांनीं सारथ्याला कंपित केलें. तेव्हां भीष्मानें दुसरें दृढ धनुष्य धारण

केलें. पार्थानें तीन बाणांनीं त्याचेहि तीन तुकडे केले. भीष्मानें नवें धनुष्य घ्यावें व पार्थानें तत्काल त्याचा छेद करावा, याप्रमाणें पार्थानें त्याचीं अनेक धनुष्यें तोडून टाकिलीं. तें पाहून शान्तनवानें पार्थाचें निवारण करण्याचें सोडून दिलें. तेव्हां धनंजयानें पितामहावर पंचवीस क्षुद्रक बाण सोडले.

(७) अर्जुनाच्या त्या बाणांनीं अतिविद्ध झालेला भीष्म दुःशासनाला असें म्हणाला—" हा पांडवांचा महारथ पार्थ क्रुद्ध होऊन मजवरच सहस्रावधि शर सोडीत आहे. या श्रेष्ठ धनुर्धराला युद्धांत जिंकण्यास साक्षात् इंद्रहि समर्थ नाहीं. तसेच ते देव-दानव-राक्षस मलाहि जिंकण्यास असमर्थ आहेत. मग या मर्त्य महारथांची काय कथा ! "

(८) याप्रमाणें ते दोघे संवाद करीत असतां पार्थानें शिखंडीला पुढें करून पुनः भीष्माला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें. तेव्हां गांगेय अत्यंत विद्ध झाला असतांहि हंसून दुःशासनाला पुनरपि म्हणाला—" बा दुःशासना, गाण्डीव धनुष्याच्या या तीक्ष्ण बाणांनीं मला अतिशय विद्ध केलें आहे. या बाणांचा स्पर्श इंद्राच्या वज्रासारखा आहे. एकसारखे येत असलेले हे बाण अर्जुनाचेच आहेत. हे शिखंडीचे शर नव्हेत. दृढ कवचांचा भेद करणारे हे मर्म-च्छेदक बाण मुसलाप्रमाणें मजवर प्रहार करीत आहेत. हे बाण शिखंडीचे नव्हेत. या बाणांचा स्पर्श वज्रदंडासारखा आहे व त्यांचा असह्य वेग माझ्या प्राणांना व्याकुल करीत आहे. हे बाण निःसंशय शिखंडीचे नव्हेत. गदा व परिघ यांच्या तुल्य असलेले हे उग्र शर यमदूतांप्रमाणें माझ्या प्राणांचा नाश करूं पहात आहेत. हे बाण शिखंडीचे असणें शक्य नाहीं. विषाचें गरल टाकणाऱ्या क्रुद्ध सर्पाप्रमाणें वळवळत ते माझ्या मर्मांत शिरत आहेत. हे बाण शिखंडीचे नाहींत. ते निश्चयानें अर्जुनाचेच असले पाहिजेत. खेंकडीचीं[1] अपत्यें जशीं जन्मकालीं आपल्या जननीची पाठ विदीर्ण करितात, तसे हे तीक्ष्ण शर माझीं गात्रें विदीर्ण करीत आहेत. अशाप्रकारचे प्राणहारक वेदनाजनकत्व शिखंडीचे बाणांत संभवत नाहीं. कारण त्याचे शर मला पुष्पतुल्य भासतात. हे शर निःसंशय पार्थाचेच आहेत. आजवर मीं अनेक नराधिपांशीं युद्ध केलें, तथापि या कपिध्वज सव्यसाचीवांचून इतर कोणींहि मला असें विह्वल केलें नाहीं. "

---

१ खेकडीच्या प्रसूतिसमयीं तिचीं उदरस्थ पिलें, मातेच्या पाठीचा छेद करून बाहेर पडतात. त्यामुळें पिलें जन्म पावतांच ती मरण पावते.

( ९ ) असें बोलून भीष्मानें जणुकाय पांडवांना दग्धच करीत पार्थावर शक्ति सोडिली. अर्जुनानें तीन विशिख शरांनीं तुझ्या सर्व कुरुवीरांच्या समक्ष तिचे तीन तुकडे केले. तेव्हां गांगेयानें जय किंवा मृत्यु यांच्या प्राप्तीसाठीं आपली सुवर्णानें अलंकृत केलेली ढाल व खड्ग कौरवांच्या समक्षच हातीं घेतलें. तथापि तो रथांतून खालीं उतरण्याच्या पूर्वींच पार्थानें तीक्ष्ण शरांनीं त्याच्या त्या चर्माचीं शतधा शकलें करून टाकिलीं. इतकें अद्भुत हस्तलाघव त्यानें प्रकट केलें.

त्यावेळीं राजा युधिष्ठिरानें आपल्या सैन्याला "गांगेयावर चाल करा, यत्किंचित्‌हि भिऊं नका" अशी प्रेरणा केली. तेव्हां पांडवसैन्य विविध प्रकारचीं आयुधें घेऊन एकट्या भीष्मावर धांवलें. पांडववीरांनीं मोठ्यानें सिंहनाद केला, तशीच एका भीष्माचेंच रक्षण करीत असलेल्या कौरवांनींहि जयेच्छेनें प्रचंड गर्जना केली आणि तुझ्या पुत्रांचा पांडवांशीं तुमुल संग्राम सुरू झाला.

हे राजेंद्रा, दहाव्या दिवशीं झालेला तो भीष्मार्जुनसमागम अतिशय दारुण होता. सागराला मिळणाऱ्या गंगेचा आवर्त जसा उत्पन्न होतो, त्याप्रमाणें तीं दोन्हीं सैन्यें एकत्र जमलीं असतां त्यांचा संभ्रम भासला. युद्ध करणारीं तीं दोन्ही सैन्यें परस्परांचा संहार करीत असतां रक्तानें माखलेली पृथ्वी उग्र दिसूं लागली. सम, विषम प्रदेश कळेनासा झाला. स्वतःचा असा मर्मभेद होत असतांहि भीष्म त्या एका दिवसांत दहा हजार योद्धयांचा वध करून अचल राहिला.

पार्थानें स्वसैन्याच्या अग्रभागीं स्थित होऊन कौरवांच्या मध्यभागीं असलेल्या सेनेला पळवून लाविलें. आम्हींहि श्वेतवाहन धनंजयाच्या तीक्ष्ण शरांनीं पीडिल्यामुळें रणांतून पलायन केलें. तथापि सौवीर, कितव, प्राच्य, प्रतीच्य, उदीच्य, मालव, अभीषाह, शूरसेन, शिबि, वसाति, शाल्वाश्रित त्रिगर्त व केकयांसह अंबष्ठ हे सर्वहि महात्मे जरी शरार्त व व्रणपीडित झाले होते, तरी ते पार्थाशीं युद्ध करणाऱ्या भीष्माला सोडून गेले नाहींत. त्याला एकट्याला अनेकांनीं समंततः परिवेष्टित केलें.

( १० ) तथापि पांडववीरांनीं कौरवांच्या सर्व योद्धयांना शरवृष्टींनीं झांकून टाकिलें व त्यांचा पराभव करून भीष्मरथाभोंवतीं वेढा दिला. 'पाडा, धरा,

युद्ध करा, छेद करा,' इत्यादि तुमुल शब्द सर्व बाजूंनीं कानीं पडूं लागला. भीष्मानें सहस्रावधि सैनिकांचा संहार केला. त्या दिवशीं पितामहाच्या शरीरावर एक अंगुलिभरहि जागा क्षतरहित दिसत नव्हती. याप्रमाणें त्याचें सर्व अंग अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध होऊन छिन्न-भिन्न झालें असतां तो कुरुवृद्ध महात्मा अतिशय विह्वल झाला आणि सूर्य किंचित् अवशिष्ट असतांना पूर्वेकडे मस्तक करून तुझ्या पुत्रांच्या समक्ष रथांतून खालीं पडला.

भीष्म रथांतून पडलेला पहातांच स्वर्गांतील देवांनीं आणि पृथ्वीवरील नृपालांनीं हाहाकार केला. महात्म्या पितामहाचें पतन होतांच आमचीं हृदयेंहि नष्ट झालीं. तो सर्व धनुर्धरांतील श्रेष्ठ महाबाहु तोडलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें जेव्हां पडला, तेव्हां धरणी कंपित झाली. तथापि त्याला भूमीचा स्पर्श झाला नाहीं. त्याच्या अंगांत सर्वतः बाण रुतले असल्यामुळें त्या पुरुषश्रेष्ठानें शरतल्पावर शयन केलें. रथांतून पडलेल्या त्या महात्म्यामध्यें दिव्य तेजानें प्रवेश केला. त्यावेळीं पर्जन्यवृष्टि झाली व पृथ्वी कंप पावली. रथांतून पडत असतांना त्यानें सूर्याला दक्षिणमार्गांत पाहिलें व कालाचा विचार करून त्याला दक्षिणायनाचें स्मरण झालें.

( ११ ) इतक्यांत अंतरिक्षांतून समंततः अशी दिव्य वाणी ऐकूं आली—"हा सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ नरव्याघ्र महात्मा गांगेय कालकर्ता म्हणजे स्वेच्छामृत्यु आहे. तो दक्षिणायनांत कालवश कसा होत आहे ?"

ती देववाणी ऐकून भीष्म म्हणाला—"मी स्थित आहें. इतक्यांत मरणार नाहीं. जरी मी धरणीवर पडलों आहें, तरी मी आपले प्राण धारण करीन." असें बोलून तो कुरुपितामह उत्तरायणाची प्रतीक्षा करीत पडून राहिला. तेव्हां त्याचा तो संकेत जाणून हिमालयकन्या गंगेनें महर्षींना हंसरूपानें भीष्माकडे पाठविलें. ते मानससरोवरवासी सर्व हंस त्वरेनें निघाले आणि जेथें कुरुपितामह भीष्म शरतल्पावर पडला होता तेथें प्राप्त झाले. ते सर्व ऋषि हंसरूपानें भीष्माच्या समीप आले व शरतल्पस्थ भीष्माला पाहून त्याला प्रदक्षिणा घालीत असतां दक्षिणमार्गस्थ सूर्य त्यांच्या दृष्टीं पडला. तेव्हां ते विद्वान् परस्परांस हांका मारून व 'अहो हा भीष्म महात्मा असून दक्षिणायनांत कसा प्रयाण करीत आहे ?' असें बोलून ते हंस दक्षिण दिशेस निघून गेले.

( १२ ) पण महाबुद्धिमान् भीष्मानें त्यांच्याकडे पाहून विचार केला व त्यांना म्हटलें—" हे हंसहो, आदित्य दक्षिण मार्गांत आहे, हें माझ्या लक्षांत आहे. मी दक्षिणायनांत कदापि देह सोडून जाणार नाहीं. सूर्य जेव्हां उत्तरमार्गांत प्रवेश करील, तेव्हांच मी माझ्या पुरातन स्थानाला जाईन. तोंपर्यंत उत्तरायणाची प्रतीक्षा करीत मी प्राणांना धारण करून राहीन, हें मी तुम्हांला सत्य सांगत आहें. स्वच्छंदमृत्युत्वामुळें माझ्या इच्छेस येईल तेव्हां प्राण सोडणें माझ्या स्वाधीन आहे. यास्तव उत्तरायणांत मृत होण्याचा संकल्प करून मी प्राण धारण करून राहीन. माझ्या महात्म्या पित्यानें मला जो इच्छामरणाचा वर दिला आहे, तो सत्य होवो. ज्याअर्थीं प्राणांचा त्याग माझ्या हातीं आहे त्याअर्थीं मी प्राण धारण करण्यास समर्थ आहें. "

हंसांना असें बोलून भीष्म शरतल्पावर पडून राहिला. याप्रमाणें कौरवांचा नेता महातेजस्वी शान्तनव पडला असतां सृंजयांसह पांडवांनीं सिंहनाद केला. परंतु तो भरतांचा पितामह पतन पावला असतां तुझ्या पुत्रांना काय करावें, हें कळेनासें झालें. ते सर्व कौरव मोहित झाले. कृप-दुर्योधनादि प्रमुख वीर दीर्घ निश्वास सोडून रोदन करूं लागले. त्यांना अतिशय विषाद झाला व ते सर्व दीर्घकाल विचार करीत स्वस्थ बसले. त्यांचीं गात्रें शिथिल झालीं, मांड्या निर्बल झाल्या. त्यांचें मन युद्धाकडे लागेना. त्यांचे पाय जागच्याजागीं खिळले व त्यामुळें त्यांच्यानें पांडवांवर धांवून जाववेना.

हे महाराज, अवध्य असलेलाहि तो महा ओजस्वी शांतनुनंदन हत झालेला पाहून आतां दुर्योधनाचा समूळ विनाश होणार, असा आम्हीं तर्क केला. सव्यसाचीनें आमच्या मुख्य मुख्य वीरांना तीक्ष्ण शरांनीं गतप्राण केल्यामुळें पराभूत झालेल्या आम्हांला त्यावेळीं आपलें कर्तव्यहि कळेनासें झालें.

ज्यांचे बाहु परिघासारखे आहेत, अशा शूर पांडवांनीं जय मिळवून व परत्र परमगति संपादन करून मोठ्यानें शंख वाजविले. पंचालांसह सोमकांनाहि संतोष झाला. नंतर त्यांनीं असंख्य रणवाद्यांचा निर्घोष केला. भीमसेन्यानें मोठ्यानें गर्जना करून आस्फोटन केलें. गांगेय हत झाला असतां उभयसैन्यांतील वीरांनीं आपापल्या हातांतील शस्त्रें बाजूला ठेवलीं आणि ते सर्व समंततः सचिंत होऊन बसले.

कांहीं योद्धे आक्रोश करूं लागले. कित्येक धांवूं लागले. कोणी मूर्च्छित झाले. कांहींनीं क्षात्रधर्माची निंदा केली, तर कित्येकांनीं भीष्माची स्तुति

केली. ऋषि व पितर यांनीं महाव्रत पितामहाची प्रशंसा केली. भारतांच्या पूर्वजांनींहि त्या महात्म्याविषयीं प्रशंसोद्गार काढले आणि धीमान् शांतनव महोपनिषदांतील योगाचा आश्रय करून ध्यानमग्न होत्साता उत्तरायणाची मार्गप्रतिक्षा करीत राहिला. ६. ४. ११९.

## अध्याय १२० वा.

[ १ भीष्मपतन ऐकून धृतराष्ट्राचा विलाप. २ संजयानें कथन केलेला भीष्मपतनानंतरचा वृत्तान्त. ३ भीष्मपतनाचें कथन, द्रोणाची मूर्च्छा. ४ भीष्माला अर्जुनदत्त उपधान. ५ वैद्योपचार न करण्याचा भीष्माचा संकल्प. ६ धर्म-कृष्ण संवाद. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, माझा तो सत्यप्रतिज्ञ पिता देवतुल्य होता, त्यानें आपल्या पित्यासाठीं आजन्म ब्रह्मचर्य धारण केलें. तो बलाढ्य सेनानी पतन पावला असतां भीष्महीन झालेल्या माझ्या योद्ध्यांची स्थिति काय झाली, तें मला सांग. शिखंडीला अमंगल लेखून त्याच्यावर प्रहार न करण्याचा भीष्मानें जेव्हां संकल्प केला, तेव्हांच कौरव आणि तत्पक्षीय नृपति यांना पांडवांनीं हत केलें, असें मी समजलों.

अरे, अरे ! माझ्या त्या पित्याचें पतन मीं दुर्मतीनें आज ऐकावें याहून अधिक दुखःप्रद आणखी काय आहे ? भीष्म युद्धांत पडल्याची दारुण वार्ता ऐकूनहि ज्याअर्थीं माझें हृदय शतधा विदीर्ण होत नाहीं, त्याअर्थीं तें खरोखर वज्रासारखें कठोर असलें पाहिजे. बा संजया, जयाची इच्छा करणाऱ्या त्या कुरुश्रेष्ठानें मरणापूर्वीं काय केलें तें मला सविस्तर कथन कर. देवव्रत युद्धांत पडला, ही वार्ता मला पुनः पुनः सहन होत नाहीं. अरे, पूर्वीं जामदग्न्य राम दिव्य अस्त्रांनींहि ज्याचा वध करूं शकला नाहीं, त्याला या पांचाल्य शिखंडीनें पाडावें ना ?

( २ ) **संजय**—हे महाराज, तो कुरुपितामह सायंकालीं शरविद्ध होऊन रथांतून भूमिवर पडला असतां, धार्तराष्ट्रांना विषाद झाला व पंचालांना हर्ष वाटला. रथांतून च्युत होऊन धरणीवर पडलेला भीष्म भूमीला स्पर्श न करतां शरतल्पावर शयन करीत आहे. भीष्माचें पतन होतांच समंततः भूतांचा हाहाकार ऐकूं आला व दोन्ही सैन्यांत महद्भय उत्पन्न झालें. राजा, तो समितिंजय कुरूंचा 'सीमावृक्षच' होता. तो गांगेय कौरवांचा सेनापतीच असल्या-

मुळें तो पडला असतां त्यांच्या विजयाशेचा विच्छेद झाला, तेव्हां त्यांना विषाद होणें उचितच आहे, पण प्रथम पांडवांना हर्ष झाला असें सांगून आतां त्यांनाहि भय वाटलें, असें कसें म्हणतोस, असें जर म्हणशील तर त्याचेंहि कारण सांगतों ऐक. कौरव-पांडवांच्या सीमास्थानीं असलेला भीष्म जिवंत असला तर आमचा संधि करील, त्याच्या योगानें पुत्र-सुहृदादिकांचा विनाश व धनाचा क्षय होणार नाहीं, त्यांना अशी जी आशा होती, ती त्याच्या निधनानें नाहींशी झाली व आपल्या पुत्र-सुहृदादिकांच्या नाशाचें भय सर्व क्षत्रियांच्या मनांत उद्भवलें. पंचालांना जरी हर्ष झालेला दिसला तरी तो आपाततः होता. मनःपूर्वक नव्हता.

भीष्माचें कवच व ध्वज हीं दोन्ही विशीर्ण झालेलीं पाहून कौरव आणि पांडव यांनीं त्याला परिवेष्टित केलें. भीष्माचें पतन होतांच आकाश अंधकारानें व्याप्त झालें, सूर्य निस्तेज झाला, पृथ्वींतून आर्तध्वनि निघूं लागला आणि त्या पुरुषश्रेष्ठाला पडलेला पहातांच 'अरे हा ब्रह्मवेत्त्यांत वरिष्ठ व श्रेष्ठ ब्रह्मज्ञानी आहे' असें भूतें परस्परांत बोलूं लागलीं.

सिद्ध-चारणांसह ऋषी म्हणाले—"अहो, हा भरतांचा पुरुषश्रेष्ठ आज शरतल्पावर शयन करीत आहे पहा! या महात्म्यानें पूर्वी आपल्या कामार्त पित्याच्या आज्ञेनें आजन्म ब्रह्मचर्य आचरिलें."

तो भरतांचा पितामह हत झाला असतां तुझ्या पुत्रांना कांहीं सूचेनासें झालें. ते सर्व निस्तेज झाले. स्वतःच्या अकार्याची त्यांना लज्जा वाटली व ते विषण्ण मनानें अधोमुख होऊन बसले. संग्रामाच्या अग्रस्थानीं असलेल्या पांडवांना जय प्राप्त झाल्यामुळें त्या सर्वांनीं सुवर्णानें अलंकृत केलेले शंख वाजविले व सहस्रावधि वाद्यांचा हर्षानें निर्घोष केला.

हे महाराज, आपल्या महाबलाढ्य शत्रूला हत करून महाबलानें युक्त असलेला कुंतीपुत्र भीम मोठ्या हर्षानें जणुकाय क्रीडाच करीत असलेला आमच्या दृष्टीं पडला. परंतु कौरव मात्र शोकानें अत्यंत मोहित झाले. तो कौरवांचा पितामह पडलेला पहातांच कर्ण-दुर्योधनहि वारंवार दीर्घ निश्वास टाकूं लागले व सर्वत्र अमर्याद हाहाकार पसरला. भीष्माचें पतन पाहून तुझा पुत्र दुःशासन अतिशय त्वरेनें द्रोणाच्या समीप गेला. भ्रात्यानें पाठविलेला तो वीर आपल्या सैन्याला विषाद देत निघाला. सज्ज झालेल्या सैन्यासह मोठ्या

वेगानें येत असलेल्या दुःशासनाला पाहून 'हा काय सांगत आहे' हें जाणण्याच्या इच्छेनें सर्व कौरववीर त्याच्या भोंवतीं जमले.

( ३ ) तेव्हां दुःशासनानें भीष्म युद्धांत पडल्याचें वृत्त द्रोणाला कथन केलें. ती अप्रिय वार्ता ऐकतांच द्रोणाला मूर्च्छा आली. परंतु सत्वर देहभानावर आलेल्या त्या प्रतापवान् भारद्वाजानें आपल्या सैन्याचें निवारण करून त्यास युद्धापासून निवृत्त होण्याची आज्ञा केली.

कौरवांचें सैन्य परत फिरल्याचें पाहून पांडवांनींहि द्रुतगतीनें जाणाऱ्या अश्वांवरून दूत पाठविले व दूरवर पसरलेलें आपलें सैन्य परत बोलावून आणिलें.

याप्रमाणें युद्धापासून निवृत्त झालेलें तें सर्व सैन्य क्रमानें तेथें आलें. ज्यांनीं आपलीं कवचें काढून ठेविलीं आहेत, असे ते नराधिप भीष्माच्या भोंवतीं जमा झाले. युद्धापासून उपरम पावलेले सहस्रावधि योद्धे, प्रजापतीच्या समीप स्थित होणाऱ्या देवांप्रमाणें, निजलेल्या भीष्माच्या सभोंवार उभे राहिले. कौरवांसह पांडवहि पितामहाला अभिवादन करून त्याच्या समीप उभे राहिले. तेव्हां अग्रभागीं स्थित असलेल्या कौरव-पांडवांना प्रणिपात करून धर्मात्मा भीष्म त्यांना म्हणाला—" हे महाभागहो ! तुमचें स्वागत असो. हे महारथांनो, मी तुमचें स्वागत करितों. देवतुल्य असलेल्या तुमच्या दर्शनानें मी संतुष्ट झालों आहें " असें बोलून त्यांना हांक मारून मस्तक लोंबकळत असतां तो शान्तनव पुनः म्हणाला—' माझें मस्तक लोंबकळत आहे हो ! कोणी तरी मला उशाला आणून द्या. '

( ४ ) गांगेयाच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच तेथें जमलेले सर्व नृपाल धांवत गेले व मृदु आणि सुसरी उशा घेऊन त्याच्याजवळ जमले. परंतु पितामहाला त्या उशांची अपेक्षा नव्हती. तो नरव्याघ्र स्मितपूर्वक म्हणाला—" हे नृपालहो, तुम्हीं आणलेल्या या उशा वीरशय्येला उचित नाहींत. "

नंतर त्या भरतश्रेष्ठानें सर्वलोकांतील महारथ पार्थाकडे पाहून म्हटलें— " बा धनंजया, माझें मस्तक लोंबकळत राहिलें आहे. यास्तव या प्रसंगीं तुला योग्य वाटेल ती उशी मला दे. "

संजय—हे महाराज, त्या कुरुश्रेष्ठाचें हें वचन ऐकतांच अर्जुनानें त्याला

वंदन करून आपलें श्रेष्ठ धनुष्य सज्य केलें आणि अश्रुपूर्ण नेत्रांनीं म्हटलें—"हे दुर्धर्ष पितामह, मला आज्ञा करा. मी आपला दास आहें. मी काय करूं तें सांगा."

त्याला शांतनवानें म्हटलें—अरे बाबा, माझें मस्तक लोंबकळत आहे. मला उंच उशी दे. हे वीरा, माझ्या या शयनाला अनुरूप अशीच उशी मला सत्वर दे. तूं क्षत्रधर्मवेत्ता आहेस. बुद्धिसत्त्वगुणानें युक्त आहेस. यास्तव हें कार्य करण्यास तूंच समर्थ आहेस.

त्यावर पार्थानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि समयोचित उद्योग आरंभिला. त्यानें गांडीव धनुष्य अभिमंत्रित करून त्याला नतपर्व बाण जोडले आणि महात्म्या गांगेयाची अनुज्ञा घेऊन तीन तीक्ष्ण व महा वेगवान् शरांनीं पितामहाचें मस्तक वर उचलून धरिलें. तेव्हां सव्यसाचीनें दिलेलें तें उसें मिळतांच, पार्थानें आपला अभिप्राय जाणला हें पाहून धर्मार्थतत्त्ववेत्ता भीष्म अतिशय संतुष्ट झाला आणि त्यानें धनंजयाचें अभिनंदन केलें. नंतर तो सर्व भारतांकडे पाहून कुंतीपुत्राला म्हणाला—"हे सुहृदांची प्रीति वाढविणाऱ्या धनंजया, माझ्या या वीरशय्येला अनुरूप असेंच उपधान ( उसें ) तूं मला दिलेंस. याहून जर दुसरें कांहीं (मऊ उशी इत्यादि) तूं आणून दिलें असतेंस, तर मीं तुला क्रोधानें शाप दिला असता. हे महाबाहो, युद्धांत शरतल्पावर पडलेल्या व स्वधर्मांत स्थित असलेल्या क्षत्रियाला अशा प्रकारचें शयनच उचित आहे."

बीभत्सूला असें बोलून, पांडवांच्या समीप स्थित असलेल्या सर्व नृपालांना व राजपुत्रांना उद्देशून भीष्मानें म्हटलें—"हे वीरहो, अर्जुनानें मला कसें श्रेष्ठ उपधान दिलें आहे, पहा! आतां रवि उत्तरेला जाईपर्यंत मी याच शय्येवर सुखानें शयन करीन. आदित्य आपल्या सप्ताश्वयुक्त रथांत बसून कुबेरानें आक्रांत केलेल्या उत्तर दिशेंत जेव्हां येईल, तेव्हां सुहृदांप्रमाणें अत्यंत प्रिय असलेल्या माझ्या प्राणांचा मी त्याग करीन. त्यावेळीं जे नृपाल माझ्या संनिध असतील, ते मला हा देह सोडून जातांना पहातील. तोंपर्यंत असंख्य शरांनीं युक्त असलेला मी असाच सूर्योपासना करीत येथेंच पडून राहणार आहें. यास्तव हे नृपालहो, माझ्या या निवासस्थानाभोंवतीं एक खंदक खणून एवढी जागा रणांगणापासून पृथक् करा. हे पार्थिवांनो, तुम्ही आतां हें वैर सोडून द्या आणि युद्धापासून निवृत्त व्हा."

( ५ ) संजय—इतक्यांत दुर्योधनाच्या आज्ञेनें कुशल शस्त्रवैद्य आपल्या सर्व उपकरणांसह तेथें प्राप्त झाले. ते सर्व शस्त्रक्रियाविशारद, उत्तम शिक्षणानें युक्त आणि शरीरांत रुतलेलीं शल्यें काढून टाकण्यांत प्रवीण होते. त्यांना पाहून गंगापुत्र तुझ्या पुत्राला असें म्हणाला—“दुर्योधना, या चिकित्सकांचा धन देऊन सत्कार कर आणि त्यांना परत पाठवून दे. या अवस्थेला प्राप्त झालेल्या मला आतां वैद्यांची काय गरज आहे! बाबारे, क्षत्रधर्मांत प्रशस्त असलेली जी श्रेष्ठ गति, तिला मी प्राप्त झालों आहें. आतां शरतल्पावर पडलेल्या मी शरांनीं वियुक्त होणें हा धर्म नव्हे. यास्तव माझ्या अंगांतील हे शर काढूं नका. माझ्या देहावसानानंतर त्या शरांसह माझें दहन करा.”

भीष्माचें हें वचन ऐकून दुर्योधनानें त्या वैद्यांचा योग्य सत्कार केला व त्यांना परत पाठविलें. अमित तेजस्वी शान्तनवाची ती क्षात्रधर्मावरील परम निष्ठा पाहून नानादेशांतील सर्व जनाधिप विस्मित झाले. नंतर त्या सर्व मनुजेश्वरांनीं पितामहाचें उसें व्यवस्थित केलें आणि कौरव-पांडवांसह त्या सर्व महारथांनीं शुभ शयनावर शयन करणाऱ्या त्या महात्म्याच्या समीप जाऊन त्याला अभिवादन केलें आणि प्रत्येकानें तीन तीन प्रदक्षिणा घातल्या. नंतर रक्षकांची योजना करून भीष्माच्या संरक्षणाची समंततः व्यवस्था केली आणि ते सर्व स्वस्थानाकडे जाण्यास आतुर झालेले वीर स्व-स्वशिबिराकडे वळले. त्या सर्वांचीं अंगें रक्तानें माखलीं होतीं व ते श्रांत झाले होते. त्यांनीं सायाह्नसमयीं विश्रांतीसाठीं आपआपल्या शिबिरांत प्रवेश केला.

( ६ ) विश्रांतिस्थानीं गेल्यावर श्रीकृष्ण आपल्या प्रियतम पांडवांकडे आला. भीष्मपतनानें ते महाबलाढ्य भ्राते हृष्ट झालेले पाहून वासुदेव युधिष्ठिराला म्हणाला—“हे धर्मराजा, आज तुझा जय झाला ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. आज भीष्म पडला हेंहि तुझें महद्भाग्यच होय. कारण तो सर्वशास्त्रपारंगत, सत्यसंध महारथ मनुष्यांना तर अवध्य होताच, पण दैवतांनाहि अजिंक्य होता. तथापि तूं केवल आपल्या दृष्टिक्षेपानेंच त्याला दग्ध केलेंस.”

श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—“हे कृष्णा, मी तर हें तुझ्या कृपेचेंच फल समजतों. तुझ्या प्रसादानें जय व तुझ्या क्रोधानें पराजय प्राप्त होत असतो. भक्तांना अभय देणारा तूं आमची शरणागति आहेस. ज्यांना

तुझा आश्रय आहे, त्यांचा विजय झाल्यास त्यांत आश्चर्य कसलें ! हे केशवा, तूं समरांत नित्य आमचें रक्षण करीत असतोस, तूं सर्वदा आमच्या हितांत तत्पर आहेस. सर्वदा तुझ्या बलाचा आश्रय करणाऱ्या आम्हांला जय मिळावा यांत मला कांहींच आश्चर्य वाटत नाहीं."

युधिष्ठिराचें हें वचन ऐकून जनार्दन स्मित करून म्हणाला—हे नृपश्रेष्ठा, हें भाषण तुला अनुरूपच आहे. ६. ४. १२०.

---

## अध्याय १२१ वा.

[ १ भीष्मदर्शनार्थ विविध जनांचें आगमन. २ भीष्माची तृषा, जलाची याचना. ३ अर्जुनानें निर्माण केलेली जलधारा. ४ भीष्माची तृप्ति, अर्जुनाची प्रशंसा. ५ दुर्योधनाला शमाचा उपदेश. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, ती रात्र संपतांच सर्व पार्थिव, कौरव आणि पांडव हे सर्व पितामहाकडे गेलें व ते सर्व क्षत्रिय वीरशय्येवर शयन करणाऱ्या त्या क्षत्रियश्रेष्ठाला अभिवादन करून त्याच्या सभोंवार उभे राहिले. त्यावेळीं कन्यांनीं चंदनाचें चूर्ण, लाह्या व सुगंधी पुष्पें आणून भीष्मावर उधळलीं. स्त्रिया, वृद्ध, बाल व त्याचप्रमाणें असंख्य प्राकृत जन यांचा समुदाय तेथें जमला. सूर्याच्या दर्शनाला जसे गंधर्वादि सर्व प्राणी जमा होतात, त्याप्रमाणें कुरुवृद्ध पितामहाच्या दर्शनार्थ तेथें नटनर्तक, शिल्पी, व वादक इत्यादि सहस्रावधि जन आले. कौरव-पांडवांनीं आपलीं शस्त्रें व कवचें काढून ठेविलीं आणि ते युद्धापासून निवृत्त होऊन भीष्माच्या समीप येऊन बसले. त्यावेळीं ते सर्व आपलें पूर्व वैर विसरले आणि अत्यंत प्रीतीनें वय व क्रम यांना अनुसरून भीष्माच्या सभोंवार बसले. त्या समितिंजयाला परिवेष्टित करून बसलेली ती पार्थिवांची भारती सभा ग्रहांनीं युक्त असलेल्या आदित्यमंडलाप्रमाणें भासली. ते सर्व नृपति गंगासुताची शुश्रूषा करीत असतां देवेश पितामहाची उपासना करणाऱ्या देवांप्रमाणें शोभले. त्यावेळीं भीष्माला अतिशय वेदना होत होत्या, तरी तो धैर्यानें त्या सहन करीत होता. शरांनीं संतप्त झालेला तो फूत्कार टाकणाऱ्या सर्पाप्रमाणें दीर्घ व उष्ण निश्वास सोडीत होता. शरांनीं विद्ध झालेला त्याचा देह तप्त झाला होता. शस्त्रप्रहारांनीं झालेल्या क्षतांनीं त्याला वरचेवर मूर्च्छा येत होती. बोलण्याचें त्राण राहिलें नव्हतें. तरी तो सर्व राजांकडे पाहून 'पाणी' असें म्हणाला.



**कर्ण**—हे पितामह, मी राधेय तुझ्या दर्शनार्थ आलों आहें. **भीष्म**—ये, ये, कर्णा, माझ्याशीं नित्य स्पर्धा करणारा तूं माझा प्रतिस्पर्धी आहेस. [ पृ. २२० ]

(२) भीष्माचे ते शब्द ऐकतांच सर्व क्षत्रिय चारी बाजूंनीं धांवत गेले आणि उच्च-नीच प्रतीचे भक्ष्य पदार्थ व शीतल जलाचे कुंभ घेऊन आले. तेव्हां त्यांनीं आणलेलें तें जल पाहून शान्तनव त्यांना म्हणाला—"हे मनुष्याचे भोग माझ्या उपयोगाचे नाहींत. मी आतां मनुष्यांत राहिलों नाहीं. मी या लोकांचें अतिक्रमण करून गेलों आहें. शरशय्येवर पडलेल्या मला इहलोकींच्या या भोगाची अपेक्षा नसून मी फक्त चंद्रसूर्यांच्या संक्रमणांचीच मार्गप्रतीक्षा करीत आहें. असें बोलून त्यानें पार्थिवांची निंदा केली आणि 'मला अर्जुनाला पहावेंसें वाटतें' असें क्षीणस्वरानें म्हटलें.

तें ऐकतांच तो महाबाहु पार्थ मोठ्या त्वरेनें पितामहाच्या समीप आला, त्याला अभिवादन करून, हात जोडून त्याच्या पुढें उभा राहिला व "हा मी आपल्या सेवेस तत्पर आहें. मीं काय करावें याची आज्ञा व्हावी" असें म्हणाला.

धनंजयाला पाहून धर्मात्मा भीष्म प्रेमानें म्हणाला—"बा अर्जुना, तुझ्या शरांनीं विद्ध झालेल्या या शरीराचा दाह होत आहे. अंगांत रुतलेले हे शर शरीराला ताप देत आहेत. मर्मस्थानें व्याकुल झालीं आहेत. माझ्या मुखाला कोरड पडली आहे. यास्तव, वत्सा, या वेदनानें आर्त झालेल्या देहाला थोडें जल देऊन शांत कर. हे महाबाहो, याप्रसंगीं मला यथाविधि जल देण्यास तूंच समर्थ आहेस."

( ३ ) पितामहाचे हे शब्द ऐकतांच अर्जुनानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि आपल्या रथावर आरूढ होऊन, गांडीव धनुष्यावर दोरी चढवून तें दृढ केलें. पार्थ आपलें धनुष्य सज्ज करीत असतां होणाऱ्या टणत्काराचा अशनीच्या कडकडाटासारखा प्रचंड ध्वनि झाला. तो निर्घोष ऐकून तेथें जमलेले पार्थिव आणि प्राणिमात्र भयभीत झाले. नंतर त्या रथिश्रेष्ठ धनंजयानें शरतल्पावर निजलेल्या श्रेष्ठ शस्त्रवेत्त्या भीष्माला रथानेंच प्रदक्षिणा घातली. धनुष्याला एक दीप्त शर जोडला, तो पर्जन्यास्त्रानें अभिमंत्रित केला आणि त्या बाणानें सर्व लोकांच्या समक्ष भीष्माच्या उजव्या बाजूला पृथ्वीला विद्ध केलें. तेव्हां तो शर भूमींत शिरला आणि तेथून निर्मल, शीतल व मधुर जलाची धार वर उसळली. तें दिव्य जल सुगंधानें युक्त असून अमृततुल्य होतें. तें पवित्र जल पार्थानें पितामहाला अर्पण केलें. त्या शीतल जलाच्या धारेनें कुरूंचा नरश्रेष्ठ भीष्म शांत झाला.

पार्थाच्या इंद्रतुल्य अलौकिक कर्मानें तेथें जमलेले सर्व वसुधाधिप विस्मित झाले. बीभत्सूचा तो अतिमानुष पराक्रम पाहून शीतानें आर्त होऊन खुड-खुडणाऱ्या गायींप्रमाणें कौरव थरथरां कांपूं लागले. नृपति विस्मयानें आपलीं उत्तरीय वस्त्रें हवेंत फडफडवूं लागले आणि सर्वत्र शंख-दुंदुभींचा तुमुल निर्घोष झाला.

( ४ ) नंतर तृप्त झालेल्या शांतनवानें सर्व पार्थिव आणि वीर यांच्या समक्ष धनंजयाचा सत्कार करीत त्याला म्हटलें—" हे महाबाहो, तूं असें दुष्कर कर्म करावेंस, यांत कांहींच विचित्र नाहीं. कारण तूं पूर्वर्षि ( नर ) आहेस व वासुदेवाच्या साह्यानें महत्कर्म करशील, असें नारदानें सांगूनच ठेवलें आहे. सर्व देवांसह देवेंद्रहि तुला जिंकण्यास समर्थ नाहीं. हें देवरहस्य जाणणाऱ्या सर्वांनीं तूं सर्व क्षत्रियांचा निधनहेतु ( मृत्यूला कारण होणारा ) आहेस, हें कधींच जाणलें होतें. हे पार्था, तूं पृथ्वीवरील सर्व मनुष्यांत श्रेष्ठ आहेस व धनुर्धरांत एकटाच अद्वितीय आहेस.

हे कौंतेया, या भूलोकीं ( सर्व प्राणिमात्रांत ) मनुष्य श्रेष्ठ आहे, जला-शयांत सागर श्रेष्ठ आहे, पक्ष्यांत गरुड श्रेष्ठ आहे, चतुष्पादांत गाय श्रेष्ठ आहे. तेजस्वी पदार्थांत आदित्य श्रेष्ठ, पर्वतांत हिमालय श्रेष्ठ, सर्व जातींत ब्राह्मण वरिष्ठ आहे आणि सर्व धनुर्धरांत तूं श्रेष्ठ आहेस. यास्तव विदुर, द्रोण, जाम-दग्न्य राम, जनार्दन व मीं स्वतःहि दुर्योधनाला अनेक प्रकारें वारंवार सांगि-तलें, संजयानेंहि पुनः पुनः विनविलें. तथापि त्या धार्तराष्ट्रानें तें ऐकलें नाहीं. त्याची बुद्धि विपरीत झाली होती. भ्रान्तचित्त झालेल्या त्यानें आमच्या शब्दावर विश्वास ठेवला नाहीं. परंतु शेवटीं शास्त्राचें उल्लंघन करणारा तो भीमाच्या गदाप्रहारानें पराभूत होऊन या रणांगणांत कायमचा शयन करील."

( ५ ) भीष्माचें हें वचन ऐकून दुर्योधन खिन्न झाला. तेव्हां त्याच्याकडे पहात पितामह म्हणाला—

" हे राजा दुर्योधना, शोकरहित हो आणि माझ्या बोलण्याकडे लक्ष दे. नुक्तीच बुद्धिमान् पार्थानें सुगंधयुक्त, अमृततुल्य शीतल जलधारा निर्माण केली, ती तूं प्रत्यक्षच पाहिली आहेस. पार्थावांचून दुसरा कोणीहि असें अलौ-किक कर्म करण्यास समर्थ नाहीं. या मनुष्यलोकीं आग्नेय, वारुण, सौम्य, वायव्य, वैष्णव, ऐन्द्र, पाशुपत, ब्राह्म, पारमेष्ठ्य, प्राजापत्य आणि धाता,

त्वष्टा, सविता व विवस्वान् यांचीं अस्त्रें एक धनंजय आणि दुसरा देवकीनंदन कृष्ण, या दोघांनाच कायतीं अवगत आहेत. त्या उभयतांवांचून अन्य कोणीहि त्या देवतांच्या अस्त्रांना जाणत नाहीं.

बाबारे, ज्या महात्म्याचीं अशीं अतिमानुष कर्में आहेत, त्याला युद्धांत केव्हांहि जिंकतां येणें शक्य नाहीं. यास्तव त्या समरशोभी, सत्त्ववान् शूर पांडवाशीं सत्वर संधि कर. उशीर करूं नको. जोंवर अर्जुनानें नतपर्व बाणांनीं तुझ्या सर्व सेनेचा नाश केला नाहीं, तोंवर तूं संधि घडवून आण. बा दुर्योधना, जोंवर तुझे अवशिष्ट राहिलेले सोदर भ्राते जिवंत आहेत आणि अद्यापि हत न झालेले नृपाल रणांगणांत उभे आहेत, तोंवर तरी संधि कर; जोंवर युधिष्ठिरानें क्रोधानें आरक्त झालेल्या नेत्रांनीं तुझ्या सेनेला दग्ध केलें नाहीं, तोंवर संधीचा विचार मनांत आण. जोंवर नकुल, सहदेव व भीमसेन यांनीं तुझ्या सैन्याचा सर्वशः नाश केला नाहीं, तोंवरच पांडववीरांशीं तुझें सख्य होणें मला योग्य वाटतें. माझ्या अंताबरोबरच या युद्धाचा अंत होवो. आतां तरी पांडवांशीं शम कर.

बा दुर्योधना, माझें हें अखेरचें वचन तरी तुला मान्य होवो. यांतच तुझें आणि सर्व कुलाचें हित आहे. यास्तव तूं क्रोध सोडून पांडुपुत्रांशीं शम कर. फाल्गुनानें आतांपर्यंत तुझ्या भ्रात्यांचा जो वध केला तो पुरे झाला. आतां भीष्माच्या मरणानें तरी तुमचें सख्य जडो. अवशिष्ट राहिलेलें सैन्य जिवंत राहो. हे राजा, प्रसन्न हो आणि एवढी तरी आतां कृपा कर.

हे कौरवेंद्रा, पांडवांना अर्धें राज्य दे आणि युधिष्ठिराला इंद्रप्रस्थाला जाऊन राज्य करूं दे. या सर्व पार्थिवांच्या वधाला कारण होऊन मित्रद्रोही होऊं नको. त्यामुळें तुझी दुष्कीर्ति होईल. बाबारे, माझ्या देहावसानानें तरी प्रजांची शान्ति होवो. हे सर्व पार्थिव प्रेमानें एकत्र जमा होवोत. पिता पुत्राला, मातुल भागिनेयाला आणि भ्राता भ्रात्याला परत जाऊन भेटो.

दुर्योधना, मी तुला हें प्राप्तकाल हितवचन सांगत आहें. त्याकडे जर तूं अविचारानें लक्ष दिलें नाहींस, तर परिणामीं पश्चात्ताप पावशील. या सर्वांचा या युद्धांत अंत होईल; हें मी तुला सत्यवचन सांगत आहें."

याप्रमाणें धर्मात्म्या शान्तनवानें केवल कौरवांच्या हितबुद्धीनें सर्व राजांच्या समक्ष दुर्योधनाला असा उपदेश ऐकविला आणि शल्यांमुळें मर्मांचा दाह

होत असतांहि सर्व वेदना सहन करून, स्तब्ध होऊन मनाला योगधारणायुक्त केलें.

संजय—राजा धृतराष्ट्रा, भीष्माचें हें वचन जरी धर्मार्थयुक्त, हितकर आणि अनामय होतें, तरी मुमुर्षूला जसें औषध रुचत नाहीं, तसें तुझ्या पुत्राला तें रुचलें नाहीं. ६. ४. १२१.

---

## अध्याय १२२ वा.

[ १ कर्णाचें भीष्मदर्शनार्थ आगमन व भाषण. २ भीष्मानें त्याला केलेल्या शमाचा उपदेश. ३ कर्णाचा युद्ध न सोडण्याचा निश्चय. ४ भीष्माची अनुज्ञा. ]

( १ ) संजय—हे महाराजा, याप्रमाणें भीष्मानें मौन धारण केलेलें पाहून तेथें जमलेले ते सर्व पार्थिव आपापल्या स्थानीं निघून गेले. कर्णानें भीष्मपतनाची वार्ता जेव्हां ऐकली, तेव्हां तो क्षणमात्र त्रस्त झाला पण लागलाच पितामहाच्या जवळ आला. तेथें जन्मसमयीं शरशय्येवर पडलेल्या प्रभु कार्तिकेयाप्रमाणें शरतल्पावर पडलेला तो महात्मा त्याच्या दृष्टीं पडला.

नेत्र मिटून शरशय्येवर पडलेल्या त्या वीराला पाहून कर्णाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. कंठ सद्गदित झाला व तो गांगेयाच्या समीप जाऊन म्हणाला—"महाबाहो भीष्मा, हे भीष्मा, मी राधेय आलों आहें. जो नित्य तुझ्या डोळ्यांत खुपत होता आणि तूं ज्याचा नित्य द्वेष करीत होतास, तो मी राधासुत तुझ्या दर्शनार्थ आलों आहें."

( २ ) तें ऐकून बलाढ्य कुरुवृद्ध पितामहानें सुरकुत्यांनीं आवृत्त होऊन संकुचित झालेले नेत्र सावकाश उघडून वर पाहिलें. सभोंवार कोणी नाहीं हें पहाण्यासाठीं नजर टाकिली. रक्षकांना तेथून दूर जाण्यास सांगितलें आणि प्रेमल पिता जसा प्रिय पुत्राचें सान्तवन करतो, तसा भीष्मानें आपला क्षीण झालेला हात कर्णाच्या पाठीवरून फिरवून त्याला स्नेहपूर्वक असें म्हटलें—"ये ये कर्णा, माझ्याशीं नित्य स्पर्धा करणारा तूं माझा प्रतिस्पर्धी आहेस. ( तुला पाहून मला समाधान वाटलें ) तूं जर न येतास तर मात्र तुझें अकल्याण झालें असतें.

वत्सा, तूं कौंतेय आहेस, राधेय नाहींस व अधिरथ तुझा पिताहि नव्हे. तूं सूर्याचा पुत्र आहेस. असें मीं नारदाच्या मुखानें ऐकलें आहे. आणि व्यासा-

नेंहि असेंच सांगितलें होतें. तेव्हां तें सत्यच आहे यांत संशय नाहीं. बाबारे, माझ्या मनांत तुझ्याविषयीं यत्किंचित्‌हि द्वेष नाहीं; हें मी तुला सत्य सांगतों. तूं सर्व पांडवांवर निष्कारण आक्षेप घेऊं लागलास म्हणून तुझा तेजोभंग करण्यासाठीं मी तुला कठोर वचन बोललों. तुझी जर संभावना केली तर तूं पांडवांना अतिशय पिडा देशील, हा विचार मनांत आणून तूं अतिरथ असतांहि मीं तुझी अर्धरथत्वानें गणना केली. शिवाय एकतर तुझा जन्म धर्मलोपानें झाला आहे ( म्ह० तूं कुंतीचा कानीन पुत्र आहेस. ) आणि ज्या दुर्योधनानें तुला प्रेरणा केली, त्या नीचाश्रयामुळें तुझी बुद्धि गुणिजनांचा द्वेष करणारी व मत्सरयुक्त बनावी यांत आश्चर्य नाहीं! तुझी ही बुद्धि बदलावी म्हणूनच मीं तुला कौरवसभेंत तशाप्रकारचें कटु व टोचणारें वचन ऐकविलें.

बा सूर्यपुत्रा, तुझा युद्धांतील पराक्रम मी जाणतों. तूं शत्रूला समरामध्यें दुःसह आहेस. तुझी ब्राह्मणभक्ति, तुझें शौर्य व दानांतील पराकाष्ठेचें औदार्यहि मला माहिती आहे. तुझ्या योग्यतेचा या जगांत एकहि मनुष्य नाहीं. तूं देवतुल्य आहेस. हें सर्व जाणत असतांहि मी तुला सर्वदा कठोर वचनें बोलत होतों, यांचें कारण तूं हा कलह वाढवून कुलभेद उत्पन्न करशील, अशी मला भीति वाटत असे. कर्णा, शरसंधान, हस्तलाघव आणि अस्त्रबल या सर्व कर्मांत तूं अर्जुन व कृष्ण यांच्या तुल्य आहेस यांत संशय नाहीं.

कुरुराजाला वधू आणून देण्यासाठीं तूं एकटा धनुर्धर काशिराजाच्या नगरीस गेलास आणि तेथें जमलेल्या योद्ध्यांचें युद्धांत मर्दन केलेंस. त्याच-प्रमाणें जरासंध राजा कितीहि दुरासद असला, तरी तोहि समरांत तुझ्या तुल्य निश्चयानें नव्हता. ( या कथा कर्णाचें दहा सहस्र हत्तींचें बल सूचित करितात. ) तूं ब्राह्मणांचा सत्कार करणारा, सत्वयोधी आणि बलानें व तेजानें देवपुत्रांच्या सदृश आहेस. युद्धांत प्रहार करणाऱ्या सर्व मनुष्यांत तूं वरिष्ठ आहेस. बा कौंतेया, मी तुजवर पूर्वीं जो क्रोध करीत होतों, तो आतां नाहींसा झाला आहे. कारण पुरुषप्रयत्नापेक्षां दैवच श्रेष्ठ आहे. त्याचें उल्लंघन कोणा-लाहि करतां येणें शक्य नाहीं. ( मग तुजवर तरी रोष कां करावा ! )

बाबारे, माझें कांहीं प्रिय करण्याची तुझी जर इच्छा असेल तर पांडवांशीं सख्य कर. ते तुझे सोदर भ्राते आहेत. माझ्या बरोबरच या वैराची समाप्ति होऊं द्या आणि हे सर्व पृथ्वींतील राजे निरामय होऊन परत जावोत.

( ३ ) कर्ण—हे महाबाहो, आपलें म्हणणें सत्य आहे, यांत संशय नाहीं. मी कुंतीपुत्र आहें, सूतपुत्र नाहीं, हेंहि मी जाणतों. तथापि हे भीष्मा, कुंतीनें माझा जन्मतांच त्याग केला आणि सूतानें माझें बालपणापासून संगोपन करून मला वाढविलें. शिवाय दुर्योधनाच्या ऐश्वर्यावर मीं सर्व सुख भोगलें. त्यानें माझा उत्कर्ष केला. असें असतां मीं त्याच्याशीं आतां मिथ्याचरण करणें योग्य नाहीं.

वासुदेवानें ज्याप्रमाणें पांडवांना साह्य करण्याचा दृढ निश्चय केला आहे, त्याप्रमाणें मींहि दुर्योधनासाठीं आपलें वित्त, देह, स्त्री, पुत्र आणि माझें यश या सर्वांचा त्याग करण्याचा संकल्प केला आहे. हे भूरिदक्षिण वीरा, या सर्व क्षत्रियांना व्याधिग्रस्त होऊन मरण येऊं नये, म्हणून मी दुर्योधनाचा आश्रय करून नित्य पांडवांना कोपवीत होतों. शिवाय हें युद्ध अवश्यंभावी आहे, त्याचें निवारण करणें शक्य नाहीं. पुरुषप्रयत्नानें दैवाचें निराकरण करण्यास कोण समर्थ आहे! पृथ्वीचा क्षय सूचविणारीं दुश्चिह्नें आपल्या प्रत्ययास आलींच होतीं आणि तीं सर्व आपण कौरवसभेंत स्पष्टच सांगितलीं होतींत.

हे पितामह, वासुदेव आणि अर्जुन हे दोघेहि इतरांस अजिंक्य आहेत, हेंहि मला पूर्णपणें अवगत आहे. तथापि मी त्यांच्याशीं युद्धाला सज्ज झालों आहें. पांडवांना जिंकण्याचा मीं निश्चय केला आहे [ अर्जुना खेरीज चारी भ्रात्यांना मी युद्धांत जिंकीन त्यांचा वध करणार नाहीं, अशी मीं प्रतिज्ञा केली आहे.] हें अतिशय दारुण वैर आतां शांत होणें शक्य नाहीं. स्वधर्माचें पालन करण्यासाठीं मी धनंजयाशीं संतोषानें युद्ध करणार आहें. मीं युद्धाचा निश्चय केला आहे. त्यापासून आतां निवृत्त होणें शक्य नाहीं. यास्तव, हे तात, मला आपली अनुज्ञा असावी. आपली अनुज्ञा घेऊन युद्ध करावें, अशी माझी इच्छा आहे. आजपर्यंत मी आपल्याला क्रोधाच्या भरांत किंवा अविचारानें जें कांहीं दुरुक्त किंवा विरुद्ध बोललों असेन, किंवा अमर्याद भाषण केलें असेल किंवा माझ्या हातून जें कांहीं प्रतिकूल घडलें असेल, त्या सर्वांची मला क्षमा करा.

( ४ ) भीष्म—बा कर्णा, इतक्या दारुण स्वरूपाला प्राप्त झालेलें हें वैर आतां नष्ट होणें शक्य नाहीं, असें जर तूं मानीत असलास, तर मी तुला युद्धाची अनुज्ञा देतों. तूं स्वर्गाच्या इच्छेनें युद्ध कर. क्रोधरहित व क्षोभशून्य

हो आणि सज्जनांच्या मार्गाला अनुसरून उत्साहानें यथाशक्ति पराक्रम प्रकट कर. माझी तुला अनुज्ञा आहे. जा. तूं ज्याची अपेक्षा करीत आहेस, तें तुला प्राप्त होवो. तुला क्षत्रधर्मानें जिंकलेले लोक धनंजयाच्या हातून प्राप्त होतील. बल व वीर्य यांचा आश्रय करून आणि निरहंकार होऊन युद्ध कर. कारण क्षत्रियाला धर्मयुद्धाहून अधिक श्रेयस्कर दुसरें कांहींहि नाहीं. कर्णा, मीं शमासाठीं दीर्घकाल अतिशय यत्न केला. पण मला त्यांत यश आलें नाहीं. हें मी तुला सत्य सांगत आहें.

**संजय**—हे महाराज, गांगेयाचें हें भाषण ऐकून कर्णानें पितामहाला अभिवादन केलें, त्याचा निरोप घेतला आणि तो राधेय आपल्या रथावर आरूढ होऊन तुझ्या पुत्रांकडे गेला. ६. ४. १२२.

( येथें भीष्मवधपर्व नांवाचें चवथें उपपर्व समाप्त झालें. )

---

येथें सहावें भीष्मपर्व संपलें.

यापुढें सातवें द्रोणपर्व येईल, त्याचा हा पहिला श्लोक आहे—

**जनमेजय**—

तमप्रतिमसत्त्वौजोबलवीर्यसमन्वितम् ।
हतं देवव्रतं श्रुत्वा पांचाल्येन शिखण्डिना ॥

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



## ७ द्रोणपर्व.



### द्रोणाभिषेकपर्व १.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

#### अध्याय १ ला.

[ १ शोकाकुल धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयानें केलेलें कौरवयोद्ध्यांच्या दुःस्थितीचें वर्णन. ३ धृतराष्ट्राचा कर्णाच्या कर्तव्याविषयीं पुनः प्रश्न. ]

( १ ) जनमेजय म्हणाला—अप्रतिम सत्व, ओज, बल व वीर्य यांनीं युक्त असलेल्या देवव्रताला पांचाल्य शिखंडीनें मारिलें आहे, असें ऐकून ज्याचे नेत्र शोकानें व्याकुल झाले आहेत, अशा राजा धृतराष्ट्रानें काय केलें ? हे विप्रर्षे, पिता हत झाला असतां त्या वीर्यवानानें काय केलें ? ज्याचा पुत्र भीष्म-द्रोणादि रथ्यांच्या साह्यानें महाधनुर्धर पांडवांना जिंकून राज्याची इच्छा करीत आहे, त्या धृतराष्ट्रानें सर्व धनुर्धरांतील ध्वजच असा भीष्म हत झाला असतां काय केलें ? तें मला सांग.

---

१ यापुढें प्रत्येक पर्वांतील युद्धाच्या सविस्तर वर्णनाचा आम्ही संक्षेप करणार आहों. युद्धप्रसंगावांचून इतर प्रसंगांचें सविस्तर भाषांतर देऊं. तथापि त्यांतील विविध विशेषणांचाहि संक्षेप करणार आहों.

वैशंपायन—हे राजा, भीष्म युद्धांत पतन पावल्याचें ऐकून चिंता-शोकपरायण झालेल्या जनाधिप धृतराष्ट्राच्या मनाला शांति वाटेनाशी झाली. तो त्या दुःखद प्रसंगाचें सतत चिंतन करीत बसला असतां विशुद्धात्मा संजय तेथें प्राप्त झाला. त्यावेळीं तो राजा भीष्माचें निधन ऐकून अतिशय खिन्न झाला होता. पुत्रांच्या जयाची इच्छा करणारा तो नृपति आतुर होऊन विलाप करीत असतां गावल्गणि कुरुक्षेत्रांतून त्या रात्रीं हस्तिनापुरास आला. तेव्हां त्याला धृतराष्ट्रानें असा प्रश्न केला.

धृतराष्ट्र—बा संजया, महात्मा पितामह हत झाला असतां कालानेंच ज्यांना प्रेरणा केली आहे, त्या कौरवांनीं काय केलें ! तो दुर्धर्ष तात पडल्यावर शोकसागरांत निमग्न झालेल्या कौरवांनीं पुढें काय केलें ? हे संजया, पांडवांचें तें महत्सैन्य त्रैलोक्यासहि भय उत्पन्न करणारें आहे. अशा दारुण प्रसंगीं ज्याच्या आश्रयानें योद्ध्यांचें रक्षण होईल, असा वीर दुर्योधनाच्या सैन्यांत कोण बरें आहे ? देवव्रत कुरूंचा ऋषभच होता, तो हत झाला असतां सर्व नृपतींनीं काय केलें तें सर्व मला सांग.

(२) संजय—हे राजन्, देवव्रत पडला असतां, तुझ्या पुत्रांनीं काय केलें, तें सांगतों, एकाग्र चित्तानें ऐक. सत्यपराक्रम भीष्म हत झाला असतां पराभव झाला म्हणून तुझ्या पुत्रांनीं व ( जय प्राप्त झाला म्हणून ) पांडुपुत्रांनीं पृथक् पृथक् शंख वाजविले. गुरुस्थानीं असलेल्या पितामहाचा आपल्या हातून जरी वध झाला आहे, तरी क्षात्रधर्माकडे लक्ष देतां त्यांत दोष नाहीं, असें जाणून ते विस्मित झाले व युद्धांत मरण आलें असतां मिळणाऱ्या महत्फलाकडे दृष्टि देऊन हृष्ट झाले. नंतर स्वधर्मांत स्थित असलेल्या त्यांनीं महात्म्या पितामहाला प्रणिपात केला आणि अमित कर्मे करणाऱ्या भीष्मासाठीं पूर्वोक्त नतपर्व बाणांची शय्या व उशी निर्माण करून त्याच्या संरक्षणाची योजना केली. परस्परांशीं संभाषण करून गांगेयाला प्रदक्षिणा घातली, त्याची अनुज्ञा घेतली व कालानेंच प्रेरणा केलेले ते सर्व क्षत्रिय एकमेकांस भेटून पुनः युद्धाला निघाले. त्यावेळीं त्यांचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. ते रणांगणाकडे चालले असतां तुझी व शत्रूची सेना, नगारे, भेरि इत्यादि रणवाद्यांचा निर्घोष करीत निघाली.

हे राजेंद्रा, अपराह्णकालीं सूर्य फिरला असतां गंगासुत पतन पावला. तेव्हां कालानेंच ज्यांची मति कुंठित केली आहे व जे क्रोधवश झाले आहेत, असे

सर्व कौरव गांगेयाच्या 'शम करा' या पथ्यकर वचनाचा अनादर करून आपलीं सर्व शस्त्रें धारण करून सत्वर निघाले. हे राजन् तुझ्या पुत्रांचा जया-विषयींचा मोह व शान्तनवाचा वध यांमुळें सर्व राजांसह अनेक कौरव मृत्युमुखीं पडले. हे महाराज, हिंस्र पशूंनीं व्यापलेल्या अरण्यांत अजपाल नसल्यास अजांची (मेंढ्यांची) जशी दुःस्थिति होते, तशीच देवव्रताच्या अभावीं कौरवांची झाली. ते सर्व उद्विग्न झाले. पितामह भीष्म युद्धांत पडले असतां कौरवांची सर्व सेना नक्षत्ररहित नभोमंडलाप्रमाणें निस्तेज झाली. ती वायुरहित आकाशाप्रमाणें शून्य भासली, सस्य–धान्य नष्ट झालेल्या भूमीप्रमाणें निस्तेज दिसली, संस्कारहीन वाणीप्रमाणें स्वकर्तव्य करण्यास असमर्थ झाली, बलिराजाचा निग्रह झाला असतां दीन झालेल्या राक्षसी सेनेप्रमाणें व्याकुल झाली, वैधव्यावस्थेंतील अलंकार-शून्य तरुणीप्रमाणें उदासीन दिसली, शुष्क नदीप्रमाणें निरुपयोगी झाली आणि वनामध्यें कळपाचा यूथप–रक्षक हत झाला असतां वृकानें निरुद्ध केलेल्या चित्रमृगीप्रमाणें आसन्नमरण दिसूं लागली.

हे राजन्, गंगापुत्र पतन पावतांच कौरवांची ती प्रचंड सेना, शरभानें जिच्यांतील सिंहाला मारिलें आहे, अशा गिरिगुहेप्रमाणें भयानक दिसूं लागली. दश-दिशांत वादळ झालें असतां, महासागरांत सांपडलेल्या जीर्ण नौकेप्रमाणें कौरवसेनेची स्थिति झाली. त्यावेळीं बलाढ्य पांडव तिच्यावर अचुक बाण सोडून तिला जर्जर करीत होते. त्या सेनेंतील रथ, अश्व व गज हे सर्व व्याकुल झाले.

देवव्रताच्या अभावीं ती सर्व सेना त्रस्त होऊन दीन झाली. भीष्माच्या अभावीं जणुंकाय आपण आतां पाताळांतच बुडत आहों, असें समजून त्या सेनें-तील सर्व राजे व योद्धे भयभीत झाले. संकटग्रस्त झालेले ते सर्व सैनिक देवव्रततुल्य असलेल्या कर्णाचें स्मरण करूं लागले. तो राधेय सर्व शस्त्रधारण करणारांत श्रेष्ठ आणि विद्या व तप यांच्या योगानें अतिथीप्रमाणें शोभत होता. तो वीर आपद्ग्रस्तांचा बंधु असल्यामुळें सर्वांचें चित्त त्याच्याकडे गेलें व तेथें असलेले सर्व पार्थिव 'हे कर्णा, कर्णा' असा आक्रोश करूं लागले. 'हा सूतपुत्र कौरवांसाठीं स्वतःच्या प्राणांचाहि त्याग करणारा आहे. तोच आमचा हितकर्ता आहे. त्या महायशस्वी राधेयानें आपले अमात्य व बंधु यांसह या दहा दिवसांत युद्ध केलें नाहीं. यास्तव त्या कर्णालाच सत्वर बोलवा, उशीर लावूं नका' असा चोहोंकडून निर्घोष होऊं लागला.

हे महाराज, सर्व बलाढ्य व पराक्रमी रथांची गणना करते वेळीं भीष्मानें सर्व वीरांच्या समक्ष कर्णाची अर्धरथ्यांत गणना केली. वस्तुतः तो महाबाहु दोन अतिरथ्यांच्या तुल्य आहे. कर्ण सर्व रथी व अतिरथी यांत अग्रणी असून तो शूरसंमत आहे. देव आणि दानव यांच्याशींहि युद्ध करण्यास तो समर्थ आहे. तथापि सर्व वीरांच्या समक्ष त्याची अर्धरथत्वानें गणना केल्यामुळें त्याला तो अपमान सहन झाला नाहीं व त्याच कोपामुळें त्यानें गांगेयाला असें म्हटलें कीं, हे कौरवा, जोंवर तूं जिवंत आहेस, तोंवर मी कदापि युद्ध करणार नाहीं. या महायुद्धांत तूं जर पांडवांचा वध केलास तर मी दुर्योधनाच्या अनुज्ञेनें वनांत निघून जाईन आणि पांडवांकडून हत होऊन तूं जर स्वर्गस्थ झालास, तर तूं ज्यांना रथी मानीत आहेस, त्या सर्व पांडवांचा मी एका रथानें संहार करीन.

भीष्माला असें बोलून कर्णानें दुर्योधनाच्या संमतीनें दहा दिवसपर्यंत युद्ध केलें नाहीं. त्या अवधींत भीष्मानें पांडवांकडील असंख्य योद्ध्यांचा वध केला व शेवटीं त्या सत्यप्रतिज्ञ पितामहाचा देहपात झाला. त्यावेळीं समुद्र तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या लोकांस नौकेचें जसें स्मरण होतें त्याप्रमाणें सर्व कौरवांस कर्ण आधारभूत वाटला आणि तुझे पुत्र व सर्व ससैनिक राजे ' हे कर्णा ये, स्वपराक्रम प्रकट करण्याची हीच वेळ आहे ' असें बोलून त्याला हांका मारूं लागले व म्हणाले—

" हे राजा, साक्षात् जामदग्न्य रामानें कर्णाला अस्त्रविद्या शिकविली होती. त्याचा पराक्रम दुर्निवार्य होता. त्यामुळें संकटसमयीं आप्तांची जशी आठवण होते, त्याप्रमाणें आम्हांला कर्णाचें स्मरण झालें. जसा विष्णु महाभयापासून देवांचें सर्वदा रक्षण करितो, तसा एकटा कर्णच या वेळीं आमचें रक्षण करण्यास समर्थ आहे."

वैशंपायन—राजा, याप्रमाणें संजय कर्णाचें वर्णन करीत असतां धृतराष्ट्र सर्पाप्रमाणें पुनः पुनः उच्छ्वास टाकीत असें म्हणाला—

(२) धृतराष्ट्र—संजया, त्यावेळीं वैकर्तन कर्णाकडे तुमचें लक्ष गेलें आणि तो सूतपुत्र कौरवांच्या हितासाठीं देहत्यागहि करील, असें जाणून तुम्हीं त्याला बोलावलेंत. परंतु त्या सत्यपराक्रमी सूतपुत्रानें तुमची आशा व्यर्थ तर केली नाहीं ना ? तुम्ही भ्रांत झालां होतां. आर्त व त्रस्त झालेले तुम्ही परि-

त्राणाची इच्छा करीत होतां. त्यावेळीं भीष्माच्या निधनानें झालेली हानि त्या श्रेष्ठ धनुर्धरानें आपल्या पराक्रमानें दूर केली ना? त्यानें शत्रूला भयभीत करून तुम्हांतील न्यूनत्व भरून काढलें ना? संजया, कर्ण सुप्रसिद्ध वीर आहे व माझे पुत्र त्याला सोदर भ्रात्यासमान मानितात. तेव्हां त्या आर्त बांधवांच्या व विशेषतः आक्रोश करणाऱ्या त्यांच्या रक्षणार्थ व कल्याणार्थ स्वप्राणांचाहि त्याग करणाऱ्या त्या कर्णानें माझ्या पुत्रांची जयाशा सफल केली किंवा नाहीं? तें मला सांग. ७. १. १.

---

## अध्याय २ रा

[ १ भीष्म पडला हें ऐकून कौरवांच्या रक्षणार्थ कर्णाच्या गमनाचें वर्णन. २ कर्णकृत भीष्मस्तुति. ३ भीष्माविषयीं कर्ण-दुर्योधनादिकांचा शोक. ४ कर्णाचें युद्धार्थ व भीष्माशीर्वादार्थ प्रयाण. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, भीष्म हत झाला आहे व अगाध समुद्रांत मग्न झालेल्या नौकेप्रमाणें कौरवसेनेची स्थिति झाली आहे, हें हेराच्या मुखानें कळतांच तुझ्या पुत्रावर सोदर भ्रात्याप्रमाणें प्रेम करणारा कर्ण त्याच्या सेनेचें रक्षण करण्यासाठीं धांवला. धनुर्धरांतील श्रेष्ठ व सर्वदा विजयी असणारा भीष्म पडल्याचें ऐकून कर्ण एकदम पुढें सरसावला. संकटग्रस्त पुत्राला सोडविण्यास तत्पर असणाऱ्या पित्याप्रमाणें तो राधेय कौरवसेनेच्या संरक्षणार्थ पुढें झाला.

( २ ) **कर्ण**—पितामहाच्या ठिकाणीं धृति, बुद्धि, पराक्रम, ओज व सत्य हे सर्व वीरगुण वास करीत होते. त्या महात्म्याला सर्व दिव्यास्त्रें विदीत असून तो कोणाची असूया करीत नसे. तो सत्यप्रतिज्ञ वीर कृतज्ञ, नम्र व सर्वदा द्विज शत्रूंचा नाश करण्यांत तत्पर असे. चंद्राच्या लांछनाप्रमाणें हे सर्व गुण त्याच्या ठिकाणीं सदोदित वसत होते. अशा प्रकारचा तो परवीरहंता हत झाल्यामुळें मला तर सर्वच वीर हत झाले, असें वाटत आहे.

खरोखर, या लोकीं कर्माच्या अनित्यत्वामुळें कांहींहि निश्चित नाहीं. ज्याचें ब्रह्मचर्यव्रत दृढ होतें, असा भीष्म हत झाला असतां दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होईलच याचा तरी निश्चय कोणीं सांगावा! वसूंप्रमाणें पराक्रमी असलेल्या शंतनुराजाचा पुत्रहि वसुतुल्यच वीर्यवान् होता. तो वसूंच्या अंशापासून

जन्म पावला व शेवटीं वसूंनाच प्राप्त झाला आहे. आतां या सर्व सेनेला धन, पुत्र, पृथ्वी व सर्व कौरव यांच्यासाठीं शोक करूं दे.

( ३ ) संजय—हे राजा, याप्रमाणें कर्ण महाप्रभावशाली वरद भीष्म पडला असतां आणि भारतांची सेना पराभूत झाली असतां अतिशय उद्विग्न झाला व अश्रु ढाळीत निश्वास टाकूं लागला. तेव्हां राधेयाचें हें वचन ऐकून तुझे पुत्र व सर्व सैनिक यांनीं परस्परांकडे पाहून आक्रोश केला. आर्त होऊन पुनः पुनः हुंदके देऊन अश्रु ढाळले. पण ते सर्व पार्थिव सैन्यसागरांत प्रवेश करून पुनः महायुद्धास प्रवृत्त होत आहेत, हें पाहून कर्ण त्या सर्व रथश्रेष्ठांना हर्ष देणारें असें वचन बोलला—'हें जगत् अनित्य आहे व मृत्यूकडे धांव घेत आहे. त्यामुळें या लोकीं कांहींहि स्थिर नाहीं, असेंच मला वाटतें. हे कौरवहो, तुमच्यासारखे वीर समीप असतां पर्वताप्रमाणें दृढ असलेला तो कुरुपुंगव कसा बरें पतन पावला ! सायंकालीं सूर्य जसा भूतलावर उतरावा, त्याप्रमाणें महारथ शान्तनव हत होऊन भूमीवर पडला. त्यावेळीं पर्वतालाहि उडवून देणाऱ्या प्रचंड वायुवेगाला वृक्ष जसे सहन करूं शकत नाहींत, त्याप्रमाणें धनंजयाचें शौर्य पार्थिवांना असह्य झालें. वास्तव शत्रूनें सेनापतीचा वध करून निरुत्साह व अनाथ केलेल्या कौरव-सेनेचें संरक्षण त्या महात्म्यानें जसें केलें होतें, तसेंच मलाहि केलें पाहिजे.

अशा प्रकारचा माझ्यावरील भार ओळखून, त्याचप्रमाणें हें जगत् अनित्य आहे, हें जाणून व रणधुरंधर भीष्माचाहि वध झाला, हें लक्षांत आणून मी इतका भ्रांत झालों आहे कीं, मला शत्रूला भयभीत कसें करतां येईल ! ( तें माझें मलाच कळत नाहीं. ) तथापि मी रणांगणांत प्रवेश करून पांडवांना यमसदनीं पाठवीन व या जगांत महद्यश तरी मिळवीन, किंवा शत्रूकडून हत होऊन भूमीवर शयन तरी करीन.

युधिष्ठिर धृति, मति, सत्य व पराक्रम यांनीं युक्त आहे. वृकोदराचा पराक्रम शतगजांच्या तुल्य आहे. अर्जुन तर साक्षात् इंद्रात्मजच असून तरुण आहे. त्याच्या सैन्यास जिंकणें देवांनाहि दुष्कर आहे. नकुल-सहदेव रणांगणांत यमासारखेच संहार करीत असतात. जेथें सात्यकि व देवकीनंदन स्थित आहेत, त्या सैन्यांतून कोणीहि दुर्बल मनुष्य जिवंत परत येणें शक्य नाहीं. मृत्युमुखांतून जसा कोणताहि प्राणी परत येत नाहीं, तसा पांडवसैन्यांतून शत्रूचा सामान्य योद्धा जिवंत सुटत नाहीं.

तथापि मी दुर्बल नाहीं. तपानेंच तपाला जिंकतां येतें. त्याचप्रमाणें बुद्धिवानांकडून सैन्यानेंच महत्सैन्याचा पराभव केला जातो. याच न्यायानें शत्रूचें निवारण करण्याविषयीं माझा दृढ निश्चय आहे. स्वसंरक्षण करण्यांत माझें मन पर्वताप्रमाणें अचल स्थित आहे. यास्तव शत्रुसैन्याला भग्न करून मी आज त्यांस जिंकीन.

मी जर याप्रमाणें न वागलों, तर मला मित्रद्रोहाचें पातक लागेल. सैन्याचा पराभव होत असतांहि जो त्याला जाऊन मिळतो तोच खरा मित्र होय. यास्तव मी आज सत्पुरुषाला उचित असेंच श्रेष्ठ कर्म करणार आहें. मी प्राणत्याग करून भीष्माला अनुसरेन. एक तर मी सर्व शत्रुसंघाचा संहार करीन, किंवा शत्रूकडून हत होऊन स्वर्गाला प्राप्त होईन. धार्तराष्ट्रांचा पराभव होऊन त्यांचे स्त्री-पुत्र 'हे कर्णा, आमचें रक्षण कर' असा आक्रोश करीत आहेत. अशा प्रसंगीं त्यांच्या रक्षणार्थ युद्ध करणें, हेंच माझें कर्तव्य आहे.

(४) आज मी दुर्योधनाच्या शत्रूंचा पराभव करीन. कौरवांच्या रक्षणार्थ व पांडवांच्या नाशार्थ मी या घोर युद्धांत स्वतःचे प्राणहि अर्पण करीन. या रणांत सर्व शत्रुसंघाचा वध करून मी धार्तराष्ट्राला राज्य अर्पण करीन. हे सूता, माझें रत्नजडित, सुवर्णाचें उज्ज्वल कवच घेऊन ये व तें विचित्र कवच माझ्या अंगावर चढीव. त्याचप्रमाणें ज्याची प्रभा सूर्यतुल्य आहे, असें माझें शिरस्त्राण आणि अग्नि व विषारी सर्प, यांच्या तुल्य असलेले माझे धनुष्यबाणहि घेऊन ये. शरांनीं पूर्ण भरलेले सोळा भाते तयार ठेव. तशींच दिव्य धनुष्यें, तरवारी, शक्ति, गदा व सुवर्णानें अलंकृत केलेला शंख घेऊन ये. ही सुवर्णाची रम्य शृंखला आणि जयाविषयीं प्रसिद्ध असलेला कमलचिन्हांकित ध्वज सज्ज कर. जिच्यामध्यें लाह्या गुंफल्या आहेत, अशी चित्र-विचित्र माला वस्त्रानें स्वच्छ करून घेऊन ये. अभ्रासारख्या शुभ्र व पुष्ट अशा शीघ्रगामी श्रेष्ठ अश्वांना मंत्रोदकानें स्नान घालून सुवर्णाचे अलंकार घाल व ज्याला सूर्य-चंद्रांसारखीं तेजस्वी रत्नें जडविलेलीं आहेत व युद्धाच्या सर्व साहित्यानें जो युक्त आहे, त्या माझ्या श्रेष्ठ रथाला शीघ्रगामी अश्व जोडून तो सत्वर घेऊन ये. युद्धोचित, वेगवान् व विचित्र अशीं अनेक धनुष्यें, शरयुक्त भाते, कवचें, धनुष्याच्या श्रेष्ठ दोऱ्या आणि इतरहि युद्धोपयोगी साहित्य घेऊन ये.

हे वीरहो, दह्यानें भरलेलीं काश्याचीं व सुवर्णाचीं पात्रें आणा. पुष्पमाला धारण करा. जयासाठीं भेरी, नगारे वाजवा. हे सूता, जेथें पांची पांडव स्थित आहेत, तेथें चल. मी आज रणामध्यें शत्रूंचा वध तरी करीन किंवा त्यांच्या हातून मृत्यु पावून भीष्माला अनुसरेन.

ज्या सैन्यांत भ्रात्यांसह सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिर, वासुदेव, सात्यकि व सृंजय स्थित आहेत, तें सैन्य सर्व पृथ्वीपतींना अजिंक्य आहे, असेंच मला वाटतें. तथापि त्या किरीटीचें सर्वहर यम जरी आज रणांत रक्षण करीत असला, तरीहि मी त्याला समरांत गांठून मृत्यूच्या स्वाधीन करीन. किंवा भीष्माच्या मार्गाला अनुसरून यमलोकीं जाईन. मी त्या शूरलोकाला प्राप्त झाल्यावांचून रहाणार नाहीं. जे कोणी मित्रद्रोही, दुर्बल, अभक्त किंवा पातकी असतील त्यांच्या साह्याची मला गरज नाहीं.

संजय—याप्रमाणें सज्ज केलेल्या व ध्वज-पताकांनीं शोभणाऱ्या श्रेष्ठ रथांत बसून कर्ण युद्धाला निघाला. त्यावेळीं देवगणांकडून पूजिल्या जाणाऱ्या इंद्राप्रमाणें कौरवांनीं त्या रथिश्रेष्ठाचा सत्कार केला. नंतर तो श्रेष्ठ धनुर्धर, जेथें भरतश्रेष्ठ भीष्माचें देहावसान झालें, तेथें आपल्या श्रेष्ठ रथांतून आला. जातिवंत अश्व जोडलेल्या त्या रथाचा निर्घोष मेघाप्रमाणें होत असून त्यांत बसलेला कर्ण सूर्याप्रमाणें शोभत होता. इंद्र जसा आपल्या विमानांत विराजमान् होतो, तसा अग्निवत् जाज्वल्य असलेला राधेय आपल्या अग्नीसारख्या देदीप्यमान शुभरथांत स्थित झाला. ७. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ शरतल्पावर पडलेल्या भीष्माचें वर्णन. २ कर्ण-भीष्मसंवाद. ३ अर्जुनाच्या पराक्रमाचें वर्णन. ]

( १ ) संजय—हे राजन्, सर्व क्षत्रियांचा अंत करण्यास समर्थ असलेला दिव्यास्त्रवेत्ता भीष्म सव्यसाचीकडून हत झाल्यावर शरतल्पावर पडला होता, तेव्हां महावातानें शोषण केलेल्या समुद्राप्रमाणें तो अमित पराक्रमी महात्मा कृश होऊन पडला आहे, हें पाहून तुझ्या पुत्रांची जयाशा क्षय पावली. त्यांचा उत्साह व शांति नष्ट झाली. अपार सागरांत सांपडलेल्या माणसांस द्वीपाचा जसा आधार वाटतो, तसा भीष्म संकटार्णवांत सांपडलेल्या तुझ्या

पुत्रांचा आधारस्तंभच होता. त्यामुळें त्या शूराचें पतन होतांच कौरवांच्या शरीराचें रक्षण करणारें कवचच भग्न झालें, असें ते समजले. शरसमुदायांनीं परिवेष्टित झालेला भीष्म यमुनेच्या प्रवाहांत सांपडल्याप्रमाणें किंवा महेंद्रानें भूमीवर पाडविलेल्या मैनाकपर्वताप्रमाणें भासला. तो नरश्रेष्ठ नभोमंडलापासून च्युत होऊन धरणीवर पडलेल्या आदित्याप्रमाणें शोभला. अथवा पूर्वी वृत्रासुरानें जिंकलेला अचिंत्य शतक्रतुच येथें पडला आहे कीं काय, असा भास झाला.

( २ ) हे महाराज, अशाप्रकारें सर्व सैन्यांत श्रेष्ठ व धनुर्धरांत वरिष्ठ असलेला पितामह पतन पावला असतां सर्व सैन्य मोहित झालें. अर्जुनाच्या शरांनीं व्याप्त झालेला शांतनव शरतल्पाच्या वीरोचित शयनावर पडलेला पाहून कर्ण अतिशय व्यथित झाला. याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. कंठ दाटून येऊन शब्दहि उमटेनासा झाला. तो रथांतून खालीं उतरला. त्यानें हात जोडले व भीष्माला अभिवादन करून, असें वचन बोलला—" हे भारता, मी कर्ण आलों आहें. आपलें कल्याण असो. माझ्याशीं पुण्यप्रद व क्षेमकर वाणीनें दोन शब्द बोला व कृपादृष्टीनें मजवर अनुग्रह करा. हे पितामह, आपण धर्मपरायण व वृद्ध असूनहि ज्याअर्थीं आज येथें भूमीवर शयन करीत अहां, त्याअर्थीं यालोकीं सद्वर्तनाचें फल मिळत नाहीं, असेंच म्हणावें लागतें. हे कुरुश्रेष्ठा, या कौरवसेनेंत धनसंचय, योग्य मन्त्र ( सल्ला मसलत ), व्यूहरचना व शस्त्रप्रहार यांत आपल्या तुल्य एकहि वीर मला आढळत नाहीं. त्याचप्रमाणें कौरवांचें या महद्भयापासून रक्षण करील, असा एकहि बुद्धिमान् मनुष्य मला दिसत नाहीं. अशा वेळीं हे पितामह, शत्रूंच्या विपुल योद्धयांचा वध करून आपण पितृलोकीं जात अहां !

( ३ ) क्रुद्ध होऊन मृगक्षय करणाऱ्या व्याघ्रांप्रमाणें आजपासून पांडव कुरूंचा क्षय करतील. असुरांना त्रस्त करणाऱ्या वज्रपाणी इंद्राच्या वज्रघोषाप्रमाणें आज सव्यसाचीच्या गांडीवाचा घोष कौरवांना त्रस्त करील. गांडीव धनुष्यापासून सुटलेले शर पार्थिवांना व सर्व कुरूंना जर्जर करतील. हे वीरा, प्रदीप्त अग्नीच्या महाज्वाला जशा वृक्षांना दग्ध करितात, तसे किरीटीचे बाण धार्तराष्ट्रांना दग्ध करतील. अग्नि व वायु एकत्र होऊन वनांत ज्या ज्या दिशेंत पसरतात त्या त्या दिशेंतील असंख्य वृक्ष, तृण, व वेली या सर्वांचें

जसें भस्म करितात त्याचप्रमाणें या रणांगणांत अर्जुन प्रदीप्त अग्नि असून श्रीकृष्ण वायु आहे; ते कौरवांना भस्मसात् करतील; यांत संशय नाहीं.

पांचजन्याचा नाद व गांडीवाचा टणत्कार कानीं पडतांच सर्व सैन्यें भयभीत होतील. हे वीरा, पार्थाच्या रथावरील कपिध्वजाचा प्रचंड भुभूत्कार सहन करण्यास आपणावांचून कोणताहि पार्थिव समर्थ नाहीं. अर्जुनाशीं युद्ध करण्यास आपणावांचून कोणता नृपति समर्थ आहे ! विद्वानांनीं अर्जुनाच्या अलौकिक कर्मांची प्रशंसा केलेली आहे. त्या वीरानें निवातकवचादि अमानुषांशीं व महात्म्या त्र्यंबकाशींहि संग्राम केलेला आहे आणि त्यानें अजितेंद्रिय लोकांस दुष्प्राप्य असे वरहि महेंद्रापासून मिळविले आहेत. त्यामुळें आपण त्याला जिंकूं शकलां नाहीं. पण आपलाहि पराक्रम कांहीं सामान्य नाहीं. देव-दानवांचा दर्प हरण करून सर्व क्षत्रियांचा अंत करणारा जो घोर परशुराम, त्यालाहि आपण पूर्वी रणांत जिंकलें होतें. ( पण पार्थाचा पराभव करूं शकलां नाहीं. ) तेव्हां अशा धनुर्धर पार्थाला जिंकण्यास कोण समर्थ आहे ! तो कौंतेय युद्धनिपुण, सर्पाप्रमाणें घोर व दृष्टिव्यामोह पाडणारा आहे, तथापि आपली अनुमति मिळाली असतां मी क्रुद्ध होऊन अस्त्रबलानें त्याचाहि वध करण्यास समर्थ होईन.” ७. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ भीष्मानें कर्णाला प्रशंसापूर्वक दिलेली युद्धाची अनुज्ञा. २ कर्णाचें कौरवसेनेंत गमन. ]

( १ ) संजय—याप्रमाणें विलाप व वल्गना करणाऱ्या कर्णाला कुरुवृद्ध पितामह हृष्ट चित्तानें असें देशकालोचित वचन बोलला—“ हे कर्णा, नद्यांना जसा समुद्र, नक्षत्रांना जसा भास्कर, सज्जनांना जसें सत्य, बीजांना जशी पृथ्वी व प्राणिमात्रास जसा पर्जन्य आश्रयभूत आहे, तसाच तूं आपल्या सुहृदांचा आधार हो. देव जसे इंद्राच्या आश्रयावर रहातात, तसे दुर्योधनादि तुझे बांधव तुझ्या आधारानें जिवंत राहोत. तूं शत्रूची मानहानि करणारा व मित्राचा आनंद वाढविणारा हो. देवांचा आधार असलेल्या विष्णूप्रमाणें तूं कौरवांची गति हो.

हे कर्णा, धार्तराष्ट्रांना जय मिळवून देण्याच्या इच्छेनें तूं स्वतःच्या बाहु-बलाचा आश्रय करून पूर्वी राजपुराला गेलास व कांबोजांना जिंकलेंस. गिरि-व्रजाला जाऊन नग्नजितप्रमुख नृपाल आणि अंबष्ठ, विदेह व गान्धार यांना जिंकून आणलेंस. हिमालयाच्या दुर्गम प्रदेशांत रहाणाऱ्या किरातांनाहि तूं दुर्योधनाच्या वश केलें आहेस. त्याचप्रमाणें उत्कल, मेकल, पौंड्र, कलिंग, आन्ध्र, निषाद, त्रिगर्त व बाल्हीक यांना तूं दुर्योधनाच्या हितेच्छेनें निरनिराळ्या संग्रामांत जिंकलें आहेस. हे वीरा, आणखीहि अनेक बलाढ्य योद्ध्यांना तूं पराजित केलें आहेस.

बा कर्णा, यास्तव दुर्योधन जसा ज्ञातिकुलबांधवांसह कौरवांचा आधार आहे, त्याचप्रमाणें तूंहि सर्व कौरवांची गति हो. मी तुला शुभाशीर्वाद देतों. जा, शत्रूंशीं युद्ध कर. रणांगणांत कुरूंचें नियंत्रण करून दुर्योधनाला जय मिळवून दे. बाबारे, दुर्योधनाप्रमाणें तूंहि आम्हांला पौत्रवत्च आहेस. त्याच-प्रमाणें धार्तराष्ट्रासारखेच तुला आम्ही सर्व पूज्य आहोंत. या लोकांत स्त्री-पुत्रादि आप्तसंबंधापेक्षां सज्जनांचा स्नेहसंबंध अधिक श्रेष्ठ आहे. यास्तव तूं सत्यप्रतिज्ञ होऊन हें सैन्य आपलेंच आहे, असें मानून दुर्योधन व त्याचें सैन्य यांचें रक्षण कर.”

( २ ) हे महाराज, भीष्माचें हें अनुज्ञावचन ऐकून वैकर्तन कर्णानें त्याच्या चरणांना वंदन केलें व तो सर्व कौरवांच्या समीप आला. तेथें त्यानें कौरवांचें अप्रतिम व अलोट सैन्य अवलोकन केलें. त्या सैन्यांतील योद्ध्यांचीं वक्षःस्थलें विशाल असून त्यांचीं आयुधेंहि प्रचंड होतीं. कर्णाच्या आगमनानें त्या सैन्याचें बल वृद्धिंगत झालें. सर्व सैन्यांत अग्रेसर असलेला कर्ण येत असलेला पाहून दुर्योधनादि सर्व कौरव हृष्ट झाले. कर्ण युद्धार्थ सज्ज होऊन आलेला पहातांच त्या सैन्यांत फार मोठा कोलाहल झाला. कोणीं सिंहनाद केले, कोणीं दंड थोपटले, तर कित्येकांनीं धनुष्यांचे टणत्कार केले व त्या सर्वांनीं मिळून कर्णाचें अशा प्रकारें सत्कारपूर्वक स्वागत केलें. ७. १. ४.

## अध्याय ५ वा.

[ १ दुर्योधन-कर्णसंवाद. २ द्रोणाला सेनापति करण्याविषयीं कर्णाची सूचना.]

( १ ) संजय—हे महाराज, पुरुषव्याघ्र कर्णाला रथांत बसलेला पाहून हृष्ट झालेला दुर्योधन असें वचन बोलला—" हे कर्णा, तूं सैन्याचें रक्षण करूं लागलास म्हणजे मी सनाथच झालों, असें मानतों. याप्रसंगीं हितावह असें काय करणें शक्य आहे, याचा विचार कर. "

कर्ण—हे नृपाला, तूंच सर्वांत बुद्धिमान् आहेस, यास्तव या प्रसंगीं काय करावें तें तूंच आम्हांला सांग. शिवाय प्रमुख कार्यकर्त्याला जसें समयोचित कृत्य सुचतें, तसें तें इतरांना सुचत नाहीं. तुझें वचन ऐकण्यास आम्ही सर्व उत्सुक झालों आहों. तूं केव्हांहि अनुचित भाषण करणार नाहींस, अशी आमची दृढ मति आहे.

दुर्योधन—हे वैकर्तना, भीष्म सर्व योद्धयांचा अग्रणी असून पराक्रम, बुद्धि आणि वय यांत सेनेचा प्रणेता होण्यास योग्य होता. त्या महात्म्यानें सर्व सैन्याचें आधिपत्य स्वीकारून मोठ्या पराक्रमानें माझ्या शत्रूंचा संहार केला. युद्ध करून दहा दिवसपर्यंत कौरवसेनेचें रक्षण केलें. अशाप्रकारचें दुष्कर कर्म करून तो पितामह अस्तंगत झाला आहे. तेव्हां आतां त्याच्या नंतर सेनापति होण्यास कोण योग्य आहे, असें तुला वाटतें !

कर्णधारावांचून नौका जशी क्षणभरहि जलामध्यें स्थिर राहूं शकत नाहीं, तशीच सेनापतीवांचून सेना राहूं शकत नाहीं. कर्णधारावांचून जशी नाव, किंवा सारथिरहित जसा रथ, तसेंच सेनानायकावांचून सैन्य यथेष्ट संचार करूं लागतें. किंवा मार्ग-दर्शकावांचून जसे पांथस्थ संकटांत पडतात, तसें सेनापतीवांचून सैन्य सर्व प्रकारच्या अनर्थांत सांपडतें. यास्तव तूं भीष्माच्या मागून सेनापति होण्यास माझ्या सैन्यांतील सर्व श्रेष्ठ वीरांत कोण योग्य आहे, तें पहा. या संग्रामांत सेनापति होण्यास तुला जो कोणी योग्य वाटेल, त्याला आम्ही सर्व एकमतानें सेनाग्रणी करूं, यांत संशय नाहीं.

( २ ) कर्ण—हे राजा, येथें जमलेले हे सर्व श्रेष्ठ महात्मे सेनापति होण्यास पात्र आहेत, याविषयीं विचारच करावयास नको. कारण ते सर्व कुलीन व सुदृढ असून ज्ञान, बल, बुद्धि व पराक्रम यांनीं संपन्न आहेत. ते धीमान् वीर शास्त्रज्ञ व युद्धांतून कधींहि परत न फिरणारे आहेत. तथापि त्या सर्वांना

एकाच वेळीं नेता करतां येणें शक्य नाहीं. त्यांच्यापैकीं ज्याच्या अंगीं विशेष गुण असतील, असा एकच सेनाध्यक्ष नेमला पाहिजे. परंतु ते सर्व तुल्यबल असल्यामुळें त्यांतील एकाला जर तूं सेनापति केलास, तर इतर सर्व त्याच्याशीं स्पर्धा करूं लागतील व ते विमनस्क होऊन तुझ्या हितासाठीं झटणार नाहींत.

यास्तव हे दुर्योधना, हा द्रोण सर्व योद्ध्यांचा आचार्य असून तो वृद्ध व सर्वांत वडील आहे. त्या शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ द्रोणाला सेनापति करावें. शुक्र-बृहस्पतितुल्य असलेला द्रोण अजिंक्य आहे. तो सेनापति झाला असतां त्याच्यापुढें उभें रहाण्यास कोण समर्थ आहे! युद्धाला निघालेल्या द्रोणाच्या मागोमाग जाईल, असा एकहि वीर या सर्व नृपालांत नाहीं. राजा, हा तुझा गुरु सर्व शस्त्रधारण करणारांत श्रेष्ठ आहे. सर्व सेनापतींत वरिष्ठ आहे आणि सर्व बुद्धिमानांचा अग्रणी आहे. यास्तव हे दुर्योधना, पूर्वी असुरांना जिंकण्याची इच्छा करणाऱ्या देवांनीं कार्तिकेयाला जसें सेनापति केलें होतें, तसें तूं आज द्रोणाचार्यांस सेनापति कर. ७. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ सेनापति होण्याविषयीं दुर्योधनानें केलेली द्रोणाची प्रार्थना. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, कर्णाचें हें वचन ऐकून दुर्योधन सैन्याच्या मध्यभागीं असलेल्या द्रोणाजवळ जाऊन त्याला असें वचन बोलला—

दुर्योधन—हे आचार्य, आपण वर्णानें श्रेष्ठ अहां. आपलें कुल, विद्या, वय, बुद्धि, पराक्रम, दक्षता व नीति हीं सर्व उच्चप्रतीचीं आहेत. आपण अर्थ-शास्त्रज्ञ असून अजिंक्य अहांत. तप, कृतज्ञता व जय यांत आपण वरिष्ठ अहांत. आपल्या अंगीं हे सर्व गुण वास करीत असल्यामुळें या राजांचा आपल्यासारखा अन्य रक्षक नाहीं. यास्तव शतक्रतु जसें देवाचें रक्षण करितो, तसें आपण आमचें रक्षण करा. आपल्या नेतृत्वाखालीं शत्रूंचा पराजय करण्याची आमची इच्छा आहे. हे द्विजश्रेष्ठा, रुद्रांमध्यें जसा कापाली, वसूंमध्यें अग्नि, यक्षांमध्यें कुबेर, मरुतांमध्यें इंद्र, विप्रांमध्यें वसिष्ठ, तेजांमध्यें भास्कर, पितरांमध्यें यम, जलचरांत वरुण, नक्षत्रांत चंद्र आणि दैत्यांमध्यें जसा शुक्र श्रेष्ठ आहे, त्याप्रमाणें सर्व सेनाध्यक्षांत आपण वरिष्ठ अहां. यास्तव आपण आमचे सेनापति व्हा.

हे अनघा, कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य तुझ्या आज्ञेंत राहील. त्या सेनेचा शत्रूच्या व्यूहावर प्रतिव्यूह रचून, दानवांचा नाश करणाऱ्या इंद्राप्रमाणें आपण शत्रूंचा संहार करा. देवांच्या अग्रभागीं असणाऱ्या कार्तिकेयाप्रमाणें आपण आमचे अग्रेसर व्हा. हे नरश्रेष्ठा, ऋषभाला अनुसरणाऱ्या सुरभिपुत्रां-प्रमाणें आम्ही आपल्या मागोमाग येऊं. उग्रधन्वा अर्जुन आपलें धनुष्य सज्ज करून जरी उभा असला, तरी आपणांस अग्रभागीं पहातांच प्रहार करण्यास धजणार नाहीं. तस्मात् हे आचार्य, आपण जर आमचे सेनापति व्हाल, तर आम्ही युधिष्ठिराला त्याचे बांधव व अनुयायी यांसह युद्धांत जिंकूं.

संजय—याप्रमाणें दुर्योधनानें द्रोणाची प्रार्थना केली असतां सर्व नरा-धिपांनीं द्रोणाचार्यांचा जयघोष केला व तुझ्या पुत्राला संतुष्ट करीत फार मोठा सिंहनाद केला. तेव्हां महद्यशाची इच्छा करणारे सर्व सैनिकहि दुर्यो-धनाचें अनुकरण करूं लागले. याप्रमाणें कौरवांकडून सत्कार होत असतां द्रोणाचार्य दुर्योधनाला असें बोलला. ७. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ कौरवांचा सेनापति होण्याविषयीं द्रोणांची संमति. २ द्रोणाला सैनापत्या-भिषेक. ३ दुश्चिह्नांचें वर्णन. ४ युद्धारंभ. ]

( १ ) द्रोण—हे राजा, मी वेद, षडंगें आणि मानवी अर्थविद्या जाणतों. त्याचप्रमाणें पाशुपत व दुसरीं विविध अस्त्रें मला अवगत आहेत. जयाची इच्छा करणाऱ्या तुम्हीं ज्या ज्या गुणांचें वर्णन केलेंत, ते सर्व गुण माझ्यामध्यें वास करीत आहेत. ते व्यक्त करण्यासाठीं मी पांडवांबरोबर युद्ध करीन. तथापि, हे राजन्, रणांगणांत मी पार्षताचा वध कदापि करणार नाहीं. कारण विधात्यानें माझ्या वधासाठींच त्याला उत्पन्न केलें आहे. मी सर्व सोमकांचा त्यांच्या सर्व सैन्यासह नाश करीन. शिवाय पांडवहि माझ्याशीं कांहीं आनं-दानें युद्ध करणार नाहींत.

( २ ) संजय—याप्रमाणें द्रोणाची संमति मिळतांच तुझ्या पुत्रानें त्याला यथाशास्त्र सेनापति नेमिलें. पूर्वी इंद्रादि देवांनीं ज्याप्रमाणें कार्तिकेयाला विधियुक्त अभिषेक केला होता, त्याचप्रमाणें दुर्योधनादि नृपालांनीं द्रोणाचा-

यांस सेनापतित्वाचा अभिषेक केला. त्या वेळीं सर्वत्र वाद्यांचा प्रचंड घोष व शंखांचा ध्वनि ऐकूं येऊं लागला व द्रोणाला सेनापति केल्याचें ऐकून सर्वांना हर्ष झाला. कौरवपक्षांत पुण्याहघोष, स्वस्तिवाचन, सूत-मागधादिकांचे स्तुति-पाठ, गायनाचा मधुर ध्वनि, ब्राह्मणांचे जयाशीर्वाद आणि सौभाग्यवतींचीं नृत्यें इत्यादि विविध प्रकारच्या मंगल कृत्यांनीं द्रोणाचा सत्कार करण्यांत आला. तेव्हां पांडवांचा पराभव झाला, असेंच कौरवांना भासलें.

हे धृतराष्ट्रा, याप्रमाणें सेनापतीचें स्थान प्राप्त झालें असतां भारद्वाज द्रोणानें सैन्याचा व्यूह रचिला व तो तुझ्या पुत्रांसह युद्धार्थ निघाला. त्यावेळीं सिंधुराज, कलिंग व तुझा पुत्र विकर्ण हे कवचें चढवून सज्ज झाले व द्रोणाच्या उजव्या बाजूस उभे राहिले. श्रेष्ठ अश्वसादींना व गांधार देशांतील प्रास-योद्ध्यांना बरोबर घेऊन शकुनीनें सैन्याचा पृष्ठभाग संभाळला. कृपाचार्य, कृतवर्मा, चित्रसेन, विविंशति व तुझे दुःशासनादि पुत्र यांनीं डाव्या बाजूचें रक्षण केलें. सर्वांच्या शेवटीं कांबोज, सुदक्षिण शक आणि यवन वेगवान् अश्वांवर आरूढ होऊन चालले होते. कर्ण व दुर्योधन सर्वांच्या अग्रभागीं होते. त्यांच्यामागें मद्र, त्रिगर्त, अंबष्ठ, पश्चिम व उत्तर दिशांतील मालव, शिबि, शूरसेन, मलद, शूद्र, सौवीर, कितव, पश्चिम व दक्षिण दिशांतील अन्य भूपति आणि तुझे पुत्र हे सर्व आपापल्या सैन्यांना प्रोत्साहन देत चालले होते.

वैकर्तन कर्ण सर्व सैन्याला प्रोत्साहन देत सर्व योद्ध्यांच्या पुढें चालला होता. गजशृंखलेच्या चिह्नानें शोभणारा त्याचा देदीप्यमान ध्वज सूर्याप्रमाणें प्रकाशत होता. सर्व योद्धे कर्णाला पहातांच भीष्मपतनाचें संकट विसरले, कौरवांसह सर्व राजे शोकरहित झाले व हृष्ट झालेले ते अनेक योद्धे अशा वल्गना करूं लागले—

"अहो, या कर्णाला रणांगणांत पाहिल्यावर पांडव युद्धांत उभेच राहूं शकणार नाहींत. हा कर्ण इंद्रासह देवांनाहि जिंकण्यास समर्थ आहे, मग पराक्रमरहित व बलहीन अशा पांडवांची काय कथा! खरोखर भीष्मानें या पार्थांचें अनेकप्रकारें रणांत रक्षण केलें. (त्यामुळेंच ते आतांपर्यंत जिवंत राहिले.) परंतु आतां मात्र कर्ण युद्धामध्यें तीक्ष्णशरांनीं त्यांचा संहार करील."

ते हृष्ट झालेले नृपति कर्णाची प्रशंसा व सत्कार करीत परस्परांशीं याप्रमाणें संभाषण करीत निघाले. द्रोणानें आमच्या सैन्याचा शकटव्यूह रचिला आणि महात्म्या धर्मराजानें पांडवसेनेचा क्रौंचव्यूह रचिला होता.

हे राजन्, पांडवांच्या व्यूहाच्या अग्रभागीं सर्व सैन्याला भूषणावह असलेला वासुदेव आणि धनुर्धरांतील श्रेष्ठ अर्जुन आपला कपिध्वज उभारून स्थित होते. महात्म्या पार्थाचा तो महातेजस्वी ध्वज पांडवांच्या सैन्याला प्रकाशित करीत होता. प्रलयकालीं पृथ्वीला प्रज्वलित करणारा सूर्य जसा प्रदीप्त होतो, तसा अर्जुनाचा तो देदीप्यमान ध्वज दिसत होता.

हे प्रभो, सर्व योद्ध्यांत अर्जुन श्रेष्ठ, सर्व धनुष्यांत गांडीव वरिष्ठ, सर्व भूतांत वासुदेव श्रेष्ठ व चक्रांमध्यें सुदर्शन उत्कृष्ट आयुध आहे. या चार तेजांना वाहून नेणारा श्वेताश्वयुक्त रथ उगारलेल्या कालदंडाप्रमाणें, शत्रुसैन्याच्या अग्रभागीं स्थित होता. हे राजा, कौरवांच्या अग्रभागीं कर्ण व पांडवांच्या अग्रभागीं पार्थ, असे ते दोघे महात्मे दोन सैन्यांच्या प्रमुखस्थानीं उभे होते. ते दोघेहि क्रुद्ध होऊन परस्परांच्या वधाची इच्छा करणारे असून जयाभिकांक्षेनें युक्त ते समरामध्यें परस्परांकडे पहात उभे होते.

( ३ ) त्यानंतर महारथ भारद्वाज रणक्षेत्राकडे वेगानें निघाला असतां घोर आर्तस्वर उठला. त्यानें भूमि कंपित झाली. भयंकर वायु वाहूं लागले. त्यांनीं उडालेल्या धूलीनें सूर्यासह अंतरिक्ष झांकून गेलें. त्यांतून पडणाऱ्या सूर्यकिरणाच्या प्रकाशानें तर तें धुळीचें आवरण रेशमी वस्त्रांच्या राशीप्रमाणें भासलें. अंतरिक्षांत अभ्रें नसतांहि मांस, अस्थि, रुधिर यांची वृष्टि होऊं लागली. सहस्रावधि गृध्र, श्येन, बक, कङ्क व वायस यांचा समुदाय सेनेच्या भोंवतीं फिरूं लागला. कोल्हे दारुण शब्द करूं लागले आणि रक्त व मांस यांच्या आशेनें तुझ्या सैन्याला डावीकडून प्रदक्षिणा घालूं लागले. इतक्यांत दारुण शब्द झाला व एक प्रदीप्त कंपयुक्त उल्का रणांगणांत येऊन पडली. तिच्या पुच्छानें सर्व रणांगण व्यापून गेलें. विद्युल्लता चमकल्या व मेघगर्जना होऊं लागली. सूर्याभोंवतीं खळें पडलें. याप्रमाणें कौरवांचा सेनापति निघाला असतां वीरांच्या जीविताचा क्षय सुचविणारे हे व असेच आणखींहि उत्पात झाले.

( ४ ) त्यानंतर परस्परांच्या वधाची इच्छा करणाऱ्या कौरव-पांडवांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. उभय सैन्यांच्या कोलाहलानें सर्व जगत् भरून गेलें. दोन्ही

पक्षांतील वीर जयाकांक्षेनें एकमेकांस जिंकण्याची इच्छा करीत तीक्ष्ण शस्त्रांचे प्रहार करीत होते. द्रोणाचार्यांनें मोठ्या वेगानें पांडवांच्या त्या प्रचंड सेनेला तीक्ष्ण शरांनीं आच्छादित केलें.

अशाप्रकारें द्रोण पुढें सरसावलेला पहातांच सृंजयांसह पांडवांनीं पृथक् पृथक् शरवृष्टि करून त्याचें स्वागत केलें. तथापि द्रोणानें त्या सैन्यावर बाणांचा वर्षाव करून, वायूनें उडवून दिलेल्या मेघांप्रमाणें पांडवांच्या त्या महाचमूला विशीर्ण केलें. याप्रमाणें भारद्वाजानें दिव्यास्त्रांचा प्रयोग करून सृंजय-पांडवांना जर्जर केलें. दानवांचा संहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें द्रोणाचार्यांनें पांडव-सैन्याचा संहार चालविला. तें पाहून धृष्टद्युम्नादि पांचालहि भयकंपित झाले. परंतु धृष्टद्युम्नहि दिव्यास्त्रवेत्ता व शूर होता. त्यानें शरवर्षाव करून द्रोणाच्या सेनेचा अनेकदां भेद केला. आपल्या बाणवृष्टीनें द्रोणाच्या बाणांचें निवारण केलें व कौरवांचा संहार चालविला.

तेव्हां द्रोणाचार्यांनें आपल्या सैन्याचें नियमन करून त्यास धृष्टद्युम्नावर चाल करण्यास उद्युक्त केलें. द्रोणाच्या शरजालानें पांडव व सृंजय कंपित झाले व सिंहाला भिऊन पळणाऱ्या इतर वन्य पशूंप्रमाणें ते द्रोणाच्या भीतीनें पुनः पुनः दूर जाऊं लागले. तो महाबलाढ्य द्रोणाचार्य रणांगणांत अतिशय वेगानें संचार करीत असतां अलातचक्राप्रमाणें सर्वत्र भासूं लागला. त्याचा सशास्त्र तयार केलेला रथ गंधर्वनगरीप्रमाणें शोभत होता. त्यावरील पताका वायूनें हलत होत्या व ध्वज स्फटिकाप्रमाणें निर्मल होता. तो रथ पाहून योद्ध्यांना आनंद वाटत होता. त्याचे अश्व खिखाळत असून त्याला पाहून शत्रूंच्या मनांत भय उत्पन्न होत होतें. अशा प्रकारच्या त्या श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन द्रोणाचार्यांनें पांडवांच्या सेनेचा संहार चालविला. ७. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ द्रोणाचें पांडवांशीं युद्ध. २ धृष्टद्युम्नानें केलेला द्रोणाचा वध. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, याप्रमाणें द्रोणाचार्यांनें अश्व, गज, रथ व सारथि यांचा ध्वंस चालविलेला पाहून पांडव अतिशय व्यथित झाले. त्यांना आचार्यांचें निवारण करतां येईना. त्यावेळीं युधिष्ठिरानें धृष्टद्युम्न व अर्जुन यांना असें सांगितलें कीं, तुम्ही दक्षतेनें द्रोणाचें निवारण करा. धर्म-

राजाची ही आज्ञा ऐकतांच पार्षत धृष्टद्युम्न व पार्थ आपल्या अनुयायांसह युद्धाला सज्ज झाले. तेव्हां इतरहि सर्व महारथ पुढें सरसावले. केकय, भीमसेन, सौभद्र, घटोत्कच, युधिष्ठिर, नकुल-सहदेव, मत्स्य, द्रौपदीचे पांच पुत्र, द्रुपदात्मज, धृष्टकेतु, सात्यकि, चेकितान, युयुत्सु इत्यादि पांडवांच्या अनुयायांनीं आपापले कुल व पराक्रम, यांस अनुसरून अनेक प्रकारचीं कर्में केलीं.

याप्रमाणें पांडव स्वसैन्याचें संरक्षण करीत आहेत, असें पाहून द्रोण क्रोधानें नेत्र विस्फारून त्यांच्याकडे पाहूं लागला, तो अत्यंत क्षुब्ध झाला आणि त्या समरदुर्जय द्रोणानें रथांत बसल्या-बसल्याच, मेघांस उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें पांडवसेनेला उधळून लावलें. तो आचार्य वृद्ध असूनहि उन्मत्त तरुणाप्रमाणें रथ, अश्व, नर व गज, यांवर प्रहार करीत इतस्ततः संचार करूं लागला. त्यावेळीं त्याच्या रथाचे रक्तवर्ण जातिवंत अश्व रक्तानें माखले होते, तरी ते वायुवेगानें धांवत होते.

त्यावेळीं युद्धदीक्षा घेतलेला द्रोणाचार्य क्रुद्ध झालेल्या कृतान्ताप्रमाणें दिसत होता. त्याला पहातांच पांडवांचे योद्धे पळत सुटले. त्यांतील कित्येक मार्गे वळून पहात होते, कांहीं परत फिरत होते, तर कांहीं स्वस्थ उभे होते. त्यावेळीं होणारा त्या सैनिकांचा दारुण शब्द ऐकून शूरांना हर्ष झाला व भीरु भयभीत झाले. त्यांच्या गर्जनेनें सर्व अंतरिक्ष दुमदुमून गेलें.

त्यानंतर द्रोणाचार्यांनें सर्व योद्धयांना आपलें नांव ऐकवीत अधिकच उग्र स्वरूप धारण केलें व शत्रूंवर शरवृष्टि चालविली. त्या वृद्ध आचार्यांनें एखाद्या तरुणाप्रमाणें पांडवसैन्यांत संचार करून शत्रूंच्या योद्धयांचा कालवत् नाश आरंभिला व मोठ्यानें सिंहनाद केला.

द्रोणाची ती गर्जना व बाणांचा वेग पाहून रणांगणांतील योद्धे थंडीनें कुडकुडणाऱ्या गायीप्रमाणें थरथरां कापूं लागले. रथनेमींचा घोष व धनुष्याच्या दोरीचा टणत्कार यांचा तुमुल शब्द अंतरिक्षांत दुमदुमला. त्याच्या धनुष्यापासून सुटणारे सहस्रावधि बाण सर्व दिशांना व्यापून गज, अश्व, रथ व सेना यांच्यावर येऊन पडत होते. त्याच्या धनुष्यापासून सुटणाऱ्या महावेगवान् अस्त्रांतून प्रज्वलित अग्नि निर्माण होत होता. अशा त्या आचार्यांवर पांडवांसह पंचाल तुटून पडले. परंतु द्रोणानें त्या सर्वांस त्यांच्या गजाश्वादि सेने-

सह तत्काल यमसदनीं पाठवून दिलें आणि ती रणभूमि रक्ताच्या चिखलानें माखून टाकली.

दिव्य अस्त्रांनीं युक्त अशा शरांची वृष्टि होत असल्यामुळें सर्वतः बाणांचें जाळेंच पसरलेलें दिसूं लागलें. मेघांत संचार करणाऱ्या विजेप्रमाणें द्रोणाचार्यांचा ध्वज शत्रूंच्या रथाश्वांवर फडकतांना दिसूं लागला. नंतर धनुष्यबाण धारण केलेल्या द्रोणानें केकयांचे पांच प्रमुख भ्राते व पंचालराज यांना आपल्या शरांनीं मृत्युमुखीं पाठवून पांडवसेनेवर चाल केली. तेव्हां भीमसेन, धनंजय, सात्यकि, धृष्टद्युम्न, शैब्यात्मज, काशिराज आणि शिबि यांनीं द्रोणाला येत असलेलें पाहून त्याला शरांनीं झांकून टाकिलें.

तेव्हां द्रोणाच्या धनुष्यापासून सुटलेल्या शरांनीं त्यांच्या गज-अश्व-नरांच्या शरीरांचा भेद केला व रक्तानें माखलेल्या त्या सुवर्णपुंखयुक्त बाणांनीं पृथ्वींत प्रवेश केला. त्यावेळीं त्या शरांनीं विदीर्ण झालेले गज, अश्व व नर यांच्या देहांनीं व्याप्त झालेली ती रणभूमि प्रलयकालच्या मेघांनीं व्याप्त झालेल्या आकाशाप्रमाणें भासली.

हे राजा, द्रोणाचार्यानें तुझ्या पुत्रांच्या हितेच्छेनें सात्यकि, भीम व अर्जुन यांच्या सैन्याचा अधिपति, काशिराजासह सौभद्र व पांचाल आणि इतरहि दुसरे वीर यांचें समरांत मर्दन चालविलें. हे व असेच दुसरेहि अनेक पराक्रम करून द्रोणाचार्यानें, प्रलयकालीं सर्व लोकांस तप्त करून अस्त पावणाऱ्या सूर्याप्रमाणें स्वर्गलोकीं प्रयाण केलें.

( २ ) हे महाराज, याप्रमाणें द्रोणाचार्यानें पांडवांच्या अनेक वीरांचा वध केल्यावर धृष्टद्युम्नानें आचार्यांना युद्धांत पाडलें. युद्धांतून कधींहि परत न फिरणाऱ्या एक अक्षौहिणीपेक्षां अधिक वीरांचा संहार करून तो महात्मा स्वर्गस्थ झाला. हे राजा, पंचालांसह पांडवांनीं हें गुरुवधासारखें अतिशय क्रूर व अपवित्र कार्य केलें. द्रोणाचार्य पडला असतां अंतरिक्षांत भूतांच्या दुःखोद्गारांचा निनाद झाला. सर्वत्र धिःकार ऐकूं येऊं लागला. त्यानें आकाश, पृथ्वी व दिशा भरून गेल्या. देवता, पितर व पूर्वज खिन्न झाले आणि विजयी झालेले पांडव सिंहनाद करूं लागले. त्या जयघोषानें पृथ्वी कंपित झाली. ७. १. ८.

## अध्याय ९ वा.

[ १ द्रोणाचें निधन ऐकून धृतराष्ट्राचा विलाप. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, द्रोणाचार्य सर्व अस्त्रांत प्रवीण होता. तो महात्मा सर्व शस्त्रवेत्त्यांत श्रेष्ठ होता. असें असतां पांडव-सृंजयांनीं त्याचा वध कसा केला ? त्यावेळीं तो वीर काय करीत होता ? त्याचा रथ तर भग्न झाला नव्हता ना ? किंवा त्यावेळीं द्रोण देहभानावर नव्हता कीं काय, त्यामुळें तो मृत्युमुखीं पडला ! बा संजया, तो द्विजश्रेष्ठ क्षिप्रहस्तानें रुक्मपुंखयुक्त शरांची सतत वृष्टि करीत चित्रयुद्ध करीत असतां पार्षत त्या दुर्धर्ष शत्रूला कसा गत-प्राण करूं शकला ! द्रोणाचार्य अस्त्रयुद्धांत प्रवीण होता. तो दमनशील आणि दूरवर शरसंधान करणारा होता. अशा त्या दिव्यास्त्रवेत्त्या अच्युत महात्म्याचा पंचालपुत्रानें वध करावा ना ? ज्याअर्थीं रणामध्यें सज्ज होऊन दारुण कर्म करणाऱ्या भारद्वाजाचाहि वध झाला, त्याअर्थीं पुरुषार्थापेक्षां दैवच बलवत्तर आहे, असें मला वाटतें.

द्रोणाचार्य धनुर्धरांत श्रेष्ठ असून त्याला चारी अस्त्रें अवगत होतीं. अशा वीरालाहि महात्म्या पार्षतानें हत केल्याचें तूं सांगत आहेस. हे संजया, व्याघ्र-चर्म पांघरून सुवर्णाच्या रथावर आरूढ होऊन युद्ध करणारा तो आचार्य हत झाल्याचें ऐकून मी शोकाकुल कसा होत नाहीं ! परदुःखानें कोणीहि मरण पावत नसतें, हेंच खरें. नाहींतर द्रोणाचा वध झाल्याचें ऐकूनहि मी मंदमति कसा जिवंत राहिलों असतों ! खरोखर, दैवच श्रेष्ठ असून पुरुषार्थ व्यर्थ आहे, असेंच माझें दृढ मत होत चाललें आहे. द्रोणाचें निधन ऐकून जें माझें हृदय शतधा विदीर्ण होत नाहीं, तें खरोखर दृढ वज्राचेंच असलें पाहिजे.

ब्रह्मास्त्रें, दिव्यास्त्रें व धनुर्विद्या यांत प्राविण्य संपादन करण्यासाठीं ब्राह्मण आणि राजपुत्र ज्या श्रेष्ठ आचार्यांची उपासना करीत असत, त्या महात्म्याचें मृत्यूनें कसें बरें हरण केलें ! समुद्राचें शोषण अथवा मेरुपर्वताचें किंवा सूर्याचें पतन जसें असंभाव्य, तसेंच द्रोणाचें पतनहि मला अशक्य वाटतें. तो परंतप द्रोणाचार्य दुष्टांचा शास्ता व धार्मिकांचा त्राता होता. प्राणांचा त्याग करून-हि दीनांचें रक्षण करणारा होता. त्याच्या पराक्रमावरच माझ्या मंदबुद्धि पुत्रांची जयाशा होती. त्याची बुद्धि बृहस्पति व शुक्र यांच्या तुल्य होती. तो माझा द्रोणाचार्य कसा बरें हत झाला !

द्रोणाचार्यांचे रक्तवर्ण बलाढ्य अश्व सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषविलेले असत. ते वेगवान् अश्व रणांगणांत त्याचा रथ वायुवेगानें नेत असत. त्यामुळें तो रथ कोणत्याहि शस्त्राच्या आघातांत सांपडत नसे. अशाप्रकारचे ते सिंधुदेशांतील गतिमान् अश्व युद्धामध्यें विह्वल तर झाले नाहींत ना? युद्धांतील गजांचे चीत्कार, शंख-दुन्दुभींचा शब्द, शरवृष्टींचा निःस्वन, धनुष्याचा टणत्कार व शस्त्रप्रहारांचा खणखणाट यांनीं ते अश्व कधींहि भ्रांत न होतां शत्रूंस जिंकण्यास पुढें सरसावत असतां शरीरावर झालेल्या शस्त्रप्रहारांनीं ते कदापि विह्वल होत नसत. ते कधीं थकून धापा टाकीत नसत. अशा प्रकारचे ते शीघ्रगामी दान्त अश्व त्या संग्रामांत पराजित तर झाले नाहींत ना?

अरे, सुवर्णरथास जोडलेल्या त्या अश्वांचा द्रोणाबरोबरच अंत होण्यापूर्वी ते पांडवांच्या सैन्याचें उल्लंघन कसें करूं शकले नाहींत! त्या सत्यपराक्रमी भारद्वाजानें युद्धांत काय केलें? बा संजया, सर्व लोकांतील श्रेष्ठ धनुर्धर ज्याच्या विद्याबलावर जिवंत रहातात, त्या श्रेष्ठ द्रोणाचार्यानें युद्धांत कोणकोणता पराक्रम केला तें मला सांग. स्वर्गांतील इंद्राप्रमाणें या पृथ्वीतलावर द्रोणाचार्य धनुर्धरांत श्रेष्ठ व भयंकर पराक्रम करणारा होता. त्या उग्र कर्में करणाऱ्या वीराबरोबर कोण-कोणत्या रथिश्रेष्ठांनीं प्रतियुद्ध केलें!

खरोखर, रणामध्यें दिव्यास्त्रवेत्त्या महाबलाढ्य द्रोणाचा तो सुवर्णाचा रथ पाहूनच पांडवांनीं पलायन तर केलें नाहीं ना? किंवा सर्व सैन्य व अनुज यांच्यासह धर्मराजानें द्रोणाला सर्वतः परिवेष्टित केलें! पांचाल्य धृष्टद्युम्न तर त्याचा बंधनरज्जूच होता (म्ह० धृष्टद्युम्नाच्या मतानेंच युधिष्ठिर वागत होता.) पार्थानें इतर सर्व कुटिल योद्ध्यांचें निवारण केलें असेल आणि त्या दुष्ट पार्षतानें द्रोणाचार्यांवर चाल केली असेल. अर्जुनानें ज्याचें संरक्षण केलें आहे, अशा धृष्टद्युम्नावांचून द्रोणाचा वध करण्यास कोणी समर्थ आहे, असें मला वाटत नाहीं. मुंग्यांनीं सर्पाला जसें व्याकुल करून सोडावें, तसे केकय, चेदि, कारुष, मत्स्य व अन्य भूपाल यांनीं सर्वतः वेढून जर्जर केलेल्या द्रोणाचा त्या अधम पांचालानें वध केला असावा! त्याचा वध करणें अतिशय दुष्कर कर्म आहे.

अरे! अरे! चार सांगवेद व पांचवे इतिहासपुराणादि यांचें ज्यानें अध्ययन केलें होतें, नद्यांना आश्रयभूत असलेल्या सागराप्रमाणें जो ब्राह्मणांचा आधार

होता व जो परंतप ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोहोंत श्रेष्ठ होता, तो वृद्ध ब्राह्मण शस्त्रानें कसा वध पावला! पांडव वास्तविक क्लेश देण्यास पात्र नव्हते, तरीहि मीं त्यांस सदोदित क्लेश दिले. त्यावेळीं द्रोणाचार्य सर्वदा पांडवांशीं सहानुभूतीनें वागत असत. पांडुपुत्रांकडून त्यांच्या त्या अनुकंपेचें फल त्यांस अशा प्रकारें मिळावें ना! पृथ्वीतलावरील सर्व श्रेष्ठ धनुर्धर ज्याला अनुसरतात, त्या सत्यप्रतिज्ञ द्रोणाचार्यांचा वध पांडवांनीं राज्यलोभानें करावा ना!

प्रचंड 'तिमि-'मत्स्याचा क्षुद्र जलचरांनीं जसा वध करावा, तसा स्वर्गांतील शक्राप्रमाणें श्रेष्ठ असलेल्या द्रोणाचा पांडवांनीं वध केला. युद्धामध्यें द्रोण क्षिप्रहस्त, बलवान् व अचुक शरसंधान करणारा होता. विजयेच्छेनें त्याच्या संमुख गेलेला कोणीहि वीर जिवंत परत येत नसे. ब्राह्मणांचा वेदघोष व धनुर्धरांच्या धनुष्यांचा टणत्कार, हे दोन्ही शब्द त्या महात्म्याला तो जिवंत असेपर्यंत सोडून गेले नाहींत. त्या उदार, नम्र व अजिंक्य वीराचा पराक्रम सिंहासारखा होता. तो नरश्रेष्ठ हत झाल्याची वार्ता मला सहन होत नाहीं.

संजया, तो भारद्वाज दुर्धर्ष, बलाढ्य व यशस्वी होता त्याचा सर्व नरेंद्रांच्या समक्ष पार्षतानें वध केला तरी कसा! द्रोणाच्या समीप राहून त्याचें रक्षण करीत अग्रभागीं कोणीं युद्ध केलें? पृष्ठभागीं राहून दुर्गम गतीला कोण प्राप्त झाले? त्या महात्म्याच्या उजव्या व डाव्या रथचक्राचें कोणीं रक्षण केलें? युद्ध करणाऱ्या त्या वीराच्या पुढें कोण होते? जीवावर उदार होऊन मृत्युमुखीं कोण पडले? द्रोण युद्ध करीत असतां अतुल पराक्रम कोणीं गाजविला? हें सर्व मला कथन कर.

माझ्या पक्षांतील मंदमति क्षत्रिय द्रोणाला सोडून भयानें रणांगणांतून पळून तर गेले नाहींत ना? त्या आचार्यांचे रक्षक पळून गेल्यामुळें व कौरवांची सेना शून्य झाल्यामुळें तर शत्रूला त्याचा वध करण्याची संधि मिळाली नाहीं ना? द्रोण अतिशय शूर होता. तो वीर समरांत कधींहि शत्रूला पाठ दाखवून पलायन करणारा नव्हता. कशाहि प्रसंगीं तो भयभीत होऊन माघार घेणारा नव्हता, असें असतां त्याचा शत्रूकडून वध झाला तरी कसा? कशाहि आपत्तींत संकटांना तोंड देणें, हें आर्यांचें कर्तव्य आहे. तें त्याच्या ठिकाणीं प्रतिष्ठित असून तो यथाशक्ति पराक्रम करण्यास तत्पर असे. असें असतां त्याचा अंत व्हावा ना? संजया माझें मन अतिशय मोहित झालें आहे. तें शांत होईपर्यंत हा

वृत्तान्त कांहीं काल राहूं दे. माझ्या मनाला थोडी स्वस्थता आली म्हणजे मी तो तुला विचारीन. ७. १. ९.

## अध्याय १० वा.

[ १ धृतराष्ट्राची मूर्च्छा. २ संजयाला प्रश्न. सर्व पार्थिवांचें गुणवर्णन. ३ श्रीकृष्णाचें संकीर्तन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा पारिक्षिता, संजयाला असें बोलून धृतराष्ट्र हृदयांतील शोकानें अतिशय व्याकुल झाला. पुत्रांच्या जयाविषयीं निराश झालेल्या त्याला मूर्च्छा आली व तो भूमीवर पडला. तो महाराज मूर्च्छित होऊन पडलेला पहातांच अनेक परिचारिका त्याच्या समीप धांवत आल्या. त्यांनीं अत्यंत शीतल जलाचें त्याच्या मुखावर सिंचन केलें व त्या वाळ्याच्या सुगंधयुक्त पंख्यांनीं त्याला वारा घालूं लागल्या. राजाला निश्चेष्ट पडलेलें पाहून भरतस्त्रिया त्याच्या भोंवतीं जमल्या. त्यांनीं आपल्या हातांनीं हलकेंच राजाला सर्व भूमीवरून उठवून त्याच्या सिंहासनावर नेऊन ठेविलें. त्यावेळीं त्या श्रेष्ठ स्त्रियांचे कंठ सद्गदित झाले होते. धृतराष्ट्रराजा आपल्या आसनावर निजला असून त्या सर्व स्त्रिया त्याला वारा घालीत होत्या. तरीहि तो पार्थिव प्रबल मूर्च्छेमुळें निश्चेष्ट होऊनच पडला होता. कांहीं वेळानें तो महीपति हळुहळू सावध झाला, तथापि तो कांपत होता. नंतर त्यानें संजयाला पुनः असा प्रश्न केला.

( २ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, उदय पावलेल्या आदित्याप्रमाणें अंधकाराचा नाश करणारा अजातशत्रु युधिष्ठिर द्रोणाचार्यावर चालून येत आहे, असें पाहून त्याचें कोणीं निवारण केलें ! एखादा मत्त गज जसा अन्य यूथपतीस अजिंक्य असतो, क्रुद्ध झालेला तो वेगवान् गज हस्तिनीच्या अभिलाषानें प्रतिपक्षांवर जसा प्रसन्न वदनानें चालून जातो, त्याप्रमाणें युधिष्ठिर द्रोणावर चालून गेला असतां त्याचें निवारण कोणीं केलें ! त्या पांडववीरानें रणांगणांत असंख्य वीरांचा संहार केला असेल ! तो सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिर आपल्या घोर चक्षूंनीं दुर्योधनाचें समग्र सैन्य दग्ध करण्यास एकटा पुरेसा आहे. तो जितेंद्रिय, सर्वमान्य, विजयी धनुर्धर युद्धांतून कधींहि परत न फिरणारा आहे. त्याला पहातांच शत्रूंचे नेत्र दिपून जातात. अशा त्या

वीराचें निवारण कोणत्या शूरांनीं केलें? तो युधिष्ठिर अजिंक्य, धैर्यवान् व धुरंधर आहे. त्याच्यावर कौरवांच्या कोणत्या वीरांनीं चाल केली? तें मला सांग.

हे संजया, त्याचप्रमाणें भीमसेन सर्व वीरांत बलाढ्य आहे. त्याला दहा हजार हत्तींचें बल आहे. तो अतिशय उत्साही असून शत्रूचा निःपात करणारा आहे. त्या महत्कर्म करणाऱ्या भीमसेनाला पाहून तुम्हांला काय वाटलें? त्या पांडवाचें कोणत्या शूरांनीं निवारण केलें!

मेघाप्रमाणें गडगडाट करणाऱ्या रथांतून येणाऱ्या व पर्जन्याप्रमाणें शरवृष्टि करणाऱ्या बीभत्सूचें कोणीं निवारण केलें! तो पार्थ जलवृष्टि करणाऱ्या इंद्राप्रमाणें शरजाल सोडीत असतो. त्यावेळीं तुमुल अशनिपाताचाच भास होतो. त्याच्या तलाघातानें सर्व दिशा दुमदुमून जातात. त्या धनंजयाच्या धनुष्याची प्रभा विद्युल्लतेसारखी असून रथाचे समुदायांचा जणुंकाय मेघच होता. त्याच्या रथ-चक्रांचा निःस्वन मेघगर्जनेसारखा प्रचंड आहे. त्याच्या शरांचा शब्दहि अतिशय घोर आहे. त्या कौंतेयानें क्रोधानें जीमूताचाहि पराभव केलेला असून त्याचा वेग मनोवेगाहूनहि तीव्र आहे. (मनांत येतांच तो इष्टस्थलीं जाऊन पोंचतो. इतका तो वेगवान् आहे.) अशाप्रकारचा तो पृथापुत्र आपल्या मर्मभेदक शरांनीं दुर्योधनादि कौरवांवर शरवृष्टि करूं लागला असतां तुमच्या मनाची स्थिति काय झाली असेल! त्या कपिध्वज पार्थानें धनुष्याचा टणत्कार करतांच त्या शब्दानेंच भयभीत झालेलें तुमचें सैन्य नाश पावलें नाहीं ना!

मेघांना उडवून लावणाऱ्या वायूप्रमाणें अर्जुन आपल्या शरांनीं पार्थिवांना उधळून लावीत असतो, त्याच्या बाणवृष्टीनें तुमचे प्राण व्याकुल तर झाले नाहींत ना? संग्रामांत त्या पार्थापुढें उभें रहाण्यास कोण समर्थ आहे! अर्जुन सैन्याच्या अग्रभागीं स्थित असल्याचें दिसतांच शत्रुसैन्यें थरथरां कापूं लाग-तात. हे संजया, त्यावेळीं कोणते वीर द्रोणाचार्याला सोडून गेले नाहींत! कोणते क्षुद्र पुरुष रणांगणांतून पळून गेले आणि प्राणांवर उदार होऊन कोणत्या शूरांनीं मृत्युमुखांत प्रवेश केला!

माझ्या पुत्रांना त्याच्या श्वेताश्वांचा वेग व मेघगर्जनेसारखा गांडीवाचा टणत्कार सहन झाला नसेल. ज्या रथावर श्रीकृष्ण सारथि व धनंजय योद्धा आहे, त्या रथाला जिंकणें देवासुरांसहि अशक्य आहे, असें मला वाटतें.

संजया, पांडुपुत्र नकुल सुकुमार, तरुण, शूर, दर्शनीय, बुद्धिमान् व सत्यपराक्रमी आहे. तो केवल आपल्या गर्जनेनेंच सर्व सैनिकांना व्यथित करितो. तो माद्रीपुत्र द्रोणावर धांवून आला असतां त्याचें निवारण कोणीं केलें! सहदेव सर्पाप्रमाणें क्रुद्ध होऊन जेव्हां आला, तेव्हां कोणत्या शूरांनीं त्याचें निवारण केलें !

हे सूता, ज्यानें सौवीर राजाच्या प्रचंड सैन्याचा पराभव करून भोजराजकन्येस आपली महिषी केलें, त्या सात्यकीचें कोणीं निवारण केलें ! तो वीर केवल युद्धांतच नव्हे, तर सर्वप्रकारें श्रीकृष्णतुल्य आहे. तो अर्जुनापाशीं धनुर्विद्या शिकलेला असल्यामुळें श्रेष्ठ धनुर्धर आहे. तो सर्व वृष्णींमध्यें वरिष्ठ असून अस्त्रविद्या, पराक्रम व यश यांत प्रतिरामच आहे. ज्याप्रमाणें केशवामध्यें सर्व त्रैलोक्य प्रतिष्ठित आहे, त्याप्रमाणें सात्यकीच्या ठिकाणीं सत्य, धृति, शौर्य व ब्रह्मास्त्र हीं अधिष्ठित आहेत. देवांनाहि अजिंक्य असलेल्या त्या महात्म्याचें कोणीं निवारण केलें! सात्यकि सर्व पंचालांत उत्तम वीर असून सत्कुलांत उत्पन्न झाला आहे. त्यानें द्रोणावर चाल केली असतां कोणत्या वीरानें त्याचें निवारण केलें. धृष्टकेतूशीं कोणी युद्ध केलें ? शिखंडी स्त्री-पुरुषांचे गुणावगुण जाणण्यांत प्रवीण आहे. युद्धांत अजिंक्य असलेल्या देवव्रत भीष्माचेंहि त्यानें प्राणहरण केलें, त्या पांचालाचें कोणी निवारण केलें ? केतुमानाशीं कोणीं युद्ध केलें ? अभिमन्यु सर्व गुणांत धनंजयाहूनहि श्रेष्ठ आहे. त्याचा पराक्रम श्रीकृष्णतुल्य आहे. त्याचें तेज आदित्यासारखें असून तो बृहस्पतितुल्य बुद्धिमान् आहे. मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें तो नरव्याघ्र जेव्हां द्रोणाचार्यावर धांवून आला, तेव्हां तुमच्या मनाला काय वाटलें !

द्रौपदीचे पांच पुत्र आपली बालक्रीडा सोडून ब्रह्मचर्याचें पालन करीत भीष्मापाशीं बारा वर्षें अस्त्रविद्या शिकत होते. ते समुद्राला मिळणाऱ्या नद्यांप्रमाणें जेव्हां मोठ्या वेगानें द्रोणावर चालून आले, तेव्हां त्यांचें निवारण कोणीं केलें ? धृष्टद्युम्नाचे पुत्र क्षत्रंजय, क्षत्रदेव व क्षत्रवर्मा हे तिघेहि मानी व शूर आहेत. त्यांचें निवारण कोणीं केलें ? चेकितानाशीं कोणीं युद्ध केलें !

---

१ या सर्व वीरांच्या पूर्वपराक्रमाचीं वर्णनें मागें अनेकदां येऊन गेलीं आहेत. यास्तव त्यांच्या गुणवर्णनांचा येथें संक्षेप केला आहे.

युद्धामध्यें कलिंगराजकन्येचें हरण करून नेणाऱ्या वार्धक्षेमीचें कोणीं निवारण केलें !

पांडवांच्या विजयाची इच्छा करणारे केकयराजपुत्र सत्यपराक्रमी आहेत. त्यांचा वर्ण इंद्रगोप कीटकांप्रमाणें आरक्त असून त्यांचीं आयुधें, कवचें व ध्वज रक्तवर्णच आहेत. ते पांडवांचे मावसभाऊ अतिशय धार्मिक आहेत. त्यांचें निवारण कोणत्या कौरववीरांनीं केलें ! महाबलवान् युयुत्सु सत्यप्रतिज्ञ आहे, वारणावतांत त्याच्याशीं अनेक नृपालांनीं सहा महिनेपर्यंत निकराचें युद्ध केलें; पण तो पराभव पावला नाहीं. अशा त्या महाबलाढ्य वीराशीं कोणीं युद्ध केलें ! महाधनुर्धर धृष्टद्युम्न पांडवांचा मंत्री आहे. त्यानें काशिराजपुत्रास एकाच भल्लबाणानें रथावरून खालीं पाडविलें होतें. तो दुर्योधनाचा वैरी असून द्रोणवधासाठींच उत्पन्न झाला आहे. त्याचें निवारण कोणीं केलें !

अस्त्रवेत्ता शिखंडी द्रुपदाच्या मांडीवरच वाढला आहे. त्याचें इतर कोणी रक्षण करीत नसून तो स्वतःच शस्त्रानें स्वतःचें संरक्षण करीत असतो. त्या वीराला द्रोणाचार्यापासून कोणीं दूर सारलें ! औशीनराचा नातु शैब्य असाधारण योद्धा आहे. त्यानें आपल्या प्रचंड रथघोषानें या समग्र पृथ्वीला चर्मवत् व्यापून टाकिलें होतें. त्यानें आपल्या प्रजेचें पुत्रवत् पालन करून दहा अश्वमेध यज्ञ केले. इतरहि अनेक समृद्ध यज्ञ करून प्रत्येक यज्ञामध्यें असंख्य गायींचें दान दिलें. त्याचें तें महत्कृत्य पाहून 'असें दुष्कर कृत्य पूर्वी कोणीं केलें नाहीं व पुढें कोणी मानव करणार नाहीं.' असे देवांनींहि उद्गार काढिले. उशीनरपुत्र शैब्यासारखा मानव त्रिकालींहि सांपडणें शक्य नाहीं. तो शैब्यराज द्रोणावर धांवून आला असतां, त्याचें निवारण कोणीं केलें !

मत्स्याधिपति विराटराजाशीं कोणीं युद्ध केलें ! वृकोदरापासून ज्याचा जन्म झाला, त्या मायावी राक्षसाचें मला महद्भय वाटतें. पार्थाच्या जयाची इच्छा करणारा तो माझ्या पुत्रांचा कंटकच आहे. त्या महात्म्या घटोत्कचाचें द्रोणापासून कोणीं निवारण केलें ! संजया, हे व इतरहि अनेक वीर प्राणांवर उदार होऊन पांडवांसाठीं युद्ध करीत आहेत. असें असतां त्या पांडुपुत्रांना कोण अजिंक्य आहे ! ज्यांच्या हितासाठीं साक्षात् शार्ङ्गधन्वा वासुदेव झटत आहे, त्या पार्थांचा पराभव कसा होणार !

(२) बा संजया, श्रीकृष्ण सर्व लोकांचा गुरु, त्रैलोक्याचा नाथ, रणांगणांतील प्रभु व दिव्यदेह धारण करणारा आहे. तो दिव्यस्वरूपी नारायण साक्षात्

परमात्मा आहे. विद्वज्जन त्याच्या दिव्य कर्मांचें वर्णन करितात. मीहि स्वास्थ्यास स्थैर्य प्राप्त होण्यासाठीं त्या महात्म्याचें भक्तीनें संकीर्तन करितों. ७. १. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ धृतराष्ट्रानें केलेलें श्रीकृष्णाच्या सामर्थ्याचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, वासुदेवाचीं दिव्य कर्में मी तुला सांगतों, तीं ऐक. गोविंदानें जीं अलौकिक कर्में केलीं आहेत, तशीं अन्य कोणीहि पुरुष कदापि करूं शकणार नाहीं. तो महात्मा गोपकुलांत वाढत असतां त्याचें बाहुबल त्रैलोक्यांत प्रस्थापित झालें. उच्चैःश्रवाच्या तुल्य ज्याचें बल आहे, वायुवेगासारखी ज्याची गति आहे, अशा केशिदैत्याचा त्यानें वध केला. तो घोर कर्में करणारा दानव यमुनेच्या तीरावरील वनांत रहात होता. धेनूंचा मूर्तिमंत मृत्यूच असलेला तो राक्षस वृषभरूप धारण करून आला असतां या वासुदेवानें बाल्यावस्थेंतच आपल्या दोन हातांनीं त्याचा वध केला.

त्याचप्रमाणें त्या कमलनयनानें प्रलम्ब, नरक, जम्भ, पीट व अंतकतुल्य मुरु या दैत्यांचा संहार केला. महातेजस्वी कंसाचें जरासंध रक्षण करीत होता, तरीहि कृष्णानें केवल स्वपराक्रमानें अस्त्रांवांचूनच त्याचा सर्वगणांसह वध केला. रणविक्रान्त सुनामा समग्र अक्षौहिणीचा सेनापति असून तो कंसाचा मधला भ्राता होता. तथापि श्रीकृष्णानें एकट्या बलरामाचें साह्य घेऊन त्याला समरामध्यें ससैन्य दग्ध करून टाकलें.

दुर्वासमुनि इतका शीघ्रकोपी असतांहि श्रीकृष्णानें आपल्या पत्नीसह त्याची आराधना करून त्याच्याकडूनहि वर मिळविले. गांधारराजकन्येचा स्वयंवर चाललें असतां तेथें जमलेल्या सर्व नृपतींचा पराजय करून त्या कमल-नयनानें त्या राजकन्येला रथावर घालून आणलें. त्यावेळीं प्रतोदाचा स्पर्शहि सहन न करणाऱ्या सदश्वाप्रमाणें अपमान सहन न करणाऱ्या भूपालांनीं कृष्णाच्या रथाला वेढून टाकिलें असतां त्या शौरीनें आपल्या प्रतोदाच्या प्रहारानें त्यांना व्रणयुक्त केलें. महाबाहु जरासंध समग्र अक्षौहिणी सैन्याचा अधिपति असतांहि जनार्दनानें मोठ्या युक्तीनें भीमसेनाकडून त्याचा वध करविला.

पांडवांनीं केलेल्या राजसूय यज्ञप्रसंगीं अग्रपूजेच्या मानाविषयीं वाद उत्पन्न झाला असतां त्या माधवानें पशुप्रमाणें त्याचा वध केला. शाल्वानें संरक्षण केलेली 'सौभ-'नामक दैत्यनगरी आकाशांतून संचार करणारी होती. परंतु माधवानें समुद्राच्या कुशीचें विदारण करून ती नगरी खालीं पाडविली. त्या देवकीनंदनानें अंग, वंग, कलिंग, मागध, काशिकोसल, वात्स्य, गार्ग्य, करूष व पौण्ड्र यांना रणांत जिंकलें. त्या श्रीकृष्णानें आवन्त्य, दाक्षिणात्य, पार्वतीय, दाशेरक, काश्मीरक, औरसिक, पिशाच, समुद्गल, काम्बोज, वाटधान, चोल, पांड्य, त्रिगर्त, मालव, दुर्जय, दरद, विविध दिशांतून आलेले खश, शक, यवन व त्यांचे अनुयायी या सर्वांसहि पराभूत केलें आहे.

घोर मकर व इतर जलचर यांचें निवासस्थान असलेल्या महासागरांत वरुण तळाशीं लपून बसला होता, तेथें प्रवेश करून मधुसूदनानें संग्रामांत त्याचाहि पराभव केला. पातालवासी पंचजन दैत्याचा युद्धांत वध करून त्या हृषीकेशानें दिव्य पांचजन्य शंख प्राप्त करून घेतला. त्या महाबलाढ्य महात्म्यानें पार्थासह खांडववनांत अग्नीला संतुष्ट करून दुर्धर्ष असलेलें आग्नेयास्त्र मिळविलें.

त्या वीरानें गरुडावर आरूढ होऊन अमरावतीला त्रस्त करून महेंद्राच्या भवनांतून पारिजातकाचीं फुलें आणलीं. इंद्र त्याचा पराक्रम जाणून असल्यामुळें त्यानें तें सर्व सहन केलें. हे संजया, कृष्णानें ज्याला जिंकलें नाहीं, असा एकहि राजा आमच्या ऐकण्यांत नाहीं. श्रीकृष्णानें (द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं) माझ्या सभेंत जें महदाश्चर्य करून दाखविलें, तसें अद्भुत कर्म करण्यास त्या पुंडरीकाक्षावांचून अन्य कोण समर्थ आहे! बा संजया, मी दृष्टिहीन असतांहि भक्तीनें त्या ईश्वराचें तें दिव्य स्वरूप पाहून प्रसन्न झालों.

हे संजया, कृष्णाचें तें स्वरूप माझ्या दृष्टीपुढें अद्यापि साक्षात् दिसत आहे. तें मी कदापि विसरणें शक्य नाहीं. तो हृषीकेश सत्यपराक्रमी व महाप्राज्ञ आहे. त्याच्या पराक्रमाचा अन्त लागणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें त्या प्रभूच्या अगाध कर्मांचाहि थांग लागणें अशक्य आहे. त्या वासुदेवाप्रमाणेंच गद, सांब, प्रद्युम्न, विदूरथ, अगावह, अनिरुद्ध, चारुदेष्ण, सारण, उल्मुक, निशठ, झिल्ली, वीर्यशाली बभ्रु, पृथु, विपृथु, शमीक व अरिमेजय इत्यादि बलाढ्य वृष्णिवीरहि महात्म्या केशवाच्या बोलावण्यावरून पांडवांचें सैन्य

भूषित करतील. हे सर्व वीर समरांगणांत येऊन स्थित झाले असतां माझ्या सैनिकांच्या जीविताविषयीं मला तर संशयच वाटत आहे.

हलधर बलरामाला दहा हजार हत्तींचें बल आहे. त्याचा देह कैलास-शिखराप्रमाणें धिप्पाड आहे. तो वनमाली रामहि जेथें कृष्ण असेल तेथेंच जाईल. बा संजया, द्विज ज्या वासुदेवाला सर्व प्राण्यांचा पिता समजतात, तो जगन्नायकहि पांडवांकरितां युद्ध करील काय! जर कां तो हृषीकेश पांडवांच्या हितासाठीं युद्ध करणार असेल, तर कौरवांच्या पक्षांत त्याला कोणीहि प्रतियोद्धा मिळणें शक्य नाहीं. यदाकदाचित् कौरवांनीं पांडवांना जिंकलेंच, तर तो वार्ष्णेय पांडवांसाठीं आपलें निर्वाणीचें अस्त्र धारण करील आणि सर्व कौरवांसह नृपतींचा रणांत संहार करून ही समग्र पृथ्वी कुंतीला अर्पण करील.

बा संजया, ज्याचा सारथि हृषीकेश व योद्धा धनंजय आहे, त्या रथाला युद्धांत प्रतिरथ कोण मिळणार! मला तर कोणत्याच उपायानें कौरवांचा जय होईल, असें वाटत नाहीं. यास्तव बा सूता, हें युद्ध कसें प्रवृत्त झालें, तो सर्व वृत्तान्त मला कथन कर.

संजया, अर्जुन कृष्णाला प्राणाहूनहि प्रिय आहे व श्रीकृष्ण तर पार्थाचा आत्माच आहे. किरीटीचा विजय शाश्वत असून कृष्णाचें यश अढळ आहे. सर्व लोकांमध्यें बीभत्सु अजिंक्य आहे. केशवाच्या असंख्य गुणांचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यांतील कांहीं प्रमुख गुणांचाच मीं निर्देश केला. अरे अरे, हा दुर्योधन मोहानें मूढ झाला आहे, त्यामुळें तो केशवाची खरी योग्यता जाणीत नाहीं. खरोखर मृत्युपाशांत सांपडलेला तो दुर्मति दैवयोगानें मोहित झाला आहे. दाशार्ह कृष्ण आणि पांडुपुत्र अर्जुन हे दोघे नर-नारायणाख्य पूर्वदेव महात्मे आहेत, हें तो जाणत नाहीं. एकरूप असलेले ते दोघे द्विधा होऊन या भूलोकीं अवतरले आहेत. ते दोघे केवल मनःसंकल्पानेंच या सर्व सेनेचा नाश करण्यास समर्थ आहेत. तथापि मानव देह धारण केल्यामुळें त्यांची तसें करण्याची इच्छा नाहीं.

भीष्म-द्रोणांचा वध हा लोकांना मोहित करणारा युगाचा विपर्यास आहे. बाबारे, मृत्यूचें निवारण कशानेंहि करतां येत नाहीं. ब्रह्मचर्यानें तो टळत नाहीं. वेदाध्ययनानें मृत्यूच्या पार जातां येत नाहीं. यज्ञयागादि कोणतीहि क्रिया किंवा अस्त्रें यांनींहि मृत्यूचें उल्लंघन करतां येत नाहीं. भीष्म-द्रोणां-

सारखे लोकप्रसिद्ध, कृतास्त्र व युद्धदुर्मद वीरहि मृत्युमुखीं पडावे ना ? अरे अरे, त्या दोघां महात्म्यांचा वध झाल्याचें ऐकूनहि मी अद्यापि जिवंत तरी कसा राहिलों ! माझे प्राण कसे निघून गेले नाहींत !

युधिष्ठिराच्या ज्या वैभवाची आम्हीं पूर्वी असूया केली होती, त्या ऐश्वर्याचा तूंच उपभोग घे, अशी आम्ही आतां भीष्म-द्रोणांचा वध ऐकून त्याला अनुज्ञा देतों. माझ्यामुळें कुरूंचा असा क्षय व्हावा ना ! परिपक्व झालेल्या पर्णाला तृणहि वज्रतुल्य होत असतें. या पृथ्वीवरील अनंत ऐश्वर्य युधिष्ठिराला प्राप्त होणार, हें निर्विवाद आहे. त्या महात्म्याच्या कोपानेंच भीष्म-द्रोण पतन पावले. तो धर्मपुत्र स्वभावतःच धर्मनिष्ठ असून माझे पुत्र अधार्मिक आहेत. त्या सर्वांचा विनाश करणारा क्रूर काल आतां समीप आलेला आहे. त्याचें अतिक्रमण करतां येणें शक्य नाहीं. विचारी माणसें एक चिंतीत असतात आणि दैवानें त्याच्या उलट घडून येत असतें, यांत मला मुळींच संशय वाटत नाहीं. हें दारुण संकट ओढवलें आहे. तें टाळणें अशक्य आहे. त्याविषयीं आतां शोक करणें व्यर्थ आहे. यास्तव रणांगणांत काय घडलें ? द्रोणाचार्यांचा वध कसा झाला ! तो सर्व यथार्थ वृत्तान्त मला कथन कर. ७. १. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ संजयाचें उत्तर. २ युधिष्ठिराला जिवंत धरून आणण्याविषयीं दुर्योधनाची प्रार्थना. ३ द्रोणाची सप्रतिबंध प्रतिज्ञा. ]

( १ ) संजय—हे महाराज, ठीक आहे. पांडव-सृंजयांनीं चाल केली असतां द्रोणाचार्य कसा पतन पावला तें सर्व मीं प्रत्यक्ष जसें पाहिलें आहे तसेंच तुला निवेदन करितों. ऐक. महारथ भारद्वाजास सैनापत्याचा अभिषेक झाल्यानंतर तो वीर सर्व सैन्याच्या मध्यभागीं येऊन तुझ्या पुत्राला असें म्हणाला—

“हे राजन्, नरश्रेष्ठ भीष्म सर्व कौरवांतील सिंहच होता. तो पतन पावतांच त्याच्या जागीं तूं मला सेनापति केलें आहेस. आज त्याचें योग्य फल तुला मजकडून प्राप्त होईल. आज मीं तुझें कोणतें प्रिय करावें तें सांग. तुझी जी इच्छा असेल ती मी पूर्ण करीन. इवा तो वर माग.”

( २ ) द्रोणाचार्यांचें हें वचन ऐकून दुर्योधनानें कर्ण-दुःशासनादि मंत्र्यांबरोबर कांहीं संकेत करून दुर्धर्ष आचार्यास म्हटलें—“ हे आचार्य, तूं जर

मला वरच देणार असशील, तर युधिष्ठिराला जिवंत धरून माझ्यासमीप आणावें, हा वर मी तुजपाशीं मागत आहें."

( ३ ) तुझ्या पुत्राचें हें भाषण ऐकतांच कौरवांचा तो श्रेष्ठ आचार्य सर्व सेनेला हर्ष देत असें म्हणाला—" हे राजन्, ज्याअर्थी त्या अजिंक्य पांडवाचा वध न करतां त्याला जिवंत धरून आणण्याचा तूं वर मागत आहेस, त्याअर्थी तो कुंतीपुत्र धन्य होय, असें मी मानितों. हे नरश्रेष्ठा, तूं त्याच्या वधाची इच्छा कां करीत नाहींस ! युधिष्ठिराचा वध माझ्या हातून होऊं नये, अशी तुझी इच्छा आहे काय ? धर्मराज जिवंत रहावा, अशी जर तुझी इच्छा असेल व त्याच्या योगानें तूं जर स्वकुलाचें रक्षण करीत असशील, तर धर्मराजाला एकहि द्वेष्टा नाहीं, असें जें म्हणतात, तें सत्य आहे. किंवा हे दुर्योधना, पांडवांना युद्धांत जिंकल्यानंतर त्यांचा राज्यांश त्यांना देऊन त्यांच्याशीं सख्य करावें, अशी तर तुझी मनीषा नाहींना ! असें जर असेल तर धन्य धन्य तो कुंतीपुत्र, त्या धीमान् पांडवाचा जन्महि धन्य होय. ज्याअर्थी तुलाहि तो प्रिय वाटत आहे, त्याअर्थी त्याचें 'अजातशत्रु' हें नांव यथार्थ आहे."

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें द्रोणानें तुझ्या पुत्रास विचारलें असतां त्याच्या अंतःकरणांतील भाव एकदम बाहेर पडला. आपल्या हृदयांतील भावना लपविण्यास साक्षात् बृहस्पतिहि समर्थ नाहीं. तस्मात् तुझा पुत्र हृष्टचित्तानें असें म्हणाला—" हे आचार्य, कुंतीपुत्र युधिष्ठिराचा युद्धांत वध झाला असतां माझा विजय होणार नाहीं. कारण एकटा युधिष्ठिर जर युद्धांत वध पावला, तर सर्व पार्थ आम्हां सर्वांचा तत्काल संहार करतील यांत संशय नाहीं. त्या सर्व पांडवांना युद्धांत जिंकण्यास साक्षात् देवहि समर्थ नाहींत. ( मग आमची काय कथा ! ) त्या पांच पांडुपुत्रांपैकीं जो कोणी अवशिष्ट राहील, तो आमच्यापैकीं एकालाहि शिल्लक ठेवणार नाहीं. यास्तव त्या सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिरास जिवंत धरून आणण्याची मी इच्छा करीत आहें. कारण त्याला पुनः एकदा द्यूतांत जिंकून वनांत पाठविलें कीं, त्याचे सर्व अनुज त्यालाच अनुसरतील आणि अशाप्रकारें ते सर्व पांडव पुनः अरण्यांत गेले कीं, मला मिळालेला तो विजय दीर्घकाल राहील. यास्तव मी धर्मराजाच्या वधाची इच्छा करीत नाहीं."

द्रोणाचार्य अतिशय दीर्घदर्शी व बुद्धिमान् होता, त्यानें दुर्योधनाचा तो कुटिल आशय तेव्हांच जाणला व किंचित् विचार करून त्याला असा वर दिला—

**द्रोण**—बा दुर्योधना, महापराक्रमी अर्जुन जर युद्धामध्यें युधिष्ठिराचें रक्षण करीत नसेल, तर मी त्याला जिवंत धरून आणून तुझ्या स्वाधीन करीन. तथापि अर्जुनाच्या समक्ष मात्र मी हें कृत्य करण्यास असमर्थ आहें. इंद्रासह देव आणि दानव हें सर्व जरी एकत्र झाले, तरीहि युद्धांत पार्थाचा पराभव करण्यास समर्थ होणार नाहींत. तो धनंजय माझा शिष्य आहे, तो मजपाशींच अस्त्रविद्या शिकला, हें जरी सत्य आहे, तरी तो तरुण आहे ( व मी वृद्ध आहें ). तो पुण्यकर्मांनीं युक्त असलेला कौंतेय जय किंवा मृत्यु यांतील एकाची अपेक्षा करीत युद्ध करीत असतो. त्याला इंद्र व रुद्र यांच्यापासून अस्त्रें प्राप्त झालीं आहेत, शिवाय तो तुजवर अतिशय संतप्त झालेला आहे. त्याच्या समक्ष मी धर्मराजाला धरूं शकणार नाहीं.

यास्तव हे राजन्, तुला जर शक्य असेल तर कोणत्याहि उपायांनीं अर्जुनाला युधिष्ठिरापासून दूर नेण्याची योजना कर, म्हणजे तूं धर्मराजाला जिंकशील. त्याला जिवंत धरण्यांतच तुझा जय आहे, त्याचा वध करण्यांत नाहीं. हें तुझें म्हणणें सत्य आहे. धनंजयाला रणांगणांतून दूर नेण्याच्या उपायानेंच धर्मराज आपल्या हातीं लागेल. तो सव्यसाची जर तेथें नसेल, तर मी त्या सत्यधर्मपरायण राजाला धरून आणून तुझ्या स्वाधीन करीन, यांत संशय नाहीं. अर्जुनावांचून तो ज्येष्ठ पांडव युद्धामध्यें एक क्षणभर जरी माझ्यापुढें उभा राहिला, तरी मी त्याला तत्काल हस्तगत करून घेईन; परंतु अर्जुनाच्या समक्ष मात्र सुरासुरांसह साक्षात् इंद्रालाहि युधिष्ठिराच्या अंगाला स्पर्श करतां येणें शक्य नाहीं.

**संजय**—धृतराष्ट्रा, याप्रमाणें द्रोणानें सप्रतिबंध प्रतिज्ञा केली असतां तुझे बालिशपुत्र धर्मराज आपल्या हातीं सांपडलाच असें मानूं लागले. द्रोणाचार्यांच्या मनाचा कल पांडवांकडे अधिक आहे, हें दुर्योधन जाणत असल्यामुळें आचार्यांनीं आपल्या प्रतिज्ञेचा भंग करूं नये म्हणून तिची कौरवांनीं सर्वत्र प्रसिद्धि केली आणि शेवटीं तुझ्या पुत्रानें 'आज द्रोणाचार्य युधिष्ठिरास जिवंत धरणार आहे' अशी सर्व सैन्यांत घोषणा करविली. ७. १. १२.

---

## अध्याय १३ वा.

[ १ धर्मराजाची अर्जुनाला सावध रहाण्याविषयीं प्रेरणा. २ अर्जुनाचें आश्वासन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें द्रोणाचार्यांनें राजा युधिष्ठिराला धरण्याची सशर्त प्रतिज्ञा केल्याचें ऐकून कौरवांच्या सर्व सैनिकांनीं आनंदानें शंखनाद केला व सर्वत्र फार मोठा कोलाहल झाला. इकडे भारद्वाजाची ही प्रतिज्ञा दूतांच्या द्वारा धर्मराजाच्याहि कानीं गेली. तेव्हां त्यानें आपले भ्राते व इतर अन्य नृपति यांना एकत्र जमविलें आणि धनंजयाला असें म्हटलें—"हे नरव्याघ्रा, द्रोणाची ही प्रतिज्ञा तूं ऐकिलीच आहेस. तेव्हां ती पूर्ण न होण्याची योजना कर. आचार्यांनीं आपल्या प्रतिज्ञेंत विकल्प ठेवला असून तो सर्वशः तुजवर अवलंबून आहे. यास्तव हे महाबाहो, तूं आज माझ्या समीप राहून युद्ध कर आणि ज्यायोगानें दुर्योधनाची ही मनीषा द्रोणाचार्यांकडून पुरविली जाणार नाहीं, अशी व्यवस्था कर."

( २ ) **अर्जुन**—हे राजन्, मला ज्याप्रमाणें आचार्यांचा वध कदापि कर्तव्य नाहीं, त्याचप्रमाणें तुझा त्यागहि मी कदापि करणार नाहीं. प्रसंगीं मी युद्धांत प्राणत्यागहि करीन, पण आचार्यांचा प्रतिपक्षी होणार नाहीं. तथापि हे राजा, तुला युद्धांत धरून नेऊन धार्तराष्ट्र जर हें राज्य प्राप्त करून घेण्याची इच्छा करीत असेल, तर मात्र त्याची ती इच्छा या लोकीं तरी पूर्ण होणें शक्य नाहीं. नक्षत्रांसह आकाश कोसळून पडेल, पृथ्वीचींहि कदाचित् शकलें होतील, परंतु मी जोंवर जिवंत आहें, तोंवर द्रोण तुला धरून नेण्यास समर्थ होणार नाहीं, हें निश्चित जाण. साक्षात् वज्रधर इंद्र किंवा सर्व देवांसह विष्णु जरी त्याच्या साह्यार्थ आला, तरीहि युद्धामध्यें आचार्य तुला धरूं शकणार नाहींत. हे राजन्, मी जिवंत असेपर्यंत तुला यत्किंचित्‌हि भय नाहीं. द्रोणाचार्य सर्व अस्त्रवेत्त्यांमध्यें जरी वरिष्ठ आहे, तरी मी जोंवर जिवंत आहें, तोंवर तो तुला जिंकून नेण्यास समर्थ होणार नाहीं. माझी दुसरीहि एक प्रतिज्ञा तुला सांगून ठेवितों कीं, असत्यभाषण, पराजय आणि वचनभंग या तीन गोष्टी मीं आजन्म आचरिल्याचें स्मरत नाहीं. यास्तव तूं यत्किंचित्‌हि साशंक होऊं नकोस.

( ३ ) **संजय**—हे महाराज, त्यानंतर पांडवांच्या शिबिरांत शंख-भेरि इत्यादि वाद्यांचा निर्घोष सुरू झाला. वीरांचे सिंहनाद व धनुष्यांचे टणत्कार

यांचा प्रचंड ध्वनि आकाशाला जाऊन भिडला. पांडवसैन्यांतील शंखनाद ऐकून तुझ्या सैन्यांत वाद्यांचा गजर झाला. नंतर तीं दोन्ही सैन्यें व्यूह रचून रणांगणांत आलीं आणि त्यांचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. कौरव-पांडव आणि द्रोण-पांचाल यांचें तुमुल युद्ध जुंपलें. द्रोणाच्या सैन्याचा नाश करण्याचा सृंजयांनीं अतिशय यत्न केला. परंतु आचार्यानें आपल्या सैन्याचें अतिशय दक्षतेनें संरक्षण केल्यामुळें ते त्याचा पराभव करूं शकले नाहींत. त्याचप्रमाणें अर्जुन पांडवसेनेचें रक्षण करीत असल्यामुळें तुझे पुत्र तिचा पराभव करण्यास समर्थ झाले नाहींत.

राजा, रात्रीं कमलाचीं वनें जशीं आपलीं पानें मिटून घेतात, त्याप्रमाणें तीं दोन्ही सैन्यें स्वसंरक्षण करीत जागच्याजागीं स्थिर उभीं राहिलीं. नंतर द्रोणाचार्य आपल्या सूर्यतुल्य प्रकाशमान असलेल्या रथावर आरूढ होऊन सर्व सैन्याचें मर्दन करीत सैन्याच्या अग्रभागीं आला. तो वृद्ध आचार्य जरी एकटा होता, तरी पांडव आणि सृंजय यांना त्रस्त करीत सैन्यांतून संचार करीत असतां अनेक असल्याप्रमाणें भासला.

त्यानें सोडलेले घोर शर पांडवसेनेला त्रस्त करीत सर्व दिशांत पसरूं लागले. शेकडों किरणांनीं आवृत्त असलेला सूर्य मध्याह्नीं आला असतां जसा तळपत असतो, तसा द्रोण त्यावेळीं भासला. समरामध्यें क्रुद्ध झालेल्या महेंद्रा-कडे पहाण्यास दानव जसे समर्थ होत नाहींत, तसे त्या क्रुद्ध आचार्याकडे पांडव पाहूं शकले नाहींत. प्रतापवान् भारद्वाजानें पांडवांच्या सर्व सैन्याला मोहित करून धृष्टद्युम्नाचें सर्व सैन्य तीक्ष्ण धारेच्या शरांनीं जर्जर केलें. नंतर सरळ जाणाऱ्या बाणांनीं सर्व दिशा व आकाश आच्छादित करून ज्या बाजूला पार्षत होता, त्या बाजूच्या पांडवसैन्याचें मर्दन आरंभिलें. ७. १. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १ द्रोणाचार्याचें दारुण युद्ध. २ विविध योद्धयांचा संग्राम. ३ अभिमन्यूचा पराक्रम. ]

**( १ ) संजय**—हे महाराज, याप्रमाणें द्रोणाचार्य पांडवांच्या सैन्यांत फार मोठें भय उत्पन्न करीत रणांगणांतून संचार करूं लागला. त्यावेळीं तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें द्रोणाचार्य सृंजयाचें सैन्य दग्ध करीत असतां

साक्षात् प्रज्वलित अग्निच भासला. त्या संतप्त आचार्यास पाहून सृंजयांचा थरकांप झाला व ते आपलीं धनुष्यें आकर्ण ओढूं लागले. तेव्हां अशनीसारखा निर्घोष होऊं लागला. आचार्यांच्या हातून सुटलेल्या त्या क्रूर बाणांनीं रथी, गज, अश्व इत्यादिकांचा संहार झाला. ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं होणाऱ्या गारांच्या वृष्टीप्रमाणें द्रोणाचार्य भयंकर शरवृष्टि करूं लागला असतां शत्रुसैन्य भयकंपित झालें. त्यावेळीं कौरवांच्या सेनापतीचा तो अतिमानुष पराक्रम पाहून शत्रुसैन्यें भयभीत झालीं. मेघाप्रमाणें चमकणाऱ्या विद्युल्लते-प्रमाणें रथरूपी मेघावर त्याचें सुवर्णानें भूषविलेलें धनुष्य चमकूं लागलें. त्या सत्यप्रतिज्ञ व मेधावी द्रोणाचार्यानें त्या रणांगणांत रक्ताची घोर नदीच निर्माण केली. भीरूंचें भय वाढविणारी ती नदी समरांगणांत पडलेल्या सहस्रावधि प्राण्यांस पितृलोकीं नेत होती.

( २ ) याप्रमाणें द्रोणाचार्य ज्या बाजूला पांडवांच्या सेनेला त्रस्त करीत होता, त्या बाजूला युधिष्ठिरपुरस्सर पांडव वीर धांवून गेले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. शकुनि सहदेवावर धांवून गेला व त्यानें तीक्ष्ण शरांनीं त्याचा रथ, अश्व व सारथि यांस विद्ध केलें. तेव्हां सहदेवानेंहि शकुनीच्या शरांचें निवारण करून त्याचा ध्वज, रथ, अश्व व सारथि यांचा सहज लीलेनें छेद केला. तें पाहून विरथ झालेल्या शकुनीनें रथांतून खालीं उडी टाकली व त्या दोघांचें युद्ध जुंपलें. विरथ झालेले ते दोघे वीर हातांत गदा घेऊन द्वंद्वयुद्ध करीत असतां दोन पर्वतच युद्ध करीत असून त्यांनीं उगारलेल्या गदा त्यांचीं शिखरेंच आहेत कीं काय, असा भास झाला.

इकडे द्रोण व द्रुपद या दोघांचेंहि असेंच युद्ध जुंपलें. भीमसेन व विविंशति यांनीं परस्परांवर शरवृष्टि चालविली. त्या दोघांचें युद्ध चालू असतां एक मदोन्मत्त हत्ती दुसऱ्या मत्त हत्तीवर जसा प्रहार करतो, तसा भास झाला. शल्य व नकुल या दोघांचाहि संग्राम अद्भुत होता. नकुलानें आपल्या मातुलाचें छत्र, ध्वज, धनुष्य, अश्व व सारथि या सर्वांचा नाश करून आपला शंख वाजविला. कृपाचार्यानें धृष्टकेतूच्या बाणांचें निवारण करून त्याला शराघातानें क्षतयुक्त केलें. सात्यकीनें कृतवर्म्याच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. तेव्हां कृतवर्म्यानें सात्यकीवर तीक्ष्ण बाण सोडले. तथापि वायूनें पर्वत जसा कंपित होत नाहीं, तसा सात्यकि निष्कंप राहिला.

सेनापतीनें सुशर्म्याच्या मर्मस्थानीं प्रहार केला असतां, त्यानें उलट सेनापतीच्या जत्रुदेशीं तोमरानें ताडन केलें. मत्स्याधिपति विराटानें आपल्या सैन्याच्या साह्यानें कर्णाचा निरोध केला. परंतु त्या राधेयानें तीक्ष्ण शरांनीं मत्स्याच्या सर्व सैन्याचा पराभव केला. तेव्हां त्याचें अप्रतिम शौर्य निदर्शनास आलें. द्रुपदराजा व भगदत्त यांचेंहि तुमुल युद्ध जुंपलें. सौमदत्ति व शिखंडिनी यांचा घनघोर संग्राम पाहून सर्व भूतें त्रस्त झालीं. घटोत्कच व अलंबुष या दोघां घोर कर्मे करणाऱ्या राक्षसांचें विस्मयकारक मायायुद्ध झालें. ते दोघेहि परस्परांच्या जयेच्छेनें मायेचे शेंकडों प्रकार निर्माण करीत, अदृश्य होत, एकमेकांवर प्रहार करीत व पुनः प्रकट होत. चेकितान व अनुविंद यांचें बलदैत्य व इंद्र यांच्याप्रमाणें घोर युद्ध प्रवृत्त झालें. पूर्वी विष्णूनें हिरण्याक्षाशीं केलेल्या संग्रामाप्रमाणें लक्ष्मण व क्षत्रदेव या दोघांनीं दारुण कर्म आरंभिलें.

( ३ ) पौरवराजा मोठ्यानें गर्जना करीत अभिमन्यूवर धांवला. तेव्हां त्या दोघांचें दारुण युद्ध प्रवृत्त झालें. त्यांनीं परस्परांवर असंख्य बाणांचा वर्षाव केला व खड्गांनीं एकमेकांवर प्रहार केले. शेवटीं अभिमन्यूनें पौरवाच्या रथावर उडी मारून मोठ्यानें गर्जना केली, त्याचे केस धरून, लाथेनें त्याचा सारथि खालीं पाडविला. तरवारीनें ध्वज तोडून टाकिला आणि गरुड सर्पाला जसा फेंकून देतो, किंवा सिंह वृषभाला जसा पाडवितो, त्याप्रमाणें अभिमन्यूनें त्या पौरवेश्वराला रथांतून खालीं फेंकून दिलें. तेव्हां तो पौरव मूर्च्छित होऊन पडला.

याप्रमाणें पौरव पडला असून अभिमन्यु त्याला अनाथाप्रमाणें फरफरा ओढीत आहे, हें पाहून जयद्रथ संतप्त झाला. त्याला तें सहन झालें नाहीं. तो आपली ढाल व तरवार घेऊन रथांतून उतरला व गर्जना करीतच अभिमन्यूवर धांवून गेला. जयद्रथ आपल्यावर चालून येत आहे, हें पहातांच अभिमन्यूनें पौरवास सोडून दिलें व श्येनपक्ष्यासारखी जयद्रथावर उडी टाकली. त्यावेळीं कौरवांच्या योद्धयांनींहि भाले, खड्ग इत्यादि शस्त्रें फेंकून अभिमन्यूला विद्ध करण्याचा यत्न केला; पण त्या बाल आर्जुनीनें आपल्या तलवारीनें तीं सर्व शस्त्रें तोडून टाकिलीं व ढालीनें स्वतःचें संरक्षण केलें.

अशा प्रकारें कौरवसैन्याचें निवारण करून तो आर्जुनि आपल्या पित्याचा वैरी जो जयद्रथ त्याच्याकडे पुनः वळला व गजावर झडप घालणाऱ्या सिंहा-

प्रमाणें त्याच्यावर तुटून पडला. त्या दोघांचें दारुण युद्ध जुंपलें. ते दोघे वीर ढाल व तलवार घेऊन युद्ध करूं लागले. तेव्हां ते पक्षयुक्त पर्वताप्रमाणें शोभले. त्या दोघांचें बराच वेळ युद्ध झाल्यानंतर कौरवांच्या नृपालांनीं अभिमन्यूला वेढलें व त्याच्यावर सर्व बाजूंनीं शस्त्रप्रहार चालविले. तेव्हां त्या सौभद्रेयानें मोठ्यानें गर्जना केली व जयद्रथाला सोडून त्यांच्या सैन्यावर चाल केली.

तेव्हां शल्यानें आपली शक्ति अभिमन्यूवर फेंकली. ती अग्नीच्या ज्वाले-प्रमाणें प्रदीप्त शक्ति आपल्याकडे येत आहे, हें पहातांच आर्जुनीनें आपली तलवार कोशांतून उपसली आणि सर्पावर झडप घालणाऱ्या गरुडाप्रमाणें तो त्याच्यावर धांवून गेला. त्याचें तें हस्तलाघव पाहून सर्व राजांनीं सिंहनाद केला. नंतर त्या पांडवेयानें शल्यरथाच्या समीप जाऊन त्याच्या सारथ्याला पाडविलें.

अभिमन्यूचा तो पराक्रम पाहून विराट, द्रुपद, धृष्टकेतु, युधिष्ठिर, सात्यकि, केकय, भीम, धृष्टद्युम्न, शिखंडी, नकुल, सहदेव व पांच द्रौपदेय या सर्वांनीं 'धन्य, धन्य' अशी चोहोंबाजूंनीं गर्जना केली. अनेक प्रकारें सिंहनाद केले व धनुष्याचे विविध टणत्कार केले. याप्रमाणें सौभद्रेयानें तुझ्या सैन्याचा पराभव चालविला असतां, पांडवांच्या विजयाचें तें चिह्न तुझ्या पुत्रांना सहन झालें नाहीं. ते सर्व अभिमन्यूवर प्रहार करण्यास धांवले आणि जलधारांनीं पर्वताला भिजवून टाकणाऱ्या मेघांप्रमाणें त्यांनीं त्या कुमारावर शरवृष्टि केली. तुझ्या पुत्रांचा विजय इच्छिणारा शल्यहि आपल्या सारथ्याचा पराभव पाहून अतिशय संतप्त झाला व सौभद्रावर धांवला. ७. १. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ युद्धांचें सविस्तर वर्णन. २ भीम-शल्ययुद्ध. ३ पांडवांचा विजय. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, तूं जें विचित्र द्वंद्वयुद्धाचें वर्णन केलेंस तें ऐकून मला स्वदृष्टीनें तें युद्ध पहावयास सांपडावें, अशी इच्छा होत आहे. कौरव-पांडवांचें हें देवासुरतुल्य युद्ध अतिशय आश्चर्यकारक झालें, असें या भूलोकीं मानव त्याचें वर्णन करतील. तूं आतां जें वर्णन सांगितलेंस तें ऐकून माझी तृप्ति होत नाहीं. तस्मात् अभिमन्यु व शल्य यांच्या युद्धाचें सविस्तर वर्णन करून सांग.

**संजय**—हे महाराज, आपल्या सारथ्याला पाडलेलें पाहून शल्य अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें आपली लोखंडी गदा हातांत घेतली व मोठ्यानें गर्जना करीत रथांतून उडी टाकिली. तेव्हां प्रलयकालच्या प्रज्वलित अग्नीप्रमाणें क्रोध-संतप्त झालेला भीमसेन आपली प्रचंड गदा हातीं घेऊन कालदंड धारण केलेल्या अंतकाप्रमाणें अतिशय वेगानें धांवून आला. इतक्यांत सौभद्रहि आपली वज्र-प्राय गदा उगारून ‘ये, ये’ असें म्हणत शल्यास आह्वान करूं लागला. परंतु भीमानें त्या कुमाराचें निवारण करून त्याला मागें सारलें व तो बलाढ्य वृकोदर शल्याच्या समीप येऊन एखाद्या पर्वताप्रमाणें स्थिर उभा राहिला.

(२) त्याचप्रमाणें मद्रराजहि भीमाला पाहून हत्तीवर धांवून जाणाऱ्या व्याघ्राप्रमाणें त्याच्यावर चाल करून गेला. त्यावेळीं उभय सैन्यांत रणवाद्यांचा निर्घोष झाला. त्या दोघां वीरांचा तो उत्साह पाहून कौरव-पांडव व इतर प्रेक्षक या सर्वांनीं प्रशंसोद्गार काढले व शंखनाद करून सर्व दिशा दुमदुमून टाकिल्या. हे भारता, संग्रामांत भीमसेनाचा वेग सहन करण्यास मद्राधिपा-वांचून अन्य कोण समर्थ आहे! त्याचप्रमाणें महात्म्या मद्रेश्वराचा गदाप्रहार बलाढ्य वृकोदरावांचून दुसऱ्या कोणास सहन होणार! सुवर्णानें भूषविलेल्या प्रचंड गदा धारण करून रणांगणांत मंडलें घेत संचार करणारे ते दोघे वीर अतिशय शोभले. त्या दोघांचें तें गदायुद्ध फारच प्रेक्षणीय झालें. भीमसेनानें मद्राच्या गदेवर आपली गदा आपटली असतां अग्नीच्या ज्वाला उत्पन्न झाल्या व ती गदा भग्न होऊन पडली. शल्यानें भीमाच्या गदेवर प्रहार केला असतां तिच्यांतून विस्फुलिंगें निघालीं. तेव्हां ती गदा वर्षाऋतूंच्या रात्रीं काजव्यांनीं युक्त असलेल्या वृक्षाप्रमाणें शोभली. त्या दोन्ही गदांनीं आकाश प्रकाशित केलें व प्रचंड उल्कापाताप्रमाणें शत्रुसैन्याला त्रस्त केलें. त्या दोन्ही गदा सैन्याचा क्षय करणाऱ्या होत्या. त्या एकमेकींवर आदळत असतां नागिणींप्रमाणें फूत्कार टाकीत अग्नि उत्पन्न करूं लागल्या.

दोन बलाढ्य हत्ती आपल्या दांतांचे परस्परांवर जसे प्रहार करितात, किंवा दोन व्याघ्र आपल्या नखांनीं एकमेकांस जसे विद्ध करितात, तसे ते दोघे बलाढ्य वीर परस्परांवर तुटून पडले. त्या गदायुद्धांत रक्तानें माखलेले ते शल्य-वृकोदर फुललेल्या पलाशवृक्षाप्रमाणें शोभले. त्यांच्या मेघगर्जनेप्रमाणें गदा-प्रहारांनीं होणाऱ्या प्रचंड ध्वनीनें दाही दिशा भरून गेल्या. मद्राच्या गदा-

प्रहारांनीं भीम यत्किंचित्‌हि कंपित झाला नाहीं. तो पर्वताप्रमाणें निष्कंप राहिला. मद्राधीशहि भीमाच्या गदाघातांनीं विह्वल न होतां अचल उभा राहिला. याप्रमाणें ते दोघे बलाढ्य वीर युद्ध करीत असतां मदोन्मत्त गजाप्रमाणें एकमेकांच्या अंगावर पडले व लोहदंडांनीं ताडन करूं लागले. दोघांनीं एकाच वेळीं परस्परांवर गदेचा प्रहार केला असतां ते दोघे वीर इंद्रध्वजाप्रमाणें एकदम भूमीवर पडले.

पण मद्राधीशाला भूमीवर विह्वळत पडलेलें पहातांच कृतवर्मा त्याच्याकडे धांवत आला व त्यानें मूर्छित झालेल्या शल्याला आपल्या रथावर घालून रणांगणांतून दूर नेलें. इकडे भीमसेनहि गदाप्रहारानें विह्वल होऊन पडला होता. मदिरापानानें मोहित झालेल्या पुरुषाप्रमाणें तो वीर क्षणभर निश्चल पडून राहिला; पण लागलाच उठून हातांत गदा घेऊन उभा राहिलेला दृष्टीं पडला.

( ३ ) हे राजन्, त्यानंतर मद्राधिपाला युद्धपराङ्मुख झालेलें पहातांच तुझे पुत्र सर्व सैन्यासह कंपित झाले. भीमाच्या या विजयामुळें पांडव अधिकच उत्साहानें युद्ध करूं लागले असतां तें सैन्य भयभीत झालें व झंझावातानें उडवून दिलेल्या मेघांप्रमाणें दश-दिशांत उधळलें. याप्रमाणें पांडवांनीं कौरवांचा पराभव केला असतां ते प्रज्वलित अग्नीप्रमाणें रणांगणांत शोभले. विजयी झालेल्या पांडवांनीं नानाप्रकारचीं रणवाद्यें वाजवून व शंखनाद करून आपला आनंद व्यक्त केला. ७. १. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ वृषसेनाचें पांडुपुत्रांशीं युद्ध. २ द्रोणाचार्यांचें युधिष्ठिरासमीप आगमन. ३ अर्जुनाचा पराक्रम. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, याप्रमाणें तुझ्या प्रचंड सैन्याची वाताहात झालेली पहातांच वृषसेनानें आपल्या अस्त्रकौशल्यानें तें सैन्य आंवरून धरलें. त्यानें सहस्रावधि शर सोडून अश्व-गजादिकांचा भेद केला. त्याच्या त्या प्रदीप्त बाणांनीं सूर्यकिरणांप्रमाणें दशदिशांत संचार करीत असंख्य गजाश्वांच्या संघांना वातभग्न वृक्षांप्रमाणें भूमीवर पाडविलें. याप्रमाणें तो एकटा वीर सर्व सैन्याचें मर्दन करीत आहे, हें पहातांच पांडवांच्या नृपालांनीं त्याला समंततः वेढलें.

प्रथम नकुलपुत्र शतानीकानें कर्णपुत्र वृषसेनावर नाराच बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां त्या कर्णपुत्रानें त्याचा ध्वज पाडविला व धनुष्य तोडून टाकिलें. तें पाहून द्रौपदीचे दुसरे पुत्र आपल्या भ्रात्याच्या साह्यार्थ धांवले व त्यांनीं वृषसेनाला शरवृष्टीनें आच्छादित केलें. तेव्हां द्रोणपुत्रादि कौरवपक्षाचे वीर गर्जना करीतच वृषसेनाच्या रक्षणार्थ धांवून आले. पर्वताला आच्छादित करणाऱ्या मेघांप्रमाणें शरवर्षाव करून त्यांनीं महारथ द्रौपदेयांना झांकून टाकिलें.

इतक्यांत पुत्रवत्सल पांडव अतिशय त्वरेनें तेथें धांवून आले. त्यांच्या बरोबर पंचाल, केकय, मत्स्य व सृंजय आपापलीं आयुधें उगारून पुढें सरसावले. त्यावेळीं तुझ्या पुत्रांचें व पांडुपुत्रांचें देवासुरांसारखें तुमुल युद्ध जुंपलें. दोन्ही पक्षांतील योद्धे अंतरिक्षांत युद्ध करणाऱ्या सर्प व गरुड यांच्याप्रमाणें शोभले. भीम, कर्ण, द्रोण, अश्वत्थामा इत्यादि वीरांच्या योगानें तें रणांगण प्रलयकालच्या कालसूर्याप्रमाणें प्रकाशित झालेलें दिसलें. त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें असतां पांडवसैन्यानें कौरवसेनेला जर्जर केलें. तेव्हां ते सर्व सैनिक पलायन करूं लागले.

( २ ) आपलें सैन्य युद्धपराङ्मुख होत असलेलें पाहून रक्ताश्व द्रोण अतिशय क्रुद्ध झाला व 'तुमचें पलायन आतां पुरे करा' असें म्हणत ऐरावताप्रमाणें पांडवसैन्यांत शिरला आणि युधिष्ठिरावर तुटून पडला. युधिष्ठिरानें द्रोणावर शर सोडले व आचार्यानें युधिष्ठिराचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां समुद्राच्या तीराप्रमाणें युधिष्ठिराच्या चक्ररक्षकानें द्रोणाला आंवरून धरलें. पांचालकुमारानें याप्रमाणें द्रोणाचें निवारण केलेलें पाहून पांडवांच्या सैन्यांतून 'धन्य, धन्य' असे प्रशंसोद्गार निघाले व सर्वत्र सिंहनाद झाला. नंतर त्या कुमारानें द्रोणाच्या वक्षःस्थलावर बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां द्रोणाचार्य अतिशय संतापला. त्या दोघांचें दारुण युद्ध झालें व शेवटीं त्या पांचालसेनापतीनें द्रोणाचा निरोध केला असतां भारद्वाजानें त्याचा शिरश्छेद केला.

नंतर संतप्त झालेला द्रोणाचार्य सर्व सैन्याच्या मध्यभागीं स्थित झाला व त्यानें शिखंडी, उत्तमौजा, नकुल, सहदेव, युधिष्ठिर, पांच द्रौपदेय, सात्यकि व विराट यांच्यावर असंख्य बाणांची वृष्टि करून त्यांना त्रस्त केलें. याप्रमाणें मुख्य वीरांचा निरोध करून द्रोणाचार्य युधिष्ठिराकडे वळला व त्या द्विजश्रेष्ठानें

त्याला नतपर्वबाणांनीं विद्ध करून युगंधरास रथावरून खालीं पाडविलें. तेव्हां विराट द्रुपद, केकय, सात्यकि, शिबि, पंचालपुत्र, व्याघ्रदत्त, सिंहसेन, या व इतरहि अनेक वीरांनीं युधिष्ठिराच्या रक्षणार्थ द्रोणाच्या मार्गाचा निरोध केला. पंचालपुत्र व्याघ्रदंतानें द्रोणाला शरवृष्टीनें विद्ध केलें असतां कौरवसैन्यांत हाहाकार उडाला. सिंहसेनानेंहि द्रोणाला विद्ध करून मोठ्यानें हास्य केलें. तेव्हां आचार्यानें आपले नेत्र विस्फारून एकदा पाहिलें. धनुष्याच्या दोरीवरून हात फिरविला, टणत्कार करून मोठ्या वेगानें चाल करून सिंहसेन व व्याघ्रदत्त या दोघांचींहि कुंडलयुक्त मस्तकें त्यांच्या देहापासून वेगळीं करून भूमीवर पाडविलीं. नंतर जेवढे पांडवांचे वीर त्याच्या मार्गांत आले, त्या सर्वांचा पराभव करून तो प्रतापवान् आचार्य अंतकाप्रमाणें युधिष्ठिराच्या पुढें जाऊन उभा राहिला.

द्रोणाचा तो पराक्रम पहातांच 'युधिष्ठिर हत झाला' असा पांडवांच्या सैन्यांत एकच कोलाहल झाला. तुझे सैनिक म्हणूं लागले कीं, आज धृतराष्ट्रराजा कृतार्थ होणार. द्रोण आतां अल्पावकाशांत युधिष्ठिराला धरून आणून दुर्योधनाच्या पुढें उभा करील.

( ३ ) तुझ्या सैनिकांच्या अशा वल्गना चालल्या असतां कुंतीपुत्र अर्जुन आपल्या रथघोषानें तें रणांगण निनादित करीत अतिशय वेगानें तेथें प्राप्त झाला. त्यानें बाणांची वृष्टि करून तेथें रक्ताची नदीच निर्माण केली. त्या घोर नदीचें उल्लंघन करून त्या कौंतेयानें सर्व कौरवांचा पराभव केला, सर्व रणांगण शरजालांनीं व्यापून टाकिलें, सर्व सैनिकांस मोहित केलें व द्रोणाचार्यांच्या सेनेस गांठलें. धनंजयाच्या बाणजालानें अंतरिक्ष, पृथ्वी व आकाश हीं सर्व व्यापून गेलीं. सर्वत्र अंधकार पसरला. सूर्यहि अस्ताला गेला. त्यामुळें शत्रु कोण व मित्र कोण हेंहि ओळखूं येईनासें झालें. तेव्हां द्रोणादि कौरव वीरांनीं आपलीं सैन्यें परत फिरविलीं. कौरव त्रस्त झाले असून ते युद्ध थांबवित आहेत, हें पाहून पार्थानेंहि आपल्या सैन्याचा अवहार केला.

हे महाराज, धनंजयाचा पराक्रम पाहून पांडव, सृंजय व पांचाल यांनीं सूर्याचें स्तवन करणाऱ्या ऋषींप्रमाणें पार्थाची प्रशंसा केली. याप्रमाणें शत्रूंना जिंकून सर्व सैन्याच्या मागून केशवासह धनंजय स्वशिबिराकडे परत वळला. पार्थाच्या त्या रथाला इंद्रनील, पद्मराग, पोवळें इत्यादि विविध प्रकारचीं रत्नें

जडविलेलीं होतीं. अशा रत्नखचित रथावर आरूढ झालेला तो पांडुपुत्र नक्षत्रांनीं युक्त असलेल्या आकाशांतील चंद्राप्रमाणें शोभला. ७. १. १६.

येथें पहिलें द्रोणाभिषेकपर्व समाप्त झालें.

## संशप्तकवधपर्व २.



### अध्याय १७ वा.

[ १ द्रोण-दुर्योधनसंवाद. २ अर्जुनाचा वध करण्याविषयीं त्रिगर्तांची प्रतिज्ञा. ३ अर्जुन-युधिष्ठिरसंवाद. ४ अर्जुनाचें युद्धार्थ प्रयाण. ]

( १ ) संजय—हे महाराज, तीं दोन्ही सैन्यें आपापल्या शिबिरांत जाऊन यथान्याय व यथाक्रम विश्रांति घेऊं लागलीं असतां अत्यंत उद्विग्न झालेल्या द्रोणाचार्यानें सर्व सैन्याचा अवहार केला व अतिशय लज्जेनें दुर्योधनापाशीं येऊन त्याला असें म्हटलें—" हे राजन्, धनंजय समरांगणावर स्थित असतां युधिष्ठिराला धरण्यास देवहि समर्थ होणार नाहींत, हें मी तुला पूर्वींच सांगून ठेवलें होतें व आज पार्थाच्या युद्धांत तुम्हांला त्या माझ्या वचनाचा प्रत्यय आलाच आहे. कृष्ण व पार्थ हे दोघेही अजिंक्य आहेत, या माझ्या कथनाविषयीं तूं यत्किंचित्‌हि शंका घेऊं नकोस.

हे राजा, तूं जर कोणत्या तरी उपायानें श्वेतवाहन अर्जुनाला या रणभूमींतून अन्य प्रदेशीं नेशील तर युधिष्ठिराला तुझ्या स्वाधीन करतां येईल. एखाद्या योद्ध्यानें जर धनंजयाला युद्धाचें आह्वान केलें तर तो कौंतेय आपल्या प्रतिपक्षाला जिंकल्यावांचून परत फिरणार नाहीं. तेवढ्या अवधींत मी धृष्टद्युम्नाच्या समक्ष सर्व सैन्याचा भेद करून युधिष्ठिराला धरून आणीन. अर्जुन समीप नसतांना युधिष्ठिर जर समरांगणांत येऊन माझ्या संमुख स्थित होईल, तर त्या पांडवाचें मीं ग्रहण केलेंच, असें समज. धर्मराज एक क्षणभर जरी अर्जुनावांचून रणांगणांत उभा राहिला तर त्याच्या सर्व अनुयायांसह मी त्याला जिंकीन. किंवा तो जर रणांगणांतून पळून गेला तर त्यांतहि आपलाच विजय आहे."

( २ ) हे महाराज, द्रोणाचें तें वचन ऐकून त्रिगर्ताधिप आपल्या भ्रात्यांसह असें म्हणाला—" हे राजन्, गांडीवधारी अर्जुन आमची सर्वदा मानहानि करीत असतो. त्याच्या स्मरणानें आमचें हृदय क्रोधाग्नीनें सतत संतप्त होत आहे. आम्हांला रात्रीं स्वस्थ निद्राहि येत नाहीं. यास्तव आज तो अस्त्रसंपन्न पार्थ आमच्या दृष्टीं पडला, हें मोठेंच सुदैव म्हणावयाचें. आम्ही अर्जुनाचा नाश करण्यासाठीं कधींपासून उत्सुक झालों आहों. यास्तव आम्ही पार्थाशीं युद्ध करून आमच्या अंतःकरणांतील इच्छा पूर्ण करून घेऊं. अर्जुनाचा वध करून आम्ही तुमचें प्रिय करूं आणि यश मिळवूं. आज ही पृथ्वी एक तर अर्जुनरहित तरी होईल किंवा त्रिगर्तशून्य होईल. आमची ही प्रतिज्ञा सत्य समज. ती कदापि असत्य होणार नाहीं."

हे धृतराष्ट्रा, याप्रमाणें प्रतिज्ञा करून सत्यरथ, सत्यवर्मा, सत्यव्रत, सत्येषु व सत्यकर्मा हे तीन त्रिगर्त भ्राते दशसहस्र रथांसह रणक्षेत्राकडे निघाले. त्यांच्याबरोबर मालव आणि तुंडिकेर हे दोघे तीस हजार रथांसह बाहेर पडले. प्रस्थलाधिप सुशर्मा आपले भ्राते व मावेल्लक, ललित्थ, आणि मद्रक यांसह दहा हजार रथ घेऊन पुढें झाला. त्याशिवाय भिन्न भिन्न देशांतील दशसहस्र निवडक रथी सज्ज होऊन शपथ घेण्यास पुढें सरसावले.

त्या सर्व नृपालांनीं अग्नि प्रज्वलित करून त्यांत पृथक् पृथक् आहुत्या दिल्या, कुशवस्त्रें धारण केलीं, अंगाला घृत चोळून चित्र-विचित्र कवचें चढविलीं. मौर्वि-मेखला बांधल्या. त्या सर्व वीरांनीं सहस्रावधि दक्षिणा देऊन ब्राह्मणांस पूर्वींच संतुष्ट केलें होतें व पुण्यलोकार्ह यज्ञ केले होते. ते सर्व पुत्रवान् असल्यामुळें इहलोकींच्या सर्व कर्तव्यांतून मुक्त झाले होते. याप्रमाणें कृतकृत्य झालेले ते वीर जिवावर उदार होऊन यश व कीर्ति मिळविण्यासाठीं उत्सुक झाले होते. ब्रह्मचर्य, वेदव्रताचरण व वेदाध्ययन हीं ज्यांमध्यें प्रामुख्यानें आहेत, तीं कर्में करण्यानें व विपुल दक्षिणा देऊन केलेल्या महायज्ञांनीं जे लोक प्राप्त होतात, तेच लोक धर्मयुद्धानें प्राप्त करून घेण्यास ते उद्युक्त झाले. त्या योद्ध्यांतील प्रत्येकानें ब्राह्मणांस धेनु, धन व वस्त्रें देऊन तृप्त केलें. परस्परांच्या भेटी घेतल्या, शेवटीं अग्नि प्रज्वलित करून रणदीक्षा घेतली आणि अग्नीच्या साक्षीनें अर्जुनाच्या वधाची प्रतिज्ञा केली.

ते सर्व वीर सर्वांना ऐकूं जाईल अशा उच्च स्वरानें म्हणाले—" आम्ही सर्व आज धनंजयाच्या वधाची प्रतिज्ञा करीत आहों. आम्ही पार्थाचा वध

केल्यावांचून जर परत फिरलों, किंवा त्यानें त्रस्त केल्यामुळें जर भीतीनें पलायन केलें तर व्रतभंग, ब्रह्मघात, मद्यपान व गुरुदारापहार हीं महापातकें आचरणारांस जे अधोलोक प्राप्त होतात, ते आम्हांला प्राप्त होतील. आम्ही अर्जुनाचा वध न करतां युद्धपराङ्मुख झाल्यास ब्रह्मस्वाची चोरी करणारे, राजपिण्डाचा अपहार करणारे, शरणागताचा त्याग करणारे, याचकाचा प्राण घेणारे, घरांना आग लावणारे, गोवध करणारे, दुसऱ्याला निष्कारण त्रास देणारे, ब्राह्मणांचा द्वेष करणारे, मोहानें विहित कालीं स्वस्त्रीचा अव्हेर करणारे व श्राद्धादि निषिद्ध कालीं विषयोपभोग घेणारे, स्वतःची जाति लपवून ठेवणारे, दुसऱ्याच्या न्यस्त द्रव्याचा अपहार करणारे, प्रतिज्ञाभंग करणारे, क्लीबाबरोबर युद्ध करणारे, नीचांची सेवा करणारे, नास्तिक, अग्नि व माता-पिता यांचा त्याग करणारे, इत्यादि महापातकी ज्या निंद्य लोकांस प्राप्त होतात, ते लोक आम्हांला प्राप्त होवोत. कौंतेयाच्या भीतीनें आम्हीं जर रणांगणांतून पलायन केलें, तरीहि आम्हांला तीच गति प्राप्त होवो. अर्जुनाला युद्धांत जिंकणें अतिशय दुष्कर आहे. तें जर आम्हीं आज समरांगणांत केलें, तर आम्ही कृतकार्य होऊं आणि जर तें करण्यास समर्थ झालों नाहीं, ( युद्धांत मृत्यु पावलों ) तर आम्हांला इष्ट लोक प्राप्त होतील, यांत शंका नाहीं."

हे राजा, अशी प्रतिज्ञा करून ते सर्व वीर अर्जुनाला युद्धाचें आह्वान करीत त्या रणांगणांतून दक्षिण दिशेकडे वळले. त्या नरश्रेष्ठांनीं आह्वान केलें असतां परपुरंजय अर्जुन समीपच असलेल्या धर्मराजाला असें स्पष्ट वचन बोलला—

( ३ ) "हे राजा, युद्धाला कोणींहि बोलाविलें असतां त्याचा स्वीकार करणें, हें माझें व्रत आहे. आजच्या या महायुद्धांत, ज्यांनीं शत्रूंस मारूं किंवा मरूं, अशी शपथ घेतली आहे, असे हे संशप्तक वीर मला युद्धार्थ आह्वान करीत आहेत. हा त्रिगर्ताधिप सुशर्मा आपल्या भ्रात्यांसह मला बोलावीत आहे. यास्तव सर्व अनुयायांसह त्यांचा वध करण्यासाठीं जाण्याची मला अनुज्ञा दे. ते वीर मला युद्धाचें आह्वान करीत असतां स्वस्थ बसणें मला सहन होत नाहीं. तुझी अनुज्ञा मिळतांच मी त्या सर्वांचा युद्धांत संहार करीन, हें मी तुला सत्य सांगतों.

युधिष्ठिर—बा अर्जुना, द्रोणाची प्रतिज्ञा तुला ठाऊकच आहे. तेव्हां त्याची ती प्रतिज्ञा ज्यायोगें वृथा होईल, तसें कर. तो आचार्य बलाढ्य, शूर,

कृतास्त्र व अश्रांत आहे. त्यानें मला धरून देण्याची प्रतिज्ञा केली आहे. हें लक्षांत घेऊन तुला जें योग्य दिसेल तें कर.

अर्जुन—हे राजन्, सत्यजित आज तुझें रक्षण करील. हा पंचालपुत्र जिवंत असतांना आचार्यांची आकांक्षा कदापि सिद्धीस जाणार नाहीं. तथापि यदा-कदाचित् कौरवांनीं रणांत सत्यजिताचा वध केला, तर मात्र हे प्रभो, तूं त्या रणभूमीवर क्षणभरहि राहूं नकोस."

( ४ ) संजय—हे महाराज, अर्जुनानें याप्रमाणें आश्वासन दिलें असतां युधिष्ठिरानें त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. परंतु त्यावेळीं त्याचा कंठ प्रेमातिरेकानें दाटून आला व त्यानें आपल्या अनुजाला आलिंगन दिलें, त्याच्याकडे स्नेहपूर्ण दृष्टीनें अवलोकन केलें व अनेक प्रकारें जयाशीर्वाद दिले. नंतर श्वापदांवर चालून जाणाऱ्या क्षुधित सिंहाप्रमाणें बलाढ्य अर्जुन धर्मराजाला सोडून त्रिगर्तांवर चालून गेला. पार्थ त्रिगर्तांबरोबर युद्ध करण्यास निघाला आहे, हें पाहून दुर्योधनाच्या सैन्यास अतिशय हर्ष झाला. त्या सर्वांचा उत्साह वाढला व ते धर्मराजाला धरून आणण्यासाठीं अतिशय वेगानें पुढें सरसावले. त्यावेळीं वर्षा-ऋतूंत तुडुंब भरलेल्या गंगा व सरयू या दोन नद्या जशा एकमेकींत वेगानें मिसळतात, तशा त्या कौरव-पांडवांच्या सेना परस्परांस जाऊन भिडल्या. ७. २. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ अर्जुन-संशप्तक युद्ध. सुधन्व्याचा वध. ]

( १ ) संजय—हे राजन्, त्यानंतर ते सर्व संशप्तक हृष्ट चित्तानें सम प्रदेशांत स्थित झाले. त्यांनीं आपल्या सैन्याचा चंद्राकार व्यूह रचला. किरीटी येत आहे, असें पाहून त्यांनीं अतिशय हर्षानें फार मोठी गर्जना केली. त्या शब्दानें सर्व दिशा, प्रदिशा व आकाश, हें सर्व निनादित झालें. तें रणक्षेत्र वीरांनीं व्यापल्यामुळें तेथें प्रतिध्वनीलाहि अवसर मिळेनासा झाला.

त्या हृष्ट झालेल्या त्रिगर्तांना पाहून धनंजय हंसतच कृष्णाला असें म्हणाला—"हे देवकीनंदना, या युद्धांत त्रिगर्तांना हा काल वास्तविक रोदन करण्याचा असतांहि ते सर्व हंसत आहेत पहा. अथवा रणांत मरण

येऊन या निंद्य पुरुषांना दुष्प्राप्य असलेल्या उत्तम लोकाची प्राप्ति होणार असल्यामुळें हा काल आनंदाचाहि म्हणण्यास हरकत नाहीं."

हे महाराज, हृषीकेशाला असें बोलून महाबाहु अर्जुन जेथें त्रिगर्त व्यूह रचून उभे होते, तेथें आला. त्यानें आपला सुवर्णानें भूषविलेला शंख वाजविला व त्याच्या ध्वनीनें दाही दिशा भरून टाकिल्या. तो शब्द ऐकूनच संशप्तकांची सेना त्रस्त झाली व भीतीनें मूर्च्छित होऊन त्या रणांगणांत पाषाणाप्रमाणें निश्चेष्ट होऊन पडली. अश्व जागच्या जागीं देहधर्म करूं लागले. नंतर थोड्या वेळानें ते सैनिक सावध झाले. ते उठून उभे राहिले आणि त्या सैन्यानें पार्थाशीं युद्ध आरंभिलें. त्यावेळीं वनांतील प्रफुल्ल वृक्षराजीवर तुटून पडणाऱ्या भ्रमरांच्या समुदायाप्रमाणें अर्जुनावर बाणांचा वर्षाव होऊं लागला. तथापि पार्थानें त्या सर्वांचें निवारण केलें. त्यांतील एक सुवर्णपंखयुक्त शर किरीटीच्या शिरस्त्राणांत अडकून राहिला, तो सुवर्णमालेनें युक्त असलेल्या उदयोन्मुख सूर्याप्रमाणें शोभला.

सुबाहूचा हा पराक्रम पाहून धनंजयानें त्याच्या तलत्राणाचा छेद केला व त्याला शरांनीं आच्छादित केलें. तेव्हां सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु यांनीं प्रत्येकीं दहा-दहा बाण अर्जुनावर सोडले. तथापि त्या कपिध्वजानें त्या बाणांचें निवारण करून त्यांच्या ध्वजाचा छेद केला, सुधन्व्याचें धनुष्य तोडून टाकिलें, अश्वांचा वध केला आणि शिरस्त्राणासह त्याचें मस्तक तोडून खालीं पाडविलें. सुधन्व्याचा वध होतांच त्याचे अनुचर भयभीत झाले व दुर्योधनाच्या सैन्याकडे पळत सुटले.

राजा, याप्रमाणें अंधकाराचा नाश करणाऱ्या सूर्याप्रमाणें तो सव्यसाची संतप्त होऊन आपल्या शरजालांनीं संशप्तकांच्या सैन्याला पादाक्रांत करीत चालला. तेव्हां तें सैन्य भयभीत होऊन जागजागीं लपून बसलें. अर्जुनानें त्यांच्यावर नतपर्व बाणांचा वर्षाव चालविला असतां त्रस्त झालेले सैनिक मृगसमुदायांप्रमाणें भीतीनें जागच्या जागीं खिळले.

त्यांची ती भयार्त स्थिति पाहून संतप्त झालेला सुशर्मा त्यांस म्हणाला— 'हे वीरांनो, भिऊं नका. तुमच्यासारख्या शूरांना असें भयभीत होणें शोभत नाहीं. सर्व सैन्याच्या समक्ष तुम्हीं कोणत्या घोर शपथा वाहिल्या आहांत, त्या तुम्हांला स्मरत नाहींत काय ? असें असतां आतां रणांगणांतून पलायन

करून दुर्योधनाच्या सैन्याला तुम्ही काय सांगाल ! संग्रामांतून पळून जाण्याचें हीन कर्म केलें असतां सर्व लोक तुमचा उपहास करतील. तस्मात् हे वीरहो, आपापलें अवशिष्ट सैन्य घेऊन तुम्ही रणांगणाकडे परत फिरा."

याप्रमाणें त्याचें भाषण ऐकून ते सर्व संशप्तक, आणि गोपाल व नारायण हे प्रचंड गर्जना व शंखनाद करून आपला उत्साह प्रकट करूं लागले आणि मृत्यु येईपर्यंत समरांगणांतून परत न फिरण्याचा निश्चय करून पुनः युद्ध करण्यास सज्ज झाले. ७. २. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ पार्थाचें संशप्तकांशीं युद्ध. ]

(१) संजय—हे महाराज, संशप्तकगण रणांगणाकडे परत येत आहेत, हें पाहून अर्जुन महात्म्या वासुदेवाला असें म्हणाला—"हे हृषीकेशा, अश्वांना प्रेरणा कर व संशप्तकांवर चाल करून त्यांच्याकडे मला ने. जिवंत असेपर्यंत ते युद्ध सोडणार नाहींत, असें मला दिसतें. आज माझें बाहुबल व घोर अस्त्रबल पहा. पशूंचा संहार करणाऱ्या क्रुद्ध रुद्राप्रमाणें मी आज त्यांना रणांत पाडवीन."

पार्थाचें हें वचन ऐकून कृष्णानें स्मित केलें व अर्जुनाच्या इच्छेप्रमाणें इष्ट स्थलीं त्याचा रथ नेला. त्यावेळीं सर्व रणांगणाला मोहित करणारा त्याचा तो श्रेष्ठ रथ शुभ्र अश्वांनीं जणुकाय आकाशांत उड्डाण करणाऱ्या विमानाप्रमाणें शोभला. पूर्वी देवासुरांच्या युद्धांतील इंद्राच्या रथाप्रमाणें कृष्णानें अनेक मंडलें घेऊन आपला रथ पूर्वस्थलीं आणला.

राजा, त्यानंतर क्रुद्ध झालेल्या नारायणगणांनीं हातांत विविध आयुधें धारण करून धनंजयाला शरजालांनीं आच्छादित केलें आणि एका क्षणांत कृष्णासह त्या कौंतेयाला अदृश्य करून टाकिलें. तें पाहून पार्थाचा उत्साह द्विगुणित झाला. त्यानें आपलें धनुष्य हातीं घेतलें, देवदत्त शंख वाजविला आणि शत्रूंचा संहार करणाऱ्या 'त्वाष्ट्र' अस्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्रप्रभावानें संशप्तकांस परस्परांचें रूप अर्जुनासारखें दिसूं लागलें. त्यांना सहस्रावधि अर्जुन सर्वत्र पसरलेले दिसले. ते मायेनें भ्रांत झाले आणि परस्परांस अर्जुन

समजून संहार करीत सुटले. 'हा अर्जुन आहे' 'हा पहा गोविंद, हे दोघे कृष्णार्जुन' असें म्हणत मूढ झालेले ते परस्परांचाच वध करूं लागले. अशा प्रकारें त्या दिव्य अस्त्रानें मोहित झालेले संशप्तक परस्परांच्या हातून नाश पावले. त्यावेळीं रणांगणांत क्षतांनीं विह्वल होऊन पडलेले योद्धे प्रफुल्ल पलाश-वृक्षाप्रमाणें शोभले. त्या अस्त्रानें त्यांच्या सहस्रावधि शरांना भस्मसात् करून त्या वीरांना यमसदनीं पाठवून दिलें.

याप्रमाणें नारायणगणांचा क्षय केल्यावर पार्थानें हास्य करून ललित्थ, मावेल्लक, मालव, त्रिगर्त व यौधेय यांसहि शरजालांनीं आच्छादित केलें. तो वीर त्यांच्यावर शरवृष्टि करीत असतां कालानेंच ज्यांना प्रेरणा केली होती, त्या क्षत्रियांनीं पार्थावर नानाप्रकारचें शरजाल सोडून त्याला आच्छादित केलें. त्यामुळें अर्जुन, त्याचा रथ, ध्वज किंवा केशव यांतील कोणीहि दिसेना. त्या घोर बाणवृष्टीनें ते सर्व झांकून गेले. तेव्हां कृष्णार्जुन हत झाले, असें समजून ते आनंदानें गर्जना करूं लागले. अनेक जयसूचक वाद्यें वाजूं लागलीं व सिंह-नादाचा प्रचंड ध्वनि उठला.

तेव्हां खिन्न झालेला कृष्ण अर्जुनाला म्हणाला—"हे पार्था, तूं कोठें आहेस! तूं मला कोठें दिसत नाहींस! हे वीरा, तूं जिवंत तरी आहेस ना!"

कृष्णाचें तें वचन कानीं पडतांच धनंजयानें मोठ्या त्वरेनें वायव्यास्त्र सोडून त्या शरजालाचें निवारण केलें. त्या अस्त्राच्या प्रभावानें प्रचंड वायु उत्पन्न होऊन त्यानें संशप्तक गणांस त्यांच्या रथाश्वांसह शुष्क पर्णाप्रमाणें उडवून दिलें. वायूनें ते वीर उडत असतां वृक्षांवरून उडणाऱ्या पक्षिसमुदाया-प्रमाणें शोभले. याप्रमाणें शत्रूंची वाताहत केल्यावर अर्जुनानें अर्धचंद्राकृति बाणांचा वर्षाव करून शत्रूंच्या सैन्याला छिन्न-भिन्न करून टाकिलें. मृत झालेल्या शत्रुसैन्यानें तें रणांगण व्यापून गेलें. सर्वत्र मृत देहांच्या राशी व सैनिकांचे विविध अवयव तुटून पडल्यामुळें त्या रणभूमींत संचार करणेंहि दुष्कर झालें. तथापि त्या भयानक रणक्षेत्रांत अर्जुन निर्भयपणें फिरत होता. त्यावेळीं प्रलयकालीं प्राणांचा संहार करणाऱ्या रुद्राप्रमाणें तो पार्थ अतिशय उग्र दिसूं लागला. पार्थाकडून वध पावणारे ते संशप्तक इंद्रलोकांतील आतिथ्याला प्राप्त होत होते. वध पावलेल्या शत्रूंच्या प्रेतांनीं ती भूमि सर्वत्र व्यापिली होती.

याप्रमाणें अर्जुनाचें संशप्तकांशीं युद्ध चालू असतां दुसरीकडे द्रोणाचार्यांनें व्यूह रचून धर्मराजावर चाल केली. तेव्हां पांडवांचे वीरहि आपल्या सैन्याची उत्तम रचना करून त्वरेनें पुढें सरसावून युधिष्ठिराचें रक्षण करूं लागले व त्यांचें द्रोणाचार्यांशीं तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. ७. २. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ कौरवांच्या सुपर्णव्यूहाचें वर्णन. २ धर्म-धृष्टद्युम्नसंवाद. ३ युद्धारंभ. ]

संजय—हे राजेंद्रा, ती रात्र संपल्यावर महारथ भारद्वाजानें सुयोधनाशीं बराच वेळ भाषण केलें. नंतर पार्थानें संशप्तकांशीं युद्ध करण्याचें ठरवून तो निघून गेला व द्रोणानें आपल्या सैन्याची व्यूहरचना करून धर्मराजास जिवंत धरण्याच्या इच्छेनें पांडवांच्या प्रचंड सैन्यावर चाल केली. द्रोणानें कौरवसैन्य सुपर्णाकार रचलेलें पाहून युधिष्ठिरानें पांडवसैन्याचा अर्धवर्तुला-कार प्रतिव्यूह रचिला. सुपर्णव्यूहाच्या मुखप्रदेशीं महारथ भारद्वाज स्वतः उभा राहिला. शिरोभागीं राजा दुर्योधन, भ्राते व अनुयायी यांसह स्थित होता. दोन नेत्रांच्या जागीं कृतवर्मा व वीराग्रणी कृपाचार्य हे उभे राहिले. भूतशर्मा, क्षेमशर्मा, करकाक्ष, कलिंग, सिंहल, प्राच्य, शूर आभीर, दशेरक, शक, यवन, कांबोज, हंसपथ, शूरसेन, दरद, मत्स्य व केकय हे आपल्या गजाश्वयुक्त सैन्यासह मानेच्या स्थानीं स्थित झाले. भूरिश्रवा, सोमदत्त, शल्य व बाल्हीक हे वीर अक्षौहिणी सेनेसह उजव्या बाजूला उभे राहिले. विंदानुविंद हे दोघे आवंत्य राजे, काम्बोज व सुदक्षिण यांनीं द्रोणपुत्राचा आश्रय करून डावी बाजू संभाळली. कलिंग, अम्बष्ठ, मागध, पौंड्र, मद्रक, गांधार, शकुन, प्राच्य, पर्वतेय व वसाति हे पृष्ठभागीं होते. आपले पुत्र, ज्ञाति-बांधव व प्रचंड सैन्य बरोबर घेऊन वैकर्तन कर्ण पुच्छाच्या जागीं स्थित झाला. जयद्रथ, भीमरथ, संपाति, ऋषभ, जय, भूमिंजय, वृषक्राथ व महाबलाढ्य नैषध हे प्रचंड सैन्यें घेऊन ब्रह्मलोकप्राप्तीसाठीं सज्ज झाले. ते सर्व युद्धविशा-रद वीर गरुडाच्या वक्षःस्थलीं स्थित झाले.

हे महाराज, याप्रमाणें द्रोणानें रचिलेला तो व्यूह पदाति व गजाश्व यांनीं युक्त होता. तो वाऱ्यानें खवळलेल्या समुद्राप्रमाणें भासत होता. ग्रीष्म ऋतूच्या शेवटीं विद्युल्लतेनें युक्त असलेले मेघ जसे गर्जना करीत आकाशांत जमा होतात,

तसे त्या व्यूहांतील भिन्न भिन्न भागांतून अनेक योद्धे आपलीं चकचकीत आयुधें उगारून गर्जना करीत फिरत असलेले दिसत होते. त्या सैन्यांत प्राग्जोतिषाधिपाचा शृंगारलेला गज उभा असून तो उदयाचलीं असलेल्या दिनकराप्रमाणें झळकत होता. त्या गजावर पुष्पमालांनीं भूषविलेलें छत्र धरलें असून तें कार्तिकी पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें शोभत होतें. काजळाच्या राशीप्रमाणें असलेला तो नीलवर्ण मदान्ध गज, महामेघांनीं अतिवृष्टि केलेल्या प्रचंड पर्वताप्रमाणें भासला. नानाविध आयुधें व भूषणें धारण केलेले ते नानादेशांतील पर्वतवासी नृपति त्या गजाच्या सभोंवार उभे असल्यामुळें तो गजराज देवगणांनीं परिवेष्टित असलेल्या इंद्राप्रमाणें शोभला.

( २ ) अशा प्रकारचा तो अतिमानुष व्यूह पाहून धर्मराज धृष्टद्युम्नास म्हणाला—"हे पारावताश्वा, ज्यायोगें मी त्या ब्राह्मणाच्या हातीं सांपडणार नाहीं, अशाप्रकारची कांहीं योजना कर."

धृष्टद्युम्न—हे सुव्रता, द्रोणाचार्यांनें कितीहि यत्न केला तरी तूं त्याच्या स्वाधीन होणार नाहींस. मी आज द्रोणाचें त्याच्या अनुचरांसह निवारण करीन. हे धर्मराजा, मी जिवंत असतां तूं यत्किंचित्हि उद्विग्न होऊं नकोस. रणामध्यें मला जिंकण्यास द्रोण कदापि समर्थ होणार नाहीं.

(३) संजय—राजा धृतराष्ट्रा, असें बोलून तो द्रुपदाचा बलाढ्य पुत्र धृष्टद्युम्न बाणांचा वर्षाव करीत द्रोणावर धांवून गेला. ज्याचें दर्शनच उग्र आहे, अशा त्या पांचालास पाहून द्रोणाचा आनंद मावळला. इतक्यांत तुझ्या दुर्मुख पुत्राचें त्याच्याकडे लक्ष जाऊन त्यानें द्रोणाचें प्रिय करण्याच्या हेतूनें धृष्टद्युम्नाचें निवारण केलें. त्यावेळीं पार्षत आणि दुर्मुख या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. पार्षतानें शरवृष्टीनें तुझ्या पुत्रास आच्छादित केलें व द्रोणाचेंहि निवारण केलें. तेव्हां दुर्मुखानें असंख्य बाणांचा वर्षाव करून धृष्टद्युम्नास त्रस्त करून सोडलें.

याप्रमाणें तो कौरव व पांचाल यांचें युद्ध जुंपलें असतां द्रोणानें शरवृष्टीनें युधिष्ठिराचें सर्व सैन्य उधळून लाविलें. त्यावेळीं वायूनें उडवून दिलेल्या मेघाप्रमाणें युधिष्ठिराचें सैन्य विस्खलित झालें. युद्धाला आरंभ झाल्यावर मुहूर्तमात्र सर्व सैन्यें व्यवस्थित दिसत होतीं, परंतु नंतर त्यांची व्यवस्था सुटून ती सेना अमर्याद झाली. त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. आपले कोण व परकीय कोण, हें ओळखूं येईनासें झालें. अनुमान व संज्ञा यांवरून ते परस्परांशीं युद्ध

करूं लागले. रणांगणांत पडलेले वीरांचे विविध रत्नभूषित अलंकार व ध्वज-पताका यांच्या योगानें तें रणक्षेत्र बलाकांनीं व्यापलेल्या आकाशाप्रमाणें शोभलें. ती समरभूमि वीरांचीं शरीरें व पशूंचे मृतदेह यांनीं व्यापली होती. तेथें रक्त, मांस व मज्जा यांचा चिखल झाला होता. तथापि ते शूर सैनिक श्रांत न होतां युद्ध करीत होते. त्यांतील एकहि वीर खिन्न झाला नाहीं. अशाप्रकारें तें घोर युद्ध चालू असतां द्रोणानें शत्रूला चकित करून अकस्मात् युधिष्ठिरावर चाल केली. ७. २. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ द्रोणाचा पराक्रम. २ वृक सत्यजित व शतानीक, यांचा वध. ३ पांडवसेना पराभव. ]

( १ ) संजय—हे राजन्, द्रोण समीप येऊन पोंचला आहे, हें पहातांच युधिष्ठिरानें निर्भयपणें त्याच्यावर असंख्य शरांचा वर्षाव केला. त्यावेळीं पांडव-सेनेंत मोठा हाहाकार उडाला. महासिंह गजाला धरावयास आला असतां हत्तीच्या कळपांत जसा गोंधळ उडतो, तसा द्रोणाला पाहून पांडवसेनेंत हाहाकार झाला.

आचार्य युधिष्ठिरावर चाल करून येत आहे, हें पहातांच सत्यविक्रम सत्य-जित द्रोणावर धांवला. त्यावेळीं आचार्य व पांचाल्य यांचें युद्ध जुंपलें असतां इंद्र-विरोचनाच्या युद्धप्रसंगाप्रमाणें सर्व सैन्य क्षुब्ध झालें. सत्यजि-तानें तीक्ष्ण धारेच्या श्रेष्ठ अस्त्रानें द्रोणाला विद्ध केलें. सर्वोत्तम विषारी बाण सोडून त्याच्या सारथ्याला मूर्च्छित केलें. अश्वांवर दहा बाण सोडले, पार्ष्णिसारथ्यांसहि विद्ध केलें आणि द्रोणाचार्यांच्या ध्वजाचा छेद केला.

त्याचा हा पराक्रम पाहून आचार्यानें मोठ्या त्वरेनें त्याच्या धनुष्याचा छेद करून त्याला मर्मांतक शरानें विद्ध केलें. तथापि त्या वीरानें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन द्रोणावर कंकपत्रयुक्त बाण सोडले. तेव्हां सत्यजित द्रोणास त्रस्त करीत आहे, हें पहातांच पंचालपुत्र वृकानें द्रोणावर शेंकडों शरांची वृष्टि केली. शरजालानें द्रोण आच्छादित झालेला आहे, हें पाहून पांडव आनंदानें

---

१ या पुढील रणांगणाचें वर्णन व नदीचें रूपक पूर्वी अनेकदा येऊन गेलेलें असल्यामुळें तें येथें सोडून दिलें आहे.

वर्खे फडकावूं लागले. वृकानें द्रोणाच्या वक्षःस्थलावर साठ बाण सोडून विस्मयकारक युद्ध केलें. याप्रमाणें सत्यजित व वृक यांनीं आचार्यास कांहीं काल त्रस्त केलें असतां द्रोणानें त्या दोघांचींहि धनुष्यें छेदून टाकिलीं व वृकाचे अश्व आणि सारथि यांचा वध करून त्याचाहि शिरश्छेद केला.

( २ ) वृक पडलेला पहातांच सत्यजितानें दुसरें धनुष्य घेतलें व शरवृष्टीनें द्रोणाचे अश्व, ध्वज आणि सारथि यांस विद्ध केलें.

याप्रमाणें त्या पांचालानें त्रस्त केलें असतां द्रोणानें त्याच्या वधार्थ बाण सोडिला. अनेक शरांची वृष्टि करून त्याचे अश्व, ध्वज व सारथि यांना व्यापून टाकिलें. त्याच्या धनुष्याचा अनेकदा छेद केला. तरीहि तो दिव्यास्त्रवेत्ता सत्यजित द्रोणाशीं युद्ध करीत होता. शेवटीं आचार्यानें अर्धचंद्रबाणानें त्या महात्म्याच्या मस्तकाचा छेद केला.

पांचालाचा महारथ सत्यजितहि युद्धांत पडलेला पाहून युधिष्ठिर द्रोणाच्या भीतीनें तेथून दूर गेला व पंचाल, केकय, मत्स्य, चेदि, कारूष, कोसल इत्यादि सर्व नृपति युधिष्ठिराच्या संरक्षणासाठीं द्रोणाचें निवारण करण्यास पुढें सरसावले. त्यानंतर युधिष्ठिराला धरण्याची इच्छा करणाऱ्या आचार्यानें कापसाच्या राशीला उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें सर्व शत्रुसैन्य उधळून लाविलें. याप्रमाणें द्रोणाचार्य सैन्याला दग्ध करीत असतां विराटाचा अनुज शतानिक मोठ्या धैर्यानें द्रोणावर धांवला. त्यानें सूर्यतुल्य उज्ज्वल बाणांनीं द्रोणास त्याचा सारथि व अश्व यांसह विद्ध केलें व आचार्यास शरवृष्टीनें झांकून टाकिलें. परंतु द्रोणाचार्यानें एकाच क्षुरप्र बाणानें शतानिकाचें कुंडलयुक्त मस्तक तोडून टाकिलें. तें पहातांच मत्स्यवीरांनीं तेथून पलायन केलें.

( ३ ) याप्रमाणें मत्स्यांना जिंकल्यावर भारद्वाजानें चेदि, करूष, केकय, पंचाल, सृंजय व पांडव या सर्वांस पुनः पुनः जिंकलें. तेव्हां अग्नीप्रमाणें संतप्त होऊन सैन्याला दग्ध करणाऱ्या आचार्यास पाहून सृंजयांचा थरकांप झाला. द्रोणानें आपलें उत्कट शौर्य प्रकट करून शत्रुसैन्याचा संहार चालविला. त्यावेळीं अतिशय वेगानें संचार करणाऱ्या द्रोणाच्या ध्वजावरील वेदी हिमालयाच्या शिखराप्रमाणें शोभत होती. ज्याला देवासुर वंदन करितात त्या विष्णूनें पूर्वीं असुरसमुदायांचा जसा संहार केला होता, तसें भारद्वाजानें पांडवसेनेचें कदन आरंभिलें. त्या सत्यप्रतिज्ञ प्राज्ञानें तेथें रक्ताची भीषण नदीच निर्माण केली.

याप्रमाणें महारथ भारद्वाज कृतान्त कालाप्रमाणें सैन्याला दग्ध करीत असतां पांडवांचे प्रमुख वीर त्याच्यावर चाल करून गेले आणि त्यांनीं एकत्र जमून आपल्या उष्ण किरणांनीं पृथ्वीला तप्त करणाऱ्या सूर्याप्रमाणें असलेल्या द्रोणाचार्यांचें निवारण आरंभिलें. ते वीर द्रोणावर चाल करून गेले असतां तुझ्या पक्षांतील राजे व राजपुत्र यांनीं आचार्यांचें सर्वतः संरक्षण केलें.

हे महाराज, त्यानंतर शिखंडी, क्षत्रवर्मा, वसुदान, उत्तमौजा, क्षत्रदेव, सात्यकि, युधामन्यु, युधिष्ठिर, धृष्टद्युम्न व चेकितान या सर्वांनीं एकाच वेळीं आचार्यांवर विपुल बाणांचा वर्षाव केला. ते सर्व वीर शरांची वृष्टि करीत असतां द्रोण मदोन्मत्त गजाप्रमाणें खवळून पुढें सरसावला. त्यानें प्रथम रथ-समुदायाचें उल्लंघन करून दृढसेनास गतप्राण केलें. क्षेमराजाचा वध करून त्याला तत्काल खालीं पाडविलें व तो वृद्ध आचार्य सैन्याच्या मध्यभागीं स्थित होऊन स्वतःचें संरक्षण करूं लागला. त्याला अन्य संरक्षकांची अपेक्षा नव्हती. तोच उलट इतरांचें रक्षण करण्यास समर्थ होता. नंतर द्रोणानें शिखंडीवर बारा व उत्तमौजावर वीस बाण सोडले आणि एका अर्धचंद्राकार बाणानें वसुदानास यमसदनीं पाठवून दिलें. क्षत्रवर्मा व सुदक्षिण यांना अनेक बाणांनीं विद्ध केलें, भल्लबाण सोडून क्षत्रदेवास खालीं पाडविलें, युधामन्यु व सात्यकि यांस शरांनीं विद्ध केलें व शेवटीं युधिष्ठिरावर चाल केली.

तेव्हां तो ज्येष्ठ पांडव वेगवान् अश्वांना प्रेरणा करून आचार्यांपासून दूर पळाला आणि पांचाल्यानें द्रोणाचा निरोध केला तथापि द्रोणानें त्याचें धनुष्य तोडून त्यास अश्व व सारथि यांसह गतप्राण करून रथावरून खालीं पाडविलें. पांचालांचा तो यशस्वी राजपुत्र हत होऊन पडला असतां पांडवसैन्यांतून 'द्रोणाचा वध करा, द्रोणाचा वध करा' असा एकच शब्द उठला.

पंचाल, मत्स्य, केकय, सृंजय व पांडव हे सर्व क्षुब्ध होऊन युद्ध करीत असतां द्रोणानें त्यांस अतिशय त्रस्त केलें. त्या आचार्यानें सात्यकि, चेकितान, धृष्टद्युम्न, शिखंडी, वार्धक्षेमि, चैत्रसेनि, सेनाबिंदु, सुवर्चा, व इतरहि नानादेशांतील भूपतींचा पराभव केला. तुझ्या पक्षांतील सैनिकांस अशा प्रकारें जय प्राप्त झाला असतां दाही दिशांत पळणाऱ्या पांडवसेनेचा तुझे सैनिक संहार करूं लागले. इंद्राकडून वध पावणाऱ्या दानवाप्रमाणें पंचाल, केकय व मत्स्य यांचा द्रोणापुढें थरकांप झाला. ७. २. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. संजयाचें उत्तर. २ दुर्योधन-कर्णसंवाद. ]

**धृतराष्ट्र**—हे संजया, भारद्वाजानें पांडवांचें आणि पंचालांचें सैन्य भग्न केलें असतां त्यांतील एक तरी वीर परत फिरला किंवा नाहीं! प्राण जाईपर्यंत युद्ध करणें हेंच क्षत्रियांना यशस्कर आहे. श्रेष्ठ पुरुष नेहमीं असेंच आचरण करीत असतात. परंतु हीन पुरुषाकडून त्याच्या विपरीत वर्तन घडत असतें. सैन्याचा पराभव झाला असतांहि जो वीर रणांगणांतून परत फिरत नाहीं तोच खरा शूर होय. द्रोणाच्या पुढें उभा राहील, असा पांडवाकडे कोणता पुरुष आहे! अरे, तो भारद्वाज व्याघ्राप्रमाणें जांभई देत असतो. तो गजाप्रमाणें मदोन्मत्त आहे, युद्धांत प्राणांचीहि पर्वा न करणारा, विचित्र युद्ध करणारा, धनुर्धर व शत्रूला भयप्रद आहे. तो दुर्योधनाच्या हितांत तत्पर असतो. त्या सत्यप्रतिज्ञ नरव्याघ्राला सैन्याच्या अग्रभागीं स्थित झालेला पाहून पांडवांचे कोणते शूर योद्धे युद्धापासून निवृत्त झाले, तें मला सांग.

**संजय**—हे महाराज, द्रोणाचार्यांच्या शरवृष्टीनें पंचाल, पांडव, मत्स्य, सृंजय, चेदि व केकय हे वीर भयभीत होऊन युद्ध सोडून पलायन करूं लागले. तेव्हां नदीच्या प्रवाहानें वाहून जाणाऱ्या नावेप्रमाणें ते योद्धे द्रोणाच्या वेगवान् शरप्रवाहानें वाहून जात आहेत, असें पाहून दुर्योधनानें हर्षातिशयानें सिंहनाद केला, अनेक रणवाद्यें वाजविलीं आणि रथ, गज, पदाति इत्यादि सैन्यासह शत्रूला चोहोंकडून वेढून टाकिलें. नंतर तो राजा आपल्या सैन्याच्या मध्यभागीं उभा राहून हृष्ट चित्तानें हंसतच कर्णाला असें वचन बोलला—

( २ ) **दुर्योधन**—हे राधेया, द्रोणांच्या बाणांनीं या पंचालांना कसें पळवून लाविलें आहे, पहा! वन्यपशूंना भयभीत करणाऱ्या सिंहाप्रमाणें आचार्यांनीं त्यांना त्रस्त करून सोडलें आहे. मोठाले वृक्ष मोडून पाडणाऱ्या वायूप्रमाणें भारद्वाजानें त्यांची वाताहत उडवून दिली आहे. आतां पुनः ते युद्धाची इच्छा करणार नाहींत, असेंच मला वाटतें. हे पहा, कांहीं सैनिक सांपडेल त्या मार्गानें पळत सुटले आहेत. अग्नीनें परिवेष्टित झालेल्या गजाप्रमाणें कित्येक योद्धे मंडलाकार जमा झाले आहेत. कौरवांनीं वेढल्या-

मुळें ते आपला मार्ग काढण्यास असमर्थ झाले आहेत. भ्रमरांच्या दंशाप्रमाणें तीक्ष्ण शरांच्या वेदनांनीं व्याकुल झालेले अनेक योद्धे पळत आहेत. पलायनपरायण झालेले ते मार्गांत एकमेकांच्या अंगावर पडत आहेत.

हे कर्णा, हा महाक्रोधी भीमसेन पहा! सर्व पांडव व सृंजय सोडून गेल्यामुळें माझ्या सैनिकांनीं त्याला सर्वतः वेढलें आहे. त्याला असा दीन झालेला पाहून मला अतिशय संतोष वाटत आहे. त्या असहाय दुर्मतीला आज सर्व जगत् द्रोणमय दिसत असेल व तो अविचारी पांडव स्वतःचें जीवित व राज्य याविषयीं पूर्णपणें निराश झाला असेल, यांत संशय नाहीं.

कर्ण—हे राजेंद्रा, तो महाबाहु भीमसेन जिवंत असेपर्यंत कदापि युद्धपराङ्मुख होणार नाहीं. आपला सिंहनाद त्याला सहन होणार नाहीं. किंवा तुझ्या म्हणण्याप्रमाणें पांडवांचा पराभवहि होणार नाहीं. ते सर्व शूर, बलाढ्य, अस्त्रवेत्ते व युद्धदुर्मद आहेत. आपण विषप्रयोग, अग्नि, वनवास व द्यूत यांच्या योगानें त्यांना जे क्लेश दिले, त्यांचें त्यांना स्मरण आहे. तें सर्व स्मरणारे पांडव युद्धांपासून निवृत्त होतील, असें मला वाटत नाहीं.

वृकोदर अमित पराक्रमी आहे, तो मोठमोठ्या महारथांना भग्न करील. तो एकदा क्रुद्ध झाला म्हणजे हत्ती, रथ, मनुष्य जें कांहीं हातीं सांपडेल, तें आपल्या सैन्यावर फेंकीत सुटेल. तो वृकोदर आपल्या लोहदंडमय गदाप्रहारानें सैन्याचा समुदाय नष्ट करून टाकील. ते पहा सात्यकिप्रभृति योद्धे इकडे येत आहेत. क्षुब्ध झालेल्या भीमाच्या आज्ञेवरूनच हे पंचाल, केकय, मत्स्य परत फिरून त्या पांडवाला अनुसरत आहेत. त्या वायुसुताच्या संरक्षणासाठीं ते सर्व सूर्यापुढें येणाऱ्या मेघाप्रमाणें द्रोणावर चोहोंकडून चालून येत आहेत.

हे दुर्योधना, मुमूर्षु पतंग जसे दीपावर झडप घालतात, तसे ते दृढनिश्चयी वीर आचार्यांवर धांवून जात आहेत. युद्धाची दीक्षा घेतलेल्या आचार्यांच्या रक्षणास त्याच्या समीप कोणी नसल्यामुळें शत्रु निःसंशय त्याला त्रस्त करील. पांडव श्रेष्ठशस्त्रवेत्ते आहेत, ते द्रोणाचेंहि निवारण करण्यास निःसंशय समर्थ आहेत. आचार्य संकटांत सांपडला आहे, असें मला वाटतें. गजेंद्राचा वध करणाऱ्या क्षुद्र वृकाप्रमाणें हे पांडव आचार्यांचा वध न करोत. हे राजन्, यास्तव जेथें आचार्य उभा आहे, तेथेंच आपण सत्वर जाऊं या.

संजय—राजा, राधेयाचें हें भाषण ऐकतांच, दुर्योधन आपल्या भ्रात्यांसह

द्रोणाच्या रथासमीप आला. त्यावेळीं एकट्या असलेल्या द्रोणाचार्यांचा वध करूं इच्छिणाऱ्या पांडवसेनेनें तेथें मोठाच संग्राम चालविला होता. ७. २. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ पांडववीरांच्या अश्व-ध्वजांचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, भीमसेनादि जे प्रमुख पांडववीर द्रोणावर चालून गेले, त्या सर्वांच्या रथचिह्नांचें वर्णन सविस्तर कर. तें ऐकूं दे.

संजय—हे महाराज, भीमसेनाच्या रथाचे अश्व अस्वलाप्रमाणें काळे होते. भीमसेन द्रोणावर चाल करून जात आहे, हें पहातांच सात्यकिहि शुभ्र अश्वांच्या रथांत बसून त्याला अनुसरला. अजिंक्य युधामन्यु सारंग पक्ष्याच्या वर्णासारख्या अश्वांनीं युक्त असलेल्या रथांतून निघाला. त्यांना पाहून धृष्टद्युम्नहि रणांगणाकडे परत फिरला. त्याच्या रथाचे अश्व पारव्या रंगाचे होते. क्षत्रवर्मा आपल्या आरक्त वर्णाच्या अश्वांना प्रेरणा करून निघाला. शिखंडीचा पुत्र क्षत्रदेव पुढें सरसावला. त्याच्या रथाचे अश्व कमलपत्रासारखे होते. नकुलाचे अश्व कांबोज देशांतील होते. मेघवर्ण अश्वांच्या रथांत बसून उत्तमौजा द्रोणाचार्यांकडे आला. सहदेवाचे अश्व तित्तिर पक्ष्यासारखे होते.

युधिष्ठिराच्या रथाचे अश्व हस्तिदंतासारखे असून त्यांचीं पुच्छें मात्र काळीं होतीं. त्याचे ते वेगवान् अश्व पुढें निघालेले पहातांच सर्व सैन्यें सज्ज होऊन युधिष्ठिराला अनुसरलीं. द्रुपदाच्या अश्वांच्या भालप्रदेशीं नक्षत्रासारखा तिलक शोभत होता. अशा श्रेष्ठ रथांत बसून द्रुपदराजा सर्व नृपतींच्या मध्यभागीं निर्भयपणें चालला होता. याच्या मागोमाग विराट, केकय, शिखंडी व धृष्टकेतु आपापल्या सैन्यासह जात होते.

विराटाचे अश्व पाटलिपुष्पाच्या वर्णाचे होते. केकयाधिपांचे अश्व इंद्रगोप कीटकाप्रमाणें तांबड्या रंगाचे होते. त्यांचे ध्वजहि लाल रंगाचेच होते. शिखंडीला तुंबुरूनें दिलेले अश्व भुरकट रंगाचे होते. बाह्लीक देशांतील अश्व शिखंडीच्या पुत्राला त्वरेनें घेऊन आले. प्रतिविंध्याचे अश्व शुभ्र असून त्यांची मान काळी होती. अर्जुनाचा पुत्र सुतसोम [१]पिंगट वर्णाच्या अश्वांच्या रथांतून तेथें आला. पूर्वीं इंद्रप्रस्थांत सोमयाग चालला असतां सहस्रचंद्राप्रमाणें

---

१ या वर्णनाचा येथें संक्षेप केला आहे.

आल्हादकारक असलेला हा पुत्र जन्म पावला. म्हणून त्याचें नांव सुतसोम असें ठेवण्यांत आलें.

शतानीकाचे अश्व बालरवीप्रमाणें होते. द्रौपदीच्या पांच पुत्रांचे अश्व मयूराच्या कंठाप्रमाणें शोभत होते. अभिमन्यूचे अश्व कपिल वर्णाचे होते. तुझा पुत्र युयुत्सु आपल्या पिंगट वर्णाच्या अश्वांसह रणांगणांत आला. वार्धक्षेमि कृष्णवर्ण अश्व घेऊन त्वरेनें पुढें झाला. राजा, याप्रमाणें पांडवांच्या मुख्य मुख्य वीरांच्या अश्वांचें वर्णन मीं तुला सांगितलें. याशिवाय दुसरे असंख्य राजे व राजपुत्र आपले नानादेशांतील चित्र-विचित्र व श्रेष्ठ अश्व जोडलेल्या रथावर आरूढ होऊन त्या रणांगणांत उपस्थित झाले.

हे महाराज, पूर्वी श्रीकृष्णानें पांड्य देशांतील ‘कपाट-’नामक नगरी त्याच्या पुत्रानें उध्वस्त केली व तेथील सागर ध्वजाच्या पित्याचा वध केला. तेव्हां त्याचे सर्व बांधव पळून गेले. त्या कठिण प्रसंगीं त्या राजपुत्रानें भीष्म, द्रोण, परशुराम व कृपाचार्य यांच्यापासून अस्त्रविद्या संपादन केली आणि तो कृष्ण, अर्जुन व रुक्मी यांच्यातुल्य अस्त्रकुशल झाला. याप्रमाणें समर्थ झाल्यावर त्याला समग्र पृथ्वी जिंकावी व पित्याचा सूड उगविण्यासाठीं द्वारका नगरी उध्वस्त करावी, अशी इच्छा झाली. तथापि त्याच्या सुहृदांनीं हितबुद्धीनें त्याचें निवारण केलें. तेव्हां वैरभाव टाकून जो शांत चित्तानें राज्य करूं लागला. तो पराक्रमी सागरध्वज वैदूर्य रत्नांच्या जाळीनें ज्यांचें शरीर आच्छादित केलें आहे, अशा श्रेष्ठ अश्वांनीं युक्त असलेल्या रथांतून द्रोणावर चालून आला. त्या पांड्यराजाला जें सैन्य अनुसरलें, त्यांत एक लक्ष व चाळीस हजार मुख्य रथ असून त्या सर्वांस शुभ्र अश्व जोडिले होते.

घटोत्कचाच्या रथाचे अश्व भिन्न भिन्न रंगाचे होते. बृहंताच्या रथाला अरट्ट देशचे अश्व जोडले होते. या शिवाय शेंकडों प्रभद्रक निरनिराळ्या रंगाच्या अश्वांनीं युक्त असलेल्या रथांतून तेथें आले. भीमाच्या सेनापत्याखालीं जमलेले ते सर्व वीर इंद्राच्या प्रमुखत्वाखालीं जमा झालेल्या देवांप्रमाणें शोभले.

भारद्वाजाचा ध्वज कृष्णाजिनयुक्त असून त्यावर सुवर्णाचा पवित्र कमंडलु झळकत होता. भीमाच्या ध्वजावर सिंहाचें चिह्न होतें. युधिष्ठिराचा सुवर्णमय ध्वज

चंद्राप्रमाणें प्रकाशत होता. धर्मराजाच्या या ध्वजावर 'नंद व उपनंद' नामक दोन प्रचंड मृदंग होते. यंत्रयोजनेनें ते वाजत असत व त्यांचा मधुर ध्वनि सैन्याला उत्साह देत असे. नकुलाच्या ध्वजावर भयोत्पादक शरभाचें चिह्न होतें. सहदेवाचा ध्वज पताकांनीं अलंकृत असून त्यावर हंसाचें चिह्न होतें. द्रौपदेयांच्या ध्वजांवर यम, वायु, इंद्र व दोन अश्विनीकुमार यांच्या प्रतिमा होत्या. अभिमन्यूचा ध्वज शार्ङ्गपक्ष्याच्या चिह्नानें भूषित होता. घटोत्कचाच्या ध्वजावर गृध्रपक्षी झळकत होता. प्राचीन रावणाच्या अश्वाप्रमाणेंच या हैडिंबाचे अश्वहि इच्छागामी होते.

धर्मराजानें माहेंद्र धनुष्य धारण केलें होतें. भीमाचें वायव्य धनुष्य अलौकिक होतें. ब्रह्मदेवानें त्रैलोक्याच्या संरक्षणासाठीं निर्माण केलेलें गांडीव तर प्रसिद्धच आहे. तें कधींहि जीर्ण न होणारें दिव्य धनुष्य अर्जुनाच्या हातीं होतें. नकुलाचें वैष्णव व सहदेवाचें आश्विन हीं श्रेष्ठ धनुष्यें होतीं. घटोत्कचाचें 'पौलस्त्य' अमानुष कर्म करणारें व भयानक आहे. द्रौपदेयांचीं रौद्र, आग्नेय, कौबेर, याम्य व गिरिश या नांवांचीं पांच धनुष्यरत्नेंच होतीं. रोहिणीपुत्र बलरामाला जें रौद्र नामक धनुष्य प्राप्त झालें होतें, तें त्यानें अभिमन्यूला मोठ्या प्रेमानें अर्पण केलें होतें.

हे महाराज, पांडवाप्रमाणें द्रोणाच्या सैन्यांतहि असंख्य रथ-ध्वजांची गर्दी झाली होती. त्या सैनिकांत एकहि भीरु नव्हता. त्यावेळीं पांडवांनीं चाल केली असतां कौरवसैन्य भ्रांत न होतां चित्राप्रमाणें स्थिर राहिलें. स्वयंवरप्रसंगीं ज्या उल्हासानें वीर पुढें सरसावतात, अशाच उत्साहानें ते सर्व योद्धे द्रोणावर चालून जात असतां आपापलें नाम-गोत्र परस्परांस ऐकवीत होते. ७. २. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ धृतराष्ट्राचा विलाप. ]

(१) धृतराष्ट्र—संजया, वृकोदरादि जे प्रमुख नृपाल पुनः समरांगणाकडे वळले, त्या सर्वांचें सामर्थ्य विलक्षण आहे, यांत संशय नाहीं. देवांच्या सैन्यालाहि व्यथित करण्यास ते समर्थ आहेत, मग आमची काय कथा !

खरोखर पुरुष आपल्या पूर्वकर्मासह उत्पन्न होत असतो व त्याच्या जीवितांतील सर्व घडामोडी त्या दैवानुसार घडत असतात, असाच प्रत्यय येत असतो. हा युधिष्ठिरच पहा, जटा-वल्कलें परिधान करून दीर्घकाल अरण्यांत जाऊन राहिला. त्यानें अज्ञातवासहि सहन केला. पण तोच आतां प्रचंड सैन्य घेऊन रणांगणांत उभा राहिला आहे. हा दैवदुर्विलासच होय. त्याचप्रमाणें माझ्या पुत्रानें जें राज्य भोगलें तेंहि दैवयोगानेंच घडून आलें.

खरोखर मनुष्य आपल्या संचितकर्मासह जन्म घेत असतो व त्या दैवाप्रमाणेंच सर्व गोष्टी घडत असतात. त्या त्याच्या इच्छेप्रमाणें घडत नसतात. या युधिष्ठिरानें पूर्वी द्यूतादि संकटांत सांपडून सर्व क्लेश सहन केले व तोच आज दैवाच्या अनुकूलतेनें सहायसंपन्न झाला आहे. ही सर्व दैवाचीच लीला आहे.

अरे अरे, मी दुर्योधनाच्या वचनावर व्यर्थ विश्वास ठेविला. तो माझा मंदमति पुत्र मला सांगत असे कीं, आज केकय आपल्या पक्षाला मिळाले, आज काशिक व कोसल वश झाले, चेदी, वंग व इतरहि राजे माझ्याच आश्रयाला आले आहेत. हे तात, आज ही समग्र पृथ्वी माझ्या वश आहे. तसें पांडवांना साह्य नाहीं. असें तो दुर्मति पूर्वी मला म्हणत होता. अशा त्याच्या त्या सेनासमुद्राच्या मध्यभागीं स्थित असलेल्या आचार्यांचें सर्व सैन्य रक्षण करीत असतां पार्षताकडून त्यांचा वध व्हावा, याहून आणखी दुर्दैव तें काय असणार ! द्रोण नेहमीं युद्धाला उत्साहानें तत्पर असे. तो सर्व अस्त्रांत प्रवीण होता. त्याच्या रक्षणार्थ सर्व राजे त्याच्या सभोंवार उभे होते. असें असतां त्या महात्म्याला मृत्यु कसा आला !

बा संजया, मजवर हा केवढा अनर्थ ओढवला आहे पहा ! भीष्म-द्रोणांचें निधन ऐकल्यापासून मी जीवितालाहि कंटाळलों आहें. दुर्योधनावर माझें प्रेम आहे, हें जाणून महात्म्या विदुरानें मला उपदेश केला होता, तो मीं ऐकला नाहीं. त्याच्या सांगण्याप्रमाणें मीं जर दुर्योधनाचा त्याग करून इतर सर्व पुत्रांचें रक्षण केलें असतें, तर आजचा हा प्रसंग टळला असता. आतां दुर्योधनाचा त्याग करण्यांत निर्दयपणा झाला असता हें जरी खरें आहे, तरी ज्ञातिक्षयाचा प्रसंग ओढवला नसता व समग्र कुल मृत्युमुखीं पडलें नसतें.

---

१ संप्रयुक्तः किलैवायं दिष्टैर्भवति पूरुषः ।
तस्मिन्नेव च सर्वार्थाः प्रदृश्यन्ते पृथग्विधाः ॥

जो मनुष्य धर्माचा त्याग करून केवल अर्थपरायण होतो, तो ऐहिक उत्कर्षापासून च्युत होऊन हीनत्वाला प्राप्त होतो. या न्यायाला अनुसरूनच आमच्या राष्ट्राची आज अवनति झाली आहे. संजया, सेनापतीचा अंत झाल्यामुळें उत्साहशून्य झालेल्या सैन्यांत कांहीं सामर्थ्य अवशेष राहिलें असेल, असें मला वाटत नाहीं. ज्या दोघां क्षमाशील नरश्रेष्ठांचा आमच्या सैन्याला आधार होता, तेच सेनानायक पडल्यावर त्यांनीं धैर्य तरी कसें धरावें ?

संजया, पांडवांनीं चाल केल्यावर पुढें कसें युद्ध झालें तें मला सविस्तर सांग. त्या युद्धप्रसंगीं पुढें कोण सरसावले ! पांडवांचें निवारण कोणीं केलें ! कोणते हीन वृत्तीचे पुरुष पळून गेले ! धनंजयानें कोणकोणतीं महत्कृत्यें केलीं ? तीं सर्व मला कथन कर. अर्जुन व भीमसेन या दोघांचेंच आम्हांला फार भय वाटतें. पांडव परत फिरून त्यांनीं माझ्या अवशिष्ट सैन्यावर चाल केली असतां कसें दारुण युद्ध प्रवृत्त झालें, त्यावेळीं तुमची मनःस्थिति कशी झाली आणि माझ्या कोणकोणत्या पुत्रांनीं त्यांचें निवारण केलें तें सर्व मला सविस्तर सांग. ७. २. २४.

---

## अध्याय २५ वा.

[ १ भिन्न-भिन्न वीरांचें द्वंद्व युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, रणांगणांत पांडव परत फिरले असतां सूर्याला झांकणाऱ्या मेघाप्रमाणें, त्यांनीं द्रोणाला आच्छादित केलें. त्यावेळीं उडालेल्या धूळीनें कौरवसैन्य झांकून गेलें, कांहीं दिसेनासें झालें, त्यामुळें द्रोणाचार्य हत झाला कीं काय, असाहि संशय आम्हांस येऊं लागला. महापराक्रमी पांडव क्रूर कर्म करण्याची इच्छा करीत आहेत, हें पाहून दुर्योधन स्वसैन्याला प्रोत्साहन देत असें म्हणाला—"हे नराधिपहो, तुम्ही सर्व आपल्या उत्साहानुसार यथाशक्ति युद्ध करून पांडवांचें निवारण करा."

हे महाराज, इतक्यांत तुझ्या दुर्मर्षण पुत्रानें भीमाला दुरूनच पाहिलें व त्याचा प्राण घेण्याच्या इच्छेनें त्याच्यावर चाल केली. अंतकाप्रमाणें क्रुद्ध होऊन

---

१ यो हि धर्मं परित्यज्य भवत्यर्थपरो नरः ।
सोऽस्माच्च हीयते लोकात् क्षुद्रभावं च गच्छति ॥

त्यानें भीमाला शरांनीं अच्छादित केलें असतां भीमानेंहि त्याच्यावर बाणांचा वर्षाव केला व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. इतक्यांत जणुकाय ईश्वरानेंच प्रेरणा केल्याप्रमाणें प्राज्ञ व शूर पांडव मृत्यूचें भय सोडून त्या संग्रामांत शत्रूच्या पुढें येऊन उभे राहिले.

हे विशांपते, त्यावेळीं शिनीचा पौत्र सात्यकि द्रोणावर चालून येत असतां कृतवर्म्यानें त्याचें निवारण केलें. त्यावेळीं एक मत्त गज दुसऱ्या मत्त गजावर जसा चालून जातो, तसा तो त्यावर धांवला व त्या दोघांचें युद्ध जुंपलें. कृतवर्म्यानें सात्यकीला शरजालानें त्रस्त करून टाकिलें. इतक्यांत क्षत्रवर्मा तीक्ष्ण बाणांची वृष्टि करीत द्रोणावर धांवला असतां उग्रधन्व्या जयद्रथानें त्याचा प्रतिकार केला. सिंधुराजाला पाहून क्षत्रवर्मा क्रुद्ध झाला व त्यानें त्याचा ध्वज व धनुष्य यांचा छेद केला. तथापि जयद्रथानें तत्काल दुसरें धनुष्य घेऊन क्षत्रवर्म्यास त्रस्त करून टाकिलें.

पांडवांच्या हितांत तत्पर असलेल्या युयुत्सूला द्रोणापासून दूर ठेवण्यास सुबाहु झटत असतां त्या वीरानें त्याच्या परिघतुल्य बाहूंचा छेद करून टाकिला. त्यानंतर धर्मात्मा युधिष्ठिर द्रोणावर चाल करून येत असतां मद्राधीश शल्यानें त्याला अडवून धरिलें. त्यावेळीं त्या ज्येष्ठ पांडवानें शरांची वृष्टि चालविली असतां शल्यानें त्या सर्व शरांचा छेद करून धर्मराजाला विद्ध केलें व मोठ्यानें गर्जना केली. याप्रमाणें तो गर्जना करीत असतां युधिष्ठिरानें त्याचें धनुष्य व ध्वज यांचा छेद केला. तें पाहून सर्व सैनिकांत फार मोठा हाहाकार झाला.

द्रुपदराजानें आपल्या सैन्यासह शरवर्षाव चालविला असतां बाल्हीकानें त्याचें निवारण केलें. त्या दोघां वृद्धांचें घनघोर युद्ध जुंपलें. पूर्वी बलीवर चालून जाणाऱ्या इंद्र व अग्नि या दोन देवतांप्रमाणें विंद व अनुविंद या दोघांनीं आपल्या सैन्यासह विराटावर चाल केली. त्या सैन्यांतील गजाश्वहि जिवावर उदार होऊन पुढें सारसावले व त्यांचें देव-दानवांसारखें दारुण युद्ध जुंपलें.

नकुलाचा पुत्र शतानीक द्रोणावर चाल करून येत असतां सभापति भूतकर्म्यानें त्याला विरोध केला. तेव्हां शतानीकानें अर्धचंद्राकार तीक्ष्ण बाणांनीं भूतकर्म्याचे दोन्ही हात व मस्तक तोडून त्याला गतप्राण केलें.

महापराक्रमी सुतसोम बाणांचा वर्षाव करीत द्रोणाच्या संमुख येत असतां विविंशतीनें त्याचें निवारण केलें. पण सुतसोम त्याला विद्ध करून पुढें निघून गेला. भीमरथानें अश्व व सारथि यांसह शाल्वराजास यमसदनीं पाठविलें.

हे राजन्, श्रुतकर्मा आपल्या मयूरासारख्या अश्वांनीं विविंशतीवर चालून आला. तेव्हां परस्परांच्या वधाची इच्छा करणाऱ्या तुझ्या त्या दोघां पौत्रांचें स्व-स्व-पित्यांच्या जयासाठीं तुमुल युद्ध जुंपलें. इतक्यांत प्रतिविंध्य द्रोणाच्या समीप येत आहे, असें पहातांच अश्वत्थाम्यानें त्याचा मार्ग अडवून धरिला. परंतु पित्याच्या रक्षणांत तत्पर असलेल्या त्या द्रोणपुत्राला प्रतिविंध्यानें तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. त्यावेळीं पेरणीच्या वेळीं भूमींत बीजें जशीं पेरतात, याप्रमाणें द्रौपदेयांनीं अश्वत्थाम्यावर शरांचा वर्षाव केला. अर्जुनपुत्र श्रुतकीर्ति द्रोणावर धांवला असतां दुःशासनाच्या पुत्रानें त्याचें निवारण केलें. तथापि त्या द्रौपदीपुत्राचा पराक्रम अर्जुनतुल्य होता. त्यानें अर्धचंद्राकार बाणांनीं त्या दौःशासनीचा ध्वज, धनुष्य व सारथि यांचा छेद करून त्याचा पराभव केला व तो पांडवेय द्रोणाचार्यांजवळ जाऊन पोंचला.

पराक्रमी सागराधिपानें तुझ्या लक्ष्मण पौत्राशीं युद्ध आरंभिलें. त्या शूर सागराधिपानें पूर्वीं 'पट्टचर'-नामक असुराचा वध केला होता. त्याचें शौर्य सर्व सैन्यामध्यें प्रसिद्ध होतें. त्या राजानें लक्ष्मणाचें धनुष्य तोडून टाकिलें व ध्वजहि खालीं पाडविला. लक्ष्मणावर शरवृष्टि करीत असतां तो राजा फारच शोभला.

द्रुपदाचा तरुण पुत्र शिखंडी समरांगणांत येत असतां विकर्णानें त्याचा प्रतिकार केला. तेव्हां शिखंडीनें बाणजालानें त्याला आच्छादित केलें. तथापि त्या सर्व शरांचा नाश करून तुझा बलाढ्य पुत्र विकर्ण अतिशय शोभला. द्रोणावर चाल करून येणाऱ्या उत्तमौजाचा अंगदानें मार्गांतच निरोध केला. त्या दोघां तुल्यबल वीरांचें युद्ध जुंपलेलें पाहून उभय सैन्यांना हर्ष झाला. पुरुजित् द्रोणावर धांवला, त्यावेळीं दुर्मुखानें वत्सदंतबाणांनीं त्याचें निवारण केलें. परंतु पुरुजितानें दुर्मुखाच्या दोन भुंवयांमध्यें बाण मारून त्याला विद्ध केलें. तेव्हां भुंवयांच्या मध्यभागीं रुतून राहिलेल्या त्या बाणाच्या योगानें त्याचें मुखकमळ नाळयुक्त कमलाप्रमाणें शोभलें.

पांच केकय भ्राते द्रोणाकडे येत असतां कर्णानें त्यांचें निवारण केलें. त्या उभय प्रतिस्पर्ध्यांनीं परस्परांस बाणांनीं आच्छादित केल्यामुळें ते सहाहि वीर अदृश्य झाल्याप्रमाणें भासले. तुझे पुत्र दुर्जय, जय व विजय यांचें नील, काश्य व जयत्सेन या तिघांशीं युद्ध जुंपलें. सात्वताचें क्षेमधूर्ति व बृहंत या उभय बंधूंशीं युद्ध प्रवृत्त झालें असतां दोन मदोन्मत्त गज सिंहावर तुटून पडावे, तसा भास झाला. इतक्यांत अंबष्ठराजा एकटाच द्रोणाकडे वळत आहे, हें पाहून क्रुद्ध झालेल्या चेदिपतीनें त्याच्यावर बाणांची वृष्टि आरंभिली. तेव्हां अंबष्ठानें अस्थींचा भेद करणाऱ्या शंकूनें त्याच्यावर प्रहार केला असतां त्याच्या हातांतील धनुष्य-बाण गळून पडले व तो रथांतून खालीं पडला.

त्याचवेळीं वार्धक्षेमीचें शारद्वत कृपाचार्यानें निवारण केलें व त्या दोघां विचित्र युद्ध करणाऱ्या वीरांकडे सर्वांचें लक्ष वेधून राहिलें. मणिमान् द्रोणावर धांवून येत असतां सौमदत्ति यूपकेतूनें त्याचा निरोध केला. तेव्हां मणिमानानें त्याचा ध्वज, धनुष्य, पताका, सारथि व छत्र या सर्वांचा छेद केला. तेव्हां यूपकेतूनें तीक्ष्ण खड्गानें मणिमानाचा रथ, अश्व व सारथि यांसह विध्वंस केला आणि दुसरें धनुष्य घेऊन पांडवसेनेचा पराभव आरंभिला. असुरावर चाल करून येणाऱ्या इंद्राप्रमाणें दुर्जय पांड्यराजा द्रोणाकडे येत असतां वृषसेनानें त्याला अडवून धरिलें.

इतक्यांत घटोत्कच गदा, परिघ, मुसळ इत्यादि विविध आयुधें घेऊन पुढें सरसावला. तो मोठाले वृक्ष, मातीचीं ढेंकळें, तृणाचे भारे, धूळ, भस्म इत्यादि शत्रुसैन्यावर फेंकून त्यांस पळवून लावूं लागला. याप्रमाणें सर्व सैन्याला त्रस्त करीत तो राक्षस द्रोणाला जणुकाय ग्रासण्यासाठींच पुढें सरसावला. तेव्हां अलंबुष राक्षस कौरवांच्या बाजूनें त्याच्याशीं युद्धाला पुढें झाला. पूर्वीं देवेंद्र व शंबरासुर यांचें जसें युद्ध झालें होतें, तसेंच या दोघां राक्षसाग्रणींचें युद्ध जुंपलें.

हे धृतराष्ट्र महाराज, याप्रमाणें कौरव-पांडवांच्या त्या संग्रामांत लहान-थोर योद्धयांचीं अशीं द्वंद्वयुद्धें जुंपलीं होतीं. पांडव द्रोणाच्या वधासाठीं झटत होते व कौरव आचार्यांचें संरक्षण करण्यांत तत्पर होते. त्यावेळीं या दोन पक्षांत जसें युद्ध जुंपलें, तसें पूर्वीं कोणीं पाहिलें नाहीं व ऐकलेंहि नाहीं. त्या-

ठिकाणीं अतिशय घोर, भयानक व विचित्र अशीं अनेक द्वंद्वयुद्धें जुंपलेलीं दिसत होतीं. ७. २. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १ भगदत्त व त्याचा गजेंद्र यांचा पराक्रम. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, रणांगणांत परत फिरलेल्या पांडवांच्या भिन्न भिन्न पथकांनीं अशाप्रकारें चाल केली असतां त्यांच्याशीं माझ्या शूर पुत्रांनीं कसें युद्ध केलें ! त्याचप्रमाणें संशप्तक व पार्थ या दोघांच्या संग्रामांत कोणाचा विजय झाला ? तें सर्व मला सविस्तर कथन कर.

संजय—हे महाराज, सर्व पांडवपक्षीय वीर परत फिरून त्यांचीं पृथक् पृथक् सैन्यें कौरवांवर तुटून पडलीं असतां तुझा दुर्योधन पुत्र विपुल सैन्यांसह भीमसेनावर चालून गेला. त्यावेळीं एका मत्त गजानें दुसऱ्या गजाला, किंवा एका वृषभानें दुसऱ्या वृषभाला गुरकावणी दाखवावी, तसें दुर्योधनानें भीमाला आह्वान केलें. तेव्हां तोहि बलाढ्य वीर गजसैन्यावर चालून गेला व क्षणार्धांत त्यानें त्या गजांची वाताहत उडवून दिली. त्या मत्त गजांच्या पर्वतप्राय देहांतून सारखा मदस्राव चालला होता. अशा प्रकारचे हे प्रचंड हत्तीहि भीमाच्या बाणजालानें भयभीत होऊन पळत सुटले. अभ्रांना उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें भीमानें तें गजसैन्य उधळून दिलें. त्यावेळीं तो पांडुपुत्र शरवर्षाव करीत असतां सर्व भुवनांवर आपलीं किरणें पसरविणाऱ्या उदयकालीन सूर्याप्रमाणें शोभला. त्या प्रचंड गजांच्या अंगांत रुतून राहिलेले ते बाण, आकाशांत सूर्यकिरणांनीं व्याप्त झालेल्या विविध मेघांप्रमाणें शोभले.

याप्रमाणें भीमसेन गजसैन्याचा चुराडा करीत असतां दुर्योधन क्रुद्ध होऊन पुढें सरसावला आणि तीक्ष्ण बाणांनीं भीमाला विद्ध करूं लागला. तेव्हां वृकोदरहि क्रोधानें नेत्र आरक्त करून दुर्योधनावर धांवला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. भीमानें तुझ्या पुत्राचा गज व धनुष्य या दोहोंचा छेद केला.

राजा दुर्योधन भीमाच्या हातीं सांपडल्याचें पहातांच अंगराज पुढें सरसावला. तथापि तो समीप येण्यापूर्वींच भीमानें त्याच्या गजाच्या

गंडस्थलावर एक बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां त्या मर्मांतक बाणानें विद्ध झालेला तो हत्ती चीत्कार करीत खालीं पडला व गतप्राण झाला. तेव्हां गज पतन पावत असतां त्यावर आरूढ झालेला म्लेच्छाधिप अंगदहि खालीं पडत आहे, हें पाहून भीमानें मोठ्या त्वरेनें त्याचाहि शिरच्छेद केला. अंगराज पडतांच त्याचें सैन्य पळत सुटलें व त्यांतील अश्व, गज व रथ यांनीं आपल्याच सैन्यांतील पायदळास तुडविलें.

याप्रमाणें सैन्य भग्न होऊन पळत असतां भगदत्त श्रेष्ठ गजावर आरूढ होऊन पुढें सरसावला. त्याचा तो श्रेष्ठ गज इंद्राच्या ऐरावताच्या कुलांतील होता. तो गजराज आपली शुंडा संकुचित करून दोन पायांवर उड्डाण करीत धांवत असतां भीमाचा प्राणच घेतो कीं काय असा भास झाला. त्या क्रुद्ध झालेल्या गजानें वृकोदराच्या रथाचें अश्वांसह चूर्ण करून टाकिलें. त्यावेळीं भीमसेनाचा चुराडाच झाला असता. परंतु त्या वीरानें मोठ्या चपलतेनें रथांतून उडी टाकली व अंजलिकावेध जाणणारा तो पांडव मोठ्या त्वरेनें त्या गजाच्याच पोटाखालीं लपून उभा राहिला व संहार करण्यास प्रवृत्त झालेल्या त्या आतिवंत गजाला हातानें ताडन करीत त्याच्याशीं जणुकाय क्रीडाच करूं लागला. तेव्हां दशसहस्र सामान्य हत्तींचें बल असलेला तो बलाढ्य गजेंद्र भीमाला आपल्या पायांखालीं तुडविण्याच्या इच्छेनें जागच्याजागींच गरगर फिरूं लागला. त्यावेळीं तो पांडव मोठ्या कुशलतेनें तेथून निसटून त्या सुप्रतीक गजाच्या संमुख आला. त्याला पहातांच गजानें आपल्या शुंडेचा विळखा देऊन आपटण्याचा यत्न केला. परंतु भीम तत्काल स्वतःला सोडवून घेऊन पुनः त्याच्या पोटाखालीं जाऊन उभा राहिला. पांडवसेनेंतील एखादा गज या गजेंद्राशीं युद्ध करण्यास पुढें सरसावेल, म्हणून त्यानें किंचित् काल वाट पाहिली पण कोणीच न आल्यामुळें मोठ्या त्वरेनें तेथून पलायन केलें.

तथापि वृकोदर सुरक्षित बाहेर पडल्याचें कोणीं पाहिलें नसल्यामुळें 'अरे अरे, धीक्कार असो, कुंजरानें भीमाला गतप्राण केलें' असा सर्व सैन्यांत एकच कोलाहल झाला. त्या गजेंद्रानें त्रस्त केलेली पांडवसेना जेथें भीम उभा होता त्या बाजूलाच पळत सुटली. युधिष्ठिरहि वृकोदर हत झाला असेंच समजला व त्यानें आणि पांचालानें भगदत्ताला अडवून धरिलें. तेव्हां सहस्रावधि महारथि युधिष्ठिराच्या रथाला वेढून उभे राहिले व त्यांनीं तीक्ष्ण बाणांनीं भग-

दत्ताला व्यथित केलें. त्या पर्वतेश्वरानेंहि आपल्या गजाच्या साह्यानें पांडव व पांचाल या दोघांना त्रस्त करून जें अद्भुत युद्ध केलें तें पाहून आम्हीं विस्मयानें थक्क झालों.

त्यानंतर दशार्णाधिप भगदत्तावर चालून आला. त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. तें पूर्वींच्या पक्षयुक्त पर्वतांच्या युद्धाप्रमाणें भासलें. शेवटीं त्या वृद्ध भगदत्तानें दशार्णाधिपाचा गज पाडवून त्याला स्थानभ्रष्ट केलें व त्यास यमसदनीं पाठवून दिलें. तेव्हां युधिष्ठिरानें भगदत्ताला चोहोंकडून वेढलें. त्यावेळीं गजारूढ असलेला तो भगदत्त वणव्यानें वेढलेल्या पर्वताप्रमाणें शोभला. त्या प्राग्ज्योतिषाधिपानें कांहीं काल आपला श्रेष्ठ गज त्या मंडळांत फिरवून त्याला सात्यकीच्या रथावर सोडिलें.

तेव्हां त्या महागजानें सात्यकीचा रथ उचलून दूर फेंकून दिला, परंतु सात्यकि त्यापूर्वींच रथांतून खालीं उतरला होता. सात्यकीच्या सारथ्यानें सिंधुदेशांतील भव्य अश्वांना उठवून तो रथ पुनः पुढें आणला, तेव्हां सात्यकि उडी मारून पुनरपि रथारूढ झाला. इतक्या अवधींत सात्यकीचा तो रथ दूर होतांच त्या मंडलाला थोडी खिंड पडली. तें अंतर दृष्टीं पडतांच भगदत्ताचा महागज त्या रथाच्या मंडलांतून बाहेर पडला व पुढें जो रथ दिसेल, त्याला दूर फेंकून देऊं लागला. त्या एकट्या गजानें सर्व रथस्थ नृपालांना त्रस्त करून सोडिलें. त्यावेळीं वस्तुतः तो एकच गज असून तेथें असंख्य गज असल्याचा भास झाला. तो गजारूढ झालेला वृद्ध भगदत्त पांडवांच्या सेनेचें मर्दन करीत असतां दानवांचा संहार करणाऱ्या ऐरावतस्थ इंद्राप्रमाणें शोभला. त्यावेळीं दशदिशांत पळणाऱ्या पांडव-पांचालांच्या गजाश्वांच्या प्रचंड शब्दानें तो प्रदेश दुमदुमून गेला.

याप्रमाणें भगदत्त पांडवांच्या सैन्याचा संहार करीत आहे, हें पाहून भीमसेन पुनः त्याच्यावर चालून गेला. तेव्हां, भगदत्ताच्या गजानें भीमाच्या अश्वावर आपल्या शुंडेनें जलाचा मारा केला. त्यामुळें त्रस्त झालेले ते अश्व बुजाले व भलत्याच दिशेला रथ नेऊं लागले. इतक्यांत कृतीचा पुत्र रुचिपर्वा कृतान्तकालाप्रमाणें तेथें आला व आपल्या शरवृष्टीनें त्या गजाला त्रस्त करूं लागला. परंतु सुपर्वा पुढें झाला व त्या पर्वतपतीनें रुचिपर्व्याला यमसदनीं पाठवून दिलें.

तो वीर पडला असतां सौभद्रेय, द्रौपदेय, चेकितान, धृष्टकेतु व युयुत्सु हे त्या गजावर धांवले. त्यावेळीं पर्वतावर जशी मेघांनीं वृष्टि करावी, तशी त्या वीरांनीं मोठमोठ्यानें गर्जना करीत त्या गजेंद्रावर शरांची वृष्टि आरंभिली. तेव्हां तो गज अतिशय क्षुब्ध होऊन मोठ्या वेगानें युयुत्सूच्या रथावर धांवला व त्यानें त्याच्या सारथ्याला तुडवून टाकिलें. तेव्हां युयुत्सु मोठ्या चपलतेनें रथांतून उडी टाकून दूर पळाला. इतक्यांत पांडवांचे योद्धे भगदत्तावर तुटून पडले व त्यांनीं गजासह भगदत्ताला शरांनीं व्यापून टाकिलें. त्या वेळीं भ्रांत झालेल्या दुर्योधनानें चुकून अभिमन्यूच्या रथावर उडी टाकली.

हे महाराज, त्या संग्रामांत गजारूढ असलेला भगदत्तराजा शत्रूवर बाणांची वृष्टि करीत असतां पृथ्वीतलावर किरणें पसरणाऱ्या आदित्याप्रमाणें शोभला. त्यावर आर्जुनि, युयुत्सु, द्रौपदेय व धृष्टकेतु यांनीं अनेक बाण सोडून त्याला विद्ध केलें. त्यांच्या शरांनीं विद्ध झालेला तो गजेंद्र एखाद्या सूर्यकिरणांनीं व्यापलेल्या मेघाप्रमाणें शोभला. त्याला शत्रूनें जरी त्रस्त करून सोडिलें होतें तरी महाताच्या चातुर्यानें व प्रयत्नानें प्रेरित झालेला तो दोन्ही बाजूच्या वीरांना वनांत गोपाल दंडानें पशूंना जसा, तसा उजवीकडे व डावीकडे घालवून देऊं लागला व त्या श्रेष्ठ गजावर आरूढ झालेला भगदत्त पांडवांच्या सैन्याला वारंवार वेढता झाला. त्यावेळीं ससाण्याच्या हातीं सांपडलेल्या काकाप्रमाणें पांडवसैन्यांत हाहाकार उडाला.

हे राजा, त्यावेळीं सैन्यांतील वाहनें व सैनिक पळून जात असतां होणाऱ्या प्रचंड कोलाहलानें सर्व दिशा भरून गेल्या. पूर्वी देवांनीं संरक्षिलेल्या सेनेंत निर्भयपणें संचार करणाऱ्या प्रल्हादपुत्र विरोचनाप्रमाणें भगदत्त पांडवसैन्यांत संचार करीत होता. तो एकटा गजेंद्र रणांगणांत फिरत असतां अनेक गजयुथपांचा भास झाला. ७. २. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ संशप्तकांचा वध. ]

( १ ) संजय—हे महाबाहो, तूं नेहमीं पार्थाचीं रणांगणावरील महत् कर्में विचारीत असतोस, यास्तव त्याच्या पराक्रमाचें वर्णन सांगतों, तें ऐक.

भगदत्तानें पांडवसैन्याला त्रस्त करून सोडलें आहे, गजांचे चीत्कार ऐकूं येत आहेत व धूलि उडत आहे, हें पाहून पार्थ कृष्णाला असें वचन बोलला-

अर्जुन—हे मधुसूदना, प्राग्ज्योतिषाधिप आपल्या गजेंद्रावर आरूढ होऊन रणांगणांत आला असावा, असें मला वाटतें. हा शब्द त्याच्याच श्रेष्ठ हत्तीचा आहे. भगदत्त युद्धामध्यें इंद्रतुल्य असून गजयानविशारद आहे. सर्व पृथ्वीतलावर तोच एक श्रेष्ठ गजयोधी आहे. गजयुद्धांत त्याची बरोबरी करील असा दुसरा वीर नाहीं. त्याचा तो गजराजहि अतिशय श्रेष्ठ आहे. समरांगणांत त्याच्यापुढें उभें रहाण्यास दुसरा एकहि गज समर्थ नाहीं. शिवाय त्या गजावर कोणत्याच शस्त्राचा प्रयोग करतां येत नाहीं. समरांत अनेक वेळां पराक्रम गाजविणारा तो गज कधींहि श्रांत होत नाहीं. नानाप्रकारच्या शस्त्रांचे प्रहार व अग्नीचा स्पर्श यांनींहि त्याला पीडा होत नाहीं. तस्मात् तो एकटा गज पांडवसैन्याचा विध्वंस करण्यास समर्थ आहे.

हे कृष्णा, त्या गजेंद्राचें पारिपत्य करण्यास तूं किंवा मी या दोघांशिवाय दुसरें कोणीहि समर्थ नाहीं. यास्तव तो भगदत्त जेथें आहे, तेथें चल. त्याला आपल्या हत्तीच्या बलाचा मोठा गर्व वाटत आहे. शिवाय हे सर्व वीर तरुण असूनहि मजपुढें उभे रहाण्यास समर्थ होत नाहींत, याचाहि त्या वृद्धाला विस्मय वाटत आहे. यास्तव आज त्याला इंद्रलोकींचें आतिथ्य स्वीकारण्यास पाठवूं या.

सव्यसाचीचें हें भाषण ऐकून कृष्णानें आपला रथ पांडवांच्या सैन्याला व्यथित करणाऱ्या भगदत्ताकडे वळविला. ते तेथें जात आहेत, असें पहातांच चौदा हजार महारथ संशप्तक त्याला युद्धाचें आह्वान करीत त्याच्या मागोमाग निघाले. त्यांत दहा हजार त्रिगर्त महारथ असून चार हजार नारायणगण होते. त्यावेळीं अर्जुन मोठ्या पेंचांत पडला. एकीकडे भगदत्त आपल्या सैन्याचा विध्वंस करीत आहे व दुसरीकडे संशप्तक युद्धाचें आह्वान करीत आहेत, अशा स्थितींत काय करावें याविषयीं त्याचें चित्त द्विधा झालें. या दोहोंतून कोणतें कार्य श्रेयस्कर होईल याचा तो प्रथम विचार करूं लागला. शेवटीं युधिष्ठिराच्या साह्यार्थ जाण्यापूर्वीं संशप्तकांचा वध करावा असा त्याच्या मनाचा निश्चय झाला. भगदत्त जरी आपल्या सेनेला व्यथा देऊन नाश करीत असला, तरी युद्धाला आह्वान करणारांची उपेक्षा करणें हा क्षात्र-

धर्म नव्हे, हें जाणून त्यानें संशप्तकांकडे जाण्याचें ठरविलें आणि तो कपिध्वज एकटाच हजारों रथिश्रेष्ठांचा संहार करण्यास निघाला.

हे राजन्, कर्ण व दुर्योधन यांनीं पार्थाच्या वधासाठींच ही योजना करून ठेवली होती. अर्जुन सहस्रावधि योद्धयांबरोबर एकटाच युद्ध करण्यांत गुंतला म्हणजे त्याचें लक्ष युधिष्ठिराकडे लागेल व युद्धाकडे दुर्लक्ष होऊन तो सहजच नाश पावेल. याच विचारानें कौरवांनीं संशप्तकांस सैन्यांतून पृथक् करून दोन ठिकाणीं युद्ध करण्याची योजना केली होती. त्यांच्या कल्पनेप्रमाणें आरंभीं जरी पार्थाचें चित्त द्विधा झालें, तरी त्या वीरानें संशप्तकांचा वध करून कर्ण व दुर्योधन यांची ही योजना व्यर्थ ठरविली.

याप्रमाणें विचार करून अर्जुन संशप्तकाकडे वळला. तेव्हां त्या महारथ संशप्तकगणांनीं सहस्रावधि नतपर्व बाणांचा वर्षाव करून अर्जुनाला आच्छादित केलें. पार्थ, कृष्ण, त्यांचा रथ व अश्व हीं सर्व शरांनीं झांकल्यामुळें दिसेनाशीं झालीं. जनार्दनहि मोहित झाला. त्यावेळीं अर्जुनानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्या शरांचा छेद केला व प्रायः बहुतेक वीरांचाहि संहार केला. वीरांचीं आयुधें व विविध अलंकार-भूषणें सर्वत्र पसरलीं. ज्यांना बालरवि, चंद्र, किंवा कमळ यांचीच उपमा शोभेल अशीं अनेक वीरांचीं मस्तकें विदीर्ण होऊन तेथें पडलीं होतीं. याप्रमाणें धनंजय क्रुद्ध होऊन शत्रूंचा संहार करीत असतां उज्ज्वल बाणांनीं व्याप्त झालेली ती सेना दग्धच होत आहे कीं काय, असें भासलें. कमलांच्या सरोवरास क्षुब्ध करणाऱ्या मत्त गजाप्रमाणें तो कौंतेय शत्रुसेनेचा नाश करीत असतां सर्व भूतगणांनीं 'साधु साधु' अशा प्रशंसोद्गारांनीं त्याचा सत्कार केला.

पार्थाचें हें इंद्रतुल्य कर्म पाहून वासुदेव अतिशय विस्मित झाला व हात जोडून म्हणाला—" हे पार्था, आज तूं सहस्रावधि संशप्तकांना गतप्राण करून पाडलें आहेस. हें मी प्रत्यक्ष पहात आहें. खरोखर आज तूं जें महत्कर्म केलेंस अशा प्रकारचें कर्म साक्षात् इंद्र, यम, वरुण इत्यादिकांसहि दुष्कर आहे."

हे महाराज, याप्रमाणें युद्धाला सज्ज झालेल्या संशप्तकांचा संहार करून पार्थ कृष्णाला म्हणाला—' हे वासुदेवा, आतां भगदत्ताकडे चल.' ७. २. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १ भगदत्त व अर्जुन यांचें युद्ध. ]

( १ ) संजय—महाराज, अर्जुनाच्या इच्छेप्रमाणें श्रीकृष्णानें मनाप्रमाणें वेगवान् असलेले त्याचे अश्व द्रोणाच्या सैन्याकडे वळविले. द्रोणानें ज्यांना पीडा दिली आहे, त्या आपल्या भ्रात्यांकडे पार्थ निघाला आहे, हें पहातांच त्रिगर्तराज सुशर्मा त्याच्या मागोमाग निघाला व त्याला युद्धाचें आह्वान करूं लागला. तेव्हां पार्थ त्या गोविंदाला म्हणाला—" हे श्रीकृष्णा, हा सुशर्मा भ्रात्यांसह मला युद्धाचें आह्वान करीत आहे. त्याचा मी तत्काल नाश करून टाकीन. परंतु या संशप्तकांनीं माझें मन द्विधा करून टाकिलें आहे. यावेळीं संशप्तकांचा वध करावा किंवा शत्रूनें त्रस्त केलेल्या आपल्या सैन्याच्या रक्षणास जावें. यांतील कोणतें कृत्य अधिक श्रेयस्कर होईल ! तें मला सांग. तूं सर्व जाणतच आहेस."

अर्जुनाचें हें वचन ऐकतांच श्रीकृष्णानें त्याच्या अश्वांना प्रेरणा केली व जेथें त्रिगर्ताधिप पांडवाला आह्वान करीत होता, तेथें त्याचा रथ नेला. तेव्हां अर्जुनानें सुशर्म्याला शरांनीं विद्ध केलें, त्याचा ध्वज व धनुष्य यांचा छेद केला आणि अश्व व सारथि यांसह त्याच्या भ्रात्यास यमसदनीं पाठवून दिलें. त्याचें सुशर्म्याशीं तुमुल युद्ध जुंपलें. शेवटीं अर्जुन त्याला मोहित करून कौरवसेनेकडे वळला.

हे राजेंद्रा, पर्जन्यवृष्टि करणाऱ्या इंद्राप्रमाणें शरांची वृष्टि करणाऱ्या पार्थाचा प्रतिकार करण्यास तुझ्या सैन्यांतील एकहि वीर समर्थ झाला नाहीं. त्याचें तें उग्र स्वरूप पाहून त्याच्या पुढें जाण्यास कोणींहि धजलें नाहीं. तो क्रुद्ध झालेला कौंतेय तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें पुढें येणाऱ्या तुझ्या सैन्याचा नाश करीत होता. प्राणिमात्रांस अग्नीचा स्पर्श जसा असह्य होतो, तसा अर्जुनाचा वेग तुझ्या वीरांना सहन झाला नाहीं.

याप्रमाणें कौरवसेनेला त्रस्त करीत तो पार्थ गरुडाच्या उड्डाणाप्रमाणें अकस्मात् भगदत्ताच्या समीप येऊन उभा राहिला. हे राजा, धनंजयानें जें धनुष्य निष्पाप भारतांच्या रक्षणार्थ युद्धामध्यें शत्रूंना रडविण्यासाठीं संपादन केलें, तेंच धनुष्य तुझ्या कपटद्यूतनिपुण पुत्रांच्या कृतीमुळें क्षत्रियांच्या विनाशासाठीं त्या पार्थाला हातीं घ्यावें लागलें. [ अर्जुनाचें गांडीव धनुष्य भारतांना क्षेमकर असतां तुझ्या पुत्राच्या दुष्कृत्यामुळें तें त्यांचा क्षय करणारें झालें. ]

हे महाराज, अर्जुनानें त्रस्त केलेली तुमची सेना, खडकावर आपटून भग्न होणाऱ्या नौकेप्रमाणें विशीर्ण झाली. इतक्यांत दहा हजार वीर 'विजय मिळवूं किंवा पराभूत होऊं' असा मनाचा निश्चय करून परत फिरले व त्यांनीं निर्भय-पणानें अर्जुनाला वेढा दिला. तथापि युद्धनिपुण पार्थ भ्रांत झाला नाहीं. साठ वर्षांचा तरुण गज जसा क्रुद्ध होऊन नलवनाला तुडवून टाकतो, तसा पार्थ तुझ्या सैन्याचें सहज लीलेनें मर्दन करूं लागला.

तेव्हां भगदत्त आपल्या बलाढ्य गजावर आरूढ होऊन पार्थावर पुनः धांवला. त्याला पहातांच रथस्थ पार्थानें त्याचा स्वीकार केला. त्यावेळीं रथ व गज या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. अर्जुनाचा तो रथ यथाशास्त्र तयार केलेला असून भगदत्ताचा गजहि युद्धाच्या सर्व सामग्रीनें युक्त होता. याप्रमाणें सर्व आयुधांनीं सज्ज असलेल्या रथावर व गजावर आरूढ झालेले ते दोघे पार्थ-भगदत्त तेथें संचार करूं लागले.

मेघतुल्य प्रचंड गजावर आरूढ झालेला भगदत्त पार्थाच्या रथावर शरांचा वर्षाव करूं लागला व रथस्थ पार्थ आपल्या शरांनीं त्या शरांचा छेद करूं लागला. त्या दोघांचें निकराचें युद्ध झालें. भगदत्तानें पार्थ व कृष्ण या दोघांनाहि विद्ध केलें. इतक्यांत मंडलें घेत असलेला तो गज पार्थाच्या रथापुढेंच येऊन उभा राहिला. तथापि युद्धधर्म जाणणाऱ्या पार्थानें पाठमोऱ्या असलेल्या त्याचा वध केला नाहीं. परंतु त्यानें पांडवांच्या सैन्याचा संहार चालविलेला पाहून मात्र धनंजय अतिशय क्षुब्ध झाला. ७. २. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ पार्थ-भगदत्त युद्ध. २ वैष्णवास्त्राची पूर्वकथा. ३ भगदत्तवध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, अर्जुन क्रुद्ध झाला असतां त्यानें भगदत्ताला काय केलें ? किंवा भगदत्तानें पार्थाला काय केलें ? तें मला सविस्तर कथन कर.

संजय—हे राजा, कृष्णार्जुन भगदत्ताला जाऊन भिडले असतां ते मृत्यूच्या दाढेंतच सांपडले आहेत, असेंच सर्वांनीं मानिलें. गजारूढ असलेला तो भगदत्त रथस्थ कृष्णार्जुनांवर सतत शरवृष्टि करीत होता. अर्जुनहि त्याच्यावर तशाच प्रकारें बाणांचा वर्षाव करीत होता. त्यांचें तुमुल युद्ध चाललें असतां पार्थानें भगदत्ताच्या गजांगावरील कवचाचे तुकडे केले. कवच

भग्न होतांच हत्तीच्या देहावर बाणांचा वर्षाव होऊं लागला. तेव्हां तो गज पर्जन्यवृष्टि होत असतां अभ्रहीन पर्वत जसा दिसतो, तसा शोभला.

भगदत्तानें वासुदेवावर पोलादी शक्ति सोडली, तिचे अर्जुनानें मार्गांतच तुकडे करून टाकिले व त्याचा ध्वज आणि छत्र खालीं पाडविलें, तेव्हां भगदत्तानें संतापानें अर्जुनाच्या मस्तकावर तोमर फेंकलें. त्याच्या प्रहारानें अर्जुनाचा मुकुट उलट फिरला. तो सरळ करीत अर्जुनानें अशी गर्जना केली— "हे भगदत्ता, हें जगत् एकदा डोळे भरून पाहून घे." (पुनः तें पाहण्यास तूं जिवंत रहात नाहींस. असा भावार्थ.)

पार्थाचे हे शब्द ऐकतांच भगदत्त अत्यंत संतापला व त्यांचें निकराचें युद्ध जुंपलें. पार्थानें त्याच्या धनुष्याचे व भात्याचे तुकडे केल्यामुळें भगदत्तानें वैष्णवास्त्रानें आपला अंकुश मंत्रून तो अर्जुनाच्या वक्षःस्थलावर फेंकला. तेव्हां श्रीकृष्णानें अर्जुनाला मागें सारून तें अस्त्र आपल्या छातीवर घेतलें. हे महाराज, त्यावेळीं फार मोठा चमत्कार घडला. श्रीकृष्णाच्या अंगाचा स्पर्श होतांच त्या सर्व घातक अस्त्राची वैजयंतीमाला बनली व ती त्या हृषीकेशाच्या हृदयावर शोभूं लागली. ती प्रफुल्ल माला कमलगुच्छांनीं युक्त असून चंद्रसूर्याप्रमाणें कांतियुक्त होती. त्या मालेंत कमलपत्रें गुंफिलेलीं असून तीं वायूनें हलत होतीं. तिच्या योगानें नीलवर्ण शौरी अधिकच शोभला.

नंतर अर्जुन खिन्न मनानें केशवाला म्हणाला—हे निष्पाप पुंडरीकाक्ष, 'मी युद्ध करणार नाहीं. केवल तुझें सारथ्य करीन.' अशी प्रतिज्ञा करून तूं ती पाळीत नाहींस. हें काय ? मी जेव्हां संकटांत सांपडलेला असेन किंवा शत्रूचें निवारण करण्यास असमर्थ असेन, तेव्हां तुला माझें रक्षण करणें उचित आहे. तथापि मी उभा असतां तूं पुढें होणें योग्य नव्हे. मी धनुष्य-बाण धारण करीत असतां देव, दानव, मानव यांसह समग्र त्रैलोक्यहि जिंकण्यास समर्थ आहें, हें तूं जाणतोसच.

(२) अर्जुनाचें हें भाषण ऐकून वासुदेवानें त्याला योग्य उत्तर दिलें. श्रीकृष्ण म्हणाला—पार्था, त्याविषयीं पूर्वी घडलेला गुह्य वृत्तान्त तुला सांगतों तो ऐक. या जगाच्या संरक्षणासाठीं मी सर्वदा चार मूर्ति धारण करीत असतों. स्वतःचे चार विभाग कल्पून मी लोकांचें पालन करितों. माझी नारायणरूपी एकमूर्ति बदरिकाश्रमांत राहून तपश्चर्या करीत असते. दुसरी परमात्मरूपी

मूर्ति कर्मे करणाऱ्या या जगताकडे पहात असते. तिसरी क्षेत्रज्ञरूपी मूर्ति मनुष्यलोकीं राहून तत्प्रयुक्त कर्मे करीत असते आणि चवथी जलशायिनी मूर्ति सहस्र वर्षे निद्रा घेत पडून असते. ही माझी चवथी मूर्ति हजार वर्षे पूर्ण झाल्याबरोबर जेव्हां जागृत होते, तेव्हां वरप्रदानास योग्य असलेल्या जनांस श्रेष्ठ वर देत असते. एकदा वरप्रदानाचा काल प्राप्त झाला असतां पृथ्वीनें नरकासुरासाठीं असा वर मागितला—

पृथ्वी—भगवन्, या माझ्या पुत्रास वैष्णवास्त्राची प्राप्ति होऊन तो देव-दानवांसहि अवध्य व्हावा, असा वर मला द्या.

हे पार्था, वसुंधरेचें हें भाषण ऐकून मीं कधींहि विफल न होणारें वैष्ण-वास्त्र नरकासुराला दिलें व म्हटलें—" हे देवि, हें अमोघ अस्त्र तुझ्या पुत्राचें संरक्षण करील. त्याचा कोणीहि वध करूं शकणार नाहीं. या अस्त्राच्या योगानें तुझा पुत्र सुरक्षित राहील व सर्व लोकांत सर्वदा दुराधर्ष होईल."

तेव्हां ती देवी कृतकार्य होऊन परत फिरली. तेव्हांपासून शत्रुतापन नरका-सुर अतिशय दुराधर्ष झाला. त्या असुरापासून प्राग्ज्योतिषाधिपाला हें माझें वैष्णवास्त्र प्राप्त झालें आहे. त्या अस्त्राला या लोकीं कोणीहि अवध्य नाहीं. हें अस्त्र साक्षात् इंद्र, रुद्र, इत्यादि देवतांचेंहि घातक होतें. यास्तव हे पार्था, मीं तुझ्यासाठीं तें आज विफल करून टाकिलें. आतां त्या दिव्यास्त्रानें रहित झालेल्या या महा असुराचा तूं पराभव कर. हा तुझा वैरी देवांचा द्वेष करणारा असून अतिशय दुर्धर्ष आहे. पूर्वीं मीं जसा जगाच्या हिता-साठीं नरकासुराचा वध केला, तसा तूं या महाराक्षसाचा वध कर."

( ३ ) श्रीकृष्णाचा हा उपदेश ऐकतांच पार्थानें तीक्ष्ण शरांची वृष्टि करून भगदत्तास आच्छादित केलें व एक नाराच बाण त्याच्या हत्तीवर सोडला. त्या बाणानें पर्वतावर पडणाऱ्या वज्राप्रमाणें हत्तीचें गंडस्थळ विदीर्ण करून वारुळांत शिरणाऱ्या सर्पाप्रमाणें भूमींत प्रवेश केला. तेव्हां भगदत्त आपल्या गजाला पुनः पुनः प्रेरणा करून उठवूं लागला. परंतु निर्धन माणसाची स्त्री जशी पतीची अवज्ञा करते, तशी त्या गजेंद्रानें आपल्या स्वामीची आज्ञा न मानतां भूमीवर अंग टाकिलें व अत्यंत क्लेशानें आर्तस्वर करीत प्राण सोडिले.

तो गज गतप्राण होऊन पडल्यावर श्रीकृष्ण म्हणाला—" हे पार्था, या भगदत्ताच्या प्रचंड देहावरील केस पिकून ते पांढरे शुभ्र झाले आहेत. वार्ध-

त्यामुळें पापण्या सुरकुतल्या आहेत. त्यांनीं त्याचे नेत्र झांकून गेले आहेत. ते उघडे रहाण्यासाठीं त्यानें पापण्यांवरून वस्त्राचा पट्टा बांधला आहे. वृद्धपणामुळें त्याची जरी अशी स्थिति झाली आहे तरी त्याचें शौर्य विलक्षण आहे, यास्तव त्याला जिंकणें अशक्य झालें आहे."

राजा, कृष्णाच्या या वचनावरून पार्थानें त्याचा अभिप्राय जाणला आणि तत्काल एका बाणानें भगदत्ताच्या पापण्यावर बांधलेल्या पट्ट्याचा छेद केला. तेव्हां त्याचे नेत्र तत्क्षणीं मिटले व त्या प्रतापवान् भगदत्तास सर्व जगत् अंधकारमय भासलें. नंतर अर्जुनानें एक अर्धचंद्राकार बाण सोडून भगदत्ताचें हृदय विदीर्ण केलें. तेव्हां तो बलाढ्य वीर गतप्राण झाला व त्याच्या हातांतील धनुष्य-बाण गळून खालीं पडले. मोडलेल्या कमलाच्या पाकळीप्रमाणें त्याच्या मस्तकावरील वस्त्र गळालें व पर्वतशिखरावरून खालीं पडणाऱ्या प्रफुल्ल कर्णिकवृक्षाप्रमाणें, हेममाला धारण करणारा तो भगदत्त आपल्या पर्वतप्राय गजावरून खालीं पडला.

याप्रमाणें अर्जुनानें भगदत्ताचा वध केला. तो बलाढ्य योद्धा इंद्राचा मित्र असून इंद्रतुल्य पराक्रमी होता. तथापि अर्जुनानें त्यालाहि गतप्राण केलें. नंतर वृक्षांना मोडणाऱ्या झंझावाताप्रमाणें त्या इंद्रपुत्रानें तुझ्या जयाकांक्षी वीरांचाहि संहार चालविला. ७. २. २९.

---

## अध्याय ३० वा.

[ १ गांधारभ्रात्यांचा वध. २ शकुनीची माया. ३ पार्थानें केलेला कौरव-सेनेचा पराभव. ]

( १ ) संजय—हे कुरुश्रेष्ठा, इंद्राला सतत प्रिय असणारा त्याचा अमित पराक्रमी सखा जो प्राग्ज्योतिषाधिप, त्याचा वध करून पार्थ त्याला उजवी घालून निघाला. इतक्यांत वृषक व अचल हे गांधारराजाचे दोघे पुत्र समरांगणांत पार्थाला पीडा देऊं लागले. त्यांपैकीं एकानें पुढून व दुसऱ्यानें पाठीमागून अर्जुनावर चाल केली व त्याला विद्ध केलें. तेव्हां पार्थानें तीक्ष्ण शरांनीं वृषकाचे अश्व, सारथि, रथ, ध्वज, छत्र व धनुष्य यांचे तिळाएवढे तुकडे केले व नानाप्रकारच्या आयुधांनीं सौबलादि गांधारवीरांस व्याकुल करून त्यांतील पन्नास योद्ध्यांना गतप्राण केलें.

महाभुज वृषकाच्या रथाचे अश्व मरून पडतांच त्यानें आपल्या रथांतून उडी टाकिली व तो आपल्या भ्रात्याच्या रथावर चढला आणि ते दोघे भ्राते अर्जुनाला शरांनीं विद्ध करूं लागले. सर्व जगतास तप्त करणाऱ्या ग्रीष्म ऋतूंतील दोन महिन्याप्रमाणें ते दोघे गांधार भ्राते आपल्या शरांनीं पार्थास ताप देऊं लागले असतां एकाच रथांत बसलेल्या त्या दोघांस अर्जुनानें एका बाणानें यमलोकीं पाठवून दिलें. तेव्हां त्यांचे सिंहासारखे शूर व प्रचंड देह चेतनाशून्य होऊन भूमीवर पडले व त्यांचें उज्ज्वल यश दश-दिशांत पसरून त्यांचे प्राण लीन झाले.

( २ ) युद्धांतून कधींहि परत न फिरणाऱ्या मातुलांचा वध झालेला पाहून तुझ्या पुत्रानें अतिशय अश्रु ढाळले. इतक्यांत मायाविशारद शकुनीनें आपले भ्राते मृत होऊन पडलेले पहातांच कृष्णार्जुनास मोहित करण्याची युक्ति योजिली. मुसळें, परशु, बाण, चक्र, इत्यादि नानाप्रकारचीं आयुधें सर्व दिशांतून अर्जुनावर पडूं लागलीं. सिंह, वाघ, गर्दभ, सर्प, राक्षस इत्यादि नानाविध क्रूर प्राणी पार्थावर धांवून आले. तथापि अर्जुनानें भ्रांत न होतां बाणजालानें त्या सर्वांचा क्षणार्धांत नाश केला. तेव्हां ते सर्व मोठ्यानें गर्जना करीत नष्ट झाले. नंतर पार्थाच्या रथाभोंवतीं अंधकार पसरला. त्यांतून भीषण शब्द निघूं लागला. तो अंधकार सर्व रणांगणाला भय उत्पन्न करणारा होता. परंतु त्या सव्यसाचीनें 'ज्यौतिष' अस्त्राचा प्रयोग करून त्या अंधकाराचाहि नाश केला.

अंधकार नष्ट होतांच त्या ठिकाणीं जलाचे प्रवाह निर्माण झाले. तथापि अर्जुनानें आदित्यास्त्र सोडतांच तें सर्व जल सुकून गेलें. सौबलानें असें अनेक प्रकारचें मायाजाल पसरलें असतां दिव्यास्त्रवेत्त्या पार्थानें सहज लीलेनें त्यांचा नाश करून टाकला.

( ३ ) याप्रमाणें मायेचा नाश करून पार्थानें शकुनीला शरजालानें त्रस्त करून सोडिलें. तेव्हां तो सौबल वेगवान् अश्वांच्या रथांत बसून एखाद्या भीरूप्रमाणें तेथून दूर पळाला. त्यानंतर अर्जुनानें आपलें हस्तलाघव प्रकट करीत कौरवांच्या सेनेवर शरांचा वर्षाव केला. त्यावेळीं पार्थाकडून त्रस्त केली जाणारी तुझ्या पुत्राची सेना, पर्वताच्या पायथ्याशीं दुभंग होणाऱ्या गंगेप्रमाणें द्विधा झाली व पळूं लागली. कांहीं द्रोणाच्या आश्रयाला गेली. कित्येकांनीं दुर्योधनाचा आश्रय केला.

त्यावेळीं सर्व दिशा धूलीनें आच्छादित झाल्यामुळें अर्जुन दिसेनासा झाला. दक्षिण दिशेंतून गांडीवाचा निर्घोष तेवढा ऐकूं येत होता. तो टणत्कार शंख-दुंदुभींच्या शब्दासहि लोपवून आकाशांत दुमदुमला होता. इतक्यांत दक्षिण-दिशेंतच पार्थाचें व कौरववीरांचें युद्ध जुंपलें. तेव्हां मी द्रोणाच्या समीप जाऊन उभा राहिलों. पांडवांचें सैन्य जागजागीं चाल करून जातच होतें. याप्रमाणें अर्जुनानें तुझ्या सैन्याचा विध्वंस चालविला असतां कौरवांचा एकहि वीर पुढें सरसावला नाहीं. उलट पार्थाच्या शरवृष्टीनें भयभीत होऊन तें सैन्य दश-दिशांत पळत सुटलें व आपल्याच सैनिकांना पायांखालीं तुडवूं लागलें.

हे महाराज, धनंजयाच्या केवल एका बाणानें तुझें सर्व सैन्य गतप्राण झालें. त्याला दुसरा बाण सोडावा लागला नाहीं. अर्जुनानें तें रणांगण सैन्यांतील सर्व प्राण्यांच्या मृतदेहांनीं व्यापून टाकिलें असतां कौरववीर इतके त्रस्त झाले होते कीं, ते आपापल्या सर्व संबंधीजनांस सोडून स्वतःच्या प्राणरक्षणार्थ पळूं लागले. कित्येक सार्दीनीं तर आपलीं अश्वादि वाहनेंहि सोडून तेथून पलायन केलें. ७. २. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ नीलाचें द्रौणीशीं युद्ध. ४ नीलाचा वध. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, त्या पांडुपुत्रानें तुमची सेना अशी भग्न केली असतां, पलायन करणाऱ्या तुमची मनःस्थिति कशी झाली होती ? पराभूत झालेल्या सैन्याला कांहीं आधार नसल्यामुळें त्यास प्रतियुद्ध करणें दुष्कर होतें. यास्तव पुढें काय झालें, तें सर्व मला सांग.

( २ ) संजय—हे महाराज, अशा संकटांत सांपडले असतांहि तुझ्या पुत्राचें प्रिय इच्छिणारे कांहीं वीर आपल्या यशाचें रक्षण करण्यासाठीं द्रोणाला अनुसरले व त्यांनीं अस्त्रें सज्ज करून धर्मराजावर चाल केली. त्या पराक्रमी वीरांनीं भीमसेन, सात्यकि व धृष्टद्युम्न यांच्यामध्यें बरेंच अंतर पाडलें व त्यांची परस्परांशीं भेट होऊं दिली नाहीं. त्यावेळीं ते सर्व क्रूर पांचाल ‘ द्रोणाचा वध करा, द्रोणाचा वध करा ’ अशी गर्जना करूं लागले व कौरव ‘ द्रोणाचें रक्षण करा, आचार्याचा वध होऊं देऊं नका ’ असें म्हणून आपल्या

सैन्यास उत्साह देऊं लागले. याप्रमाणें त्या दोन पक्षांत द्रोणाच्या नांवांचें जणू काय द्यूतच प्रवृत्त झालें.

हे महाराज, त्या संग्रामांत द्रोणाचार्यानें पंचालांच्या ज्या ज्या रथसमुदायावर प्रहार चालविला, त्याच्या त्याच्या रक्षणार्थ धृष्टद्युम्न झटत होता. दोन्ही पक्षांत भयंकर रुदन माजलें होतें. तथापि त्यांत विशेष असा होता कीं, पांडव आपणांस पूर्वी दिलेले क्लेश स्मरून शत्रूंना कांपवीत होते. ते स्वतः शत्रूकडून मात्र कंपित होत नव्हते.

हे महाराज, पांडव स्वभावतः सत्त्वशील, अकार्याविषयीं लज्जा बाळगणारे व नम्र होते, तथापि कौरवांनीं त्यांचा क्रोधाग्नि प्रदीप्त केल्यामुळें ते जीवावर उदार होऊन द्रोणाचा वध करण्यास उद्युक्त झाले. त्या संग्रामांत आपल्या प्राणांचा पण लावून जणुकाय द्यूतच खेळणाऱ्या त्या वीरांचें परस्परांशीं झालेलें द्वंद्वयुद्ध म्हणजे लोखंडावर लोखंडाचें घर्षण किंवा दगडावर दगडांचे प्रहार आपटावे, याप्रमाणें भासलें. असें दारुण युद्ध पूर्वी कधीं पाहिल्याचें वृद्धांनासुद्धां आठवत नाहीं, किंवा ऐकल्याचेंहि त्यांना स्मरत नाहीं.

राजा, अजातशत्रु युधिष्ठिराचा सेनासमुद्र क्षुब्ध झाला असतां जो प्रचंड शब्द झाला, तो आकाशाला जाऊन भिडला व पुनः त्या सेनेंतच लीन झाला. नंतर द्रोणानें त्या रणांगणांत संचार करीत पांडवांचें असंख्य सैन्य भग्न करून टाकिलें. याप्रमाणें द्रोणाचार्यानें पांडवसैन्याचें मर्दन चालविलें आहे, हें पाहून सेनापति धृष्टद्युम्नानें स्वतः त्याचें निवारण केलें. त्यावेळीं झालेलें द्रोण-पांचालांचें तें युद्ध अनुपम होतें.

( ३ ) नंतर पांडवांकडील नील पुढें सरसावला. त्या अग्नितुल्य वीराचे शर हेच विस्फुलिंग असून धनुष्य हीच ज्वाला होती. त्यानें आपल्या पराक्रमानें कौरवसैन्य जणुकाय दग्धच केलें.

याप्रमाणें तो नील शत्रुसैन्याला दग्ध करीत असतां प्रतापवान् द्रोणपुत्र त्याला म्हणाला—" हे नीला, शररूपी ज्वालांनीं अनेक सामान्य योद्ध्यांना दग्ध करण्यांत काय अर्थ आहे ! त्यापेक्षां मज एकट्याबरोबर युद्ध कर. तूं क्रुद्ध झाला आहेस. मजवर प्रहार कर. ये. "

( ४ ) अश्वत्थाम्याचें हें भाषण ऐकतांच नीलानें त्या कमलपत्राक्षावर शर सोडिले. तेव्हां द्रोणपुत्रानेंहि तीन अर्धचंद्राकार बाण सोडून त्याचें धनुष्य,

ध्वज व छत्र यांचा छेद केला. इतक्यांत नीलानें अश्वत्थाम्याचें मस्तक शरीरापासून वेगळें करण्यासाठीं हातांत खड्ग घेऊन एखाद्या पक्ष्याप्रमाणें रथावरून उड्डाणच केलें. तथापि द्रोणपुत्रानें एकच शर सोडला व पूर्णचंद्राप्रमाणें कांतिमान् मुखकमलानें युक्त असलेल्या त्या भव्य नीलाचें मस्तक भूमीवर पाडविलें.

अग्नितुल्य असलेला नील गतप्राण होऊन पडतांच पांडवसेना दुःखानें विह्वल झाली. सर्व वीर भयभीत झाले. ते सर्व पांडवांचे महारथ 'अर्जुन आम्हांला या शत्रूच्या हातून कधीं सोडवितो' असें म्हणूं लागले. परंतु त्यावेळीं तो बलाढ्य पार्थ दक्षिणदिशेस संशप्तक व नारायणगण यांचा संहार करण्यांत गुंतला होता. ७. २. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ वृकोदराचें कौरवांशीं युद्ध. २ कर्ण-धनंजययुद्ध. ३ द्वितीयदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे महाराज, पांडवसेनेची ही हानि वृकोदराला सहन झाली नाहीं. तो द्रोणावर धांवून गेला व त्यानें तीक्ष्ण धारेच्या असंख्य बाणांनीं त्याला विद्ध केलें. इतक्यांत कर्ण, अश्वत्थामा व दुर्योधन यांनीं विपुल बाणांनीं त्याचें निवारण केलें. त्यावेळीं त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. भीमसेन प्रचंड गर्जना करीत त्यांच्यावर तुटून पडला. तेव्हां तो जीवावर उदार होऊन हें साहस करीत असतां मृत्युमुखीं पडण्याचाहि संभव आहे, असें जाणून युधिष्ठिरानें 'भीमाचें रक्षण करा' अशी आपल्या सेनेला आज्ञा दिली.

तेव्हां नकुल-सहदेव, युयुधान इत्यादि वीर त्याच्या साह्यार्थ निघाले व त्यांनीं द्रोणाच्या सैन्यावर चाल केली. द्रोणानें यत्किंचित्हि न भितां त्यांच्याशीं युद्ध आरंभिलें. याप्रमाणें पांडवांनीं तुझ्या पक्षांतील महाबलाढ्य वीरांवर मृत्यूस न भितां चाल केली असतां त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें व त्या रणांगणांत एकच हलकल्लोळ उडाला. मृतदेहांनीं व विद्ध होऊन विह्वल होणाऱ्या प्राण्यांनीं ती भूमि व्यापून गेली होती.

हे राजन्, त्या दिवशींच्या संग्रामांत पांडव जरी त्वरेनें चाल करीत होते, तरी सेनापति धृष्टद्युम्न 'द्रोणाला जिंकण्याचा हाच काल आहे' असें म्हणत

त्यांना आणखी त्वरा करूं लागला. तेव्हां महातेजस्वी पांडव पार्षताच्या इच्छेनुरूप त्वरेनें द्रोणाच्या रथावर तुटून पडले. त्यावेळीं ते वेगानें सरोवराकडे धांवणाऱ्या हंसाप्रमाणें शोभले.

इतक्यांत द्रोण, कृप, कर्ण, अश्वत्थामा, जयद्रथ, विंदानुविंद, आणि शल्य हे पांडवांचें निवारण करण्यास पुढें सरसावले. तथापि पांडव आणि पंचाल अतिशय दुरासद व दुर्निवार होते, ते यावेळीं क्षत्रधर्मानुसार संरब्ध झाले होते. त्यामुळें ते शरार्त झालेले महारथ द्रोणापासून दूर पळाले नाहींत. तें पाहून क्रोधसंतप्त झालेल्या द्रोणानें सहस्रावधि शरांनीं चेदि, पंचाल व पांडव यांच्या सैन्यांतील योद्ध्यांचा संहार चालविला.

हे महाराज, त्यावेळीं आचार्यांच्या प्रत्यंचेचा ध्वनि मेघगर्जनेप्रमाणें दशदिशांत दुमदुमून राहिला व त्या प्रचंड ध्वनीनें मनुष्यप्राणीहि भयभीत झाले. राजा, इतक्यांत अवशिष्ट राहिलेल्या संशप्तकांस जिंकून अर्जुन मोठ्या त्वरेनें द्रोणाकडे वळला. त्यावेळीं आचार्यांनें पांडवसेनेचा संहार चालविला होता. कल्पान्त सूर्यासारखा तेजस्वी पार्थ आपल्या अस्त्ररूपी किरणांनीं संशप्तकरूपी समुद्र शुष्क करून परतीरावरील कौरवांस तप्त करूं लागला. युगान्तसमयीं सर्व भूतांना दग्ध करणाऱ्या धूमकेतूप्रमाणें तो कौंतेय आपल्या शस्त्रतेजानें कौरवांस दग्ध करूं लागला. त्यानें सहस्रावधि बाणांचा एक असे अनेक शरसमूह निर्माण केले. त्यांनीं सैनिकांना व सैन्यांतील अश्व-गजादि असंख्य प्राण्यांना गतप्राण करून टाकिलें व कौरवसैन्य उध्वस्त करून सोडलें. त्यावेळीं भूमीवर पडलेले जे वीर पळत सुटले होते, त्यांवर मात्र युद्धनीति जाणणाऱ्या पार्थानें प्रहार केला नाहीं.

( २ ) हे महाराज, तुझ्या सैन्यांतील बहुतेक योद्धे युद्धपराङ्मुख होऊन ' हे कर्णा हे कर्णा ' असें ओरडत हाहाकार करूं लागले. त्यांचा तो आक्रोश अधिरथ कर्णाच्या कानीं पडतांच ' ते कौरव स्वसंरक्षणार्थ आपल्याला शरण आले आहेत, ' असें मानणारा कर्ण ' भिऊं नका ' असें त्यांना आश्वासन देत अर्जुनावर धांवून गेला. अस्त्रविद्येंत प्रवीण असलेल्या त्या वैकर्तनानें आग्नेयास्त्र सोडलें असतां धनंजयानें त्याचा छेद केला. ते उभयतां परस्परांवर अस्त्रप्रयोग करीत होते व प्रतिस्पर्ध्यांच्या अस्त्राचा नाश करीत होते. इतक्यांत धृष्टद्युम्न, भीमसेन व सात्यकि यांनींहि कर्णावर बाणांची वृष्टि चालविली. राधेयानेंहि

त्यांच्यावर बाण सोडून त्यांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं. धनुष्यें नष्ट होतांच त्या वीरांची दंतभग्नसर्पाप्रमाणें स्थिति झाली. तेव्हां त्यांनीं रथदंड हातीं घेऊन ते वेगानें कर्णाच्या रथावर फेंकले. ते दंड सर्पाप्रमाणें वेगानें येत असतां कर्णानें त्यांचे तुकडे करून टाकिले व मोठ्यानें सिंहनाद केला.

इतक्यांत कर्णाचे दोघे भ्राते त्याच्या साह्यार्थ धांवले. ते पार्थाच्या शीघ्रगामी शरांनीं तत्काल गतप्राण होऊन पडले. त्यांचा तिसरा भ्राता विपाट पुढें येतांच त्याचेंहि मस्तक अर्जुनाच्या अर्धचंद्राकृति बाणानें खालीं पाडविलें. याप्रमाणें पार्थानें कौरवांच्या समक्ष कर्णाच्या तीन भ्रात्यांचा वध केला.

त्यानंतर भीमसेनानें आपल्या रथावरून गरुडाप्रमाणें उड्डाण केलें व आपल्या हातांतील श्रेष्ठ खड्गानें कर्णाच्या पंधरा अनुयायांस यमालयीं पाठवून दिलें. त्यानें पुनः रथावर चढून धनुष्य हातीं घेतलें आणि कर्णाला त्याचा अश्व व सारथि यांसह विद्ध केलें.

दुसऱ्या बाजूनें धृष्टद्युम्न पुढें झाला. त्यानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या खड्गानें चंद्रवर्मा, बृहत्क्षत्र व नैषध यांस गतप्राण करून मोठ्यानें सिंहनाद केला व एकवीस बाणांनीं कर्णाला विद्ध केलें. इतक्यांत सात्यकीनेंहि कर्णावर शरवर्षाव आरंभिला. त्यानें कर्णाचें धनुष्य तोडून टाकिलें व त्याचे बाहू आणि वक्षःस्थल यांस शरांनीं विद्ध केलें.

त्यावेळीं सात्यकिरूपी समुद्रांत कर्ण बुडत आहे, असें पहातांच दुर्योधन, द्रोण व जयद्रथ हे तिघे त्याच्या साह्यार्थ धांवले व त्यांनीं त्यास वांचविलें. कौरवांचे शेकडों सैनिक कर्णाच्या रक्षणार्थ धांवून आले व त्यांनीं पांडवांच्या सैन्यांतील गजाश्वांना विह्वल करीत सात्यकीवर शरवृष्टि चालविली. प्रतिपक्षाकडील वीर एकट्या सात्यकीवर चाल करून आलेले पहातांच धृष्टद्युम्न, भीमसेन, सौभद्र, अर्जुन, नकुल व सहदेव यांनीं त्याचें रक्षण केलें.

( ३ ) हे महाराज, याप्रमाणें जणुंकाय सर्व धनुर्धरांच्या क्षयासाठींच त्या रणांगणांत भयंकर संग्राम झाला. त्यांत उभयपक्षांकडील सहस्रावधि वीर गज, अश्व व पदाति यांसह प्राणांस मुकले. त्यांच्या मृतदेहांच्या राशी पडल्या. अनेक प्राणी रथांखालीं चिरडून मृत झाले. अशी प्राणहानि होत असतांहि ते क्रुद्ध झालेले बलाढ्य वीर स्वसामर्थ्यानुसार समरांगणांत संचार करीतच होते.

अशाप्रकारें तुमुल युद्ध चाललें असतां सूर्य अस्तास गेला. तेव्हां अतिशय श्रांत झालेलीं तीं दोन्ही सैन्यें क्रोधानें परस्परांकडे पहात आपापल्या शिबिरांत परत फिरलीं व दुसऱ्या दिवसाचें युद्ध संपलें ७. २. ३२.

येथें दुसरें संशप्तकवध उपपर्व समाप्त झालें.

---

# अभिमन्युवधपर्व. ३.



## अध्याय ३३ वा.

[ १ दोन्ही सैन्यांच्या मनःस्थितीचें वर्णन. २ दुर्योधन-द्रोणसंवाद. ३ अभिमन्युवधाचा संक्षिप्त वृत्तान्त. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, अमित तेजस्वी पार्थानें आमच्या सेनेला उध्वस्त करून धर्मराजाचें रक्षण केलें आणि द्रोणाची प्रतिज्ञा निष्फल केली. तुझ्या सर्व सैन्याला जिंकलें. त्या सर्वांचीं कवचें भग्न केलीं. त्यांचे देह धूलीनें माखले आणि ते दीन होऊन दशदिशांकडे पाहूं लागले. तेव्हां आम्हीं भारद्वाजाच्या संमतीनें त्या दिवसाचें युद्ध थांबवून सैन्याचा अवहार केला.

हे प्रभो, त्या दिवशीं आपले अनेक वीर बाणांनीं विद्ध झाले होते. क्षतांनीं ते विह्वल झाले होते, शिवाय पुष्कळ वीरांचा उपहासहि झाला होता. त्यामुळें त्या रात्रीं आपल्या शिबिरांत सर्वत्र शांतता पसरली होती. पराजय पावलेले ते सर्व योद्धे एखाद्या ध्यानस्थ मुनीप्रमाणें स्तब्ध बसले होते.

परंतु पांडवसेनेंत विलक्षण उत्साह दिसत होता. सर्व सैनिक अर्जुनाच्या पराक्रमाचें वर्णन करीत होते व त्याच्यावरील श्रीकृष्णाचें स्वाभाविक प्रेम पाहून त्याचें कौतुक करीत होते.

( २ ) हे भारता, ती रात्र जाऊन दुसरा दिवस उगवला असतां शत्रूचा उत्कर्ष पाहून अतिशय खिन्न झालेला राजा दुर्योधन सुप्रभातीं द्रोणाचार्याजवळ येऊन सर्व वीरांसमक्ष त्यास म्हणाला—" हे आचार्य, या युद्धांत आमचा वध करावा किंवा होऊं द्यावा, अशीच तुमची इच्छा दिसत आहे. त्यामुळेंच काल युधिष्ठिर हातीं आला असतांहि तुम्हीं त्याला धरलें नाहीं. 'मीं प्रयत्न केला, परंतु पांडव त्याचें संरक्षण करीत असल्यामुळें त्याला धरणें अशक्य

झालें ' असें जर म्हणशील, तर पांडवच काय, पण साक्षात् देव जरी युधिष्ठिराच्या रक्षणार्थ आले, तरी त्यांचाहि पराभव करण्यास तूं समर्थ आहेस. तुझ्या मनांत शत्रूला धरावयाचें असल्यास, तो तुझ्या दृष्टीपुढें आल्यावर सुटून जाणें शक्य नाहीं. हे द्विजश्रेष्ठा, तूं पूर्वी मजवर प्रसन्न होऊन मला वर दिला आहेस व आतां मात्र त्याच्या उलट वागत आहेस. परंतु आर्यजन आपल्या भक्ताचा आशाभंग कदापि करीत नसतात."

राजा धृतराष्ट्रा, दुर्योधनाचें हें भाषण ऐकून द्रोणास फार खेद झाला. तो म्हणाला—"दुर्योधना, मी तुझें प्रिय करण्यासाठीं इतके यत्न करीत असतांहि तूं मजविषयीं अशी कल्पना करावीस हें तुला शोभत नाहीं. बाबारे, समरांगणांत अर्जुन रक्षण करीत असतां मीच काय, पण देव, दानव, गंधर्व, यक्ष, उरग, राक्षस यांसह हें त्रैलोक्यहि धर्मराजाला धरण्यास समर्थ होणार नाहीं. समग्र विश्वाला उत्पन्न करणारा गोविंद व अर्जुन हे दोघे जेथें सेनानी आहेत, तेथें प्रभु त्र्यंबकावांचून अन्य कोणाचेंहि सामर्थ्य चालणार नाहीं! असें जरी आहे, तरी आज मी तुला सत्यप्रतिज्ञेनें सांगतों कीं, देवांनाहि अभेद्य असा व्यूह रचून आज पांडवांचा एक श्रेष्ठ महारथ मी पाडवीन. तथापि हे राजा, तूं कांहीं तरी युक्ति योजून अर्जुनाला मात्र तेथून दूर ने. त्या वीराला ठाऊक नाहीं, अशी समरविद्येतील एकहि गोष्ट नाहीं. त्यानें मजपासून व इतर अनेक गुरूंपासून उपांगांसह युद्धाचें सर्व ज्ञान संपादन केलें आहे."

द्रोणानें असें म्हटलें असतां संशप्तकगणांनीं पुनः अर्जुनाला दक्षिण दिशेकडे युद्धाचें आह्वान केलें. तेथें पार्थ वळला व त्याचें तुमुल युद्ध जुंपलें. तसें दारुण युद्ध पूर्वी कोणीं पाहिलें किंवा ऐकलेंहि नाहीं.

( ३ ) याप्रमाणें संशप्तकांशीं युद्ध करण्यांत पार्थ गुंतला असतां द्रोणाचार्यानें रणांगणांतील मुख्य भागांत चक्रव्यूह रचला. त्या देदीप्यमान व्यूहाकडे माध्याह्नींच्या सूर्याप्रमाणें पहाणेंहि अशक्य झालें. तो व्यूह दुर्भेद्य असूनहि अभिमन्यूनें धर्मराजाच्या आज्ञेनें त्याचा भेद केला. त्या बालवीरानें चक्रव्यूहभेदाचें दुर्घट कर्म करून सहस्रावधि योद्ध्यांचा वध केला व शेवटीं तो सुभद्रापुत्र द्रोण, द्रौणि, कृप, कर्ण, भोज व शल्य या सहा वीरांशीं एकटा युद्ध करीत असतां दुःशासनपुत्राच्या हातीं सांपडून प्राणांस मुकला. तो कुमार हत होतांच आम्हांला परम संतोष झाला व पांडव शोकसागरांत बुडाले.

धृतराष्ट्र—हे संजया, पार्थासारख्या पुरुषव्याघ्राचा पुत्र युद्धांत हत झाल्याचें ऐकून माझें मन अतिशय विदीर्ण होत आहे. अरे अरे, अभिमन्यूसारखा कुमार युद्धांत पडावा ना! तो अद्यापि यौवनावस्थेसहि प्राप्त झाला नव्हता! मन्वादि श्रेष्ठ धर्मज्ञांनीं घालून दिलेला हा क्षत्रियांचा धर्म खरोखर अतिशय दारुण आहे! या क्षत्रधर्मास अनुसरून राज्याची इच्छा करणाऱ्या अनेक शूरांनीं एका बालवीरावर शस्त्र चालवावें ना! बा संजया, अभिमन्यु अद्यापि बालकच होता. तो सौख्यांत रहाणारा कुमार निर्भयपणें रणांगणांत संचार करीत असतां अनेक वीरांनीं त्याचा कसा वध केला, तें मला सांग. त्याच-प्रमाणें तुमच्या रथसैन्याचा संहार करणाऱ्या त्या अमिततेजस्वी सौभद्रानें केलेल्या पराक्रमाचेंहि सविस्तर वर्णन कर.

संजय—हे राजेंद्रा, कौरवांनीं सौभद्रास युद्धांत कसें पाडिलें व त्यानें चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा कसा यत्न केला तें सांगतों, ऐक. मोठाले वृक्ष, तृण व घनदाट झुडपें यांनीं युक्त असलेल्या अरण्याला चोहोंबाजूंनीं अग्नि लागला असतां त्यांत सांपडलेल्या वन्य पशूप्रमाणें आमच्या सैन्यांत शिर-तांच त्या श्रेष्ठ कुमाराची स्थिति झाली. ७. ३. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १ अभिमन्यूचें गुणवर्णन. २ चक्रव्यूहाचें वर्णन. ]

( १ ) **संजय**—हे राजा धृतराष्ट्रा, पांच पांडव व श्रीकृष्ण समरांगणांत दारुण कर्म करणारे आहेत. त्यामुळें रणांगणांत ते साक्षात् देवांनाहि दुरासद आहेत. राजा युधिष्ठिर सत्व, सत्कर्म, कुलीनत्व, बुद्धि व श्री यांनीं संपन्न आहे. परकीयहि त्याची कीर्ति गात असतात. त्याच्या सारखा पुण्यशील पुरुष पूर्वीं झाला नाहीं व पुढेंहि होणार नाहीं. तो सत्यधर्मांत रत व दमनशील आहे. विप्रपूजादि गुणांनीं युक्त आहे. त्याच्या या पुण्याचरणामुळें तो सदैव स्वर्गा-तच वास करीत आहे, ( म्ह० सतत स्वर्गसुखाचा अनुभव घेत आहे. ) असें म्हणण्यास हरकत नाहीं.

राजा, रथस्थ भीमसेन, कालान्त काल व महाप्रतापी परशुराम हे तिघे तुल्यगुण आहेत, असें तज्ज्ञ म्हणतात. गांडीवधारी अर्जुन आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठीं दक्षतेनें युद्ध करीत असतो. त्या पार्थाला ज्याची उपमा देतां

येईल असा एकहि वीर मला या पृथ्वीतलावर दिसत नाहीं. माद्रीपुत्र नकुल अत्यंत गुरुवत्सल, नम्र, दमनशील, सौंदर्य व शौर्य यांनीं युक्त आहे. तो आपण केलेल्या कर्मांचा कदापि उच्चारहि करावयाचा नाहीं अशा प्रकारचें नैभृत्य म्ह० कृतकर्मांचें अप्रकाशन त्यांच्या अंगीं वसत आहे.

सहदेव बहुश्रुतपणा, गांभीर्य, माधुर्य, सौंदर्य, सत्य व पराक्रम यांत साक्षात् अश्विनिकुमारतुल्य आहे. या पांची भ्रात्यांच्या अंगचे सर्व गुण व श्रीकृष्णाचें लोकोत्तरत्व अभिमन्यूमध्यें सांठविलें होतें. हे महाराज, तो कुमार युधिष्ठिराच्या पराक्रमानें व कृष्णाच्या सदाचारानें युक्त होता. भीमसेनासारखा भयंकर कर्में करणारा होता. त्याचें स्वरूप धनंजयासारखें होतें. सामर्थ्य, बहुश्रुतपणा व विनय हे गुण नकुल-सहदेवांच्या तुल्य होते. एकंदरींत त्याच्या अंगीं सर्व सद्गुणांचा संचयच होता.

धृतराष्ट्र—हे सूता, तो सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु युद्ध करीत असतां कसा हत झाला, तो समग्र वृन्तात ऐकण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) संजय—महाराज, चित्त स्थिर कर, शोक आंवर, मी तुला आप्तजनांच्या फार मोठ्या नाशाचा वृत्तान्त सांगणार आहें, तो शांत चित्तानें श्रवण कर. द्रोणाचार्यानें चक्रव्यूहाची रचना करून त्यांत इंद्रतुल्य पराक्रमी राजांची योजना केली. त्या चक्रांतील आरास्थानीं सूर्यासारखे तेजस्वी राजपुत्र स्थित होते. त्या सर्व राजकुमारांनीं निकरानें युद्ध करण्याची प्रतिज्ञा केली होती. सुवर्णालंकृत ध्वज उभारले होते. रक्तवस्त्रें परिधान करून, त्याच वर्णाचीं भूषणें धारण केलीं होतीं. त्या सर्वांच्या पताकाहि आरक्त वर्णाच्या असून त्यांनीं पुष्पमाला धारण केल्या होत्या. चंदन व अगरूच्या उट्या लावल्या होत्या. त्यांचीं वस्त्रें अतिशय सूक्ष्म होतीं.

अशा प्रकारचे दहा हजार धनुर्धर वीर अभिमन्यूवर धांवून गेले. ते सर्व राजपुत्र परस्परांवर प्रेम करणारे व समदुःखी होते. सर्व परस्परांशीं स्पर्धा करीत असून परस्परांच्या हिताविषयीं तत्पर होते. त्या सर्वांचें साहस समान होतें. अशा त्या श्रेष्ठ वीरांच्या अग्रभागीं तुझा अतिशय सुस्वरूप पौत्र लक्ष्मण स्थित होता.

राजा दुर्योधन व्यूहाच्या मध्यभागीं असून तो कर्ण, दुःशासन, कृपाचार्य इत्यादि वीरांनीं परिवेष्टित होता. देवराज इंद्राप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या

कौरवाधिपावर चवऱ्या वारल्या जात असल्यामुळें तो उदय पावणाऱ्या सूर्या-प्रमाणें प्रकाशत होता.

सैन्याच्या प्रवेशद्वारीं द्रोणाचार्य स्वतः उभा होता. त्याच्या समीपच सिंधु-पति जयद्रथ मेरुपर्वताप्रमाणें निश्चल स्थित होता. जयद्रथाच्या एका बाजूला अश्वत्थामा व तुझे देवतुल्य तेजस्वी पुत्र उभे होते व दुसऱ्या बाजूला शकुनि, शल्य व भूरिश्रवा, हे स्थित होते.

याप्रमाणें चक्रव्यूहाची रचना करून सर्व वीर प्राणावर उदार होऊन पुढें सरसावले व त्यांचा अंगावर रोमांच आणणारा दारुण संग्राम प्रवृत्त झाला. ७. ३. ३४.

---

## अध्याय ३५ वा.

[ १ द्रोणसैन्यावर पांडववीरांची चाल. २ अभिमन्यु-धर्मराजसंवाद. ३ चक्र-व्यूहभेदाची प्रतिज्ञा. ]

( १ ) संजय—हे प्रभो, द्रोणाचार्य आपल्या दुर्धर्ष सैन्याचें रक्षण करीत असतां त्यावर भीमसेनादि पांडवांकडील वीर धांवून गेले. त्याचप्रमाणें सात्यकि, चेकितान, धृष्टद्युम्न, कुंतिभोज, द्रुपद, अभिमन्यु, क्षत्रधर्मा, बृहत्क्षत्र, धृष्टकेतु, दोघे माद्रेय, घटोत्कच, युधामन्यु, शिखंडी, उत्तमौजा, विराट, पांच द्रौपदेय, शिशुपालपुत्र, पांच केकय भ्राते, सहस्रावधि सृंजय आणि दुसरेहि अनेक अस्त्रवेत्ते वीर, यांनीं आपापल्या सैन्यांसह द्रोणावर चाल केली. तथापि भारद्वाजानें यत्किंचित्हि भ्रांत न होतां त्या सर्वांचें निवारण केलें.

हे महाराज, दुर्भेद्य पर्वतापासून जलप्रवाह जसा उलट फिरतो, किंवा समुद्राच्या लाटा तटावर आपटून परत फिरतात, त्याप्रमाणें पांडवांकडील वीर द्रोणाचार्यांपासून परत फिरूं लागले. द्रोणाच्या शरजालापुढें पांचाल व सृंजय हेहि हतबल झाले. आचार्यांचें तें अद्भुत बाहुबल पाहून आम्ही विस्म-यानें चकित झालों. युधिष्ठिरानें मनांत त्याचा पराभव करण्याचा विचार अनेक प्रकारें केला पण शेवटीं कोणीहि वीर हें कार्य करण्यास समर्थ नाहीं, हें पाहून त्यानें सौभद्राकडे हें दुष्कर कर्म सोंपविलें.

( २ ) अभिमन्यूचा पराक्रम श्रीकृष्ण व अर्जुन, यांहून यत्किंचित्हि न्यून नाहीं, असें जाणणारा युधिष्ठिर त्या कुमाराला म्हणाला—" बा अभि-

मन्यो, या चक्रव्यूहाचा भेद कसा करावा, हें आम्हांतील कोणालाहि ठाऊक नाहीं. यास्तव या प्रसंगीं अर्जुन आम्हांला दोष देणार नाहीं, असें कर्तव्य तूं कर. बा वत्सा, अर्जुन, श्रीकृष्ण, प्रद्युम्न व चवथा तूं यांखेरीज पांचव्या कोणालाहि या चक्रव्यूहाचा भेद करतां येणार नाहीं. यास्तव सात्यकिप्रभृति मातुल, सर्व सैन्य व आम्ही तुझे गुरुजन, या व्यूहभेदाची तुझ्यापाशीं याचना करीत आहों. ती पूर्ण करण्यास तूंच समर्थ आहेस. आम्हीं जर आज या व्यूहाचा भेद केला नाहीं, तर धनंजय संशप्तकांच्या युद्धांतून परत येतांच आम्हांला दोष देईल. यास्तव तो परत येण्यापूर्वी तूं अस्त्रें सज्ज करून द्रोणाच्या सैन्याचा नाश कर."

अभिमन्यु—हे तात, द्रोणाचें सैन्य अतिशय बलाढ्य व उग्र आहे. तथापि पितरांच्या जयाकांक्षेनें मी त्या व्यूहांत प्रवेश करीन. या व्यूहभेदाची युक्ति माझ्या पित्यानें मला शिकविली आहे. परंतु आंत गेल्यानंतर कांहीं संकट उपस्थित झाल्यास त्यांतून मला बाहेर पडतां येईल किंवा नाहीं, हें मात्र सांगवत नाहीं.

युधिष्ठिर—हे वत्सा, तूं सर्व धनुर्धरांत श्रेष्ठ आहेस. तूं आम्हांला सैन्यांत प्रवेश करण्यास केवल द्वार करून दे. तूं जेथून आंत जाशील, त्याच मार्गानें आम्ही तुझ्या मागोमाग येऊं. आज तूं आम्हांला धनंजयाच्या जागीं आहेस. युद्धामध्यें आम्ही सर्वदा त्याला अनुसरतों. आपल्या पित्याप्रमाणेंच आज तूं आमचा अग्रणी हो आणि आम्ही सर्व बाजूंनीं तुझें रक्षण करूं.

भीम—बा कुमारा, मी तुझ्या बरोबर राहीन. शिवाय धृष्टद्युम्न, सात्यकि, केकय, पांचाल, मत्स्य व अखिल प्रभद्रक, हे सर्व तुझ्या मागोमाग येतील. तूं केवल व्यूहाचा भेद कर. एकदा आमचा आंत प्रवेश झाला कीं आम्ही त्या सैन्याचा जागच्याजागीं संहार करून त्यांच्या श्रेष्ठ श्रेष्ठ वीरांचा नाश करूं.

( २ ) अभिमन्यु—हे तात, प्रज्वलित अग्नीमध्यें उडी टाकणाऱ्या पतंगाप्रमाणें आज क्रोधसंतप्त झालेला मी या दुरासद द्रोणसैन्यांत उडी घेणार आहें. त्याच्या योगानें माझ्या श्रीकृष्णमातुलाचें मजवरील प्रेम वृद्धिंगत होईल आणि माझ्या पित्याचें यश पसरेल. मी आज माझ्या दोन्ही कुलांना हितावह होईल, असेंच दुष्कर कर्म करून दाखवीन. हीं सर्व भूतें संग्रामामध्यें एकट्या कुमारानें शत्रुसैन्याचा नाश केला आहे, असें पहातील. आज माझ्या हातून

शत्रूंचा एक योद्धाहि जर जिवंत सुटला तर मी सुभद्रामातेचा पुत्रच नव्हे. मी शत्रुसैन्याचा नाश जर न करीन तर पार्थपुत्रच नव्हे. आज केवळ एका रथानें समग्र क्षत्रमंडळाला दाही दिशेंत पळावयास न लावीन तर मी स्वतःला महापराक्रमी अर्जुनाचा आत्मजच म्हणविणार नाहीं.

युधिष्ठिर—बाळा सौभद्रा, तुझ्या या उत्साहपूर्ण भाषणानें आम्ही निश्चिंत झालों. तुझें सामर्थ्य असेंच वृद्धिंगत होवो. द्रोणाचें रक्षण करणारे वीर साध्य, मरुद्गण व रुद्र यांच्या योग्यतेचे आहेत व त्यांचा पराक्रम वसु, आदित्य व अग्नि यांच्या तुल्य आहे. पण तूं अशा महाधनुर्धर पुरुषश्रेष्ठांकडून सुसंरक्षित असलेल्या दुरासद द्रोणाचार्यांच्या सैन्याचाहि भेद करण्याचा उत्साह धरीत आहेस ! खरोखर तूं धन्य आहेस !!

संजय—राजा धृतराष्ट्रा, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकतांच सौभद्रानें आपल्या सारथ्याला अशी आज्ञा केली—"हे सुमित्रा, अश्वांना प्रेरणा कर आणि रथ द्रोणसैन्याकडे सत्वर ने." ७. ३. ३५.

---

## अध्याय ३६ वा.

[ १ अभिमन्यूचा पराक्रम. २ कौरवसेनेचें पलायन. ]

( १ ) संजय—हे भारता, सौभद्रानें आपल्या सारथ्याला द्रोणाकडे रथ नेण्याविषयीं पुनः पुनः 'चल चल' अशी आज्ञा केली असतां तो अभिमन्यूला असें म्हणाला—"हे आयुष्मन्, आज पांडवांनीं हा फार मोठा भार तुजवर घातला आहे. परंतु त्याचा पूर्ण विचार करूनच तूं त्यामध्यें प्रवृत्त व्हावेंस, असें मला वाटतें. हा द्रोणाचार्य धनुर्विद्येंत प्रवीण असून तो श्रेष्ठ अस्त्रवेत्ता आहे. त्यानें आतांपर्यंत अनेक संग्राम केलेले असल्यामुळें त्याचा अनुभव फार मोठा आहे. उलटपक्षीं, तूं केवल सौख्यांत वाढलेला अल्पवयी बालक आहेस. तुला युद्धाचा फारसा अनुभव नाहीं. यास्तव तूं या व्यूहभेदाचें दुष्कर कर्म करण्याचें साहस अकस्मात् करूं नको."

सारथ्याचें हें भाषण ऐकून अभिमन्यु म्हणाला—"हे सारथे, द्रोण जरी झाला तरी तो एवढा कोण आहे ? व समग्र क्षत्रमंडलाची तरी काय मोठीशी प्रतिष्ठा आहे ? सर्व देवांसह साक्षात् इंद्र जरी ऐरावतावर बसून आला किंवा समग्र भूतगणांसह रुद्र आला, तरी त्यांच्याशींहि मी एकटा युद्ध करण्यास

समर्थ आहें. मग या क्षत्रगणाची काय कथा ? मला त्यांची यत्किंचित्हि भीति वाटत नाहीं. हें सर्व शत्रुसैन्य माझ्या षोडशांशालाहि पुरेसें नाहीं. फार काय, पण माझा मातुल श्रीकृष्ण जगज्जेता आहे. त्याच्याशीं किंवा साक्षात् माझ्या पित्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग जरी आला, तरीहि मी भिणार नाहीं. ”

याप्रमाणें सारथ्याला कांहींसें उपहासपूर्वक उत्तर देऊन तो सुभद्रात्मज म्हणाला—‘ द्रोणसैन्याकडे सत्वर चल. ’ तेव्हां खिन्न झालेल्या सारथ्यानें त्याचे तीन वर्षें वयाचे तरुण अश्व त्वरेनें चालविले. तेव्हां सौभद्र येत आहे, हें पहातांच द्रोणाच्या सैन्यांतील सर्व कौरव त्याच्याकडे वळले व पांडवहि सौभद्राच्या मागोमाग निघाले.

हे राजन्, त्या अर्जुनात्मजाचा ध्वज कर्णिकार वृक्षाप्रमाणें उंच होता. त्या वीरानें सुवर्णाचें कवच धारण केलें होतें. तो अर्जुनापेक्षांहि श्रेष्ठ असलेला कुमार हत्तीवर चालून जाणाऱ्या बालसिंहाप्रमाणें द्रोणादि प्रमुख वीरांवर धांवून गेला. तेव्हां व्यूहाचें रक्षण करणारे वीर सर्वतः त्याच्यावर शरवृष्टि करूं लागले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. याप्रमाणें सर्व सैनिक निवारण करीत असतां अभिमन्यु द्रोणाच्या समक्ष व्यूहभेद करून आंत शिरला व शत्रुसंघाचा संहार करूं लागला. त्यावेळीं अनेक वीरांनीं त्याचें सर्वबाजूंनीं निवारण करण्याचा यत्न केला. कोणी ‘ वध करा, वध करा ’ अशा गर्जना करीत होते. कित्येक ‘ उभा रहा ’ असें म्हणत पुढें येत होते. ’ व वीरांचा असा कोलाहल सुरू असतां, त्यांत हत्तींचा चीत्कार व अश्वांचें खिंकाळणें यांचाहि ध्वनि मिसळून प्रचंड शब्द होत होता. त्यानें समग्र पृथ्वी निनादित झाली.

याप्रमाणें कौरव वीर अभिमन्यूवर धांवून गेले असतां अस्त्रवेत्त्या सौभद्रानें मर्मभेदक बाणांनीं त्यांचा संहार आरंभिला. त्यावेळीं वणव्यांत सांपडलेल्या शलभाप्रमाणें तेथें मृतदेहांच्या राशी पडल्या. विविध प्रकारचीं आयुधें धारण केलेल्या सहस्रावधि वीरांचे बाहु त्या आर्जुनीनें तोडून टाकिले असतां ते गरुडानें मारून टाकलेल्या पंचमुखी सर्पाप्रमाणें भासले. सूर्य-चंद्रतुल्य कांतिमान् व कमलाप्रमाणें सुंदर मुखांनीं युक्त असलेल्या असंख्य मस्तकांनीं तें रणांगण व्यापून गेलें. अगणित रथ भग्न होऊन पडले होते. त्याचप्रमाणें शत्रूंचे हत्ती, गजारोही, जातिवंत अश्व, अश्वसादी व ध्वज, पताका, छत्रें या सर्वांचे त्या कुमारानें तुकडे करून टाकिले व सर्व कौरवसेनेचा निःपात आरंभिला.

( २ ) हे महाराज, याप्रमाणें त्या एकट्या कुमारानें महाविष्णूप्रमाणें परम दुष्कर कर्म केलें. पूर्वी असुरांचा नाश करणाऱ्या त्रिपुरारीप्रमाणें तुमच्या सैन्याचा विध्वंस करून टाकिला. सुभद्रापुत्राचा तो पराक्रम पाहून तुझे पुत्र व इतर सर्व तत्पक्षीय वीर दीन वदनानें एकमेकांकडे पाहूं लागले. त्यांचीं मुखें शुष्क झालीं. सर्वांग रोमांचित झालें व घामानें भिजलें. नाम-गोत्रादिकांनीं एकमेकांस पाचारण करणारे ते जीवितेच्छु वीर शत्रुजयाविषयीं निराश होऊन पलायन करण्याचा विचार करूं लागले. रणांगणांत पडलेल्या पिता-पुत्रादिकांना तेथेंच टाकून त्यांनीं आपापल्या गजाश्वादि वाहनांना त्वरा केली व स्वतःचे प्राण वांचविण्यासाठीं मोठ्या त्वरेनें तेथून पलायन केलें. ७. ३. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[ १ अभिमन्यूनें केलेला द्रोणसैन्याचा पराभव. २ शल्याची मूर्छा. ]

( १ ) **संजय**—हे प्रभो, याप्रमाणें अमित पराक्रमी सौभद्रेयानें तुझ्या सैन्याचा विध्वंस केला असतां दुर्योधन अतिशय क्रुद्ध झाला व तो स्वतः त्याच्यावर धांवून गेला. दुर्योधन अभिमन्यूवर चालून जातांच द्रोणाचार्य सर्व योद्ध्यांना उद्देशून म्हणाला—" वीरांनो, दुर्योधनराजाचें रक्षण करा. तुमच्या समक्ष हा अभिमन्यु दुर्योधनावर प्रहार करील. यास्तव तो कुमार समीप येण्यापूर्वीच तुम्ही आपल्या राजाचें रक्षण करा. "

द्रोणाचे हे शब्द ऐकतांच दुर्योधनाचे कृतज्ञ व बलाढ्य मित्र त्याचें संरक्षण करण्यासाठीं त्याच्या भोंवतीं जमले. द्रोण, अश्वत्थामा, कृप, कर्ण इत्यादि वीरांनीं शरवृष्टीनें सौभद्रास आच्छादित केलें व सर्व बाजूंनीं त्याला भ्रांत करून राजा दुर्योधनाला मुक्त केलें. राजा दुर्योधन आपल्या हातांतून निसटून गेल्याचें पहातांच सौभद्र संतप्त झाला. त्यानें शरवृष्टीनें त्या महारथांस परत फिरवून सिंहनाद केला. तेव्हां त्याची ती सिंहाप्रमाणें गर्जना द्रोणादिकांस सहन झाली नाहीं. त्यांनीं आपल्या सर्व रथसमुदायांसह अभिमन्यूवर शरवृष्टि आरंभिली. त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें व समुद्राच्या वेलेप्रमाणें त्या एकट्या आर्जुनीनें तुझ्या विस्तीर्ण सैन्यसागराला आंवरून धरिलें.

याप्रमाणें त्या कुमारानें तुझ्या पुत्रांस जर्जर केलें असतां अश्मकाचा पुत्र आपल्या गरुड व वायु यांच्या तुल्य वेगवान् अश्वांनीं अभिमन्यूवर धांवून

गेला. तथापि त्या सौभद्रेयानें हंसतच त्याच्यावर बाण सोडून सारथि, अश्व व ध्वज यांसह रथ भग्न केला व त्याचें मस्तक तोडून खालीं पाडविलें. तो वीर अश्मक युद्धांत पडलेला पहातांच सर्व सैन्याचा थरकांप झाला व तें पुनः पलायनाचा विचार करूं लागलें.

आपल्या सैन्याची ती दीनावस्था पहातांच कर्ण, कृप, द्रोण, अश्वत्थामा, शल्य इत्यादि अनेक प्रमुख वीर पुढें सरसावले व अभिमन्यूवर शरवृष्टि करूं लागले. त्यांच्या शरवृष्टीनें विद्ध झालेला सौभद्रेय अतिशय संतप्त झाला. त्यानें कवचासह देहाचा भेद करणारा एक तीक्ष्ण धारेचा बाण कर्णावर सोडिला. तो शीघ्रगामी बाण त्याचें कवच व शरीर या दोहोंना भेदून वारुळांत शिरणाऱ्या सर्पाप्रमाणें भूमींत शिरला. त्या बाणानें व्यथित झालेला कर्ण भूकंपानें कांपणाऱ्या पर्वताप्रमाणें कंपित झाला.

नंतर क्रुद्ध झालेल्या अभिमन्यूनें सुषेण, दीर्घलोचन व कुंडभेदी या तिघांचा तशाच तीक्ष्ण शरांनीं वध केला. त्यावेळीं अश्वत्थामा व कर्ण यांनीं त्या कुमाराला शरांनीं विद्ध केलें असतां, त्या शरयुक्त देहानें रणांगणांत संचार करणारा तो पांडवेय हातीं पाश घेऊन हिंडणाऱ्या यमाप्रमाणें भासला.

( २ ) हे महाराज, इतक्यांत त्या कुमारानें समीपच असलेल्या शल्यावर शरवृष्टि करून मोठ्यानें गर्जना केली. त्याचा तो सिंहनाद ऐकून सर्व सेना भयभीत झाली व त्याच्या बाणांनीं विद्ध झालेला शल्य रथांतच मूर्च्छित होऊन पडला. शल्याला मूर्च्छित झालेलें पहातांच सर्व सैन्य अधिकच भयभीत झालें व द्रोण निवारण करीत असतांहि पळत सुटलें. त्यावेळीं घृतानें प्रज्वलित झालेल्या अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेला अभिमन्यु अतिशय शोभला. रणांगणांत विजयी झालेल्या कुमाराची देव, गंधर्व व यक्ष यांसह भूतें प्रशंसा करूं लागलीं. ७. १. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ शल्यानुजाचा वध. २ कौरवसैन्याचा पराभव. ]

(१) धृतराष्ट्र—हे सूता, याप्रमाणें सैन्याचें मर्दन करणाऱ्या त्या आर्जुनीचें माझ्या कोणत्या पुत्रांनीं निवारण केलें तें सांग.

संजय—हे राजन्, भारद्वाजानें जिचें रक्षण केलें आहे, त्या सैन्याचा भेद करून सौभद्रानें समरांगणांत जो अतर्क्य पराक्रम केला त्याचें अगोदर वर्णन करतों, ऐक. अभिमन्यूनें शल्याला मूर्च्छित केल्याचें पहातांच त्याचा कनिष्ठ भ्राता क्रुद्ध होऊन पुढें सरसावला व त्यानें सौभद्रास त्याच्या अश्व-सारथ्यांसह विद्ध केलें. तेव्हां अभिमन्यूनें आपलें हस्तलाघव प्रकट करीत त्याचीं सर्व आयुधें, रथ, सारथि व चक्ररक्षक या सर्वांचा नाश करून त्याचेहि सर्व अवयव छिन्न-भिन्न केले व त्याला गतप्राण करून खालीं पाडविलें.

याप्रमाणें तो बलाढ्य शल्यानुज भूमीवर महाशैलाप्रमाणें पडलेला पहातांच त्याचे सर्व अनुचर भयभीत होऊन दश-दिशांत पळत सुटले. त्या कुमाराचा हा पराक्रम पाहून सर्व प्राणी त्याला धन्यवाद देऊं लागले. शल्यानुजाचा वध झालेला पाहून त्याच्या पक्षांतील कित्येक वीर पुढें सरसावले व आपापलीं गोत्रें, नांवें व स्थानें यांचा मोठ्यानें उच्चार करीत अभिमन्यूवर धांवून गेले. त्यांची रणगर्जना, सिंहनाद, धनुष्यांचे टणत्कार इत्यादि अनेक प्रकारच्या ध्वनींनीं दश-दिशा निनादित झाल्या. त्यांनीं 'हे पार्थनंदना, आज तूं आमच्या हातून जिवंत सुटत नाहींस' अशी गर्जना करीत सौभद्रावर चाल केली.

( २ ) त्यांची ही वल्गना ऐकून सौभद्रेय हंसला व ज्यांनीं ज्यांनीं त्याच्यावर प्रहार केले होते, त्या त्या वीरांना त्यानें बाणांनीं विद्ध केलें. आरंभीं त्या बालवीरानें अल्प प्रभावांचीं विचित्र अस्त्रें प्रदर्शित करीत सौम्य युद्ध आरंभिलें व नंतर वासुदेव आणि धनंजय यांच्यापासून संपादिलेल्या सर्व अस्त्रांचा प्रयोग करून त्यानें त्या सर्व सैन्यसागराला दूर लोटून दिलें. तें पाहून सर्व सैनिक भयभित झाले.

हे महाराज, अभिमन्यु धनुष्यावर बाण जोडतो केव्हां व सोडतो केव्हां, हें कोणाला कळतहि नव्हतें. शरत्कालीन रविमंडलाप्रमाणें त्याचें धनुष्यमात्र सर्व दिशांत चमकतांना दिसत होतें. त्या कुमाराचें हस्तलाघव इतकें विलक्षण होतें! तो प्रसन्न मुखाचा विजयी राजपुत्र शत्रूंच्या वीरांचा मान राखण्यासाठीं त्यांच्याशीं केवळ शर व अस्त्रें यांनींच युद्ध करीत होता. प्रथम त्याचें स्वरूप सौम्य होतें, पण पुढें तें भगवान् अंशुमालीप्रमाणें प्रखर झालें. सूर्याच्या किरणाप्रमाणें त्यानें द्रोणाचार्यांच्या समक्ष अनेकप्रकारच्या तीक्ष्ण बाणांची वृष्टि आरंभिली. तेव्हां तें सर्व शत्रुसैन्य विह्वल होऊन पळूं लागलें. ७. ३. १८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ३ अभिमन्यूचा पराक्रम पाहून द्रोणाचे प्रशंसोद्गार. ४ दुर्योधनाचा संताप. ५ दुःशासनाची प्रतिज्ञा. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—संजया, अभिमन्यूनें माझ्या पुत्रांना त्रस्त केल्याचें ऐकून माझें चित्त द्विधा झालें आहे. त्या कुमाराचा पराक्रम ऐकून मनाला आनंद वाटत आहे, पण त्याचवेळीं माझ्या पुत्रांविषयीं भय उत्पन्न होत आहे. यास्तव असुरांशीं युद्ध करणाऱ्या कुमार स्कंदाप्रमाणें या पांडवकुमारानें केलेल्या रणक्रीडेचें वर्णन सविस्तर कर. तें मला ऐकूं दे.

(२) **संजय**—महाराज, ठीक आहे. मी तो सर्व वृत्तान्त सांगतों ऐक. तो रथस्थ अभिमन्यु अलातचक्राप्रमाणें सर्वत्र संचार करीत द्रोण, कर्ण, कृप, भोज, दुर्योधन, नानादेशांतील नृपति, राजपुत्र व त्यांचीं विविध सैन्यें या सर्वांस शरवृष्टीनें विद्ध करूं लागला. आपल्या दिव्य अस्त्रांनीं शत्रूंचा निःपात करणारा तो तेजस्वी कुमार सर्वत्र इतक्या वेगानें संचार करीत होता कीं, तो एकाच वेळीं सर्व दिशांत दृष्टीं पडत होता. सौभद्राचा तो असामान्य पराक्रम पाहून तुझीं सैन्यें थरथरां कांपूं लागलीं.

( ३ ) त्या बालवीराचें तें विलक्षण शौर्य पाहून प्रतापवान् द्रोणाचार्यहि संतुष्ट झाला. त्याचे नेत्र आनंदातिशयानें प्रफुल्ल झाले आणि जणुंकाय तुझ्या पुत्रांच्या मर्मावर आघात करण्यासाठींच कीं काय तो वृद्ध आचार्य मोठ्या कौतुकानें प्रेमपूर्ण नेत्रांनीं अभिमन्यूला अवलोकन करीत कृपाचार्याला हांक मारून म्हणाला—" हे कृपा, हा पांडवांचा वत्स रणांगणांत कसा संचार करीत आहे पहा ! हा आपल्या कृतीनें समग्र नृपति, सर्व पांडव व इतर आप्तजन यांचा हर्ष वाढवीत आहे. समरामध्यें याच्या तुल्य अन्य योद्धा नाहीं. हा एकटा धनुर्धर समग्र सैन्याचा नाश करण्यास समर्थ आहे. पण तो अद्यापि तें मनांत कसें आणीत नाहीं हेंच आश्चर्य आहे ! "

( ४ ) द्रोणाचें हें प्रीतियुक्त भाषण ऐकून दुर्योधन अतिशय क्रुद्ध झाला, द्रोण व अभिमन्यु यांच्याकडे पाहून उपहासानें हंसला आणि कर्ण, बाह्लिक, दुःशासन व इतर सर्व महारथ यांच्याकडे पहात असें म्हणाला—" हे वीरहो, हा द्विज-श्रेष्ठ सर्व मूर्धाभिषिक्त राजांचा आचार्य आहे. परंतु अर्जुनाच्या या मूढ पुत्राचा वध करण्याची त्याची इच्छा नाहीं. प्राणांची पर्वा न करतां युद्ध करणाऱ्या या

द्रोणापुढें रणांगणांत साक्षात् यमहि उभा रहाण्यास समर्थ नाहीं. मग इतर मानवांची काय कथा ! तथापि केवल अर्जुनाचा पुत्र म्हणून शिष्यत्वाच्या नात्यानें तो या मूर्खाचें रक्षण करीत आहे. धर्मज्ञ लोकांना आपले शिष्य, त्यांचे पुत्र व त्यांचीं अपत्यें अतिशय प्रिय असतात. ( याच न्यायानें हा अभिमन्यु द्रोणाला प्रिय वाटत आहे. ) वस्तुतः द्रोण या सौभद्रेयाचें रक्षण करीत आहे. पण तो मूढ कुमार आपल्याच सामर्थ्यानें द्रोणादिकांचा पराभव होत आहे, असें मानीत आहे. यास्तव आत्मसंभावना करणाऱ्या या अहंमन्य मूढाचा सत्वर वध करा. आतां विलंब करूं नका."

( ५ ) हे कुरुश्रेष्ठा, दुर्योधनाचें हें भाषण ऐकतांच ते सर्व राजे क्रुद्ध होऊन भारद्वाजाच्या समक्ष सौभद्रावर धांवून गेले. तेव्हां दुःशासन आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला म्हणाला—" हे महाराज, मी याचा वध करीन, हें मी तुला सत्य सांगतों. राहु जसा सूर्याला ग्रासतो, तसा मी आज सर्व पांडव व पांचाल यांच्यासमक्ष सौभद्राला ग्रासीन आणि मी सौभद्राला ग्रस्त केल्याचें वृत्त ऐकतांच कृष्णार्जुन इहलोक सोडून परलोकीं जातील. त्या दोघांहि अतिशय मानी वीरांना आपण जिवंत असतांना सौभद्राचा वध झालेला सहन होणार नाहीं. ते शोकार्त होऊन मृत्युमुखीं पडले कीं, पांडवांचा पराक्रम नष्ट झालाच ! त्या दोघांचा अंत झाला कीं, सर्व पांडव आपल्या सर्व सुहृद्‌-बांधवांसह कौरवांच्या भीतीनें दीन होऊन प्राणच सोडतील. याप्रमाणें एका सौभद्राच्या वधानें सर्व शत्रूंचा अनायासानें निःपात होणार आहे. तूं माझें शुभ चिंतन कर. मी शत्रूंचा आतां नाश करून टाकतों."

राजा, असें बोलून दुःशासनानें मोठ्यानें सिंहनाद केला व बाणांची वृष्टि करीत सौभद्रावर झडप घातली. दुःशासन क्रुद्ध होऊन आपल्या अंगावर चालून येत आहे, हें पाहून अभिमन्यु त्याच्यावर शरांचा वर्षाव करूं लागला. याप्रमाणें ते दोघे युद्धविशारद योद्धे परस्परांवर तुटून पडले असतां त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. त्यावेळीं सर्व रणवाद्यांचा समुद्राच्या गर्जनेप्रमाणें फार मोठा ध्वनि झाला. ७. ३. ३९.

---

## अध्याय ४० वा.

[ १ दुःशासन-अभिमन्युयुद्ध. २ दुःशासनाची मूर्च्छा. ३ कर्णाशीं संग्राम. ४ कर्णाचा पराभव. ]

( १ ) **संजय—** हे महाराज, शरांनीं विद्ध झाल्यामुळें ज्याचीं गात्रें क्षतयुक्त झालीं आहेत, अशा अभिमन्यूनें हंसतच दुःशासनाला असें म्हटलें—“ गर्वानें मत्त झालेला तूं आज संग्रामांत माझ्यापुढें आलास, हें फार चांगलें झालें. धृतराष्ट्राच्या समक्ष सभेमध्यें तूं युधिष्ठिराची अश्लील शब्दांनीं निंदा केलीस ! तूं धर्महीन व निष्ठुर आहेस. शकुनीच्या कपट-द्यूतानें विजयी झालेल्या तूं एखाद्या उन्मत्ताप्रमाणें भीमसेनाची निर्भर्त्सना केलीस. त्याचें फल भोगण्यासाठीं तूं आज माझ्या पुढें अनायासेंच आलास. तूं परवित्ताचा अपहार केला आहेस. निष्कारण क्रुद्ध होणाऱ्या तुझ्या अंगीं शांतीचा अभाव आहे. तूं लोभी व ज्ञानशून्य असून आमचा द्रोह करण्याचें अतिशय हीन कर्म केलें आहेस. माझ्या महाधनुर्धर पित्याच्या राज्याचा अपहार करून तूं हीं जीं घोर पातकें आचरिलीं आहेस, त्याचें फल माझ्या महात्म्या पितृव्याच्या क्रोधानें आज तुला प्राप्त होईल. तें भोगण्यास तयार हो. तुझें सर्व सैन्य जरी तुझें रक्षण करीत असलें, तरी मी तुला माझ्या शरांनीं शासन करीन आणि युधिष्ठिराच्या ऋणांतून मुक्त होईन. माझ्या द्रौपदीमातेची तूं सभेंत जी विटंबना केलीस, त्याचें स्मरण झालें कीं अंतःकरणाचा दाह होऊं लागतो. ती तळमळ मी आज शांत करीन. माझ्या पित्याची इच्छा व भीमसेनाची प्रतिज्ञा मी आज रणांगणांत सफल करून दाखवीन. हे भीरो, तूं जर येथून आतां पलायन केलेंस तरच जिवंत रहाशील. एरवीं माझ्या हातून जिवंत सुटणार नाहींस.”

( २ ) असें बोलून अभिमन्यूनें अग्नीप्रमाणें प्रज्वलित बाणांनीं दुःशासनाला विद्ध केलें. त्या तीक्ष्ण शरांनीं त्याचा देह क्षतयुक्त झाला. त्यांनीं विह्वल झालेल्या तुझ्या पुत्राला प्रबल मूर्च्छा येऊन तो रथांतच पडला. सौभद्राच्या शरांनीं पीडलेला आपला स्वामी चेतनाशून्य होऊन पडलेला पहातांच त्याच्या सारथ्यानें त्याचा रथ मोठ्या त्वरेनें रणांगणांतून दूर नेला.

तें पाहून पांचालादि सर्व पांडवपक्षीय वीर मोठ्यानें सिंहनाद करूं लागले. सैनिकांनीं हर्षभरानें विविध रणवाद्यांचा घोष केला. अभिमन्यूच्या पराक्रमाचा सर्वांनीं गौरव केला. नंतर आपल्या सर्वांचा शत्रू व पांडवांचा द्वेष्टा असा

जो दृप्त दुःशासन, त्याचा पराभव झालेला पाहून द्रौपदीचे पांच पुत्र, सात्यकि, मत्स्य, पांचाल, केकय, युधिष्ठिर इत्यादि सर्व प्रमुख वीर द्रोणाचा व्यूहभेद करण्यासाठीं अतिशय त्वरेनें धांवून गेले व त्या उभय पक्षांचें पुनः तुमुल युद्ध जुंपलें.

हे महाराज, याप्रमाणें दारुण संग्राम प्रवृत्त झाला असतां दुर्योधन कर्णाला म्हणाला—" हे राधेया, दुःशासन मोठा मान्य योद्धा असतांना तोहि आज अभिमन्यूच्या शरांनीं विह्वल होऊन पडला आहे. हा जणुकाय सूर्यच आकाशांतून खालीं पडला आहे, असें वाटतें. सिंहाप्रमाणें बलाढ्य असलेले पांडव सौभद्राचें रक्षण करण्यासाठीं अस्त्रें सज्ज करून धांवून येत आहेत, पहा."

दुर्योधनाचें हें भाषण ऐकतांच क्रुद्ध झालेल्या कर्णानें त्याला निश्चित करण्यासाठीं अभिमन्यूवर बाणांची वृष्टि केली व त्याच्या अनुयायांवरहि शरवर्षाव आरंभिला. तेव्हां सुभद्रेच्या त्या शूर कुमारानें त्र्याहत्तर बाण सोडून राधेयाला विद्ध केलें आणि तो मोठ्या त्वरेनें द्रोणाचार्यांकडे वळला. तेव्हां त्याचें निवारण करण्यास एकहि रथी धजला नाहीं. तें पाहून कर्णानें आपलीं श्रेष्ठ अस्त्रें प्रकट करीत अभिमन्यूवर पुनः शरवृष्टि आरंभिली. कर्ण सर्व अस्त्रज्ञांमध्यें श्रेष्ठ होता व साक्षात् परशुरामाचा शिष्य होता. तरीहि त्याच्यापुढें प्रतापी अभिमन्यु यत्किंचित्हि भयभीत झाला नाहीं. त्यानें उलट कर्णाचे अश्व, रथ, ध्वज, छत्र व सारथि यांचा छेद केला व शेवटीं त्याचें धनुष्यहि तोडून टाकिलें. तेव्हां कर्णाचा कनिष्ठ बंधु आपलें धनुष्य सज्ज करून धांवला.

याप्रमाणें अभिमन्यूचा विजय झालेला पाहून त्याला प्रोत्साहन देण्यासाठीं पांडवांनीं सिंहनाद करून वाद्यांचा घोष केला. ७. ३. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

[ १ कर्णाच्या भ्रात्याचा वध. ]

( १ ) संजय—हे धृतराष्ट्रा, तो कर्णाचा कनिष्ठ भ्राता मोठ्यानें गर्जना करीत कर्ण व अभिमन्यु या दोघांच्या मध्यें येऊन उभा राहिला व त्यानें दहा तीक्ष्ण बाण सहज सोडून अभिमन्यूचें छत्र, ध्वज, सारथि व अश्व यांचा छेद करून त्यालाहि विद्ध केलें. तें पाहून तुझ्या वीरांना मोठा हर्ष झाला. इतक्यांत अभिमन्यूनें हंसतच एका बाणानें त्याचें मस्तक तोडून टाकिलें. तेव्हां

वायूनें पर्वतावरील कर्णिकारपुष्प जसें उडवून द्यावें, त्याप्रमाणें त्याचें मस्तक रथांतून खालीं पडलें.

याप्रमाणें आपल्या कनिष्ठ भ्रात्याचा वध झालेला पहातांच कर्णाला अतिशय दुःख झालें. पण सौभद्रानें त्याचाहि पराभव करून इतर धनुर्धरांवर चाल केली. कर्णानें तर त्याचे शर सहन न झाल्यामुळें विह्वल होऊन तेथून पलायन केलें. कर्ण रणांगणांतून पराभव पावून परत फिरल्याचें पाहून सर्व सैनिकहि त्यालाच अनुसरले. त्यावेळीं एका जयद्रथावांचून अन्य कोणीहि त्या कुमाराच्या पुढें उभें रहाण्यास धजला नाहीं.

त्यानंतर त्या आर्जुनीनें तुझ्या सेनेवर मोठ्या त्वरेनें चाल केली. तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें तो सर्व भारतीसेनेचा नाश करीत चक्रव्यूहाच्या आंत शिरला. त्यानें असंख्य सैन्याला गतप्राण करून त्या रणांगणांत मृतदेहांच्या राशी पाडिल्या. याप्रमाणें सर्व सेनेचा विध्वंस करीत तो कुमार सर्व दिशा आणि उपदिशा यांत संचार करूं लागला. त्यावेळीं धूळीनें आच्छादित झालेल्या त्या सैन्यांत अभिमन्यु कोठें आहे, हेंहि आम्हांला प्रथम कळेना. परंतु अल्पावधींतच तो परंतप माध्याह्नीच्या सूर्याप्रमाणें प्रकाशूं लागला. राजा धृतराष्ट्रा, इंद्रतुल्य पराक्रम करणारा तो इंद्रपौत्र आर्जुनीहि त्यावेळीं सैन्याच्या मध्यभागीं खरोखरच सहस्ररश्मि सूर्याप्रमाणें शोभत होता. ७. ३. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ जयद्रथाच्या वराचा वृत्तान्त. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, तो अर्जुनाचा पुत्र अतिशय सुखांत वाढलेला आहे. त्याला स्वतःच्या बाहुबलाचा गर्व वाटणें साहजिकच आहे. कारण तो युद्धांतील मर्मज्ञ आहे. तो बालवीर आपल्या तीन वर्षें वयाच्या श्रेष्ठ अश्वांच्या रथांतून सैन्याचा नाश करीत चालला असतां युधिष्ठिराच्या सैन्यांतील एखादा तरी बलाढ्य वीर त्याला अनुसरला कीं नाहीं, हें मला सांग.

संजय—हे महाराज, युधिष्ठिर, भीमसेन, सात्यकि, माद्रेय, शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, द्रुपद, केकय, धृष्टकेतु व मत्स्य, इतके वीर रणांगणांत आले व अभिमन्यु ज्या मार्गानें आंत गेला, त्याच मार्गानें त्याचे ते सर्व पितृव्य

आणि मातुल व्यूहांत शिरले. ते सर्व तुझ्या सैन्याचा संहार करीत सौभद्राला अनुसरले असतां सर्व सैनिक भयभीत होऊन पळत सुटले.

त्यावेळीं तुझ्या पुत्राचें तें महत्सैन्य युद्धविमुख झालेलें पहातांच तुझा जामात जयद्रथ पुढें सरसावला व त्यानें मार्गांतच पांडवांचें निवारण केलें. ते सर्व पुत्रवत्सल पांडव अभिमन्यूचें रक्षण करण्यासाठीं त्याच्या मागोमाग येत असतां जयद्रथानें त्यांना मार्गांतच अडवून धरलें. त्यानें दिव्य अस्त्रांचा प्रयोग करून पांडवांना पुढें पाऊलहि टाकूं दिलें नाहीं.

धृतराष्ट्र—संजया, सौभद्राच्या रक्षणार्थ निघालेल्या क्रुद्ध पांडवांचें एकट्या जयद्रथानें निवारण केलें, यावरून त्याचा पराक्रम असामान्य असला पाहिजे, यांत संशय नाहीं. अशाप्रकारचें सामर्थ्य संपादन करण्यासाठीं त्यानें पूर्वी कोणतीं दानें दिलीं होतीं, किंवा कोणती तपश्चर्या आचरली होती, तें मला कथन कर.

संजय—राजा, पूर्वी जयद्रथानें द्रौपदीचें हरण केलें असतां भीमसेनानें त्याला जिंकून आणलें. तो अपमान त्या मानी सैंधवाला सहन झाला नाहीं. त्यानें खिन्न होऊन वरप्राप्तीसाठीं फार मोठी तपश्चर्या आरंभिली. अतिशय प्रिय अशा विषयांपासूनहि इंद्रियांना निवृत्त केलें व तो क्षुधा, तृषा व आतप यांना सहन करून शरीर कृश करीत केवळ वायुभक्षण करून राहिला. त्यानें शाश्वत ब्रह्माचा स्वीकार करून शंकराची आराधना आरंभिली. याप्रमाणें त्याची आराधना पाहून तो भक्तवत्सल भगवान् प्रसन्न झाला व त्याला स्वप्नांत दर्शन देऊन 'वर माग' असें म्हणाला.

तेव्हां तो आत्मसंयमी राजा जयद्रथ शंकराला प्रणाम करून हात जोडून म्हणाला—"हे भगवन्, या बलाढ्य व पराक्रमी पांडवांचें मीं एकट्यानें केवळ एका रथानें निवारण करावें, असा मला वर द्या."

जयद्रथानें असा वर मागितला असतां त्या देवेशानें म्हटलें—"मी तुला थोडा सौम्य वर देतों. धनंजयावांचून इतर चौघां पांडवांचें तूं रणांगणांत एकदाच निवारण करशील." तेव्हां जयद्रथानें 'तथास्तु' असें म्हटलें व तो राजा जागा झाला.

याप्रमाणें शंकराच्या वरप्रसादानें तो सैंधव दिव्य अस्त्रांच्या प्रयोगानें पांडवांचें निवारण करण्यास समर्थ झाला. त्याच्या धनुष्याचा टणत्कार ऐकून पांड-

वांचें सैन्य भयभीत झालें व तुझें सैन्य हृष्ट झालें. जयद्रथानें सर्व भार आपल्या शिरावर घेतल्याचें पाहून सर्व क्षत्रिय गर्जना करीत पांडवसेनेवर धांवून गेले. ७. ३. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ जयद्रथाचें युद्धनैपुण्य. ]

( १ ) संजय—हे राजन्, सिंधुराजानें पांडवांबरोबर कसें युद्ध केलें, तें मी तुला सांगतों; ऐक. त्याच्या रथाची रचना शास्त्रसिद्ध असून आकार गंधर्वनगरीसारखा होता. त्याचे सिंधुदेशांतील प्रसिद्ध अश्व अतिशय वेगवान् होते. त्याच्या रथावरील रौप्य ध्वज वराहचिह्नांकित होता. छत्र, पताका, चामरें इत्यादि सर्व शुभ्र राजचिह्नांनीं अलंकृत असलेला तो रथ गगनमंडलांत विराजणाऱ्या तारापतीप्रमाणें शोभत होता. तो रथ लोहजालानें आच्छादित होता व त्याला नाना वर्णांचीं रत्नें जडविलेलीं होतीं. त्यामुळें तें आच्छादन नक्षत्रांनीं युक्त असलेल्या नभोमंडलाप्रमाणेंच भासत होतें.

अशा प्रकारच्या श्रेष्ठ रथावर आरूढ झालेल्या जयद्रथानें आपल्या प्रचंड धनुष्याचा टणत्कार करून अभिमन्यूवर शरांचा वर्षाव केला आणि त्याचें धृष्टद्युम्न, सात्यकि, युधिष्ठिर, भीम, केकयभ्राते व पांच द्रौपदेय यांच्याशीं तुमुल युद्ध जुंपलें. त्या सिंधुपतीनें भीमसेनाचे अश्व, ध्वज व धनुष्य यांचा छेद केला व तो सैंधव पर्वतावर चढणाऱ्या सिंहाप्रमाणें सात्यकीच्या रथावर चढला.

तेव्हां जयद्रथाचें अद्भुत कर्म पाहून तुझे योद्धे हर्षानें ‘ धन्य, धन्य ’ अशी गर्जना करूं लागले. त्या एकट्या वीरानें क्रुद्ध झालेल्या सर्व पांडवांना आपल्या अस्त्रप्रभावानें अडवून धरलें असतां कौरवांनीं त्याची प्रशंसा केली. सौभद्रानें श्रेष्ठ गज, योद्धे इत्यादिकांचा वध करून चक्रव्यूहांत शिरण्यास जो मार्ग केला होता, त्याचा जयद्रथानें निरोध केला. मत्स्य, पंचाल, केकय आणि पांडव अभिमन्यूचें रक्षण करण्यासाठीं त्याच्या मागोमाग जाण्याचा भगीरथ यत्न करीत असतां जयद्रथानें त्या सर्वांचे प्रयत्न निष्फल केले. द्रोणसैन्याचा भेद करण्यास पुढें सरसावणाऱ्या पांडवांच्या प्रत्येक वीराचें तो सिंधुराज आपल्या वरप्रभावानें निवारण करीत होता. ७. ३. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ अभिमन्यूचा पराक्रम. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें जयाची इच्छा करणाऱ्या पांडवांना जयद्रथानें मार्गांतच अडवून धरलें. तेव्हां तुझ्या वीरांचें सौभद्राशीं तुमुल युद्ध जुंपलें. त्या सत्यसंध, तेजस्वी कुमारानें तुझ्या सैन्यसागरांत प्रवेश करून समुद्राला खळबळून सोडणाऱ्या मकराप्रमाणें तुझ्या सेनेला क्षुब्ध करून सोडलें. तुझ्या सैनिकांनीं सौभद्राला वेढलें असतां त्या युद्धकुशल वीरानें वृषसेनाच्या सारथ्याचा वध केला, त्याचें धनुष्य तोडून टाकिलें व अश्वांनाहि विद्ध केलें. तेव्हां त्या भयभीत झालेल्या अश्वांचा थरकांप होऊन त्यांनीं रथाला रणांगणांतून दूर ओढून नेलें. तेव्हां ज्या मार्गानें तो रथ गेला, त्याच मार्गानें अभिमन्यूच्या सारथ्यानें आपला रथ बाहेर काढला. त्याचें हें कौशल्य पाहून सर्व महारथांनीं ‘ धन्य धन्य ’ अशा उद्गारांनीं त्याची प्रशंसा केली.

नंतर सिंहाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या अभिमन्यूवर वसातीयानें चाल केली. ‘ मी जिवंत असतां युद्धामध्यें तूं कदापि जिवंत रहाणार नाहींस ’ अशी गर्जना करून चालून येणाऱ्या त्या वसातीयाच्या हृदयावर सौभद्रानें एकच बाण मारला. त्या मर्मांतक बाणानें तो तत्क्षणीं गतप्राण होऊन खालीं पडला. वसातीय हत होऊन पडल्याचें पहातांच सर्व क्षत्रियांनीं तुझ्या पौत्राला वेढून टाकिलें. त्यावेळीं अभिमन्यूनें निकराचें युद्ध केलें व ती रणभूमि मृतदेहांनीं आच्छादित केली. तो क्रुद्ध झालेला कुमार सर्व दिशा व उपदिशा यांतून संचार करीत असतां त्याचें स्वरूप झांकून गेलें होतें. त्याचें धनुष्य, कवच व भूषणें यांवरील सुवर्ण तेवढें चकाकत होतें. त्यावेळीं योद्ध्यांचे प्राण हरण करणारा तो बालवीर माध्याह्नीच्या सूर्याप्रमाणें दुष्प्रेक्ष्य झाला होता. त्याच्याकडे पहाण्यासहि कोणीं धजलें नाहीं. ७. ३. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ रुक्मरथाचा वध. २ अनेक राजपुत्रांचा संहार. ३ दुर्योधनाचा पराजय. ]

( १ ) संजय—हे महाराज, सर्व प्राण्यांच्या प्राणांचें हरण करणाऱ्या प्रलयकालच्या कालाप्रमाणें तो इंद्रतुल्य पराक्रमी इंद्राचा पौत्र शत्रूंच्या समग्र

सैन्याला जर्जर करीत त्या चक्रव्यूहांत शिरला व मृगावर झडप घालणाऱ्या व्याघ्राप्रमाणें सत्यश्रव्यावर तुटून पडला. तेव्हां मोठमोठे महारथ असंख्य शस्त्रें घेऊन त्या कुमाराचा वध करण्याच्या इच्छेनें धांवले. तथापि अभिमन्यूनें त्या सर्व क्षत्रियांस त्यांच्या सैन्यांसह पराभूत केलें. तेव्हां ती भग्न झालेली सेना भयभीत झाली.

तें पाहून मद्रपति शल्याचा 'रुक्मरथ'-नामक बलाढ्य पुत्र आपल्या भ्यालेल्या सेनेला आश्वासन देत म्हणाला—" हे सैनिकहो, भिऊं नका. मी जिवंत असतांना तुम्ही असे घाबरतां कां ! माझ्यापुढें अभिमन्यु कःपदार्थ आहे. मी त्याला निःसंशय जिवंत धरीन."

असें बोलून तो वीर्यवान् रुक्मरथ आपल्या देदीप्यमान रथावर आरूढ होऊन अभिमन्युवर धांवला. परंतु अभिमन्यूनें त्याला क्षणार्धांत यमसदनीं पाठवून दिलें. त्याचा वध झालेला पाहून सर्व क्षत्रियवीर अतिशय क्षुब्ध झाले. त्या सर्व राजपुत्रांनीं अभिमन्यूला वेढा दिला व त्याला शरांनीं झांकून टाकिलें. तें पाहून दुर्योधनाला अतिशय आनंद झाला. अभिमन्यु इहलोकांतून गेलाच, असें तो समजला.

त्यावेळीं तो सौभद्रेय रथ, अश्व व सारथि यांसह शरांनीं विद्ध झाला होता. तो अंकुशानें पीडित झालेल्या गजाप्रमाणें अतिशय विद्ध झाला असतां क्रोधानें संतप्त झाला व त्यानें गंधर्वास्त्र आणि रथमाया यांचा प्रयोग केला. हे राजन्, हें गंधर्वास्त्र अर्जुनानें तपश्चर्या करून तुंबुरुप्रभृति गंधर्वांपासून प्राप्त करून घेतलें होतें. त्या अस्त्राचा प्रयोग करून आर्जुनीनें शत्रूला मोहित करून सोडलें. त्यावेळीं तो कुमार अस्त्रयोजना करीत समरांगणांत अलातचक्राप्रमाणें संचार करीत असतां त्या ठिकाणीं असंख्य अभिमन्यु फिरत असल्याचा भास झाला.

( २ ) अभिमन्यूच्या अस्त्रमायेनें मोहित झालेले ते सर्व राजपुत्र शरांनीं विद्ध झाले. त्यांचे प्राण निघून गेले व देह भूमीवर पडले. ते सर्व राजपुत्र तरुण व उत्साही होते. अभिमन्यूनें त्यांचीं मस्तकें तोडून रथ व सारथि यांचाहि विध्वंस केला. फळांनीं भरलेल्या आम्रवृक्षांचें वन जसें तोडून टाकावें, त्याप्रमाणें सौभद्रानें असंख्य यौवनसंपन्न राजपुत्रांचा संहार केला. सौख्यांतच रहाण्यास योग्य असे ते राजकुमार भुजंगाप्रमाणें क्रुद्ध होऊन युद्ध करीत असतांहि एकट्या अभिमन्यूनें त्यांना परलोकीं पाठवून दिलें.

(३) आर्जुनीचा हा अद्भुत पराक्रम पाहून दुर्योधन भयभीत झाला. आपल्या सर्व सैन्याचा अश्वादि वाहनांसह नाश होत आहे, हें त्याला सहन झालें नाहीं. तो संतप्त होऊन त्या कुमारावर धांवला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. तथापि अल्पावधींतच तुझा पुत्र बाणांनीं विद्ध होऊन मागें फिरला. ७. ३. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ अभिमन्यूनें केलेला दुर्योधनपुत्राचा वध. २ क्राथपुत्राचा वध. ]

(१) धृतराष्ट्र—संजया, एका वीराचें अनेक योद्धयांशीं दारुण युद्ध जुंपल्याचें तूं मला सांगत आहेस. त्यांत त्या एकट्या कुमाराला जय मिळाल्याचें ऐकून मला आश्चर्य वाटत आहे. पण त्यांत अश्रद्धेय तरी काय आहे? शाश्वत धर्म ज्यांचा आश्रय आहे, त्यांना कोणतेंच अद्भुत कर्म अशक्य नाहीं. सहस्रावधि राजपुत्रांचा वध झाला व दुर्योधन युद्धविमुख झाला, तेव्हां माझ्या वीरांनीं सौभद्राच्या निवारणार्थ कोणता उपाय योजला?

संजय—हे महाराज, दुर्योधन पराभूत होऊन शत्रु विजयी झाल्याचें पाहून सर्व वीर उत्साहशून्य झाले. ते जयाविषयीं पूर्णपणें निराश होऊन पलायनपरायण झाले. त्यांनीं आपल्या गतप्राण झालेले पुत्र, भ्राते, मित्र इत्यादि सर्वांचे मृतदेह तेथेंच टाकून आपापल्या गजाश्वांवर आरूढ होऊन त्या रणांगणांतून मोठ्या त्वरेनें पाय काढला. तेव्हां द्रोण, द्रौणि, बृहद्बल, कृपाचार्य, दुर्योधन, कर्ण, कृतवर्मा व शकुनि तुझ्या पौत्रावर धांवून गेले. तेव्हां त्या कुमारानें त्यांतील बहुतेक वीरांचा पराभव करून त्यांस परत फिरविलें.

तें पाहून दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण पुढें सरसावला. तो धनुर्विद्या व अस्त्रें यांत प्रवीण होता. तो मोठ्या उत्साहानें सौभद्रावर धांवून गेला. तेव्हां पुत्रवात्सल्यामुळें दुर्योधन त्याच्या मागोमाग निघाला व दुसरेहि कित्येक महारथ त्यालाच अनुसरले. त्या सर्वांनीं मिळून पर्वतावर पर्जन्यवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें अभिमन्यूवर शरांची वृष्टि चालविली. तथापि मेघांना उडवून देणाऱ्या वायुप्रमाणें एकट्या कुमारानें त्या सर्वांना दश-दिशांत उधळून लाविलें.

---

१ किं तु नात्यद्भुतं तेषां येषां धर्मो व्यपाश्रयः ।

हे महाराज, तुझा पौत्र लक्ष्मण अतिशय शूर, सुस्वरूप, दुर्धर्ष व कुबेर-पुत्रतुल्य होता. तो आपलें धनुष्य आकर्ण ओढून पित्याच्या संनिध उभा राहिला असतां एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजावर उडी टाकतो, त्याप्रमाणें अभिमन्यूनें त्याच्यावर एकदम झडप घातली. त्यावेळीं सौभद्र काठीनें डवंचलेल्या सर्पाप्रमाणें चवताळून लक्ष्मणाला म्हणाला—" आतां तुला परलोकीं जावें लागणार आहे. यास्तव हा लोक चांगला पाहून घे. मी तुला सर्व बांधवांच्या समक्ष यमलोकीं पाठवून देतों. "

असें बोलून परंतप सौभद्रानें सर्पतुल्य घोर बाण सोडला व लक्ष्मणाचें शिरकमल खालीं पाडविलें. लक्ष्मण गतप्राण होऊन पडतांच सर्वत्र हाहाकार झाला. प्रियपुत्राचें निधन सहन न होऊन दुर्योधन अतिशय संतप्त झाला आणि ' या सौभद्राचा वध करा ' अशी गर्जना करूं लागला. तेव्हां द्रोण, द्रौणि, कृप, कर्ण, बृहद्बल, हार्दिक्य व कृतवर्मा या महारथांनीं अभिमन्यूस वेढलें. परंतु त्यानें त्या सर्वांस तीक्ष्ण बाणांनीं विद्ध करून परत फिरविलें आणि मोठ्या त्वरेनें जयद्रथाच्या प्रचंड सैन्यावर चाल केली.

( २ ) याप्रमाणें अभिमन्यु येत आहे, हें पहातांच कलिंग, निषाद व क्राथपुत्र यांनीं मोठ्या दक्षतेनें त्याचा मार्ग अडवून धरला व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. इतक्यांत द्रोणादि वीरहि तेथें आले व त्या सर्वांनीं सौभद्रावर बाणांची वृष्टि चालविली. तथापि त्या सर्वांचें निवारण करून तो आर्जुनि क्राथपुत्राकडे वळला व त्यानें शरांच्या वर्षावानें त्याचें धनुष्य बाण, रथ, ध्वज, सारथि व छत्र इत्यादि सर्वांचा विध्वंस करून शेवटीं त्याचें मुकुट-कुंडलांनीं विभूषित असलेलें मस्तकहि खालीं पाडविलें. याप्रमाणें तो अस्त्रसंपन्न क्राथपुत्र हत झाला असतां बहुतेक योद्धे युद्धपराङ्मुख झाले. ७. ३. ४६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ बृहद्बलाचा वध. २ दशसहस्र कौरववीरांचा संहार. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे सूता, तो तरुण सौभद्र अपराजित होता. तो रणांगणांत विजय मिळवीत असतां कोणत्या वीरांनीं त्याचें निवारण केलें ? त्याचे तरुण अश्व वेगानें चालले असतां, ते आकाशांतून उड्डाण करतात कीं काय असाच भास होत असेल !

संजय—हे राजन्, अभिमन्यूनें तीक्ष्ण बाण सोडून तुझ्या सैन्यांतील सर्व पार्थिवांना परत फिरविलें. तेव्हां कृप, कर्ण, द्रौणि, बृहद्बल, हार्दिक्य व कृतवर्मा या सहा वीरांनीं त्याच्यावर चाल केली. त्याचप्रमाणें एकट्या जयद्रथावर पांडवसैन्य तुटून पडलें आहे, हें पाहून कांहीं सैन्य युधिष्ठिराच्या निवारणार्थ वळलें व कांहीं अभिमन्यूवर शरवृष्टि करूं लागलें आणि त्या सर्वांचें तुमुल युद्ध जुंपलें.

( २ ) नंतर कोसलाधिप बृहद्बलानें 'कर्णि'-नामक तीक्ष्ण बाण अभिमन्यूच्या हृदयावर सोडला. तथापि अभिमन्यूनें भ्रांत न होतां उलट त्याचेच अश्व, ध्वज, धनुष्य व सारथि यांचा निःपात केला. तेव्हां त्या विरथ झालेल्या बृहद्बलानें फाल्गुनेयाचें मस्तक कुंडलांसह हरण करण्याचा निश्चय केला आणि आपली ढाल व तलवार हातांत घेतली. इतक्यांत सौभद्रेयानें एक तीक्ष्ण बाण सोडला, तो बृहद्बलाच्या हृदयांत वेगानें शिरून त्याचे प्राण हरण करून बाहेर पडला.

याप्रमाणें कोसलाधिपाला गतप्राण करून व धरणीवर पाडून त्या प्रतापवान् कुमारानें मोठमोठ्या दहा हजार राजांचा पराभव केला. नंतर तो विजयी वीर आपल्या शरवृष्टीनें तुझ्या सैनिकांना त्रस्त करीत रणांगणांत मोठ्या वेगानें संचार करूं लागला. ७. ३. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ सौभद्र-कर्णयुद्ध. २ कर्ण-द्रोणसंवाद. ३ अभिमन्युविरथीकरण. ४ सौभद्राचें अंतरिक्षांतून युद्ध. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्यानंतर तो पराक्रमी सुभद्रापुत्र कर्णाकडे वळला व त्यानें त्याच्यावर शरांचा वर्षाव केला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या राधेयानें उलट तेवढ्याच बाणांची त्याच्यावर वृष्टि केली. तेव्हां त्याचें सर्वांग शरांनीं विद्ध होऊन तो अतिशयच शोभला. राधेयाच्या अंगांतूनहि रक्ताचा प्रवाह चालला होता. ते दोघेहि वीर रक्तानें माखले होते. त्यामुळें ते प्रफुल्ल पलाशवृक्षांसारखे भासले. त्या दोघांचें दारुण युद्ध जुंपलें असतां कुमारानें आश्चर्यकारक युद्ध करणाऱ्या सहा कर्णसचिवांचे अश्व, रथ, ध्वज व सारथि यांचा निःपात केला व इतरहि महाधनुर्धरांस विद्ध केलें. मागधराजाचा पुत्र अश्व-

केतु तरुण व शूर होता. त्यानें त्यालाहि अश्व व सारथि यांसह गतप्राण केलें व भोजराजाचा एकाच क्षुरप्र बाणानें वध केला.

नंतर दुःशासनपुत्रानें अभिमन्यूवर चाल केली. तेव्हां सौभद्रानें क्रुद्ध होऊन त्याला म्हटलें—" हे दौःशासने, तुझा पिता एखाद्या क्षुद्र पुरुषाप्रमाणें युद्ध सोडून पळाला. तथापि तूं मात्र आज माझ्या हातून जिवंत सुटत नाहींस."

असें बोलून त्या कार्ष्णीनें त्यावर एक नाराच बाण सोडला. पण द्रोणपुत्रानें त्याचे मध्येंच तुकडे करून टाकिले. तेव्हां अभिमन्यूनें त्याचा ध्वज पाडविला. शल्यावर तीन बाण सोडले. त्याच्या चक्ररक्षकांचा वध केला आणि शल्यासहि विद्ध केलें. नंतर त्या परंतपानें शत्रुंजय, चंद्रकेतु, मेघवेग, सुवर्चा व सूर्यभास या पांच वीरांचा वध केला आणि शकुनीला विद्ध केलें.

तेव्हां त्याच्यावर तीन बाण सोडून शकुनि दुर्योधनाला म्हणाला—" हा सौभद्र आपल्या वीरांचा एकसारखा संहार करीत सुटला आहे, यास्तव त्याच्या हातून मृत्यु पावण्यापूर्वीं आपण सर्व मिळून त्याचाच प्राण घेऊं या."

( २ ) इतक्यांत दुसरीकडे कर्ण द्रोणाला म्हणाला—" हे आचार्य, या कुमाराच्या हातून आपला सर्वांचा नाश होण्यापूर्वीं याच्या वधाचा कांहीं तरी उपाय सांगा."

वैकर्तनाचें हें वचन ऐकून द्रोणाचार्य सर्व वीरांस उद्देशून म्हणाला—" हे वीरहो, हा कुमार दश-दिशांत कसा संचार करीत आहे पहा ! याच्या रथ-मार्गांत धनुष्याचें मंडल दिसत आहे. हा नरसिंह इतक्या त्वरेनें शरसंधान करीत आहे कीं, तो धनुष्याला बाण जोडतो केव्हां व सोडतो केव्हां हेंहि कळत नाहीं. तो पांडवनंदन आपल्या शरांनीं मला मोहित करून माझे प्राण व्याकुल करीत आहे. तरीहि त्याच्या पराक्रमाकडे पाहून माझें अंतःकरण हर्षानें भरून येतें. हा परंतप रणांगणांत संचार करूं लागला कीं, मला अति-शय आनंद वाटतो. त्याचें युद्धकौशल्य पाहून कोणाला समाधान वाटणार नाहीं. त्याचें विलक्षण हस्तलाघव पहा ! तुमच्यासारख्या छिद्रान्वेषी वीरां-नाहि त्यांत कोठें छिद्र सांपडणार नाहीं. गांडीवधारी अर्जुनाचा पराक्रम या कुमाराहून विशेष असेल, असें मला वाटत नाहीं.

नंतर सौभद्राच्या शरांनीं विद्ध झालेला कर्ण द्रोणास पुनः म्हणाला—" आचार्य, मी कसा तरी जीव धरून उभा आहें. पण अभिमन्यूच्या बाणांनीं

मला अतिशय पीडा होत आहे. या तेजस्वी कुमाराचे परम दारुण शर अग्नी-प्रमाणें प्रखर आहेत. त्यांनीं माझें हृदयहि व्यथित होत आहे."

कर्णाचे हे शब्द ऐकून आचार्य कर्णास स्मितपूर्वक हलकेच म्हणाला— "हे कर्णा, या पराक्रमी कुमाराच्या अंगांत अभेद्य कवच असलें पाहिजे. मीं त्याच्या पित्याला अभेद्य कवच धारण करण्याची विद्या शिकविली होती. तेव्हां या परपुरंजयाला ती पित्यापासुन प्राप्त झाली असलीच पाहिजे. हे राधेया, अशा प्रकारचें अभेद्य कवच अंगांत असेपर्यंत त्याचा वध करण्याचा आपला सर्व प्रयत्न व्यर्थ आहे. परंतु आपण लक्षपूर्वक वेध केल्यास त्याचें धनुष्य व प्रत्यंचा यांचा छेद करतां येणें शक्य आहे. त्याचप्रमाणें त्याचे दोघे पार्ष्णि-सारथि, भाते, अश्व व रथ यांचाहि नाश करतां येईल. यास्तव हे धनुर्धरा, तुला शक्य असल्यास एवढें तूं प्रथम कर आणि नंतर विरथ झालेल्या त्या वीरावर मागच्या बाजूनें शरवृष्टि चालीव. त्या इंद्रपौत्राच्या हातांतील धनुष्य जोंवर कायम आहे, तोंवर तो देव-दानवांसहि अजिंक्य आहे. त्याला जिंकण्याची जर तुझी इच्छा असली तर त्याला विरथ करून त्याच्या धनुष्याचा छेद कर."

( ३ ) आचार्यांचें हें भाषण कानीं पडतांच कर्णानें त्वरा केली व सौभद्राचें धनुष्य तोडून टाकिलें; भोजानें त्याच्या अश्वांचा वध केला, गौतमानें पार्ष्णिसारथ्यांना गतप्राण केलें आणि इतर सर्व वीर धनुष्यहीन झालेल्या त्या सौभद्रेयावर शरवृष्टि करूं लागले. त्या बिकट प्रसंगीं सहा महारथांनीं एकाच वेळीं त्या विरथ झालेल्या एकट्या बालकावर निर्दयपणानें शरवृष्टि चालविली. तथापि तो वीर यत्किंचित्‌हि भ्रांत झाला नाहीं.

( ४ ) हे राजन्, त्या कुमाराचें धनुष्य तुटून पडलें होतें. रथ भग्न झाला होता. तथापि क्षात्रधर्माचें पालन करणारा तो तेजस्वी पार्थपुत्र हताश झाला नाहीं. त्यानें हातांत ढाल-तलवार घेऊन आकाशांत उड्डाण केलें व आपल्या लाघवानें व सामर्थ्यानें कौशिकादि मार्गांनीं गरुडपक्ष्याप्रमाणें आकाशांत वेगानें भ्रमण केलें. त्यावेळीं हा आपल्यावर झडप घालतो कीं काय या भीतीनें समरांगणांतून वर पहाणाऱ्या त्या छिद्रदर्शी वीरांनीं त्याचा वध करण्याच्या हेतूनें त्याला विद्ध करण्याचा आरंभ केला. महातेजस्वी द्रोणानें एका क्षुरप्र बाणानें त्याचा सुवर्णाच्या मुठीचा खड्ग तोडून टाकला व कर्णानें त्याच्या श्रेष्ठ ढालीचेहि तुकडे केले.

त्यावेळीं तो कुमार शरांनीं सर्वांग भरून गेल्यामुळें आणि ढाल व तलवार मोडल्यामुळें अंतरिक्षांतून उतरला व रणांगणावर येऊन उभा राहिला. रथचक्र घेऊन द्रोणावर धांवला. त्या चक्रापासून उडालेल्या धूळीनें त्याचें शरीर अधिकच उज्ज्वल दिसलें व हातांत देदीप्यमान चक्र धारण करणारा तो बालवीर सुदर्शनचक्रधारी श्रीकृष्णाप्रमाणें भासला. त्या कुमारानें त्यावेळीं भयंकर पराक्रम केला. ७. ३. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ सौभद्राचें गदायुद्ध. ]

( १ ) **संजय**—धृतराष्ट्र महाराज, श्रीकृष्णभगिनी सुभद्रेचें हर्षवर्धन व श्रीकृष्णाचें आयुध धारण करणारा तो अतिरथ अभिमन्यु समरांगणांत प्रति श्रीकृष्णच भासला. त्याच्या मस्तकावरील केस वाऱ्यानें उडत होते. त्यानें महान् महान् शत्रूंवर शस्त्र उगारलें. त्यावेळीं तो तेजस्वी कुमार देवांनाहि दुष्प्रेक्ष्य झाला. त्याचें तें उग्र स्वरूप पाहून सर्व भूपालांचा थरकांप उडाला. तथापि त्या सर्वांनीं मिळून त्या चक्राचे सहस्रावधि तुकडे केले. कौरवांनीं त्याला विरथ करून धनुष्य व खड्ग यांनीं रहित केलें होतें व आतां तर त्याचें चक्रहि भग्न झालें होतें, तथापि तो महारथ अभिमन्यु यत्किंचित्‌हि भ्रांत झाला नाहीं.

तो आपली प्रचंड गदा उगारून अश्वत्थाम्यावर धांवला. ती प्रदीप्त उल्केसारखी गदा पाहून नरश्रेष्ठ अश्वत्थामाहि रथोपस्थ सोडून तीन पावलें मागें हटला. तेव्हां सौभद्रानें त्याचे अश्व व दोन्ही चक्ररक्षक यांना गदाप्रहारानें गतप्राण केलें. त्यावेळीं सौभद्राच्या अंगांत असंख्य बाण रुतल्यामुळें तो पक्ष्याप्रमाणें शोभला.

नंतर त्या बालसिंहानें सुबलपुत्र कालिकेयाचा त्याच्या बरोबर असलेल्या सत्याहत्तर गांधार वीरांसह संहार केला. दहा वसातीयांचा वध केला, केकयांचे सात रथ व दहा हत्ती यांना विदीर्ण केलें आणि दुःशासनपुत्राच्या रथावर उडी घालून त्याचा रथ व अश्व यांचें गदाप्रहारानें चूर्ण करून टाकिलें. तेव्हां तो दौःशासनि अतिशय संतप्त होऊन 'थांब थांब' असें म्हणत आपली गदा उगारून त्याच्यावर धांवला. त्यावेळीं त्या दोघां भ्रात्यांचें तें दारुण युद्ध पाहून प्राचीन त्र्यंबक व अंधक यांच्या युद्धाचा भास झाला.

(२) त्या दोघांनीं परस्परांवर गदेचे प्रहार केले. तेव्हां परस्परांच्या गदा-प्रहारांनीं ते उभयतां वीर मूर्छित होऊन, तुटून पडलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें धरणीवर पडले. हे महाराज, दौःशासनीच्या दैवीं कुरूंची यशोवृद्धि असल्यामुळें तो प्रथम सावध झाला व देहभानावर येऊन उठत असलेल्या सौभद्राच्या मस्तकावर त्यानें गदाप्रहार केला. हे राजेंद्रा, त्यावेळीं तो कुमार युद्धानें अतिशय क्लान्त झाला होता. तो मूर्च्छेतून पूर्णपणें सावधहि झाला नव्हता. अशा मूर्च्छितावस्थेंतच दौःशासनीनें त्याच्या मस्तकावर प्रचंड गदाघात केला. तेव्हां तो परंतप सौभद्र धरणीवर निश्चेष्ट पडला.

अरे अरे, याप्रमाणें त्या संग्रामांत अनेकांनीं मिळून एकाचा वध केला. शत्रुसैन्याला उध्वस्त केल्यानंतर अभिमन्यु गतप्राण होऊन त्या रणभूमीवर पडला असतां कमलिनींचा नाश करून संचार करणाऱ्या वनगजाला व्याधानें जसें पाडावें, तसाच भास झाला. शिशिर ऋतूच्या शेवटीं समग्र अरण्याला दग्ध करून शांत होणाऱ्या दावानलाप्रमाणें तो सौभद्र वीर तेथें पडला असतां तुझे सर्व योद्धे त्याच्याभोंवतीं जमले. पर्वतशिखरांचें चूर्ण करणारा हा पार्थ-नंदनरूपी वायुच शांत झाला ! कीं भारतीसेनेला दग्ध करून पांडवकुलांतील सूर्यच अस्त पावला कीं आहे तरी काय ! जणुकाय त्याच्या उज्ज्वल मुख-चंद्राला राहूनें ग्रासलें आणि सागरच शुष्क झाला ! असा भास झाला.

हे कुरुश्रेष्ठ धृतराष्ट्रा, ज्याच्या मुखाची कांति पूर्णचंद्रासारखी आहे, त्या सौभद्राला मृत होऊन भूमीवर धूळींत पडलेलें पहातांच तुझ्या सर्व महार-थ्यांस परम आह्लाद झाला व ते वारंवार सिंहनाद करूं लागले. राजा, तुझ्या पुत्रांना याप्रमाणें जरी हर्ष झाला, तरी इतर सर्व क्षत्रियांच्या नेत्रांतून अश्रु गळूं लागले. नभोमंडलांतून च्युत झालेल्या चंद्राप्रमाणें तो वीर भूमीवर पडला आहे, असें पाहून भूतांनीं अंतरिक्षांतून "द्रोण-कर्णादि सहा महारथी एकट्या बालकावर तुटून पडल्यामुळें हा वीर हत होऊन पडला. पण हा धर्म नव्हे. त्यांचें हें युद्ध आम्हांला संमत नाहीं." असा मोठ्यानें आक्रोश केला.

हे महाराज, असंख्य मृत देहांनीं आच्छादिलेली ती रणभूमि अभिमन्यु पडल्यानंतर पूर्णचंद्रानें शोभणाऱ्या नक्षत्रयुक्त नभोमंडलाप्रमाणें अधिकच शोभली. चंद्र-सूर्यांप्रमाणें देदीप्यमान असलेला तो कुमार गतप्राण होऊन पडतांच तुझे वीर हृष्ट झाले व पांडव अत्यंत दुःखमग्न झाले. बाल सौभद्र पडतांक्षणीं धर्मराजाच्या समक्ष त्याची सेना पळत सुटली.

आपलें सैन्य पळत आहे, हें पाहून युधिष्ठिर आपल्या वीरांना म्हणाला—
"हे वीरहो, शूर अभिमन्यु रणांगणांत युद्ध करीत असतां मरण पावला. तो निःसंशय स्वर्गाला प्राप्त झाला आहे. यास्तव तुम्ही खेद करूं नका. थांबा. घाबरूं नका. आपण शत्रूचा पराजय करूं या."

असें बोलून धर्मराजानें आपल्या दुःखित सैनिकांना प्रोत्साहन दिलें. याप्रमाणें तो कृष्णतुल्य वीर अभिमन्यु विषारी सर्पाप्रमाणें उग्र राजपुत्र, दहा हजार वीर, आणि कोसलाधिप या सर्वांचा संहार करून इंद्रलोकीं गेला. त्यानें असंख्य गजाश्वांचा निःपात केला. तरी त्याची तृप्ति झाली नाहीं. धन्य धन्य तो कुमार ! त्या पुण्यशाली वीराच्या मृत्यूबद्दल शोक करण्याचें कांहीं कारण नाहीं. पुण्याचरणानें पुण्यपुरुषांना प्राप्त होणारे शाश्वत लोक त्याला निःसंशय प्राप्त झाले आहेत. ७. ३. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ समरभूमीचें त्रोटक वर्णन. २ तृतीयदिनयुद्धसमाप्ति. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें पांडवांच्या प्रमुख वीरांचा वध करून आम्हीं सायंकाळीं आपल्या शिबिरांत परत आलों. त्यावेळीं पांडवांच्या शरांनीं विद्ध झालेले आमचे देह रक्तानें माखले होते. कौरव आणि पांडव समरांगणाचें निरीक्षण करीत चालले होते. पांडव अत्यंत विमनस्क मनानें परत फिरले. त्या सर्वांना त्यावेळीं ग्लानि आली.

अल्पावकाशांतच सूर्य अस्तास गेला. त्याची प्रभा रक्तकमलाप्रमाणें आरक्त झाली. भालूंच्या अशुभ शब्दानें दुमदुमलेला दिवस व रात्र यांचा संधिकाल प्राप्त झाला. तेजोनिधि भास्करानें चकचकीत खड्गें, शक्ति, इत्यादि आयुधांची प्रभा हळुहळू कमी केली व जणुकाय अंतरिक्ष आणि भूमि यांना एकत्र करण्यासाठींच त्यानें तें तेज आपल्या अग्निरूपी प्रिय मूर्तीमध्यें ठेवून दिलें.

प्रचंड अभ्रें किंवा पर्वतांचीं शिखरें यांच्या तुल्य असलेल्या विशाल गजांचे मृत देह चोहोंकडे पडल्यामुळें त्या रणभूमीवरील मार्गांचा निरोध झाला होता. ज्यांचे अश्व, योद्धे व सारथि गतप्राण होऊन पडले आहेत, असे ध्वजपताकारहित रथ भग्न होऊन सर्वत्र पसरल्यामुळें तें रणक्षेत्र शत्रूंनीं उध्वस्त केलेल्या

नगराप्रमाणें भयानक भासत होतें. गजाश्वांचे हस्त-पादादि अवयव छिन्न-भिन्न झाल्यामुळें त्यांच्या मृत देहांनीं ती भूमि घोर दिसत होती. मृदुशय्येवरील बहुमोल आस्तरणावरच पडावयास योग्य, अशा प्रसिद्ध वीर पुरुषांचे देह गतप्राण होऊन तेथें उघड्या भूमीवर धूलींत पडले होते. त्यांच्या परिवारांचा व सेवकजनांचा निःपात झाला होता.

हे महाराज, त्या मृतदेहांच्या राशी व रक्त-मांसाचा चिखल पाहून कोल्हे, कावळे इत्यादि प्राणी, राक्षसांचा समुदाय आणि दारुण पिशाचगण यांना हर्ष झाला. त्या वीरश्रेष्ठांनीं अत्यंत भयानक व दुस्तर अशी जणुकाय प्रति वैतरणीनदीच तेथें उत्पन्न केली होती. ती दारुण नदी रणांगणाच्या मध्या-वरून वहात असून ती जिवंत आणि मृत जीवांस आपल्या प्रवाहाबरोबर वाहून नेत होती. भयंकर पिशाचें रक्तप्राशन करीत होतीं व तीं हर्षभरानें कोल्हीं, कुत्रीं आणि हिंस्र पक्षी यांच्यासह मांस भक्षण करीत होतीं. अशा प्रकारच्या त्या अत्यंत घोर रणांगणाचें अवलोकन करीत उभयपक्षांचीं सैन्यें सावकाश परत फिरलीं. त्यावेळीं रणांगणांत पडलेला शक्रतुल्य महाबलाढ्य अभिमन्यु बहु-मोल आभरणांनीं रहित झाला होता. त्यांचीं सर्व अलंकारभूषणें अस्ताव्यस्त पसरलीं होतीं. त्यामुळें तो तेजस्वी कुमार हवनीय द्रव्याला भस्मसात् करून शांत झालेल्या यज्ञमंडपांतील अग्नीप्रमाणें भासला. ७. १. ५०.

---

## अध्याय ५१ वा.

### [ १ युधिष्ठिराचा विलाप. ]

( १ ) संजय—रथसमुदायाचें रक्षण करणारा तो महावीर्यशाली अभि-मन्यु गतप्राण होऊन पडतांच पांडवांकडील सर्व वीरांनीं रथ सोडले, युद्धाचीं वस्त्रें काढून टाकिलीं, धनुष्यें दूर केलीं आणि सचिंत होऊन युधिष्ठिराला परिवेष्टित केलें. याप्रमाणें सर्व वीर दुःखमग्न होऊन सभोंवार बसले असतां सौभद्राच्या मृत्यूनें शोकाकुल झालेला युधिष्ठिर असा विलाप करूं लागला.

युधिष्ठिर—अरे अरे, द्रोणाचार्यांच्या सैन्याचा व्यूह इतका दुर्भेद्य असतां केवळ माझें प्रिय करण्यासाठींच त्या कुमारानें शत्रुसैन्याचा भेद करून गाईंच्या कळपांत शिरणाऱ्या सिंहाप्रमाणें त्यांत प्रवेश केला. तो माझा शूर बालक कसा हत झाला! अस्त्रविद्याविशारद व जीवावर उदार झालेले

वीरहि ज्या बालसिंहापुढें हतबल झाले, तो माझा अभिमन्यु मृत्युमुखीं पडावा ना ? आमचा वैरी दुःशासन इतका शूर, पण त्यालाहि त्या वत्सानें मूर्च्छित करून रणांगण सोडण्यास लावलें ! द्रोणसैन्याचा महासागर तरून गेल्या-वर दौःशासनीच्या हातून त्या शूराला मरण यावें ना ?

अहो, मी आतां अर्जुनाला तोंड तरी कसें दाखवूं ? या जन्मांत प्रिय पुत्राचें मुख जिच्या दृष्टीसहि पडणार नाहीं, त्या महाभागा सुभद्रेला मी काय सांगूं ! केशवार्जुनांस जीव कीं प्राण असलेला बाळ अभिमन्यु आम्हीं कसा लोपविला ! मी त्या उभयतांना ही अमंगल वार्ता सांगूं तरी कशी ! कृष्णार्जुन व सुभद्रा यांचें सदैव प्रिय करण्यास तत्पर असणाऱ्या माझ्या हातून विजयाच्या लोभानें हें अप्रिय कार्य कसें घडलें ! खरोखर मोहांत सांपडलेल्या माणसाला त्यांतील दोष दिसत नाहींत. लोभानें मनुष्य मोहांत पडतो. मींच पहा ना ? मधाच्या आशेनें हा अशा प्रकारचा प्रपात पाहिला नाहीं. शेवटीं त्याचा असा भयंकर परिणाम व्हावा ना !

अरे अरे, माझ्या प्रियतम अभिमन्यूचा मी भोजनप्रसंगीं, विहारप्रसंगीं, अलंकार-भूषणें धारण करण्याच्या वेळीं किंवा शयनसमयींच पुरस्कार करणें योग्य, पण त्या युद्धांत अननुभवी असलेल्या बालाला मीं समरांगणांत पुढें कसा केला ! या गहन सैन्यसागरांत युद्धापासून कधींहि पराङ्मुख न होणाऱ्या आतिवंत अश्वाप्रमाणें त्या सुकुमार कुमारानें अक्षत रहाणें कसें शक्य होतें ! आम्हीं आतां अभिमन्युचेंच अनुकरण करून मृत होऊन जर येथेंच शयन न केलें, तर क्रुद्ध झालेल्या अर्जुनाच्या आरक्तनेत्ररूपी प्रखर अग्नीनें दग्ध होऊं, यांत संशय नाहीं. यास्तव आतां प्राण त्याग करावा, हें बरें.

माझा भ्राता धनंजय निर्लोभ, बुद्धिमान्, अकार्याविषयीं लज्जा बाळगणारा, मानी, तेजस्वी व पराक्रमी वीर आहे. तो सर्वांना प्रिय आहे. त्या प्रख्यात वीराची देवहि प्रशंसा करीत असतात. त्या प्रतापी शूरानें निवातकवचांचा संहार केला. कालेयांचा निःपात केला. हिरण्यपुरांत रहाणाऱ्या महेंद्रशत्रु पौलोमांचा त्यांच्या परिवारासह निमेषमात्रांत विध्वंस केला. इतकें त्याचें सामर्थ्य असूनहि शत्रु शरण आल्यास तो उदार अंतःकरणाचा महात्मा त्याला अभय देत असतो. त्याच्या बलाढ्य पुत्राचें संरक्षण करण्यासहि आम्ही समर्थ झालों नाहीं !

आतां महाबलाढ्य धार्तराष्ट्रांना मात्र फार मोठें भय प्राप्त झालें आहे. पुत्रवधानें क्रोधसंतप्त झालेला पार्थ सर्व कौरवांचा निःपात करील. खरोखर दुर्योधन क्षुद्रबुद्धीच्या सहायकांच्या मतांनीं वागून स्वपक्षाचा नाश करीत आहे, पण तो शेवटीं तळमळत प्राण सोडील. तथापि अप्रतिम पराक्रम करणारा माझा वत्स अभिमन्यु हत झाला, आतां मला जय किंवा पराजय हीं दोन्ही सारखींच आहेत. मला राज्य, अमरत्व किंवा देवांचें सालोक्य जरी प्राप्त झालें तरीहि तें सर्व तुच्छ वाटत आहे. ७. ३. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ व्यास-युधिष्ठिर संवाद. २ अकंपनराजाचें उपाख्यान. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें कुंतीपुत्र युधिष्ठिर विलाप करीत असतां महान् ऋषि कृष्णद्वैपायन तेथें आला. तेव्हां युधिष्ठिरानें त्याचा योग्य सत्कार व यथाविधि पूजन करून त्याला आसनावर बसविलें व भ्रातृपुत्राच्या वधानें शोकसंतप्त झालेल्या त्यानें असें म्हटलें—" हे भगवन्, आमचा वत्स सौभद्र रणांत हत झाला हो. अनेक महारथांनीं त्या कुमाराला परिवेष्टित करून अधर्मयुक्त युद्धांत त्याचा वध केला. तो किशोर बालवयाचा असूनहि त्यानें आपलें अप्रतिम युद्धकौशल्य प्रकट करून शत्रूच्या अनेक महारथांचा निःपात केला.

हे महात्मन्, आम्ही चक्रव्यूहभेदाविषयीं अनभिज्ञ असल्यामुळें मीं त्या सुकुमार कुमाराला आंत प्रवेश करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या शूरानें व्यूहभेद करून आम्हांला मार्ग करून दिला. तथापि तो वीर आंत शिरतांच जयद्रथानें मार्गाचा निरोध करून आम्हां सर्वांस अडवून धरलें. त्यामुळें आम्ही त्याचें रक्षण करण्यास असमर्थ झालों आणि तो वत्स व्यूहांत एकटा सांपडला. वस्तुतः क्षत्रियांना धर्मयुद्धच उचित आहे, तथापि त्यावेळीं शत्रूंनीं धर्मयुद्ध न करतां त्या एकट्या कुमारावर अनेकांनीं अधर्मानें चाल केली. तो माझा प्रिय बालक अभिमन्यु व्यूहांत एकटा सांपडून वध पावला, त्यामुळें माझें अंतःकरण शोकानें व्यथित होत आहे. माझा कंठ सद्गदित झाला आहे. हे भगवन्, माझ्या मनांत हा विचार पुनः पुनः येऊन मला यत्किंचित्‌हि शांति वाटत नाहीं."

संजय—याप्रमाणें ज्याचें चित्त शोकाकुल झालें आहे, अशा युधिष्ठिरानें विलाप केला असतां भगवान् व्यास त्याला असें म्हणाला—

व्यास—हे महाराज युधिष्ठिरा, तूं सर्वशास्त्रविशारद आहेस, तुझ्यासारखे ज्ञाते संकटप्रसंगीं असे मोहित होत नाहींत. तो वत्स अभिमन्यु बाल असूनहि त्यानें अबालाप्रमाणें शौर्यानें युद्ध केलें आणि असंख्य शत्रूंना रणांगणांत निजविलें. तो वीर निश्चयानें स्वर्गाला गेला. बा युधिष्ठिरा, दैवगतीनें प्राप्त होणाऱ्या मृत्यूचें अतिक्रमण कोणालाहि करतां येत नाहीं. देव, दानव, गंधर्व यांचेंहि मृत्यु हरण करीत असतो, मग मानवांची काय कथा!

युधिष्ठिर—हे भगवन्, युद्धांत गतप्राण होऊन भूमीवर पडलेल्या या पार्थिवांना 'मृत' संज्ञा प्राप्त झाली आहे. सहस्र गजांच्या बलांनीं युक्त व वायुसारख्या वेगवान्, अशा वीरांना तत्तुल्य वीरांनीं युद्धांत गतप्राण केलें आहे. तथापि त्या सर्वांचे प्राण हरण करणारा मृत्यु मात्र कोठें दिसत नाहीं. महातपस्वी आणि बलाढ्य असे अनेक पराक्रमी वीर आयुष्यं संपल्यामुळें येथें निजले आहेत. त्यांना 'मृत' असें म्हणत आहेत. भूमीवर निश्चेष्ट होऊन पडलेले हे निरभिमानी शूर नृपति व राजपुत्र मृत कसे झाले! त्यांचे प्राणहरण करणारा मृत्यु या संग्रामांत मला कोठेंच दिसला नाहीं! हे सर्वज्ञ पितामह, हे सर्व कसे मृत झाले, त्यांना मृतसंज्ञा कां प्राप्त झाली? याविषयीं मला शंका येते. वास्तव कोणाचा कोण मृत्यु आहे, त्याचें कारण काय आहे, तो प्रजेचा संहार कसा करतो? हें सर्व मला कथन कर.

संजय—राजा, कुंतीपुत्र युधिष्ठिरानें असा प्रश्न केला असतां भगवान् व्यासांनीं त्याला आश्वासन देत असें म्हटलें—

---

१ युधिष्ठिराच्या या प्रश्नांतील 'विगतायुषः' या शब्दानें देहवियोगामध्यें पुरुषाचें पारतंत्र्य प्रतीत होतें आणि 'मृताः' या शब्दानें मूळ धात्वर्थाकडे लक्ष दिलें असतांहि प्राणत्यागाविषयीं पुरुषाचें अस्वातंत्र्यच प्रतीत होतें. वास्तव पुरुषाला दुसरा कोणी मारतो कीं तो स्वतःच स्वतःला मारितो? असा या प्रश्नाचा निष्कर्ष भासतो. पण कोणाचा कोण मृत्यु आहे? दुसरा कोणी कीं हा स्वतःच, असा प्रश्न स्वीकारून हा स्वतःच स्वतःचा मृत्यु आहे, हा पक्ष स्वीकारिल्यास तो कोणत्या कारणानें स्वतःच स्वतःचा मृत्यु होतो, असा याचा भावार्थ आहे. व्यासांनीं या प्रश्नाचें उत्तर पुढें दिलेंच आहे.

( २ ) व्यास—हे नृपते, याविषयीं पूर्वी नारदानें अकंपन राजाला एक पुरातन इतिहास सांगितला होता, त्याचें नेहमीं उदाहरण देत असतात. तेंच आख्यान मी तुला कथन करतों. हे नृपश्रेष्ठा, पूर्वी अकंपनराजाला अत्यंत असह्य असा पुत्रशोक झाला होता, त्यावेळीं त्याला कथन केलेला मृत्यूच्या उत्पत्तीविषयींचा हा उत्तम इतिहास मी तुला सांगतों, तो ऐक. हें कथानक ऐकल्यानें स्नेहबंधापासून उत्पन्न झालेला तुझा शोक दूर होईल. हें आख्यान सर्व पापांचें भस्म करणारें, आयुष्याची वृद्धि करणारें, शोकाचा नाश करणारें, पुष्टिकारक, शत्रूंचा नाश करणारें व मंगलांतीलहि मंगल आहे. हें उपाख्यान वेदाध्ययनाच्या तुल्य असून पुत्र, राज्य, आयुष्य व श्री यांची इच्छा करणाऱ्या राजांनीं तर नित्य प्रातःकालीं त्याचें अवश्य श्रवण करावें.

हे धर्मराजा, पूर्वी कृतयुगांत 'अकंपन' नांवाचा एक राजा होऊन गेला. त्याला 'हरि'-नामक एक पुत्र होता. तो सुस्वरूप, बुद्धिमान् व विष्णुतुल्य बलाढ्य होता. त्या अस्त्रनिपुण पुत्राचा पराक्रम इंद्रतुल्य होता. एकदा अकंपन-राजा समरांगणांत शत्रूंच्या हातीं सांपडला असतां, त्याच्या या पुत्रास शत्रूंनें चोहीं बाजूंनीं वेढून टाकिलें. त्यावेळीं त्यानें शरजालानें शत्रुसैन्यास त्रस्त करून सोडिलें. शत्रूंच्या अनेक योद्ध्यांशीं तो दुष्कर कर्म करणारा एकटा कुमार युद्ध करीत असल्यामुळें शेवटीं वध पावला. आपला गुणवान् अल्पवयी पुत्र मृत्युमुखीं पडल्याचें पाहून राजाला अतिशय दुःख झालें. त्यानें शोकाकुल चित्तानें पुत्राचें और्ध्वदेहिक केलें. तथापि रात्रंदिवस शोक करणाऱ्या त्याच्या मनाला शांति मिळेनाशी झाली.

पुत्रशोकानें राजाची झालेली ही दुःखद मनःस्थिति देवर्षि नारदानें जाणली व तो मुनि त्याच्याकडे आला. नारदमुनींना पहातांच अकंपनराजानें त्याचें यथाविधि पूजन केलें. नंतर त्याला आपलें आत्मवृत्त निवेदन केलें व शेवटीं असा प्रश्न केला—'हे भगवन्, हा मृत्यु कोण आहे ? त्याचें सामर्थ्य, बल, पराक्रम, कशा प्रकारचें आहे ? हें सर्व तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. तें मला सविस्तर कथन कर.'

नारद—हे राजन्, हें आख्यान अतिशय विस्तृत आहे. तें जसें घडलें व मीं जसें ऐकलें आहे, तसेंच तुला कथन करितों. तें ऐक. हे वसुधाधिपा, पितामह ब्रह्मदेवानें ही सृष्टि आदिकल्पांत जेव्हां निर्माण केली, तेव्हां त्यांतील

प्रजा अपरंपार वाढलेली पाहून तिच्या संहाराविषयीं त्या महातेजाला मोठी चिंता लागून राहिली. त्यानें पुष्कळ विचार केला, पण कांहीं उपाय सुचेना. तेव्हां त्याला अतिशय संताप आला. त्याच्या त्या क्रोधापासून अग्नि उत्पन्न झाला व त्याच्या देहांतून बाहेर पडला. त्या अग्नीनें सर्व प्रदेश दग्ध करीत दाही दिशा व्यापल्या. तरीहि तो शांत न होतां वाढतच गेला. त्या प्रदीप्त अग्नीच्या ज्वालांनीं पृथ्वी व अंतरिक्ष भरून टाकिलें. सर्व चराचर जगतांत पसरलेल्या त्या भगवान् प्रभूनें सकल चर व स्थावर भूतांना दग्ध करून टाकिलें.

याप्रमाणें आपल्या क्रोधावेगानें सर्व प्राणिमात्रांस त्रस्त करणाऱ्या त्या ब्रह्मदेवाला निशाचरांचा पति रुद्र शरण गेला. सर्व प्रजांच्या हिताच्या इच्छेनें स्थाणु रुद्र आपल्याकडे आला आहे, हें पाहून परमेष्ठी ब्रह्मदेव त्याला म्हणाला—"हे पुत्रक, तूं माझ्या स्वेच्छेनें ज्याअर्थीं उत्पन्न झाला आहेस, त्याअर्थीं मी तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग! तुझी जी इच्छा असेल ती सांग. मी ती पूर्ण करीन." ७. ३. ५२.

---

## अध्याय ५३ वा.

[ १ क्रोध आंवरण्याविषयीं रुद्रानें केलेली ब्रह्मदेवाची प्रार्थना. ]

**स्थाणु**—हे प्रभो, आपण प्रजा उत्पन्न केल्या, त्यांना निर्माण केल्यावर भिन्न भिन्न जातीच्या प्राणिसंघाचें संवर्धन केलेंत पण आतां त्याच सर्व प्रजा आपल्या क्रोधाग्नीनें दग्ध होत आहेत. त्यांची ही स्थिति पाहून माझ्या हृदयांत दया उत्पन्न झाली आहे. तस्मात् हे भगवन्, आतां प्रसन्न व्हा आणि आपला क्रोध आंवरून धरा.

**ब्रह्मदेव**—हे महादेवा, अशाप्रकारें सर्व प्राण्यांचा संहार करण्याची माझी इच्छा नव्हती. पृथ्वीचें हित व्हावें या इच्छेनें मला केवल तिचा भार हलका करावयाचा होता. तथापि तो माझा हेतु साध्य न झाल्यामुळें मी क्रुद्ध झालों. ही भूदेवी भारानें आर्त होऊन मजकडे आली व तिनें प्राण्यांचा संहार करण्याविषयीं माझी प्रार्थना केली. त्यावेळीं हें अनंत जगत् कायम ठेवून प्राण्यांचा संहार कसा करावा, याविषयीं मीं पुष्कळ विचार केला, पण मला योग्य उपाय सुचेना. तेव्हां मला संताप आला.

रुद्र—हे वसुधाधिपा, केवल संहारासाठीं तूं असा क्रुद्ध होऊं नकोस. प्रसन्न हो. या सर्व स्थावर जंगम प्रजेचा असा विनाश करूं नकोस. हे भगवन्, तुझ्या प्रसादानें हें सर्व जगत् त्रिकाल क्लेशरहित राहो. तूं क्रोधसंतप्त होऊन जो अग्नि उत्पन्न केलास, तो पर्वत, वृक्ष, नद्या, सरोवरें, तृण इत्यादि सर्व पदार्थांना दग्ध करीत असून ह्या स्थावर-जंगमान्त सर्व जगतास निःशेष करून टाकीत आहे. ही सर्व सृष्टि भस्मसात् झाली आहे. यास्तव आतां त्यांच्या संहारार्थ रोष करूं नकोस. प्रसन्न हो व आपला कोप शांत होऊं दे. एवढाच वर मी मागत आहें.

हे देवा, तूं स्वतःच निर्माण केलेले प्राणी कसे नाश पावत आहेत पहा. प्रजेच्या हितासाठीं तूं आपलें तेज परत घे व तें तुझ्यांतच लीन होऊं दे. या आपल्या प्रजेकडे स्नेहार्द्र दृष्टीनें पहा. हे आदिदेवा, स्थावर-जंगम जगताचा नाश न होतां या प्रजेचा संहार व्हावा, याच हेतूनें तूं माझी योजना केली आहेस. यास्तव या स्थावर-जंगमाचा नाश न होवो, अशी मी तुझी प्रार्थना करीत आहें.

नारद—हे राजा, स्थाणूचें तें भाषण ऐकून ब्रह्मदेवानें लोकहितासाठीं आपलें तेज आंवरून तें स्वतःमध्येंच लीन केलें. याप्रमाणें अग्नीचा उपसंहार केल्यानंतर भगवंताचा सृष्टिहेतु व मोक्षहेतु त्याला कथन केला. याप्रमाणें अग्नीचा उपसंहार करीत असतां त्या महात्म्या ब्रह्मदेवाच्या इन्द्रियच्छिद्रापासून एक स्त्री उत्पन्न झाली. त्या स्त्रीचा वर्ण कृष्ण, रक्त व पिंगट होता. तिची जिह्वा, मुख व नेत्र आरक्त होते. कुंडलें व इतर भूषणें तेजस्वी होतीं. तिनें उत्पन्न होतांच दक्षिण दिशेचा आश्रय केला व त्या विश्वचालक उभय देवांकडे हास्यमुखानें अवलोकन केलें.

तेव्हां लोकांची उत्पत्ति व नाश यांचा अधिप असलेला ब्रह्मदेव तिला 'मृत्यु' या नांवानें संबोधून म्हणाला—'हे मृत्यो, या सर्व प्रजांचा संहार कर. या जगताच्या संहारार्थ माझ्या कोपानलापासून तुझी उत्पत्ति झाली आहे. यास्तव तूं माझ्या आज्ञेनें सजीव आणि निर्जीव प्राण्यांचा संहार कर. त्यायोगानें तुझें कल्याण होईल.'

राजा अकंपना, ब्रह्मदेवाचें हें भाषण ऐकून त्या कमललोचनेनें पुष्कळ विचार केला व ती अबला रोदन करूं लागली. तेव्हां पितामहानें सर्व

प्राण्यांच्या हितासाठीं ते अश्रु आपल्या ओंजळींत धारण करून तिचें सान्त्वन केलें. ७. ३. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ मृत्यु व ब्रह्मदेव यांचा संवाद. ]

( १ ) नारद—हे अकंपन राजा, त्यानंतर लतेला जसा वृक्षाचा आधार असतो, तसा त्या अबलेचा केवल ब्रह्मदेवच आश्रयस्थान होता. तेव्हां ती आपलें दुःख आंवरून हात जोडून त्या प्रजापतीला असें म्हणाली—

मृत्यु—हे देवा, तूं वक्त्यांतील श्रेष्ठ देव आहेस, तथापि या क्रूर कर्मासाठीं अशाप्रकारची नारी कशाला बरें निर्माण केलीस? तूं मजवर सोंपविलेलें हें घोर कर्म करण्यास मला भीति वाटते. मी अधर्माला अतिशय भितें, यास्तव मजवर प्रसन्न हो. हे प्रभो, मी अशाप्रकारचें हें निर्दय कर्म करूं लागल्यास आपले पुत्र, मित्र, माता, पिता, भ्राते इत्यादि प्रियजनांचे प्राण हरण केल्या-मुळें त्यांचे आप्त मला शिव्याशाप देतील. हे देवा, मृतांच्या आप्तजनांचें मला फार भय वाटतें. ते दीन होऊन अश्रु ढाळूं लागले असतां मला तें हृदयद्रावक दृश्य पहाणें असह्य होईल. हे भगवन्, मी भयभीत होऊन तुला शरण आलें आहें; मजवर प्रसन्न हो. मी हें क्रूर कर्म करण्यास यमलोकीं जाणार नाहीं.

हे लोकपितामह, मी हात जोडून तुला प्रणिपात करीत आहें. विनयान्वित होऊन साष्टांग नमस्कार घालीत आहें. माझी एवढी इच्छा पूर्ण कर. हे प्रजापते, तुझ्या अनुज्ञेनें तपश्चर्या करावी, अशी माझी उत्कट मनीषा आहे. इतका वर मला दे. तुझी अनुमति मिळतांच मी श्रेष्ठ धेनुकाश्रमास जाईन व तेथें तुझ्याच आराधनेंत रत होऊन उग्र तप आचरीन. प्राण धारण करणाऱ्या जीवांचे प्रिय प्राण हरण करणें मला शक्य नाहीं. हें क्रूर कर्म माझ्या हातून होणार नाहीं. यास्तव मला या कार्यांत नियुक्त करूं नकोस. विलाप करणाऱ्या मृतांच्या आप्तबांधवांचे शाप मला सहन होणार नाहींत. या अधर्मापासून माझें रक्षण कर.

ब्रह्मदेव—हे मृत्यो, मीं तुला प्रजासंहारार्थच निर्माण केलें आहें. यास्तव जा, सर्व प्रजांचा संहार कर. याविषयीं अधिक विचार करीत बसूं नकोस. जें

भवितव्य ठरलेलें आहे, तें कदापि अन्यथा होणार नाहीं. यास्तव तूं माझ्या आज्ञेनुसार हें कर्म कर. त्यायोगें तुझी लोकांत यत्किंचित्‌हि निंदा होणार नाहीं.

नारद्—ब्रह्मदेवाचें हें वचन ऐकून ती अबला प्रसन्न मनानें प्रजापतीच्या संमुख हात जोडून उभी राहिली. तथापि प्राण्यांच्या विषयीं तिच्या मनांत अनुकंपा असल्यामुळें त्यांचा संहार करण्यास तिची बुद्धि संमति देईना. ती स्तब्ध राहिली. अल्पावधींतच प्रजापतीचा क्रोध शांत झाला. त्यानें प्रसन्न मुखानें स्मित करून त्या सर्व लोकांचें अवलोकन केलें. तत्क्षणीं ते सर्व लोक पूर्ववत् सजीव झाले.

याप्रमाणें त्या अपराजित भगवंताचा क्रोध शांत झालेला पाहून त्या कन्येनें प्रजासंहाराचें कार्य न स्वीकारतां तेथून पलायन केलें व ती मोठ्या त्वरेनें धेनुकाश्रमास निघून गेली. तेथें तिनें तीव्र व्रतें आचरून उग्र तपश्चर्या आरंभिली. त्या अबलेनें इंद्रियांचा निग्रह करून त्यांना विषयांपासून परतविलें आणि एकवीस अब्जं वर्षें एका पायावर उभें राहून दुष्कर तप केलें. नंतर तेवढींच वर्षें दुसऱ्या पायावर उभें राहून तपाचरण चालविलें. त्यानंतर तिनें एक महापद्म वर्षें मृगांबरोबर वनांत संचार केला. त्याच्या नंतर ती 'नंदा'-नामक नदीच्या शीतल व निर्मल जलांत आठ सहस्र वर्षें उभी राहिली.

अशाप्रकारें व्रतस्थ राहून निष्पाप झालेली ती तपस्विनी पुण्यप्रद कौशिकी नदीच्या तीरावर आली. तेथें तिनें केवल जल व वायु यांवर निर्वाह केला. नंतर ती पंचगंगेच्या तीरावर गेली. तेथें तिनें वेतसयुक्त प्रदेशांत राहून अनेक तीव्र व्रतें आचरून शरीर झिजविलें, तेथून ती पुढें महामेरूवर गेली. तेथें ती गंगेच्या तीरावर प्राणायामपरायण होऊन पाषाणाप्रमाणें निश्चेष्ट बसून राहिली. त्यानंतर ती परमपावन झालेली तपस्विनी, देवांनीं पूर्वी ज्या ठिकाणीं यजन केलें होतें, त्या हिमालयाच्या शिखरावर जाऊन तेथें एक निखर्व वर्षें पायाच्या एका अंगठ्यावर उभी राहिली. नंतर आपला देह क्षीण करीत ती पुष्कर, गोकर्ण, नैमिषारण्य व मलयपर्वत इत्यादि पुण्यप्रद क्षेत्रांत राहून स्वेच्छेनें व्रताचरण करूं लागली.

१ येथें या संख्येचा अर्थ दीर्घकाल इतकाच घ्यावयाचा.

हे महाराज, याप्रमाणें त्या मृत्युसंज्ञक अनन्य देवतेनें पितामहावर नित्य दृढभक्ति ठेवून उग्र तप आचरिलें आणि पितामहाला धर्मतः संतुष्ट केलें. तेव्हां तो सर्व लोकांचा अव्यय प्रभु प्रसन्न चित्तानें तिला प्रेमपूर्वक असें म्हणाला— "हे मृत्यो, तूं हें काय आरंभिलें आहेस! इतकें उग्र तप कां आचरीत आहेस?"

तेव्हां ती भगवान् पितामहाला म्हणाली—"हे प्रभो, तुजकडून मला इष्ट वर मिळावा, यासाठीं मी हें तप आचरीत आहें. हे महाभागा, या सर्व प्रजा सुखानें रहात असतां मी त्याचा संहार करूं लागल्यास त्या आक्रोश करतील. यास्तव मी त्यांचे प्राण हरण करणार नाहीं. मला अधर्माचें अतिशय भय वाटतें. माझ्या हातून ही हिंसा घडूं नये म्हणून मीं हें तप आरंभिलें. हे अव्यय प्रजानाथ, मज निरपराध स्त्रीला अभय दे. मी आर्त होऊन तुजपाशीं ही याचना करीत आहें. यास्तव तूंच माझी गति हो."

हें ऐकून तो भूत-भविष्यद्वर्तमानवेत्ता ईश्वर तिला म्हणाला—हे मृत्यो, प्रजेचा संहार करण्यांत अधर्म नाहीं. माझ्याच आज्ञेनें तूं हें कार्य करणार आहेस. यास्तव त्यामुळें तुला यत्किंचित्हि पातक लागणार नाहीं. माझें वचन कदापि असत्य होत नसतें. यास्तव तूं या चतुर्विध प्रजांचा संहार कर. सनातन धर्म तुला पावन करील. लोकपाल यम आणि व्याधि तुला सहाय करतील. शिवाय तूं पापमुक्त होऊन अत्यंत शुद्ध म्हणून प्रसिद्ध होशील, असाहि वर हे सर्व देव व मी असे सर्व मिळून तुला देत आहों.

हे महाराजा, ब्रह्मदेवाची ही आज्ञा ऐकतांच ती तपस्विनी त्या सर्वेश्वराच्या पुढें हात जोडून उभी राहिली व त्याला शिरसा वंदन करून म्हणाली—'हे प्रभो, माझें हें कर्तव्य आहे, असेंच जर तूं म्हणत असशील आणि हें कार्य मजवांचून जर होण्यासारखें नसेल, तर मी तुझी आज्ञा शिरसा मान्य करितें. तथापि याविषयीं माझें वचन ऐक. या सर्व देहधारण करणाऱ्या प्राण्यांचें जीवित लोभ, क्रोध, द्रोह, मोह, ईर्ष्या, अभ्यसूया, अकार्याविषयीं निर्लज्जपणा इत्यादि दुर्गुण आणि त्यांनीं परस्परांस केलेले कठोर वाक्प्रहार यांच्या योगानेंच परस्पर नष्ट व्हावें.

ब्रह्मदेव—हे मृत्यो, ठीक आहे, तुझ्या इच्छेप्रमाणें घडून येईल. तूं प्रजांचा संहार कर, त्यामुळें तूं अधर्मानें लिप्त होणार नाहींस. शिवाय हे शुभे, मीहि

तुला निंद्य मानणार नाहीं. तूं माझ्या हातांत जे अश्रुबिंदु टाकले आहेस ते सर्व प्राण्यांच्या व्याधिच आहेत. त्या व्याधि सर्व प्राण्यांना गतप्राण करतील, तुला त्याचें पातक लागणार नाहीं. भिऊं नकोस. या प्राण्यांची हिंसा करण्यांत तर यत्किंचित्‌हि अधर्म घडणार नाहीं. तूं स्वतः धर्म आहेस. धर्मधारण करणारी देवताहि तूंच आहेस. तूं आतांपर्यंत धर्मपरायण होऊन धर्माचरण केलें आहेस. त्यायोगें तूं साक्षात् धर्माची मूर्तिच झाली आहेस. यास्तव अधर्माचा विचारहि मनांत न आणतां तूं या सर्व प्राण्यांच्या वृद्धीचें नियंत्रण कर. तूं कोणत्याहि प्राण्याविषयीं मनांत काम किंवा रोष न धरतां त्यांचा संहार कर. त्यायोगें तुला अनंत पुण्याची प्राप्ति होईल.

मिथ्याचरण करणाऱ्या प्राण्यांचा अधर्मच त्यांचें प्राणहरण करील. तस्मात् तूं निष्पाप राहून आपलें कार्य कर. हे सर्व प्राणी स्वतःच्या असत्यामुळें पातकांत निमग्न होतील. त्याविषयीं राग-द्वेष न मानतां तूं त्यांचा संहार कर. ते स्वतःच्या पाप-पुण्याचीं फळें भोगतील.

नारद्—हे अकंपनराजा, ती अबला अगोदर 'मृत्यु' या नांवामुळें भ्याली होती. शिवाय मृतांचे आप्त शाप देतील याचीहि तिला भीति वाटली. तथापि ब्रह्मदेवाला 'ठीक आहे' असें बोलून ती हें क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त झाली. हे राजा, तीच ही देवता काम-क्रोधांत आसक्त न होतां अंतकालीं प्राणिमात्रांच्या प्राणाचें हरण करीत असते. अशा प्रकारची मृत्यु ही देवता आहे. हिच्यापासून सर्व व्याधि उत्पन्न झाल्या आहेत. त्यांनाच रोग असें म्हणतात. त्या रोगांपासून प्राणी जन्म पावतात आणि त्यांचें आयुष्य संपलें म्हणजे ते सर्व नाश पावतात. तस्मात् तूं शोक करूं नकोस, तो व्यर्थ आहे. देवांचें आयुष्यहि मर्यादित आहे. सर्व देव—इंद्रियें जीवांसह परलोकीं जाऊन तेथें जन्म घेतात आणि त्या जन्माला योग्य असेंच आचरण करितात. पण आयुष्य संपलें म्हणजे तीं त्या लोकापासुन निवृत्त होतात. फार काय पण हे राजश्रेष्ठा, देवादि सर्व प्राण्यांनाहि हाच न्याय लागू आहे. इंद्रादि देवहि मर्त्याप्रमाणेंच पुण्यकर्मांच्या बलावर जन्मतःच देव होतात; पण ते पुनः मर्त्यत्वासाठीं—मर्त्य होण्यासाठीं परत फिरत नाहींत. कारण ते आजान देव असतात. जन्मतःच जे देव होतात ते आजान देव होत. त्यांना क्रममुक्ति मिळण्याचा संभव असतो. पण अधिकारी मनुष्यजन्मामध्यें अग्निहोत्रादि विहित कर्मांचें

आचरण करून ज्यांनीं स्वर्ग हा परलोक मिळविलेला असतो ते कर्मदेव होत आणि तेच मर्त्यत्वासाठीं स्वर्गोपभोग संपल्यावर निवृत्त होतात. कीटादि सर्व प्राण्यांचा संहार असाच अविच्छिन्न चालतो.

हे राजसिंहा, हा प्राणवायु अतिशय ओजस्वी व भयंकर आहे. त्याचें सामर्थ्य व गति अकुंठित आहे. तो सर्व प्राण्यांच्या देहांचा भेद करितो. प्रत्येक प्राणी मरणधर्मवान् आहे. फार काय सांगावें! प्रत्यक्ष ब्रह्मदेवहि मर्त्य आहे. ( कल्पाच्या अंतीं त्याचाहि नाश होतो. ) तस्मात् शोक करणें व्यर्थ आहे. प्रत्येक उत्पन्न झालेल्या प्राण्याचा नाश होणें स्वाभाविक असल्यामुळें तूं पुत्रशोकानें विह्वल होऊं नकोस.

हे अकंपनराजा, तुझ्या पुत्राला युद्धांत मरण आलें, त्यामुळें तो स्वर्गांत गेला आहे. त्याला वीरपुरुषाचे रम्य लोक प्राप्त झाले आहेत. तो नित्य सौख्य भोगीत आहे. यास्तव शोक सोडून दे आणि सज्जनांचा सहवास कर. प्रजापतीनें उत्पन्न केलेली ही मृत्युदेवता प्राप्तकालीं प्राण्याचा संहार करीत असते. वस्तुतः प्रत्येक प्राणीच स्वतःचा मृत्यु असतो. मनुष्यप्राणी जें जें कर्म करतो, त्याच्या अनुसार त्याचें आयुष्य व मृत्यु नियत होतो. प्रत्येक प्राणी आपणच आपला मृत्यु निर्माण करून ठेवीत असतो. तो कांहीं खरोखरीचा दंडपाणी अंतक नसतो. मानव स्वतःच स्वतःचा घात करीत असतात. पण अज्ञ जन मात्र तें जाणत नाहींत. तस्मात् ज्ञाते जन मृताविषयीं शोक करीत नसतात. मृत्यु ईश्वरानें निर्माण केलेला आहे आणि तो नियत कालीं अवश्य येणार, हें त्यांना ठाऊक असतें. ब्रह्मदेवानें निर्माण केलेली ही सृष्टि नश्वर आहे, हें जाणून तूं पुत्रनिधनाचा शोक सोडून दे.

व्यास—हे युधिष्ठिरा, नारदानें सांगितलेलें हें आख्यान ऐकून तो अकंपन राजा म्हणाला—' हे भगवन्, आपल्या वाणीनें माझा शोक नाहींसा झाला. अंतःकरण प्रसन्न झालें. हा इतिहास ऐकून मी कृतार्थ झालों. हे देवर्षे, तुला नमस्कार असो.'

याप्रमाणें त्या राजाचें सान्त्वन करून तो महाज्ञानी देवर्षि नंदनवनाकडे सत्वर निघून गेला. हे राजा युधिष्ठिरा, हा पुरातन इतिहास अतिशय पुण्यप्रद आहे. याचें श्रवण करणारास व तें करविणारांस धन, आयुष्य, यश व स्वर्ग यांची प्राप्ति होते.

कृष्णद्वैपायनाचें हें वचन ऐकून युधिष्ठिराला क्षत्रधर्माचें स्मरण झालें, वीरांना परागति प्राप्त होते, हेंहि त्याच्या लक्षांत आलें व तो महारथ उत्तम लोकांना प्राप्त झाला. हें त्यानें जाणलें. इतक्यांत व्यास त्याला पुनः म्हणाला, —हे अजातशत्रो, अभिमन्यु स्वर्गलोकींच गेला आहे. त्यानें असंख्य धनुर्धरांसमक्ष सहस्रावधि शत्रूंचा निःपात केला आहे. हा पूर्वींचा सोमपुत्र विरजा होय. तो पुनः त्याच स्वरूपांत लीन झाला. तस्मात् शोक करूं नकोस. भ्रात्यांसह शांत हो आणि अप्रमत्त होऊन पूर्ववत् युद्धाला सज्ज हो. ७. १. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ युधिष्ठिराच्या मनःस्थितीचें वर्णन. २ सृंजयराजाची कथा. ३ मरुत्तराजाचा वृत्तान्त. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें द्वैपायनमुनींच्या मुखानें मृत्यूची उत्पत्ति व तिचें अनुपम तप यांचा वृत्तान्त ऐकून युधिष्ठिराचें मन किंचित् शान्त झालें. तथापि मृत्यु स्वाभाविकच आहे, याविषयीं कितीहि जरी मनाचा निश्चय असला, तरी गुणवान् पुरुषाच्या वियोगाचें दुःख अतिशय जाणवतें. याच न्यायानें युधिष्ठिरास अभिमन्यूचा वध अत्यंत शोकप्रद झाला. तथापि संकटसमयीं प्राज्ञ जन दुःखतर प्रसंगाकडे लक्ष देऊन आपला दुःखभार हलका करीत असतात. हें जाणून धर्मराजानें पूर्वीं होऊन गेलेल्या गुणवान् महात्म्यांच्या अलौकिक कर्माविषयीं व्यास महर्षींस आदरपूर्वक असा प्रश्न केला.

युधिष्ठिर—हे ब्रह्मन्, शक्रतुल्य पराक्रमी व आपल्या सत्कृत्यांचा आपल्याच मुखानें उच्चार न करणारे सत्यप्रतिज्ञ पुण्यात्मे सत्यलोकाला प्राप्त होतात, हें योग्यच आहे. तथापि हे भगवन्, आपण मजवर अनुग्रह करा आणि पूर्वींच्या राजर्षींचीं पुण्यकर्मैं मला निवेदन करा. त्या महात्म्यांनीं कोणकोणत्या दक्षिणा दिल्या व कोणकोणतीं पुण्यकर्में केलीं, तें मला सांगा.

( २ ) व्यास—हे धर्मपुत्रा, मी तुला सृंजयराजाची कथा सांगतों, ती ऐक. शैब्यराजाला 'सृंजय'-नामक एक पुत्र होता. त्याचे पर्वत व नारद हे दोघे ऋषि मित्र होते. एकदा हे दोघे ऋषि एकाच वेळीं त्याच्या भेटीला आले. तेव्हां सृंजयानें मोठ्या प्रेमानें त्या दोघांचें यथोचित विधिवत् स्वागत करून त्यांस सुखासनावर बसविलें. आपल्या परम मित्रांच्या भेटीनें अतिशय संतुष्ट

झालेला सृंजय त्यांच्या समीप बसून वार्तोविनोद करीत होता. इतक्यांत त्याची लावण्यवती उपवर कन्या सहज तेथें आली व हास्यमुखानें त्या सर्वांस अभिवादन करून त्यांच्या बाजूला उभी राहिली. तेव्हां राजानेंहि तिचें शुभाशीर्वादपूर्वक अभिनंदन केलें.

त्या कन्येला पाहून पर्वत स्मित करून म्हणाला—हे राजन्, सर्व लक्षणांनीं संपन्न असलेली ही रूपवती कन्या कोण आहे ! अहो, ही सूर्याची प्रभा आहे किंवा प्रज्वलित अग्नीची ज्वाला आहे कीं, चंद्राची कांति किंवा श्री, न्ही, कीर्ति, धृति, पुष्टि अथवा सिद्धि यांतील कोणी आहे ?

देवर्षि पर्वतानें असा प्रश्न केला असतां सृंजय म्हणाला—हे भगवन्, ही माझी कन्या माझा आशीर्वाद घेण्यासाठीं येथें आली आहे.

सृंजयाचें हें भाषण ऐकून नारद त्याला म्हणाला—हे नृपते, तुला जर उत्तम श्रेयाची इच्छा असेल तर तुझी ही कन्या मला भार्यार्थ अर्पण कर.

तेव्हां सृंजय संतुष्ट चित्तानें ‘ ठीक आहे, मी ती तुला देतों ’ असें म्हणाला.

तथापि त्याचें हें वचन ऐकून पर्वत अतिशय क्रुद्ध झाला व नारदाला म्हणाला—हे नारदा, या कन्येला मीं पूर्वींच मनानें वरिलें असतां तूं ज्याअर्थी माझी अवज्ञा करून तिला वरीत आहेस, त्याअर्थी स्वेच्छेनें स्वर्गलोकीं जाण्याचें तुझें सामर्थ्य नष्ट होवो.

पर्वतानें असा शाप दिला असतां नारदानें त्याला म्हटलें—“ पर्वता, सात प्रकारचा कन्यापरिग्रह प्रसिद्ध आहे. वरानें मनानें वरणें, वाचेनें वरणें, पालकानें बुद्धिपुरस्सर वधूचें दान करणें आणि वर व वधू या दोघांनीं संभाषण करून परस्पर परिग्रह करणें. हे चार लौकिक प्रकार असून उदकपूर्वक कन्यादान व मंत्रयुक्त पाणिग्रहण हे दोन वैदिक प्रकार आहेत. तथापि या सहाहि प्रकारानें विवाह निश्चित होत नाहीं. तर, या सर्वांत ‘सप्तपदी’ हा मुख्य विधि आहे. ‘ पाणिग्रहणमंत्राणां निष्ठा स्यात्सप्तमे पदे ’—सप्तपदींतील सातवें पाऊल भार्येसह टाकलें असतां कन्येचें भार्यात्व सिद्ध होतें, त्यापूर्वी होत नाहीं, असें वचन असल्यामुळें पाणिग्रहण मंत्रांची निष्ठा सप्तपदी स्मृत आहे. सप्तपदीनंतर वधूला भार्यात्व प्राप्त होत असतें, त्याच्या पूर्वी होत नाहीं, असें स्मृत आहे. तुझा या कन्येवर कांहीं अधिकार नसतां तूं मला निष्कारण शाप दिलास. तस्मात् तूंहि मजवांचून स्वर्गांत जाऊं शकणार नाहींस. ”

याप्रमाणें परस्परांस शाप देऊन ते दोघेहि भूलोकीं राहिले. नंतर सृंजयराजानेंहि पुत्रकामनेनें ब्राह्मणांची परिचर्या, त्यांना अन्न, पान, आच्छादन, इत्यादि अर्पण करून आपल्या शक्तीच्याहि बाहेर मोठ्या यत्नानें आरंभिली. त्यामुळें एकदा तपःस्वाध्यायांमध्यें निरत असलेले व वेद-वेदांगपारग असे ते विप्रेंद्र राजावर प्रसन्न झाले. त्याला पुत्र व्हावा अशी इच्छा करूं लागले व ते सर्व मिळून देवर्षि नारदास 'याला इष्ट पुत्र दे' असें म्हणाले.

तेव्हां नारदमुनि 'ठीक आहे' असें बोलून सृंजयराजाला म्हणाले—'हे राजर्षे, हे सर्व ब्राह्मण तुजवर प्रसन्न झाले आहेत व ते तुला पुत्रप्राप्ति व्हावी, अशी इच्छा करीत आहेत. यास्तव तुला जशाप्रकारच्या पुत्राची इच्छा असेल तशा पुत्राचा वर मागून घे. तुझें कल्याण असो.'

नारदाचें हें वचन ऐकतांच राजानें हात जोडून या सर्व गुणांनीं युक्त अशा पुत्रप्राप्तीचा वर मागितला. तो म्हणाला—'हे भगवन्, मला यशस्वी, कीर्तिमान्, तेजस्वी व अरिन्दम असा पुत्र होऊं दे. त्या पुत्राचे स्वेद, मूत्र, पुरीषादि सर्व कांचनमय असावें.'

याप्रमाणें वर मागितला असतां त्याला तशा प्रकारचा पुत्र झाला. त्याचें नांव 'सुवर्णष्ठीवी' ठेविलें. वरप्रभावानें त्या मुलापासून अपरंपार सुवर्ण उत्पन्न झालें.

तेव्हां त्या राजानें आपल्याला इष्ट असलेल्या सर्व वस्तु सुवर्णाच्या बनविल्या. त्या नृपतीनें प्रासाद, प्राकार, दुर्ग, ब्राह्मणांचीं गृहें, शय्या, आसनें, वाहनें, इत्यादि सर्व सुवर्णमय केलें. फार काय पण पाकसिद्धीचीं भांडीं व स्थाल्यादि भोजनपात्रेंहि सोन्याचींच तयार करविलीं. कांहीं कालानें राजाचें गृह व सर्व बाह्य पदार्थहि सुवर्णाचेच झाले.

लवकरच ही वार्ता चोरांना समजली आणि सुवर्ण उत्पन्न करणाऱ्या त्या राजपुत्रासहि त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें व त्या तस्करांनीं त्याला कांहीं तरी अपाय करण्याचें योजिलें. तेव्हां त्यांतील कांहीं तस्करांनीं असें सुचविलें कीं, आपण त्या राजपुत्रासच धरून आणूं या. कारण तोच या राजाच्या सुवर्णाचा उत्पादक आहे. यास्तव त्यालाच हस्तगत करण्याचा आपण यत्न केला म्हणजे आपलें कार्य होईल.

याप्रमाणें संकेत करून ते चोर राजगृहांत शिरले आणि त्यांनीं बलात्कारानें राजपुत्राला धरून अरण्यांत नेलें. तेथें गेल्यावर त्या राजपुत्रापासून कोणत्या उपायानें द्रव्य उत्पन्न करावें, हें त्यांना कळेना. तेव्हां त्या अविचारी मूर्खांनीं त्याचा वध केला व त्याच्या पोटांत सुवर्ण असेल, अशा समजुतीनें त्याचें पोट चिरलें. परंतु त्याच्या पोटांत त्या द्रव्यलोभी चोरांना कांहींहि सांपडलें नाहीं. त्या राजपुत्राचे प्राण निघून जातांच, त्याचें सुवर्णोत्पादन-सामर्थ्य नष्ट झालें.

इतका प्रयत्न करूनहि शेवटीं कांहींच लाभ झाला नाहीं, हें पाहून ते मूर्ख तस्कर संतापून परस्परांवर तुटून पडले व शेवटीं एकमेकांच्या हातून ते सर्व प्राणास मुकले. समग्र भूलोकांत अलौकिक असलेल्या त्या राजपुत्राचा निष्कारण वध करणारे ते अविचारी चोर आपल्या दुष्ट कृत्यामुळें कल्पनातीत घोर नरकाला प्राप्त झाले.

हे महाराज, इकडे आपल्या पुत्राच्या मृत्यूची वार्ता कानीं येतांच सृंजय-राजाला अतिशय दुःख झालें. आपण महत्तप आचरून वरप्रसादानें मिळविलेल्या अलौकिक पुत्राच्या मृत्यूनें शोकाकुल होऊन तो विलाप करूं लागला. तेव्हां पुत्रशोकानें विव्हल झालेल्या त्या राजाला नारदमुनीनें दर्शन दिलें व त्याला उपदेश केला. तो मी तुला सांगतों ऐक.

नारद—हे सृंजया, तुझ्या मनःकामना अद्यापि पूर्ण झाल्या नाहींत. तूं असा शोकमग्न होऊन जर आयुष्य घालवूं लागलास, तर तुझ्या इच्छा अतृप्त राहूनच तुला मरण येईल. आम्ही व हे ब्रह्मवेत्ते मुनि ज्याच्या गृहीं वास करीत होतों तो मरुत्तराजाहि मृत झाल्याचें श्रुत आहे, मग इतरांची काय कथा !

( १ ) हे राजेंद्रा, मरुत्तराजाची योग्यता अवर्णनीय आहे. एकदा संवर्तानें बृहस्पतीच्या स्पर्धेनें यज्ञ केला असतां, त्याला लागणारें द्रव्य त्या राजर्षीनें दिलें. हिमालयाच्या सुवर्णमय पायथ्याशीं त्यानें विविधप्रकारचे यज्ञ केले, तेव्हां तेथें बृहस्पतिपुरस्सर इंद्रासह सर्व विश्वोत्पादक देवता यज्ञसमाप्ती-पर्यंत उपस्थित होऊन राहिल्या होत्या. त्याच्या यज्ञांतील सर्व यज्ञपात्रें सुवर्णाचीं होतीं. तेथें जमलेल्या विप्रांस व अन्नार्थी जनांस इच्छाभोजन मिळत असे. तें सर्व अन्न अतिशय शुद्ध व पवित्र असे. त्याच्या सर्व यज्ञांत दूध, दहीं,

तूप, मद्य व भक्ष्य-भोज्य पदार्थ विपुल असून ब्राह्मणांस वस्त्राभरणेंहि दिलीं जात. त्यामुळें ते सर्व वेदवेत्ते ब्राह्मण अतिशय संतुष्ट होत.

त्या आविक्षित मरुत्तराजाच्या घरीं साक्षात् मरुद्गण काम करीत असून विश्वेदेव त्याचे सभासद होते. तो वीर्यवान् राजा राज्य करीत असतां नेहमीं सुवृष्टि होऊन विपुल धान्य उत्पन्न होत असे. त्या राजर्षीनें श्रेष्ठ यज्ञ-याग करून देवांना तृप्त केलें. ऋषि, पितर व सुखोपजीवी देव यांस संतुष्ट ठेवण्यासाठीं तो वेदाध्ययनपरायण राजा नित्य ब्रह्मचर्याचें पालन करून सर्व प्रकारचीं दानें देत असे. त्याच्या संग्रहीं उत्तम शय्या, सुखासनें, सुवर्णाच्या राशि व उत्कृष्ट प्रकारचे भक्ष्य-भोज्य पदार्थ होते, ते सर्व त्यानें ब्राह्मणांना अर्पण केले. त्या राजेंद्रानें अपरंपार वित्त विप्रांना देऊन टाकिलें.

याप्रमाणें तो श्रद्धावान् राजा आपल्या निरामय प्रजेचें पालन करीत उत्तम-प्रकारें राज्य करीत असतां इंद्रानें त्याचें चिंतन केलें. तेव्हां तो परम धार्मिक राजर्षि आपली प्रजा, आश्रित राजे, अमात्य, पत्नी, पुत्र, या सर्वांसह अक्षय स्वर्गलोकीं गेला.

हे सृंजयराजा, त्यानें एक हजार वर्षें यौवनसंपन्न राहून राज्य केलें. तो मरुत्तराजा गर्वहीन, शूर, ज्ञानी व क्षमावान् होता. त्यानें आपल्या सर्व वित्ताचा दानांत व्यय केला. तो धर्म-ज्ञान-वैराग्य व ऐश्वर्य या चार गुणांनीं युक्त होता. धर्म-अर्थ-काम व बल या चार शुभ गुणांनीं संपन्न असलेल्या त्या राजर्षीची योग्यता तुझ्याहून किती तरी पटीनें अधिक होती. दानयुक्त वित्त, गर्वरहित ज्ञान, क्षमायुक्त शौर्य व आसक्तिहीन भोग या चार दुर्लभ शुभ गुणांनीं संपन्न असलेला तो मरुत्तराजाहि जर मृत्युमुखीं पडला, तर इतरांची काय कथा! तो तुझ्या पुत्राहून पुण्यतर होता. मरुत्तापुढें तुझा पुत्र गुणहीन ठरतो. त्यानें यज्ञ केले नाहींत किंवा दानेंहि दिलीं नाहींत. त्याच्या-साठीं शोक करणें व्यर्थ आहे. त्याच्यापेक्षां मरुत्तराजा पुण्यवान् असून तोहि कालवश झाला. तस्मात् तूं शोक करूं नकोस. ( याप्रमाणें नारदाचें वचन व्यासांनीं युधिष्ठिराला कथन केलें.) ७. ३. ५५.

## अध्याय ५६ वा.

[ १ सुहोत्रराजाची कथा. ]

( १ ) नारद—हे सृंजया, साक्षात् देवहि ज्याच्याकडे पहाण्यास धजत नसत, तो सुहोत्रराजाहि मरण पावला, असें आम्हीं ऐकलें आहे. त्या सुहोत्राला पितृपरंपरेनें धर्मानें प्राप्त होणारें राज्य मिळालें असतां तो ऋत्विज, ब्राह्मण व पुरोहित यांना आपलें श्रेय विचारून त्याप्रमाणें वागत असे. प्रजापालन, दान, यज्ञ-याग व शत्रूंचा पराजय करणें हाच आपला धर्म आहे, हें जाणून तो सदाचारानें द्रव्यसंचय करीत असे. त्या राजानें धर्माचरणानें देवतांना संतुष्ट केलें. बाणांनीं शत्रूंचा पराभव केला. आपल्या अंगच्या श्रेष्ठ गुणांनीं सर्व प्राण्यांचें रंजन केलें आणि केवल म्लेच्छांचा प्रदेश वजा करून समग्र पृथ्वीचें राज्य केलें.

हे सृंजयराजा, सुहोत्रनृपति राज्य करीत असतां पर्जन्यानें अनेक वर्षें सुवर्णवृष्टि केली, त्यामुळें तेथील सर्व नद्या सुवर्णमय झाल्या. सर्वांस त्या नदीतीरावर जाण्याची मोकळीक असल्यामुळें त्याचे सर्व प्रजाजनांस या सुवर्णाचा यथेष्ट लाभ मिळत असे. त्या नद्यांतील मकर, नक्र, इत्यादि जलचर प्राणीहि सुवर्णमय झाले. ते विविधप्रकारचे मत्स्य सुवर्णमय झालेले पाहून राजाला विस्मय वाटला.

या सुवर्णनिधीचें काय करावें, असा विचार मनांत येऊन त्या सुहोत्र राजानें कुरुजांगल देशांत यज्ञ करून ब्राह्मणांस हें असंख्य द्रव्य अर्पण करावें, असा निश्चय केला. त्याप्रमाणें त्या धर्मनिष्ठ नृपतीनें अनेक अश्वमेध, राजसूय व क्षत्रियांना अनुष्ठेय असे दुसरेहि कित्येक यज्ञ केले. काम्य व नैमित्तिक याग करून ब्राह्मणांना अपरंपार दक्षिणा दिल्या आणि शेवटीं तो परागतीला प्राप्त झाला.

राजा सृंजया, अशाप्रकारें पुण्याचरण करणारा तो सुहोत्रराजा धर्म, अर्थ, काम व बल या चारी शुभ कर्मांत तुझ्याहून श्रेष्ठ व तुझ्या पुत्राहून श्रेष्ठतर होता. तोहि ज्याअर्थी मृत्युवश झाला, त्याअर्थी तुझा यज्ञहीन व दानशून्य पुत्र मरण पावला तर त्यांत आश्चर्य कसलें ! यास्तव 'बा श्वैत्या,' असा आक्रोश करूं नकोस. हा शोक सोडून दे. ७. १. ५६.

## अध्याय ५७ वा.

[ १ पौरवाची कथा. ]

( १ ) नारद्—हे राजेंद्रा, आणखी एक आख्यान ऐक. महाप्रतापवान् पौरवराजानें सहस्रावधि श्वेत अश्व सोडून असंख्य अश्वमेध केले, तो पौरव-श्रेष्ठहि मरण पावला. त्या नृपतीच्या अश्वमेधप्रसंगीं देशोदेशींचे वेद-वेदांग-पारग विद्वान् विप्र जमा झाले होते. वेदाध्ययन पूर्ण होईपर्यंत स्नातकधर्मांत स्थित असलेले उदारधी व प्रसन्नवृत्तीचे विद्वान् तेथें आले असतां त्या सर्वांची सर्वोत्कृष्ट व्यवस्था ठेवण्यांत येत असे. रम्य गृहें, सुखशय्या, वस्त्रालंकार, मिष्टान्न, इत्यादि अर्पून तो त्यांची परिचर्या करीत असे. नट-नर्तक, गायक इत्यादि गुणीजन त्यांचें रंजन करीत असत.

प्रत्येक यज्ञप्रसंगीं तो राजा मुक्त हस्तानें दक्षिणा देत असे. ध्वज-पताका-युक्त गज, सुवर्णाचे रथ, अश्व, सुवर्णालंकृत कन्या, मंदिरें, शेतें, धेनु इत्यादि असंख्य वस्तूंचें तो ब्राह्मणांस दान देत असे. तो स्वर्णमाली राजा जेव्हां सहस्रावधि सवत्स धेनूंचें दान करीत असे, तेव्हां तेवढेच गोपाळ, सुवर्णाचीं शृंगें, रुप्याचे खुर व दुध काढण्यास पात्रें यांसह दान देत असे. शिवाय तो राजर्षि दास-दासी, गर्दभ, शेळ्या, विविध रत्नें व मिष्टान्नाच्या पर्वतप्राय राशी, अशा असंख्य वस्तु ब्राह्मणांस दक्षिणार्थ देत असे.

राजा, पुराणवेत्ते लोक त्याच्याविषयीं अशी आख्यायिका सांगतात कीं, तो अंगाधिप पौरवराजा यज्ञ करीत असतां त्याच्या पूर्वसुकृताच्या योगानें त्याला त्या शुभ यज्ञांचें यथार्थ ज्ञान प्राप्त झालें. त्यामुळें ते यज्ञ यथासांग होऊन राजाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले. तथापि तोहि शेवटीं मरण पावला. हे राजा, ज्यानें इतके यज्ञ-याग करून पुण्यसंचय केला, त्या पौरवराजालाहि जर मृत्यु चुकला नाहीं, तर मग दानधर्मविरहित अशा तुझ्या पुत्राला मरण आल्यास त्यांत शोक करण्याचें काय कारण आहे ! ७. ३. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ शिबि राजाचा वृत्तान्त. ]

( १ ) नारद्—हे संजया, ज्या औशीनर शिबिराजानें ही समग्र वसुंधरा चर्मवत् आपल्या स्वाधीन करून घेतली होती, तो सम्राट्हि अखेर

मृत झाला, असें आम्हीं ऐकलें आहे. त्या सार्वभौम राजाचा वृत्तान्त तुला सांगतों ऐक.

उशीनराचा पुत्र शिबि अतिशय बलाढ्य होता. त्यानें आपल्या रथघोषानें पर्वत, अरण्यें, द्वीपें व समुद्र यांसह पृथ्वीवर ताबा बसविला होता. प्रत्येक संग्रामांत तो शूर नृपति शत्रूचा निःपात करीत असे. त्यानें मोठाले यज्ञ करून विपुल दक्षिणा दिल्या. त्या धीमान् राजानें पुष्कळ धन मिळविलें. त्या युद्धनिपुण पार्थिवाला अनेक मूर्द्धाभिषिक्त राजांनीं मान्यता दिली होती.

त्या भूपालानें समग्र पृथ्वी पादाक्रान्त केल्यावर विपुल फल देणारे अनेक अश्वमेध यज्ञ केले. ते सर्व निर्विघ्नपणें पार पडले. त्या यज्ञांत त्या भूपतीनें याचकांना सुवर्णाचीं एक खर्व नाणीं दक्षिणारूपानें दिलीं. त्याशिवाय हत्ती, अश्व, धान्य, मृग, धेनु आणि पवित्र भूमि यांचें ब्राह्मणांना दान केलें. हे राजा, त्या शिबीचें औदार्य काय वर्णावें ! पर्जन्यधारा, आकाशांतील तारा, गंगेतील वाळूचे कण, मेरुपर्वतावरील पाषाण किंवा समुद्रांतील विविध रत्नें व जलचर प्राणी या सर्वांच्या संख्येनेंच ज्यांची गणती करतां येईल, इतक्या गायी त्या सम्राटानें यज्ञांत दान दिल्या.

शिबीच्या तुल्य राज्यधुरा ओढणारा दुसरा राजा भूत-भविष्यद्वर्तमान कालींहि ब्रह्मदेवास आढळला नाहीं. त्या औशीनरानें अनेक यज्ञ केले, त्यांतील एकांतहि कांहीं न्यून राहिलें नाहीं. सुवर्णाच्या यूपासह सर्व प्रकारच्या अवश्य वस्तु तेथें सिद्ध असत. ब्राह्मण उच्चप्रतीच्या भक्ष्य-भोज्य पदार्थांचें सेवन करीत व तेथें सदैव प्रिय कथा सांगत बसलेले दृष्टीं पडत असत.

त्या राजाच्या यज्ञशालेंत दहीं-दुधाचे डोह भरलेले असून इतर पेयांच्या नद्या वहात असत व अन्नाच्या पर्वतप्राय राशी पडलेल्या दिसत. ‘ हे याचक-जनहो, स्नान करा व आपल्याला जें रुचेल तें पेय प्राशन करा, मिष्टान्न सेवन करा ’ अशी प्रार्थना सर्वदा कानीं पडत असे.

याप्रमाणें पुण्याचरण करणाऱ्या त्या राजावर रुद्र प्रसन्न झाला व त्यानें त्याला असा वर दिला कीं, तूं दानामध्यें कितीहि द्रव्य खर्च केलेंस, तरी तुझी संपत्ति कमी होणार नाहीं, तुझें वित्त अक्षय राहील. तुझें यज्ञकर्म आणि कीर्ति यांचासुद्धां केव्हांहि लोप होणार नाहीं. सर्व लोकांची प्रीति संपादन करून तूं उत्तम स्वर्गलोकाला प्राप्त होशील.

हे सृंजया, असा श्रेष्ठ वर मिळविणारा तो पुण्यशील शिबिराजाहि त्याचा काल प्राप्त होतांच गतप्राण झाला. राजा, तुजपेक्षां श्रेष्ठ व तुझ्या पुत्राहून श्रेष्ठतर असलेल्या शिबीलाहि इहलोक सोडून जावें लागलें, तेथें औदार्य-शून्य अशा तुझ्या पुत्राची काय कथा ? तस्मात् तुझा हा शोक व्यर्थ आहे. तो सोडून दे. ७. ३. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ दाशरथि रामाचें उपाख्यान. ]

( १ ) नारद—हे सृंजया, प्रजेला पुत्रवत् प्रिय असलेल्या दाशरथि रामालाहि मृत्यु आल्याचें आम्हीं ऐकलें आहे. औरस पुत्रांना पाहून पित्याला जसा आनंद होतो, तशी सर्व प्रजा त्याला पाहून संतुष्ट होत असे. त्या अमित पराक्रमी राजाच्या अंगीं असंख्य गुण वास करीत होते. त्या राजपुत्रानें केवळ पित्याच्या आज्ञेसाठीं आपला अनुज लक्ष्मण व पत्नी सीता यांच्यासह चौदा वर्षें वनवास भोगिला. तापसांच्या रक्षणासाठीं जनस्थानांत सहस्रावधि राक्षसांचा संहार केला. तो राजपुत्र वनांत रहात असतां रावण नांवाच्या राक्षसानें त्याला अनुजासह मोहित करून त्याच्या वैदेही भार्येचें हरण केलें. तो रावण अतिशय बलाढ्य व अजिंक्य होता, तथापि त्याच्या या प्रमादानें रामचंद्र क्रुद्ध झाला आणि अंधकाचा वध करणाऱ्या त्र्यंबकाप्रमाणें त्यानें त्या पौलस्त्याचा समरांगणांत वध केला. तो पौलस्त्य सुरासुरांना अवध्य होता. देव-ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्या त्या राक्षसाचा त्याच्या सर्व परिवारासह वध करून त्या दाशरथीनें प्रजाजनावर अनुग्रह केला. तेव्हां त्याची कीर्ति सर्व जगतांत पसरून सर्व सुरगण व ऋषिगण यांनीं त्याची प्रशंसा केली.

त्या रघुनाथाच्या मनांत सर्व प्राणिमात्रांविषयीं प्रेमभाव वास करीत होता. त्यानें धर्मानें प्रजेचें पालन केलें आणि अश्वमेधादि अनेक महायज्ञ केले. हविर्द्रव्यानें इंद्राला संतुष्ट केलें. त्या राजेंद्रानें क्षुधा-तृषा व प्राणिमात्रांना होणारे सर्व रोग यांना जिंकलें. त्यावेळीं तो आपल्या अमूल्य गुणांनीं प्रकाशणारा तेजस्वी राम सर्व प्राण्यांहून अधिकच शोभला. दाशरथि राम राज्य करीत असतां ऋषि, देव आणि मानव यांचा पृथ्वीतलावर सहवास दृष्टीं पडत असे. मनुष्यांच्या पुण्यातिशयामुळें पृथ्वीवरील मानवांत देवादि संचार प्रत्यक्ष करीत असत.

रघुनंदन राज्य करीत असतां प्राण्यांचें बल क्षीण होत नसे. त्यांच्या श्वासोच्छ्वासादि क्रिया नियमित चालत. त्यांस अतिश्वासादि रोग कधींहि होत नसत. तेजस्वी पदार्थ अधिक उज्ज्वल दिसत. अनर्थ घडत नसत. सर्व प्रजा दीर्घायुषी होती. त्या काळांत तरुण माणसें कदापि मृत्युमुखीं पडत नव्हतीं. चतुर्वेदांच्या पठणानें स्वर्गांतील देवता सदैव संतुष्ट असत. विविध प्रकारचे हव्य-कव्यादि होत असत.

त्या प्रभूच्या काळीं कोणत्याहि प्रदेशीं मशक, डांस, सर्प इत्यादि विषारी प्राण्यांपासून उपद्रव होत नसे. कोणीहि जलांत बुडून मृत्यु पावत नसे, किंवा अग्नीहि कोणाला अकालीं दग्ध करीत नसे. अधर्मरत, चोर, मूर्ख अशा प्रकारचीं माणसें त्या काळांत कोठेंहि दृष्टीं पडत नसत. सर्व वर्णांची जनता शिष्टसंमत व प्राज्ञ होती. जनस्थानांत स्वधा, पूजा, पितरांचें तर्पण इत्यादि धार्मिक कृत्यें राक्षसांच्या भीतीनें नष्टप्राय झालीं होतीं, तीं रामचंद्रानें राक्षसांचा संहार करून पुनः निर्विघ्नपणें चालू केलीं.

हे सृंजया, तो दाशरथि राम राज्यावर असतांना मनुष्याचें आयुष्य एक हजार वर्षांचें असून, पुरुषाला हजार पुत्र होत असत. कुलांतील ज्येष्ठावर कनिष्ठाचें श्राद्ध करण्याचा प्रसंग कदापि येत नसे.

त्या अयोध्याधिपाचा वर्ण श्याम असून नेत्र आरक्त होते. तो आजानुबाहु मत्त मातंगाच्या गतीनें चालत असे. त्याचें तारुण्य दीर्घकाल कायम राहिलें होतें व त्याचा स्कंधप्रदेश सिंहाप्रमाणें पीवर होता. त्या सार्वभौम राजानें अकरा हजार वर्षें राज्य केलें व सर्व भूतांना संतुष्ट ठेविलें. सर्व प्रजाजन सर्वकाल रामचंद्राच्याच कथा सांगत असत. त्या सत्यप्रतिज्ञ व प्रजावत्सल सम्राटाच्या योगानें वसुंधरेला शोभा आली होती.

याप्रमाणें सकल ऐश्वर्यसंपन्न प्रभु रामचंद्रानें चतुर्विध प्रजांना स्वचरणीं लीन करून स्वर्गीं नेलें, अयोध्येंत स्वांशभूत आठ प्रकारच्या राजवंशांची स्थापना केली व शेवटीं त्यानेंहि स्वर्गलोकीं प्रयाण केलें. राजा सृंजया, अशा शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या रामालाहि इहलोक सोडावा लागला. मग त्याच्याहून कितीतरी हीन असलेल्या यज्ञ-दानरहित अशा तुझ्या पुत्राला मृत्यु कसा चुकावा! यास्तव व्यर्थ शोकमग्न होऊं नकोस. ७. ३. ५९.

## अध्याय ६० वा.

[ १ भगीरथराजाचा वृत्तान्त. ]

( १ ) नारद्—हे सृंजया, एवढा मोठा भगीरथराजा, पण तोहि मृत झाला. त्या पराक्रमी राजानें भागीरथीच्या उगमापासून मुखापर्यंत तिच्या दोन्ही तीरावर सुवर्णाचे घाट बांधले. क्रत्वर्थ सुवर्णाचीं स्थंडिलें बांधलीं. अनेक राजे व राजपुत्र यांचा अनादर करून सुवर्णानें अलंकृत केलेल्या सहस्रावधि कन्या ब्राह्मणांना अर्पण केल्या. त्या राजानें त्या सर्व कन्यांना सुवर्णाच्या रथांत बसविलें. त्यांतील प्रत्येक रथाला चार चार अश्व जोडले होते. प्रत्येक रथाबरोबर शंभर गज चालत होते. ते सर्व मत्तगज सुवर्णाच्या मालांनीं भूषविलेले होते. प्रत्येक गजाच्या मागून एक हजार अश्व, प्रत्येक अश्वाच्या मागें शंभर धेनु आणि प्रत्येक गायीच्या मागें शेळयांचे कळप चालले होते. इतक्या परिवारांसह त्या कन्या विप्रांना समर्पिल्या जात.

तो उदार भगीरथराजा भागीरथीच्या तीरावर बसून भूयसी दक्षणा देत असे. त्यामुळें गंगातीरावर अपरिमित याचक जमत असत. त्यांच्या भारानें गंगेचें तीर वेत्रयष्टिवत् वांकलें. त्यामुळें गंगेला फार क्लेश झाले व ती राजाच्या मांडीवर येऊन बसली. ( दक्षिणेच्या भारानें गंगेचा तीरप्रदेश वांकला असतां तिच्या प्रवाहाचें जल राजाच्या मांडीपर्यंत आलें, असा भावार्थ. ) अशाप्रकारें गंगा भाराला धारण करते म्हणून उर्वशी किंवा राजाच्या ऊरूचा म्ह० मांडीचा आश्रय केला म्हणून उर्वशी झाली व भगीरथाची कन्या असल्यामुळें भागीरथीहि झाली. याप्रमाणें ती गंगा भगीरथाच्या मांडीवर बसून त्याची दुहिता झाली आणि तिनें त्याला पुन्नामक नरकापासून मुक्त केलें. ( पुत्र नरकापासून रक्षण करीत असतो. यास्तव या कन्येला पुत्र म्हटलें आहे. ) याविषयीं पूर्वी सूर्यतुल्य तेजस्वी असलेले गंधर्व संतुष्ट होऊन गंधर्व-पितर-देव-मनुष्य हे ऐकत असतां ती गाथा सुंदर वाद्यें वाजवून गाऊं लागले.

राजा सृंजया, तो इक्ष्वाकुवंशांतील भगीरथ नृपति विपुल दक्षिणा देऊन यज्ञ करीत असे. समुद्रगामिनी गंगेनें त्याला पिता मानून त्याचा आश्रय केला. इंद्रासह सुरगण व देवता यांनीं तो यज्ञ विभूषित केला, त्या यज्ञाचा मोठ्या आदरानें स्वीकार केला व तो निर्विघ्नपणें पार पडला. त्या राजर्षीचा यज्ञ चालू असतां सर्व प्रजा निरामय होती. तो भूपाल योगप्रभावानें इष्ट

असलेली कोणतीहि वस्तु कोणत्याहि प्रदेशांत असलेल्या ब्राह्मणास त्याच्या इच्छेनुरूप देण्यास समर्थ होता. त्या भगीरथाला ब्राह्मणांस अदेय असें कांहींच नव्हतें. कोणतीहि दुर्मिळ वस्तु तो याचकास तत्काल देत असे.

अशाप्रकारें दान करणारा तो भगीरथ विप्रप्रसादानें ब्रह्मलोकाला प्राप्त झाला. सूर्यदर्शनानें पापनाशादि जें फल प्राप्त होतें किंवा कर्मयज्ञ-ज्ञानयज्ञ यांनीं ज्याची प्राप्ति होते, तें फल या भगीरथाच्या दर्शनानें मिळत असल्यामुळें मरीचिपादि ऋषि या राजाच्या दर्शनाविषयीं व उपासनेविषयीं तत्पर असत. इतक्या श्रेष्ठ योग्यतेचा भगीरथहि जर मरण पावला, तर त्याच्याहून सर्व प्रकारें हीन असलेला तुझा पुत्र कालवश झाल्यास त्यांत आश्चर्य कसलें! तस्मात् तूं पुत्रासाठीं विलाप करूं नको. ७. १. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ दिलीपराजाचें वृत्त. ]

( १ ) नारद्—हे संजया, ऐलविल म्ह० प्रतिकुबेरच असा दिलीपराजाहि अखेर मरण पावल्याचें आम्हीं ऐकलें आहे. त्या राजानें शेकडों यज्ञ करून प्रत्येक यज्ञांत लक्षावधि ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिली. त्या राजर्षीला अनुष्ठान आणि वेदार्थ यांचें उत्कृष्ट ज्ञान असून त्यानें पुष्कळ यज्ञ केले. पुत्र-पौत्रांनीं संपन्न असलेला तो वसुधाधिप यज्ञामध्यें संपूर्ण वसूनें युक्त असलेली वसुधा ब्राह्मणांना अर्पण करीत असे.

या दिलीपाच्या यज्ञांत विधिमार्ग उज्ज्वल झाले. तेव्हांपासून ते प्रवृत्त झाले. पुढें इंद्रासह सर्व देवांनींहि पुण्योत्पत्तीसाठीं त्याचेंच अनुवर्तन केलें. त्याच्या यज्ञमंडपाच्या बाहेर पर्वतप्राय हजारों गज तिष्ठत असत. त्याचे सभामंडप सुवर्णाचे असून अतिशय दीप्तिमान् असत. त्याच्या यज्ञप्रसंगीं भक्ष्य-भोज्य पदार्थांचे पर्वत व पेयपदार्थांच्या नद्या दृष्टीं पडत. त्याचे विस्तीर्ण यज्ञस्तंभ सुवर्णाचे होते. त्या यूपांवरील चषकेंहि कांचनाचींच होतीं. त्या यज्ञमंडपांत सहा हजार अप्सरा सातप्रकारचें नृत्य करीत असत. विश्वावसु गंधर्व स्वतः प्रसन्न चित्तानें वीणा वाजवीत असे आणि सर्व भूतें त्या सत्यशील राजाला अतिशय मानीत असत.

दिलीपाच्या राज्यांत उत्कृष्ट प्रकारचे व उच्चप्रतीचे भक्ष्यभोज्य पदार्थ भक्षण करून आणि नानाप्रकारचीं पेयें प्राशन करून स्त्रिया मत्त झालेल्या असत. तथापि त्या पतिव्रता आपापल्या पतींशीं एकनिष्ठेनेंच वागत. ( त्याच्या राज्यांत व्यभिचारिणी स्त्रिया नव्हत्या. ) तो राजा समुद्रांतून युद्ध करीत असतां त्याच्या वाहनांचीं चक्रें जलांत बुडत नसत. हा अद्भुत प्रकार पाहून या अलौकिक नृपालाच्या सदृश अन्य नृपति नाहीं, असें सर्वांचें दृढ मत झालें.

अशा प्रकारच्या महा पराक्रमी, सत्यवादी आणि अतिशय उदार अशा दिलीप राजाचें दर्शन घेणारे पुरुष स्वर्गालाच जिंकीत असत. त्या ऐलविल –प्रतिकुबेर असलेल्या राजाच्या प्रासादांत अहोरात्र स्वाध्यायाचा घोष व धनुष्याचा टणत्कार सतत कानीं पडत असे आणि खा, प्या व सेवन करा, अशा या पांच प्रकारच्या शब्दांचा नाद सर्वदा ऐकूं येत असे.

राजा सृंजया, ज्यानें इतकीं पुण्यकर्में केलीं, त्या महात्म्या दिलीप राजालाहि मृत्युमुखीं पडावें लागलें. मग तुझा यज्ञ-दानरहित पुत्र मरण पावला, तर त्याविषयीं शोक करण्याचें काय कारण आहे ! ७. ३. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

### [ १ मांधात्याची कथा. ]

( १ ) नारद्—हे सृंजया, युवनाश्वाचा पुत्र मांधाताहि निधन पावल्याचें श्रुत आहे. त्या राजश्रेष्ठानें त्रैलोक्य जिंकून देव, दानव आणि मानव यांवर अधिपत्य मिळविलें. तो असामान्य पुरुष पित्याच्या उदरांत गर्भरूपानें उत्पन्न झाला असतां साक्षात् अश्विनीकुमारांनीं त्याला बाहेर काढलें. त्याविषयींचा वृत्तान्त तुला सांगतों. ऐक.

एकेदां युवनाश्वराजा मृगया करीत वनांतून हिंडत असतां तो तृषार्त झाला. त्याचा अश्वहि श्रांत झाला. इतक्यांत पलीकडे धूर निघत असलेला त्याच्या दृष्टीं पडला. तेव्हां त्या अनुरोधानें तो राजा तेथें गेला. त्या ठिकाणीं एक सत्र चाललें होतें. तेथें त्याला पृषदाज्य म्ह० दहीं व तूप यांच्या मिश्रणानें तयार

---

१ या सर्व कथा पूर्वी सविस्तर येऊन गेल्या आहेत. यास्तव येथें त्यांचा शक्य तेवढा संक्षेप केला आहे.

केलेला पदार्थ मिळाला. तो त्यानें भक्षण केला. त्या मंत्रयुक्त पदार्थाच्या प्रभावानें त्याच्या उदरांत गर्भ राहिला.

हा प्रकार भिषग्वर अश्विनीदेवांच्या लक्षांत येतांच त्यांनीं त्या बालकास पित्याच्या उदरांतून बाहेर काढलें. पित्याच्या अंकावर पडलेला तो तेजस्वी बालक पाहून देवांनीं एकमेकांस असा प्रश्न केला कीं, हा बालक आतां दुग्धपान कोणाचें करणार! तेव्हां इंद्रानें ' मां धास्यति ' असें म्हटलें तेव्हां इंद्राच्या करांगुलींतून अमृततुल्य दुधाची धार वाहूं लागली. या कारणानें त्याचें नांव ' मांधाता ' असें पडलें.

इंद्राच्या अंगुलींतून वहाणारें दूध व तूप यांच्या धारा त्या महात्म्या मांधात्याच्या मुखांत पडूं लागल्या. त्याच्या योगानें तो अतिशय त्वरेनें वाढूं लागला. तो बारा दिवसांत बारा वर्षांच्या मुलासारखा सुदृढ व बलवान् झाला. पुढें त्या राजानें एका दिवसांत ही समग्र पृथ्वी जिंकली.

तो धार्मिक राजा सत्यप्रतिज्ञ व जितेंद्रिय होता. त्या धृतिमान् वीरानें जनमेजय, सुधन्वा, गय, पूरु, बृहद्रथ, असित व नृग या सर्वांस पराक्रमांत मागें टाकलें. सूर्य उदय पावणाऱ्या प्रदेशापासून तों तो अस्ताला जाण्यापर्यंतचा सर्व देश म्हणजे पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत मांधात्याचें क्षेत्र म्हटलें जात असे. या राजानें अनेक अश्वमेध यज्ञ केले. जेथील भूमि रक्तवर्ण आहे, जेथें पद्मरागमण्याच्या खाणी आहेत, ज्या नद्यांतील वाळू सुवर्णानें युक्त आहे, असा शंभर योजनें लांबीचा ' मत्स्य '-नामक प्रदेश त्या सम्राटानें ब्राह्मणांस अर्पण केला.

भक्ष्य-भोज्य पदार्थांच्या पर्वतप्राय राशी कधींहि संपत नसत. याचकांना यथेच्छ तृप्त केल्यावरहि अवशिष्ट राहिलेल्या अन्नाचा ढीग पडून राहिलेला दिसत असे. त्याच्या राज्यांत खाद्य-पेयाची कधींहि उणीव पडत नव्हती. देव, दानव, मानव, यक्ष, गंधर्व, उरग, पक्षी व वेदवेत्ते ब्राह्मण त्याच्या कल्याणार्थ तत्पर असत. तेथें जमलेले सर्व ब्राह्मण व ऋषि विद्वान् आणि ज्ञानी होते. अशा प्रकारच्या त्या ऐश्वर्यसंपन्न मांधाताराजानें ही समुद्रवलयांकित समग्र पृथ्वी ब्राह्मणांना अर्पण केली आणि आपली कीर्ति दशदिशांत पसरून तो पुण्यात्मा स्वर्गलोकीं निघून गेला.

हे सृंजया, हा मांधाता तुझ्या पुत्राहून अनेक पटींनें श्रेष्ठ असून तोहि जर चिरायु होऊं शकला नाहीं, त्यालाहि हें जगत् सोडावें लागलें. मग तुझ्या

यज्ञ-दानरहित पुत्राची काय कथा! यास्तव त्याच्यासाठीं शोक करणें व्यर्थ आहे! ७. ३. ६२

---

## अध्याय ६३ वा.

[ १ ययातीचें आख्यान. ]

( १ ) नारद्—सृंजया, शेकडों अश्वमेध आणि राजसूय करणारा प्रख्यात ययातिराजाहि मरण पावला. त्यानें असंख्य पुंडरीक, वाजपेय, अतिरात्र, अग्निष्टोम, चातुर्मास्यें व विविध प्रकारचीं सत्रें केलीं. विपुल दक्षिणा दिल्या. त्या धार्मिक राजानें म्लेच्छादि ब्राह्मणद्वेष्ट्या धनिकांचें सर्व वित्त हरण करून तें सर्व ब्राह्मणांना अर्पण केलें. तो पुण्यशील राजा यज्ञ करूं लागला असतां पवित्र सरस्वती नदी, सप्तमहासागर, पर्वत आणि इतर सरोवरें दूध व तूप यांचा पुरवठा करीत असत.

पूर्वी देवासुरांच्या युद्धांत या नाहुषानें देवांना सहाय केलें आणि समग्र पृथ्वीचे चार विभाग करून ते चार ऋत्विजांना अर्पण केले. तेव्हांपासून ' पूर्व दिशा होत्याची, दक्षिणदिशा अध्वर्यूंची ' इत्यादि श्रुति प्रवृत्त झाली. नानाविध यज्ञ करणाऱ्या या राजर्षीनें शुक्रकन्या देवयानी व शर्मिष्ठा या दोघी भार्यांच्या ठिकाणीं धर्मतः श्रेष्ठ संतति उत्पन्न केली. त्या देवतुल्य राजानें देवारण्यांत प्रति इंद्रवत् विहार केला. तथापि त्या सर्ववेदवेत्त्याला शांति मिळाली नाहीं. तेव्हां त्यानें ही गाथा गाइली आणि पत्नीसह वनांत प्रवेश केला.

ययातीनें गाइलेली गाथा—या पृथ्वीतलावर जेवढें धान्य, तृण, सुवर्ण, पशु, स्त्रिया व इतर धन आहे, तेवढें सर्व जरी एका मनुष्याला प्राप्त झालें, तरीहि त्याची तृप्ति होत नाहीं. यास्तव मानवानें शम करावा.

याप्रमाणें ययातिराजानें सर्व कामनांचा त्याग करून धृतीचें अवलंबन केलें. आपल्या ' पूरु '-नामक पुत्रास राज्यावर स्थापन करून वानप्रस्थाश्रम स्वीकारला आणि शेवटीं तो राजर्षिहि कालवश झाला. राजा, तुझ्या पुत्राहून त्याची योग्यता केवढी तरी श्रेष्ठ होती. तोहि अमर होऊं शकला नाहीं. यास्तव तूं शोक सोड. हे श्वैत्या, असा व्यर्थ विलाप करीत बसूं नको. ७. ३. ६३.

---

## अध्याय ६४ वा.

[ १ अंबरीषाचें वर्णन. ]

( १ ) नारद—राजा सृंजया, सहस्रावधि राजांशीं एकटा युद्ध करणारा नाभाग अंबरीषराजाहि शेवटीं मरून गेला. एकदां या पराक्रमी राजावर चोहोंबाजूंनीं शत्रु धांवून आले. ते सर्व अस्त्रविद्याविशारद भयंकर वीर अपशब्दांचा वर्षाव करीत त्याच्यावर तुटून पडले. तथापि अंबरीषानें आपलें हस्तलाघव आणि शरीरसामर्थ्य यांच्या योगानें शत्रूंचा क्षणार्धांत विध्वंस केला. तेव्हां पराभूत झालेले ते शत्रु स्वतःचे प्राण वांचविण्यासाठीं 'आम्ही आपले अंकित आहों' असें बोलून अंबरीषाला शरण आले. अशा प्रकारें सर्व शत्रूंना जिंकून त्या नराधिपानें ही समग्र वसुंधरा जिंकली आणि यथाशास्त्र अगणित यज्ञ केले.

हे अनघा, तो अंबरीष राजा राज्य करीत असतां षड्स अन्नाची सर्वत्र समृद्धि होती. यज्ञाला आलेले सर्व ब्राह्मण राजाच्या आदरातिथ्यानें प्रसन्न झाले. याचकांना सर्व प्रकारचे भक्ष्य-भोज्य पदार्थ यथेष्ट दिले जात असत. मद्यपी गायक आणि वादक सुखलोलुप होत्साते मादक मद्य पापमूलक आहे, हें जाणत असूनहि तें यथेच्छ प्राशन करीत आणि हृष्टचित्तानें नाभागराजाचे स्तुतिपाठ गात नृत्य करीत.

या उदारचरित राजानें अनेक याग केले. त्यांत एक लक्ष राजांना त्यांच्या राज्यासह ब्राह्मणांच्या वश केलें. ते सर्व मूर्द्धाभिषिक्त राजे व राजपुत्र सुवर्णाच्या रथांत बसलेले असत व त्यांचें छत्र-चामरादि सर्व हिरण्यमयच असे. यज्ञसमाप्तीच्या वेळीं तो राजा आपला सर्व कोश याचकांना अर्पण करीत असे. त्यावेळीं 'असा उदार सम्राट् पूर्वीं झाला नाहीं व पुढें होणार नाहीं' असे उद्गार त्या संतुष्ट झालेल्या महर्षींच्या तोंडून ऐकूं येत असत.

राजा सृंजया, अशा श्रेष्ठ योग्यतेचा अंबरीषराजाहि आयुष्य क्षीण होतांच स्वर्गीं गेला. यास्तव तुझ्या पुण्याचरणरहित पुत्राच्या वियोगानें व्यथित होण्यांत काय अर्थ आहे ? ७. ३. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ शशबिंदूचें आख्यान. ]

नारद्—संजया, सत्यपराक्रमी श्रीमान् शशिबिंदुराजाहि मृत झाल्याचें श्रुत आहे. त्यानें विविध प्रकारचे यज्ञ केले. त्या महात्म्याच्या एक लक्ष भार्या होत्या. त्यांतील प्रत्येक स्त्रीला एक हजार पुत्र झाले. ते सर्व कुमार अतिशय पराक्रमी निपजले. त्यांनीं अगणित द्रव्य खर्च करून मोठाले ऋतु केले. ते सर्व वेद्पारग होते. त्यांनीं धनुर्विद्येंतहि प्रावीण्य संपादन करून सर्वांनीं पृथक् पृथक् राज्यें स्थापन केलीं व अश्वमेध यज्ञ केले.

अशा प्रकारच्या सुवर्णाचीं कवचें धारण करणाऱ्या त्या श्रेष्ठ राजपुत्रांस शशबिंदूनें अश्वमेध यज्ञांत ब्राह्मणांना अर्पण केलें. त्या प्रत्येक राजकुमाराच्या मागून शंभर गज व तेवढेच रथ चालत होते. शिवाय सुवर्णांचे अलंकार धारण करणाऱ्या अनेक कन्या त्या राजपुत्रांच्या बरोबर होत्या. त्या प्रत्येक कन्येच्या मागून शंभर हत्ती, प्रत्येक हत्तीच्या मागें शंभर रथ, प्रत्येक रथाच्या मागोमाग शंभर अश्व, प्रत्येक अश्वाच्या मागें हजार गायी, प्रत्येक गायीच्या मागें पांचशें शेळ्या, अशा प्रकारचा परिवार त्या राजानें आपल्या महायज्ञांत ब्राह्मणांना अर्पण केला, तरीहि आपण कमीच दान केलें, पुरेसें धन दिलें नाहीं, असेंच तो उदार राजा समजत होता.

त्या महायज्ञांत जेवढे लांकडाचे स्तंभ होते, तेवढेच तेथें सुवर्णांचे बांधले होते. त्या राजाचा अश्वमेध यज्ञ समाप्त झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या भक्ष्य-भोज्य पदार्थांच्या एक कोस उंचीच्या तेरा पर्वतप्राय राशी पडलेल्या होत्या. त्या शशबिंदूच्या राज्यांत कसलीहि व्याधि नव्हती, कसल्याहि प्रकारचें विघ्न येत नसे. त्याची प्रजा हृष्ट, पुष्ट व सुखी होती.

अशा प्रकारच्या पृथ्वीचा दीर्घकाल उपभोग घेतल्यानंतर तो भाग्यवान् शशबिंदुहि स्वर्गलोकीं गेला. तेव्हां यज्ञ-यागरहित अशा तुझ्या पुत्राची काय कथा ! यास्तव त्याच्या नांवानें व्यर्थ आक्रोश करूं नको. ७. ३. ६५.

---

## अध्याय ६६ वा.

[ १ गयराजाचा वृत्तान्त. ]

( १ ) नारद्—हे सृंजया, जगद्विख्यात गयराजाहि अमर झाला नाहीं. तोहि गत झाला. तो गयनृपति शंभर वर्षें केवळ हुतावशिष्टच सेवन करून राहिला होता. तेव्हां अग्नि त्याच्यावर प्रसन्न झाला व त्याला ‘ इष्ट वर मागून घे ’ असें म्हणाला.

त्यावेळीं गयानें असा वर मागितला—“ हे भगवन्, तप, ब्रह्मचर्य व्रत, नियम आणि गुरुसेवा यांच्या योगानें वेदविद्या जाणण्याची माझी इच्छा आहे. स्वधर्मांत स्थित राहून दुसऱ्याची हिंसा केल्यावांचून मला अक्षय धन प्राप्त व्हावें. विप्रांना दान करण्याची श्रद्धा माझ्या मनांत नित्य उत्पन्न व्हावी. मजवर अनन्यनिष्ठा ठेवणाऱ्या स्ववर्णाच्या भार्यांपासूनच मला संतति व्हावी. माझें चित्त सर्वदा धर्मांत रमावें आणि श्रद्धेनें अन्नदान करण्यास माझें मन तत्पर असावें. मी धर्मकार्यें करीत असतां त्यांत कदापि विघ्नें येऊं नयेत.”

राजाची ही प्रार्थना ऐकून तो पावक ‘ तथास्तु ’ असें म्हणाला व तेथेंच अंतर्धान पावला. त्याच्या वरप्रदानानें गयराजाची सर्व कामना पूर्ण झाली. आणि त्यानें सर्व शत्रूंना धर्मानें जिंकिलें. तो धार्मिक वृत्तीचा भूपाल विहित कालीं दर्शपौर्णमास, आग्रयण चातुर्मास्य, विविधप्रकारचे यज्ञ अव्याहत शंभर वर्षें करीत होता. तो प्रत्येक दिवशीं प्रातःकालीं एक लक्ष धेनु, दहा सहस्र अश्व, एक लक्ष सुवर्णाचें निष्क, इत्यादि दानें देत असे. त्या राजानें नक्षत्र-विहित दक्षिणा देऊन सोम, अंगिरा इत्यादि प्रकारचे याग केले.

अश्वमेध यज्ञाच्या प्रसंगीं रत्नें व मधुर फळें यांनीं युक्त असलेली भूमि सुवर्णानें भूषवून ब्राह्मणांना अर्पण केली. या महामखांतील सुवर्णाचे सर्व यूप रत्नजडित होते. ते मूल्यवान् यूप पाहून सर्व भूतें संतुष्ट होत. त्या गयराजाच्या यज्ञांत ब्राह्मणांस व इतर सर्व याचकांस समृद्ध अन्नानें तृप्त करण्यांत येत असे. समुद्र, अरण्यें, द्वीपें, नद्या, सरोवरादि जलाशय, नगरें, राष्ट्रें, स्वर्ग आणि अंतरिक्ष यांत वास्तव्य करणारे विविध प्राण्यांचे समुदाय राजाच्या यज्ञसंपदेनें तृप्त होत्साते, असें म्हणाले कीं, गयाच्या यज्ञासारखा दुसरा यज्ञ इतरत्र कोठेंहि झाला नाहीं.

त्या राजाच्या यज्ञांतील सुवर्णाची रत्नजडित वेदी छत्तीस योजनें लांब आणि पुढून तीस व मागून चोवीस योजनें रुंद होती. अशी मूल्यवान् वेदीहि त्या यजन करणाऱ्या नृपालानें विप्रांना अर्पण केली. त्याचप्रमाणें वस्त्रें, भूषणें व विपुल दक्षिणा देऊन सर्व याचकांना यथान्याय संतुष्ट केलें. त्या यज्ञ-समाप्तीनंतर अवशिष्ट राहिलेल्या अन्नाचे पंचवीस पर्वतप्राय ढीग शिल्लक राहिले होते. वस्त्रें, भूषणें व सुगंधिद्रव्यें यांच्या राशी पडल्या होत्या. दुग्धादि रसांचे प्रवाह वहात होते.

ज्या अक्षय वटवृक्षाच्या प्रभावानें गयराजा त्रैलोक्यांत प्रसिद्ध झाला तो वृक्ष आणि तें पवित्र ब्रह्मसरोवर याच ठिकाणीं होतें.

अशाप्रकारचा पुण्यशील गयराजाहि शेवटीं मृत झाला. तो भूपाल तुझ्या पुत्राहून अनेक पटीनें पुण्यवान् असून जर कालवश झाला, तर तुझ्या पुत्राची काय कथा! यास्तव बा सृंजया, व्यर्थ शोक करूं नको. ७. २. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ रंतिदेवाची कथा, २ निष्काची व्याख्या. ]

( १ ) नारद्—सृंजया, सांकृति रंतिदेवहि मरणाधीन झाला. त्या महा-त्म्याच्या आश्रयाला दोन लक्ष बल्लव होते. ते अमृतोपम मिष्टान्नें तयार करीत व राजद्वारीं आलेले अतिथि, ब्राह्मण व याचक या सर्वांस यथेच्छ भोजन घालीत. अहोरात्र तेथें अन्नसत्र चालू होतें. त्या राजानें न्यायानें वित्त मिळवून तें ब्राह्मणांना अर्पण केलें. त्यानें वेदाध्ययन करून धर्मयुद्धानें शत्रूंना वश करून घेतलें. व्रतधारण केलेल्या त्या राजर्षीनें सत्र आरंभिलें असतां यज्ञीय पशु स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें स्वतः होऊन त्याच्या यज्ञांत उपस्थित होत असत.

हे सृंजया, त्या सत्रयाजी राजाच्या पाकशालेंत व अग्निगृहांत असंख्य पशूंची विधिवत् हिंसा होत असे. त्या मृत पशूंच्या चर्मराशीपासून एक रक्ताची नदीच निर्माण झाली. म्हणून ती 'चर्मण्वती' या नांवानें प्रसिद्ध झाली. तो उदार राजा स्वतःच्या प्रभावानें ब्राह्मणांना सुवर्णाचे 'निष्क' अर्पण करीत असे. 'हे निष्क तुम्ही घ्या, हे तुम्हांला असोत' असें म्हणत तो सहस्रावधि निष्कांचें दान करीत असे. थोडा वेळ विश्रांति घेऊन तो पुनः याचकांना निष्क

देण्यास आरंभ करीत असे. याप्रमाणें प्रतिदिवशीं कोट्यवधि निष्कांचें दान देऊनहि तो 'आज मीं अगदीं अल्प दान केलें' असें म्हणत असे. 'विप्रांच्या हाताचा वियोग होतांच मला निःसंशय चिरकाल दुःख होईल' असें म्हणून तो राजा सारखें द्रव्य देत असे.

( २ ) हे सृंजया, 'निष्क' म्हणजे काय हें मी तुला सांगतों ऐक. सुवर्णांचे सहस्र वृषभ, शंभर धेनु आणि एकशें आठ तोळे सुवर्ण, इतकें मिळून एक 'निष्क' होतो. तो दातृत्ववान् भूपति प्रति पाक्षिकास अग्निहोत्र व याग यांस लागणारें सर्व साहित्य विप्रांना देत असे. कुंभ, स्थाली, शयन, आसन, वाहनें, प्रासाद, गृहें, विविध प्रकारचे उपयुक्त वृक्ष, अन्न व धन इत्यादि सर्व तो ऋषींना अर्पण करीत असे.

धीमान् रंतिदेवाच्या सदनांत सर्व वस्तु सुवर्णाच्या होत्या. त्यानें दान केलेलीं तीं सर्व हिरण्यपात्रें पाहून पुराणवेत्ते लोक विस्मित होत व अशी अतिमानुष संपत्ति कुबेराच्या मंदिरांतहि कधीं दृष्टीं पडत नाहीं. मग मानवांच्या घरीं कोठली असणार ! अशी गाथा गात असत.

त्या सांकृति रंतिदेवाच्या घरीं एखादा अतिथि एक रात्र जरी राहिला, तरी तेवढ्या वेळांत एकवीस हजार गायींचें आलभन होत असे. तथापि तेथें असलेले रत्नजडित कुंडलें धारण करणारे बल्लव मोठ-मोठ्यानें ओरडून सांगत कीं, आज जरा मांसान्न कमी आहे, यास्तव यथेच्छ शाकाहार करा. त्या महात्म्याच्या संग्रहीं जेवढें सुवर्ण होतें, तेवढें सर्व त्यानें यज्ञामध्यें विप्रांना दान देण्यांत संपवून टाकलें. त्या पुण्यवान् राजाच्या यज्ञांत साक्षात् देव प्रकट होऊन हविर्भागाचा स्वीकार करीत. पितरहि योग्यकालीं स्वतः येऊन कव्याचें ग्रहण करीत. ब्राह्मणांच्या सर्व कामना तो राजा पूर्ण करीत असे.

हे सृंजया, अशा श्रेष्ठ योग्यतेचा रंतिदेवहि जर मरण पावला तर तुझ्या यज्ञ-यागशून्य पुत्राला मृत्यु आल्यास त्यांत आश्चर्य कसलें ! त्याच्या नांवानें आक्रोश करणें व्यर्थ आहे. ७. ३. ६७.

---

१ यावरून अन्नार्थी याचकांच्या संख्येची कल्पना होते.

## अध्याय ६८ वा.

[ १ भरतराजाची कथा. ]

( १ ) नारद्—राजा सृंजया, दुष्यंताचा पुत्र भरतराजाहि मृत झाला. त्याच्याच नांवानें हें भरतवर्ष प्रसिद्धीस आलें. तो भरत बालपणीं कण्वाश्रमांत रहात असतां त्यानें दुष्कर कर्म केलें. नखें व दांत हींच ज्यांचीं स्वयंसिद्ध आयुधें होतीं, अशा सिंहांना तो कुमार निर्बल करून ओढून आणीत असे व त्यांना बांधून ठेवीत असे. क्रूर व उग्र अशा व्याघ्रांचेंहि दमन करून त्यांना वश करीत असे. सर्पादि हिंस्र प्राण्यांचेंहि तो नियमन करीत असे. बलाढ्य गजांचे दांत उपटीत असे. त्यानें वृषभांना ओढून आणावें, शंभर सिंहांची आयाळ धरून ओढून न्यावें. इतर वन्य पशूंना धरून आणावें आणि त्याच्या जननीनें ' बाळ, त्या प्राण्यांची हिंसा करूं नये ' असें म्हटलें असतां सोडून द्यावें, अशीं अतिमानुष कर्में करणाऱ्या त्याचें ब्राह्मणांनीं ' सर्वदमन ' असें नांव ठेविलें होतें.

अशा प्रतापवान् भरतानें पुढें यमुनेच्या तीरावर शंभर, सरस्वतीच्या तीरीं तीनशें आणि गंगेच्या तीरीं चारशें अश्वमेध केले. इतरत्रहि एक हजार अश्वमेध व शंभर राजसूय यज्ञ केले. विपुल दक्षिणा देऊन दुसरेहि अनेक प्रकारचे क्रतु केले. तो सहस्रावधि अग्निष्टोम, अतिरात्र, विश्वजित्, वाजपेय, सुसंवृत इत्यादि यागांत ब्राह्मणांस अमित दक्षिणा देऊन तृप्त करीत असे. त्या महायशस्वी शाकुंतलानें कण्वमुनीलाच एक सहस्र महापद्म तोळे जाम्बुनद शुद्ध सुवर्ण दिलें.

त्या महापराक्रमी भरताच्या यज्ञस्तंभाची उंची शंभर ' व्याम '-वांवा असून तो यूप सुवर्णाचा होता. इंद्रासह सर्व देव आणि ब्राह्मण यांनीं एकत्र जमून तो यूप उभारला, रत्नजडित सुवर्णाच्या अलंकारांनीं भूषविलेले अश्व, गज, रथ इतर उपयुक्त पशु, दास, दासी, धन, धान्य, सवत्स गायी, गृहें, शेतें, गांवें यांसह विविध वस्त्रें, भूषणें इत्यादि अर्पण करून त्यानें कोट्यवधि ब्राह्मणांना तृप्त केलें.

तो चक्रवर्ती राजा कधींहि शत्रूंकडून जिंकला गेला नाहीं. उलट त्या अदीनात्म्यानें सर्व शत्रूंना जिंकून आपल्या वश करून ठेवलें. असा पुण्यवान् भरतराजाहि शेवटीं मरण पावला. तेथें यज्ञ-दानशून्य अशा तुझ्या पुत्राचा काय पाड ! यास्तव पुत्रासाठीं व्यर्थ शोक करूं नको. ७. ३. ६८.

## अध्याय ६९ वा.

[ १ पृथुराजाचें वर्णन. २ पृथ्वीचें दोहन. ३ पृथूचें औदार्य. ]

(१) नारद—हे सृंजया, वेनपुत्र पृथु एवढा पृथ्वीपति असून तोहि अखेर निधन पावला, असें श्रुत आहे. राजसूय यज्ञांत थोर महर्षि जमून त्यांनीं या राजाला साम्राज्याचा अभिषेक केला. हा राजा स्वपराक्रमानें पृथ्वीचा उत्कर्ष करून तिचें उत्तम प्रकारें पालन करील, हें जाणून ऋषींनीं त्याचें 'पृथु' असें नांव ठेविलें. सर्वांचें क्लेशापासून रक्षण करील, म्हणून तो 'क्षत्रिय' या संज्ञेस पात्र झाला. या वैन्य पृथूवर सर्व प्रजा अनुरक्त होईल, असें ब्राह्मण म्हणाले. प्रजेच्या अनुरागामुळें त्याला 'राजा' हें अभिधान प्राप्त झालें.

पृथुराजाच्या राज्यांत सर्व भूमि नांगरल्यावांचूनच उत्कृष्ट धान्य देत असे. त्याच्या राज्यांतील सर्व धेनु कामधुक् होत्या. दर्भ सुवर्णमय असूनहि अतिशय मृदु होते. त्यामुळें ते टोंचत नसत. सर्व प्रजाजन त्या दर्भांचीं वस्त्रें विणीत व त्यांवर शयन करीत. वृक्षांचीं फळें स्वादु व मधुर असत. त्यामुळें प्रजाजन तोच आहार करीत. त्या कालांत कोणालाहि निराहार रहावें लागत नसे. सर्व प्राणी निरोगी होते. ते निर्भयपणानें विहार करीत. त्यांना कसलीहि उणीव भासत नसे. प्रजाजन वृक्षावर किंवा गुहांमध्यें आपल्या इच्छेस येईल, तेथें वास्तव्य करीत. राष्ट्र, नगरें इत्यादि विभाग त्या कालीं नव्हते. अशाप्रकारें सर्व प्रजा स्वेच्छेनें अतिशय सुखांत रहात होती.

तो पृथ्वीपति समुद्रांतून जाऊं लागला कीं, जल स्थिर होत असे आणि पर्वतहि त्याला मार्ग देत. त्यामुळें त्याचा ध्वजभंग केव्हांहि होत नसे. एकदा सर्व वनस्पति, शैल, देव, असुर, नर, उरग, सप्तर्षि, पुण्यवान् लोक, गंधर्व, अप्सरा, पितर, इत्यादि सर्व सुखासनावर बसलेल्या त्या भूपालाच्या जवळ आले व त्याला असें म्हणाले—

"हे महाराज, तूं सम्राट् आहेस, क्षत्रिय आहेस, आमचा राजा, गोप्ता व पिता आहेस. यास्तव ज्याच्या योगानें आमचें शाश्वत श्रेय होईल व आम्ही सुखानें राहूं, असे वर आम्हांला दे."

तेव्हां तो पृथुराजा 'तथास्तु' असें म्हणाला आणि आपलें धनुष्य व बाण हातांत धारण करून पृथ्वीला विचारपूर्वक असें बोलला—"हे भूदेवि, तूं

वसूनें युक्त असून कामधेनु आहेस. तस्मात् या सर्वांस अभिकांक्षित असलेलें पय त्यांस अर्पण कर. ( त्यांना अपेक्षित असलेले पदार्थ देऊन त्यांना संतुष्ट कर. ) मी तुला यत्किंचित्हि क्लेश देणार नाहीं. ज्याला जें इष्ट असेल, तें अन्न मी त्याला देईन. तुझें कल्याण असो."

वसुधा—हे वीरा, तूं मजवर शस्त्र उगारूं नको. मला तूं आपली कन्या मानून माझें रक्षण कर. मी तुझ्या इच्छेप्रमाणें सर्वांस इष्ट वस्तु देईन.

( २ ) वसुंधरेचें हें वचन ऐकून पृथु राजा 'ठीक आहे' असें म्हणाला व त्यानें वसुधेच्या दोहनाची सिद्धता केली. नंतर सर्व भूतसमूहानें पृथ्वीचें दोहन केलें. प्रथम वनस्पति पुढें आल्या. तेव्हां ती वत्सला वत्स व दुग्ध-पात्र यांची वाट पहात राहिली. त्यावेळीं पुष्पित सालवृक्ष तिचा वत्स झाला व प्लक्षवृक्ष तिचें दोहन करूं लागला आणि औदुंबररूप पवित्र पात्रामध्यें शुष्कवृक्षांस अंकुर फुटावा हेंच दुग्ध काढण्यांत आलें. नंतर उदयाचल पर्वत वत्स झाला, महागिरि मेरु दोग्धा झाला. शिलामय पात्र दोहनासाठीं घेतलें आणि रत्न व ओषधिरूप दोहन करण्यांत आलें. त्यानंतर आत्मा स्वतःच दोग्धा झाला. त्यानें मनोरूपी पात्रांत पोषक—इष्ट वस्तूंचें दोहन केलें. नंतर दैत्य पुढें झाले. त्यावेळीं द्विमूर्धा दोग्धा व विरोचन वत्स झाला. त्यांनीं आमपात्रांत मायारूपी दूध काढलें. मानवांनीं दोहन करून भूतलावर कृषि व तृण निर्माण केलें. त्यावेळीं स्वायंभुव मनु वत्स व पृथुराजा दोग्धा झाला. धृतराष्ट्रानें तक्षकाला वत्स करून अलाबुपात्रांत पृथ्वीचें दोहन केलें आणि विषरूप दुग्ध निर्माण केलें. सप्तर्षीनीं सोमराजाला वत्स केलें व बृहस्पतीनें वेदमय पात्रांत 'सनातन ब्रह्म' हें दुग्ध काढलें. नंतर कुबेर दोग्धा झाला. वृषध्वज वत्स झाला. गंधर्व व अप्सरा यांनीं पद्मपात्रांत पुष्पगंधरूपाचें दोहन केलें. चित्ररथ वत्स झाला व प्रभु विश्वरूपी दोग्धा झाला. पितरांनीं त्या भूधेनूचें दोहन करून रौप्यपात्रांत स्वधारूपी दोहन केलें. त्यावेळीं वैवस्वत वत्स झाला आणि अंतक यम दोग्धा झाला. याप्रमाणें विविध भूतसंघांनीं पृथ्वीचें दोहन करून स्वतःला इष्ट असलेल्या वस्तु प्राप्त करून घेतल्या. अद्यापिहि तीं भूतें त्या त्या पात्रांत अशा प्रकारचें दोहन नित्य करीत असतात.

( ३ ) राजा, वेनपुत्र पृथूनें विविध याग केले. सर्व भूतांस इष्ट पदार्थांनीं संतुष्ट केलें. पृथ्वीवरील सर्व मृत्तिकेच्या वस्तु सुवर्णाच्या केल्या व त्या भूपा-

लानें अश्वमेध यज्ञांत त्या सर्व ब्राह्मणांना अर्पण केल्या. सहासष्ट हजार सुवर्णाचे गज आणि ही सर्व पृथ्वी सुवर्ण व रत्नें यांनीं अलंकृत करून विप्रांना समर्पण केली.

सृंजया, अशाप्रकारचा पृथुराजाहि अखेर मृत्युमुखीं पडला. तो सम्राट् तुझ्या पुत्राहून अनेक पटीनें श्रेष्ठ होता व तुझा पुत्र तर यज्ञ-दान-शून्य असतांनाच त्याला मरण आलें आहे; त्यांत आश्चर्य कसलें ! यास्तव त्याच्या नांवानें आतां विलाप करणें व्यर्थ आहे. ७. ३. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ परशुरामाचें आख्यान. ]

( १ ) नारद्—राजा सृंजया, याप्रमाणें आतांपर्यंत होऊन गेलेले थोर पुरुष तर मृत झालेच, पण सांप्रत जे विद्यमान आहेत, तेहि त्यांचा काल येतांच मृत्युवश होतील. महातपस्वी परशुराम सर्व वीरांना वंद्य आहे. तो कीर्तिमान् जामदग्न्य युद्धानें कधींहि तृप्त होत नाहीं. पण तोहि एके दिवशीं मरण पावणार आहे.

या भार्गवानें ही समग्र पृथ्वी उपद्रवशून्य करून कृतयुगास योग्य अशा धर्माची स्थापना केली. अपरंपार ऐश्वर्य प्राप्त झालें असतांहि त्याच्या मनांत कसलाहि विकार उत्पन्न झाला नाहीं. कार्तवीर्याच्या पुत्रानें त्याचा पिता व वत्स यांना पीडा दिली असतां, त्या जामदग्न्यानें समरांत शत्रूला अजिंक्य असलेल्या कार्तवीर्याचाहि संहार केला.

जेव्हां कार्तवीर्याशीं युद्ध आरंभिलें, तेव्हां या परशुरामानें एका धनुष्यानें चौसष्ट कोटि क्षत्रियांना गतप्राण केलें. त्यांतील चौदा कोटि क्षत्रिय ब्रह्मद्वेष्टे होते. त्यानें पुनः इतर क्षत्रियांचा निग्रह केला व दंतक्रूरास यमसदनीं पाठविलें. एक हजार वीरांना मुसलानें विद्ध केलें. एक सहस्र योद्ध्यांचा खड्गानें छेद केला. हजार क्षत्रियांचा वृक्षाच्या शाखेला बांधून वध केला व हजार राजकुमारांना जलाशयांत बुडविलें. हजारांचे नाक-कान कापून दांत उपटले. साठ हजारांना कटु धूरी देवविली आणि इतरांना बांधून, मारून त्यांच्या मस्तकांचा छेद केला.

गुणावतीच्या उत्तरेला व खाण्डव्याच्या दक्षिणेला जे पर्वत आहेत, तेथें लक्षावधि हैहयवीर रथ-गज-अश्वांसह युद्धांत हत होऊन पडले. राजा, कार्तवीर्यानें जेव्हां जमदग्नीचा वध केला, तेव्हां आश्रमवासी ऋषींनीं 'हे भार्गवरामा, धांव, धांव' असा मोठ्यानें आक्रोश केला व जे उद्गार काढले, ते त्या रामाला सहन झाले नाहींत. पित्याचा वध झालेला पाहून तो अतिशय क्रुद्ध झाला व त्यानें आपल्या परशूनें दहा हजार क्षत्रियांचा संहार केला.

त्यानंतर त्या महाप्रतापवान् जामदग्न्यानें काश्मीर, दरद, कुंति, क्षुद्रक, मालव, अंग, वंग, कलिंग, विदेह ताम्रलिप्त, रक्षोवाह, वीतिहोत्र, त्रिगर्त, मार्तिकावत, शिबि आणि इतरहि अनेक देशोदेशींचे नृपाल, या सर्वांचा संहार करून त्यांचीं राज्यें उध्वस्त करून टाकिलीं. कोट्यवधि क्षत्रियांचा वध करून इंद्रगोपक किंवा बंधुजीव पुष्पाप्रमाणें तांबड्या लाल रक्ताच्या प्रवाहानें मोठालीं सरोवरें भरून टाकिलीं आणि अठराहि द्वीपें वश करून घेतलीं.

त्यानें असंख्य क्रतु केले व विपुल दक्षिणा दिली. त्याची यज्ञवेदी सुवर्णाची असून बत्तीस हात उंच होती. ती रत्नजडित वेदी शास्त्रविधीनें निर्माण केलेली असून तिच्या सभोंवार असंख्य पताका शोभत होत्या. त्या जामदग्न्यानें ग्राम, अरण्य व पशु यांनीं युक्त असलेली समग्र पृथ्वी कश्यपमुनींना अर्पण केली. प्रथम सुवर्णानें भूषविलेल्या एक लक्ष गजांचें दान दिलें. नंतर पृथ्वीवरील क्रूर दस्यूंचें निर्मूलन करून सदाचरणी जनतेनें संपन्न असलेली पृथ्वी अश्वमेध यज्ञांत कश्यपाला समर्पिली. त्या भार्गवरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली व शंभर क्रतु करून त्यांत ब्राह्मणांचा यथाविधि सत्कार केला.

नंतर परशुरामानें दान केलेल्या सप्तद्वीपयुक्त वसुमतीचा स्वीकार करून मारीच कश्यप त्याला म्हणाला—" भार्गवा, या वसुधेचें तूं मला दान केलेंस. आतां तिच्यावर तुझा अधिकार नाहीं. यास्तव माझ्या आज्ञेनें तूं येथून निघून जा."

कश्यपाचे हे शब्द कानीं पडतांच भार्गवानें एकाच बाणानें समुद्राला मागें सारलें आणि तो या निर्माण केलेल्या नवीन प्रदेशांत समुद्राच्या तीरावरील महेंद्रपर्वतावर राहूं लागला.

राजा सृंजया, अशा प्रकारचा महापराक्रमी भार्गवराम तुझ्या पुत्राहून अनेक गुणांनीं श्रेष्ठ आहे, तथापि तोहि मरणाधीन होणार आहे. तुझ्याहून शतपट गुणवान् असलेले अनेक श्रेष्ठ पुरुष आजपर्यंत मृत झाले आहेत व जे पुण्यवान् पुरुष अद्यापि विद्यमान आहेत तेहि कालवश होणार आहेत. यास्तव पुत्रासाठीं व्यर्थ शोक करूं नको. ७. ३. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[१ व्यास-युधिष्ठिर संवाद. २ सृंजयराजपुत्राचें संजीवन. ३ व्यासांचा उपदेश.]

( १ ) व्यास—राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें सोळा राजांचें हे पुण्यकारक व आयुष्य वाढविणारें आख्यान श्रवण करून सृंजय क्षणभर स्तब्ध बसला. तेव्हां नारद त्याला म्हणाला—" हे भूपाला, मीं सांगितलेलें हें आख्यान तूं लक्षपूर्वक ऐकलेंस ना? तें तुझ्या मनाला पटलें ना? किंवा शूद्र स्त्रीशीं विवाह करणाऱ्या ब्राह्मणाला श्राद्धप्रसंगीं बोलाविलें असतां तें श्राद्ध जसें निष्फल होतें, त्याप्रमाणें माझें बोलणें व्यर्थ झालें ?"

नारदमुनींचा हा प्रश्न ऐकून संजय त्याला हात जोडून म्हणाला—" हे भगवन्, यज्ञ करून विपुल दक्षिणा देणाऱ्या प्राचीन राजर्षींच्या पुण्यकथा श्रवण करून मी धन्य झालों. त्यांच्या ऐश्वर्याचें व औदार्याचें वर्णन ऐकून माझ्या चित्ताचा विकास झाला. अंधकाराचा नाश करणाऱ्या सूर्यप्रकाशानें माझ्या अंतःकरणांतील शोक नष्ट झाला. माझें चित्त शांत झालें आहे. यास्तव मीं आतां काय करावें तें सांग."

नारद्—राजा, तुझें चित्त शोकरहित झालें, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे. मी तुजवर प्रसन्न झालों आहें. तुला इष्ट असलेला वर मागून घे. माझी वाणी कदापि असत्य होत नसते.

सृंजय—भगवन्, आपण मजवर प्रसन्न झालांत यांतच मी संतुष्ट झालों. आपला अनुग्रह झाला असतां इहलोकीं दुर्लभ असें काय आहे ?

( २ ) नारद्—हे राजन्, तुझ्या मृतपुत्रास घोर नरकांतून काढून मी तुला परत देत आहें. कारण एखाद्या प्रोक्षित पशूप्रमाणें शत्रूंनीं त्याचा वध केला आहे.

व्यास—युधिष्ठिरा, याप्रमाणें नारद बोलला असतां सृंजयाचा पुत्र त्याच्या पुढें प्रकट झाला. प्रसन्न झालेल्या देवर्षीनें दिलेला तो कुमार कुबेराच्या पुत्राप्रमाणें कांतिमान् दिसत होता. याप्रमाणें पुत्रानें युक्त झालेल्या त्या राजानें पुण्यप्रद क्रतु केले व यज्ञसमाप्तीनंतर विपुल दक्षिणा दिल्या.

हा राजपुत्र अकृतार्थ होता, शिवाय तो भीरु होता व युद्धाविषयीं उत्सुक नसतांहि त्याचा वध झाला. त्यानें यज्ञ व दान केलें नव्हतें. तो अपत्यवान् नव्हता. याप्रमाणें त्याचा जन्म यत्किंचित्‌हि सफल झाला नव्हता, म्हणून देवर्षीनीं त्याला पुनः जिवंत केलें. पण अभिमन्यूची स्थिति याच्या अगदीं उलट आहे. त्या वीरानें सहस्रावधि योद्धयांस गतप्राण केलें. तो सैन्याच्या संमुख हत झाल्यामुळें त्याच्या जन्माचें सार्थकच झालें. ब्रह्मचर्य, प्रज्ञा, वेदाध्ययन आणि यजन यांच्या योगानें तुझा तनय अक्षय लोकांना प्राप्त झाला आहे. विद्वान् लोक सुकृताच्या योगानें स्वर्ग मिळविण्याची रात्रंदिवस इच्छा करीत असतात. परंतु स्वर्गांत रहाणाऱ्या जीवांची इहलोकीं परत येण्याची केव्हांहि इच्छा नसते. यास्तव रणांत वध पावलेला अर्जुनाचा पुत्र स्वर्गस्थ झाला आहे. त्याला तेथून परत आणणें अशक्य आहे. ध्यानानें आत्मदर्शी झालेले योगिजन, महाक्रतु करणारे याजक आणि यथाविधि तपाचरण करणारे तपस्वी यांना पुण्याचरणाच्या योगानें जी गति प्राप्त होते, त्याच अक्षय गतीला अभिमन्यु गेला आहे.

( १ ) भगवद्भक्त वीर अभिमन्यु मृत झाल्यावर आपल्या अमृतमय किरणांच्या योगानें राजाप्रमाणें विराजत आहे. द्विजांना अभिमत असलेली चंद्राची तनु त्याला प्राप्त झाली आहे. तस्मात् तूं त्याच्यासाठीं शोक करूं नको. अशा वीरासाठीं शोक करणें योग्य नाहीं. हें जाणून तूं शांत हो आणि धैर्यानें शत्रूला जिंक.

बा युधिष्ठिरा, आमच्यासारखे दीर्घकाल जिवंत राहणारे वस्तुतः शोच्य आहेत. कारण आम्हांला अद्यापि पुण्यलोकांतील सुख अनुभवतां येत नाहीं, याविषयीं खेद होणें साहजिक आहे. पण सौभद्रासारखे जे भाग्यवान् स्वर्गलोकीं ऐश्वर्याचा उपभोग घेत आहेत, त्यांच्यासाठीं शोक करणें व्यर्थ आहे. हे निष्पाप पांडवा, वृथा शोक करण्यांत यत्किंचित्‌हि हित नसून उलट पातक आहे. यास्तव प्राज्ञजन शोक करीत नसतात. प्रहर्ष, अभिमान व सुखप्राप्ति

यांची इच्छा करणारे विद्वान् शोक सोडून देतात, उद्यम आरंभितात आणि श्रेयासाठीं यत्न करितात.

वत्सा धर्मराजा, 'शोक, शोक' म्हणून ज्याला म्हणतात, ती वस्तुतः चित्ताची एक वृत्ति आहे. मनच शोकरूप बनत असतें, त्या मनालाच शांत ठेवलें असतां शोक नाहींसा होतो. तस्मात्, ऊठ, शोक करूं नको. मृत्यूची उत्पत्ति, तपश्चर्या, सर्व प्राण्यांचें सारखेंच प्राणोत्क्रमण, थोर विभूतींचीहि कालवशता आणि सृंजयराजाच्या पुत्राचें पुनर्जीवन यांविषयीं सर्व वृत्तान्त तूं ऐकला आहेस. यास्तव शोक करूं नकोस. मी आतां जातों.

असें बोलून भगवान् व्यास तेथेंच अंतर्धान पावले. निरभ्र आकाशाप्रमाणें ज्याची कांति आहे, असा तो महात्मा बुद्धिमानांत श्रेष्ठ आणि वागीश्वर होता. तो सांत्वन करून निघून गेला असतां, महेंद्रतुल्य पराक्रमी अशा प्राचीन नरश्रेष्ठांनीं न्यायानें मिळविलेली यज्ञसंपत्ति श्रवण करून युधिष्ठिराच्या मनांत त्यांच्याविषयीं अतिशय आदर उत्पन्न झाला. त्याचा शोक नाहींसा झाला. परंतु अर्जुन परत आला असतां त्याला काय सांगावें या विचारानें तो पुनः चिंतामग्न होऊन बसला. ७. ३. ७१.

येथें तिसरें अभिमन्युवधपर्व समाप्त झालें.

---

## प्रतिज्ञापर्व ४.



### अध्याय ७२ वा.

[ १ अर्जुन-वासुदेवसंवाद. २ पांडवशिबिरांतील दृश्य. ३ पार्थाचा विलाप. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, प्राण्यांचा क्षय करणारा तो घोर दिवस संपून संध्याकाल झाला असतां सूर्य अस्तास गेला आणि सर्व योद्धे आपापल्या शिबिराकडे वळले. त्यावेळीं आपल्या दिव्य अस्त्रांनीं संशप्तकांच्या प्रचंड समुदायाचा संहार करून कपिध्वज पार्थहि स्वशिबिराकडे परत फिरला. त्याचा विजयी रथ शिबिराकडे चालला असतां धनंजयाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. कंठ दाटून आला व तो सद्गदित होऊन गोविंदाला असें म्हणाला—

"हे केशवा, माझें हृदय एकाएकीं असें भयोद्विग्न का होऊं लागलें ! वाणी

अडखळूं लागली आहे. कांहीं तरी अनिष्ट वार्ता कानीं पडणार आहे, असें वाटत आहे. माझीं गात्रें श्रांत झालीं आहेत. माझा उत्साह नाहींसा होऊन अनिष्ट विचार मनांतून नाहींसे होत नाहींत. हे पहा सर्व दिशांमध्यें भयंकर उत्पात होऊं लागले आहेत. अनेक प्रकारचे अपशकुन होत आहेत. माझ्या पितृतुल्य युधिष्ठिराचें क्षेम असेलना ?"

वासुदेव—तुझा भ्राता अमात्यांसह निःसंशय कुशल आहे. त्याच्याविषयीं तूं यत्किंचित्हि चिंता करूं नको. इतर कांहींतरी अनिष्ट घडलें असेल.

( २ ) संजय—हे राजन्, त्यानंतर त्या दोघां वीरांनीं रणांगणांतच संध्यावंदन केलें व रथारूढ झालेले ते दोघे अमितपराक्रमी वीर युद्धांत घडलेल्या प्रकाराविषयीं चर्चा करीत स्वशिबिरांत येऊन पोंचले. तों तेथें सर्वत्र औदासिन्य पसरलेलें त्यांच्या दृष्टीं पडलें. आपल्या शिबिरांतील ती भीषण स्तब्धता पाहून पार्थाचें हृदय अधिकच अस्वस्थ झालें व तो वासुदेवाला म्हणाला—" हे जनार्दना, आज आपल्या शिबिरांत मंगल वाद्यांचा ध्वनि व दुन्दुभींचा घोष कां बरें ऐकूं येत नाहीं. वीणेचा सुस्वर नाद आणि मंगल गीतांचें गायनहि कानीं पडत नाहीं. सैन्यांतील बन्दिजन रम्य स्तुति-स्तोत्रांचाहि पाठ करीत नाहींत. सर्व सैनिक अधोमुख होऊन चालले आहेत. ते नेहमींप्रमाणें स्वपराक्रमाची चर्चाहि करीत नाहींत. कोणीहि माझें अभिनंदन करण्यास पुढें येत नाहीं. हा सर्व प्रकार माझ्या मनांत भय उत्पन्न करीत आहे. माधवा, माझ्या सर्व भ्रात्यांचें स्वास्थ्य असेल ना ! या सर्व स्वजनांस खिन्न झालेलें पाहून माझ्या मनांत अनेक विकल्प येत आहेत. पांचालराज व विराटराजा या दोघांहि वृद्धांचें क्षेम असेलना ! माझे सर्व योद्धे सुरक्षित असतील ना ! हे अच्युता, नित्याप्रमाणें आज माझा अभिमन्यु भ्रात्यांसह हंसत हंसत पुढें कां बरें येत नाहीं ! मी रणांगणांतून परत आलों असतां तो नित्य सामोरा येऊन माझें स्वागत करीत असतो."

( ३ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें संभाषण करीत त्या उभयतां जिष्णूंनीं स्वशिबिरांत प्रवेश केला. तेथें चारी पांडव अतिशय खिन्न होऊन बसलेले त्यांच्या दृष्टीं पडले. ते सर्व जणुकाय चेतनाशून्यच झालेले दिसले. तेव्हां आपले भ्राते व पुत्र विमनस्क झालेले दिसत असून त्यांच्यामध्यें सौभद्र कोठेंच दिसत नाहीं, हें पाहून अर्जुन त्यांना असें बोलला—

" हे वीरहो, आज तुम्हां सर्वांचा मुखवर्ण असा म्लान कां दिसत आहे ? आणि माझा अभिमन्यु कोठेंच कसा दिसत नाहीं ! तुम्हीं कोणीच माझें स्वागत कसें केलें नाहींत ? आज द्रोणानें चक्रव्यूह रचिला होता, असें मीं ऐकलें. त्या व्यूहाचा भेद करण्यास अभिमन्यूवांचून अन्य कोणीहि समर्थ नाहीं, हेंहि मला ठाऊक आहे. तथापि त्या वत्साला व्यूहभेद करून बाहेर कसें पडावें हें मीं शिकविलें नव्हतें. त्या बाळाला तर तुम्हीं शत्रुसैन्यांत पाठविलेंत नाहीं ना ?

अहो, शत्रूंच्या व्यूहाचा भेद करून त्या बालवीरानें असंख्य योद्धयांचा संहार केला असेल, यांत संशय नाहीं. पण तो परवीरहा कुमार युद्धांत पडला तर नाहींना ! अरे अरे, उपेंद्रतुल्य असलेला माझा सुकुमार वत्स संग्रामांत कसा हत झाला ? तो सौभद्र पर्वताच्या गुहेंत रहाणाऱ्या सिंहाप्रमाणें अतुल पराक्रमी होता. तो लोहिताक्ष मला सर्वदा प्रिय होता. तो मज इंद्रात्मजाचा पुत्र युद्धांत पडला तरी कसा ? तें मला सांगा.

त्या कुमारावर कुंती, द्रौपदी व केशव यांचें अतिशय प्रेम होतें. सुभद्रेच्या त्या प्रिय वत्साचा कोणीं बरें वध केला ! माझा अभिमन्यु विक्रम, अध्ययन व युद्धकौशल्य यांत महात्म्या केशवाच्या तुल्य होता. तो शूर बालक रणांगणांत कसाहो वध पावला ! तो माझा बाळ सुभद्रेचा जीव कीं प्राण होता आणि माझाहि अतिशय आवडता होता. तो आमचा प्रिय पुत्र जर आज माझ्या दृष्टीं पडला नाहीं, तर मी प्राण देईन.

अहो, त्या सुकुमार बालकाचे मृदु कुरळे केंस, बाल हरिणासारखे चंचल व विशाळ नेत्र, मत्त गजासारखा पराक्रम, सिंह शिशूसारखी गति, स्मितवदन, मधुर भाषण व आज्ञाधारक वृत्ति हें सर्व माझ्या दृष्टीपुढें मूर्तिमंत दिसत आहे. त्या कुमाराचा इंद्रियनिग्रह व बालवयांतील अतुल पराक्रम असामान्य होता. तो माझा प्राणांहूनहि प्रिय अभिमन्यु सेवकांवर अनुकंपा करणारा, नीचांना न अनुसरणारा, दान्त व कृतज्ञ होता. तो अस्त्रविशारद वीर कसाहो हत झाला !

वीरांची गणना करते वेळीं तो जरी महारथांत गणला गेला होता, तरी त्याची योग्यता वस्तुतः त्याहूनहि अधिक होती. तो युद्धाकांक्षी अजिंक्य वीरहि पितरांच्या जयाची इच्छा करीत असे. शत्रूंचें भय वाढविणारा तो कुमार

स्वपक्षाच्या हितार्थ सदैव तत्पर असे. युद्धांत त्याचें शौर्य माझ्याहून दीडपटीनें अधिक होतें. अरे अरे, तो प्रद्युम्नाचा प्रिय सखा व केशवाचा आणि माझा आवडता वत्स जर आज मला दिसला नाहीं, तर मी प्राण ठेवणार नाहीं. देवांनाहि दुर्लभ असें त्याचें सौंदर्य[1] अप्रतिम होतें. तें रूप आतां मी कोठें पाहूं ? सनाथामध्यें वरिष्ठ असलेला तो वीर आज अनाथाप्रमाणें रणांगणांत पडला ना ? मऊ शय्येवरच निजण्यास योग्य असा त्याचा सुकुमार देह आज भूमीवर कसाहो शयन करीत असेल !

अहो, पूर्वी शयन करणाऱ्या त्या कुमाराला लावण्यवती स्त्रिया रमवीत असत, त्याच्या भोंवतीं आज अशुभ भालु जमल्या असतील ना ! ज्या राजकुमाराला आजपर्यंत सूत, मागध व बंदिजन आपल्या सुस्वर गायनानें जागे आणीत असत, त्या सुकुमाराला आज हिंस्र श्वापदें आपल्या भीषण ध्वनीनें जागृत करीत असतील ! छत्र-छायेलाच वस्तुतः योग्य असें ज्याचें मुखकमल होतें, तें आज रणांगणांतील धूलीनें कसें बरें आच्छादित झालें !

बा वत्सा, तुझ्या कमलवदनाकडे पाहून माझी केव्हांहि तृप्ति झाली नाहीं. सतत तुझ्या दर्शनाची इच्छा करणाऱ्या मज भाग्यहीनापासून कालानें तुझें बलात्कारानें कसेंरे हरण केलें ! ज्याअर्थी तूं इहलोकींचा त्याग करून गेलास त्याअर्थी जेथें पुण्यवान् लोक मरणोत्तर वास करितात, त्या रम्य संयमनी नगरीला तुझ्या योगानें अतिशय शोभा आली असेल, यांत संशय नाहीं. इंद्र, यम, वरुण व कुबेर यांनीं तुला प्रिय अतिथि मानून तुझा उत्तम प्रकारें सत्कार केला असेल ! ”

राजा धृतराष्ट्रा, ज्याची नौका भग्न झाली आहे, असा वणिक् ज्याप्रमाणें शोक करितो, त्याप्रमाणें अर्जुनानें बराच वेळ नानाप्रकारें विलाप केला. नंतर अतिशय दुःखार्त झालेल्या त्यानें युधिष्ठिराला असा प्रश्न केला.

अर्जुन—हे कुरुनंदना, माझा अभिमन्यु शत्रूंचें कदन करून अनेक वीरांशीं युद्ध करीत असतां त्यांच्या संमुख मरण पावला. तो स्वर्गालाच गेला असेल यांत शंका नाहीं. त्या कुमाराला अनेक बलाढ्य वीरांशीं युद्ध करावें लागलें. त्यावेळीं असहाय असलेल्या त्या माझ्या वत्सानें माझ्या

---

१ येथें स्वरूपवर्णनाचा संक्षेप केला आहे.

साह्याची अपेक्षा केली असेल व निःसंशय माझेंच सारखें चिंतन चालविलें असेल! कर्ण, द्रोण, कृप, इत्यादि वीरांनीं त्याला तीक्ष्ण शरांनीं पीडा दिली असतां त्या माझ्या अल्पवयी कुमारानें 'यावेळीं माझा पिता येथें असता, तर त्यानें माझें रक्षण केलें असतें' असें पुनः पुनः म्हटलें असेल! अरे अरे, अशाप्रकारें माझ्या नांवाचें चिंतन करणाऱ्या माझ्या बाळाला त्या निर्दय शत्रूंनीं क्रूरपणानें भूमीवर पाडविलें असावें, असें मला वाटतें.

अथवा त्या माझ्या शूर पुत्राच्या मुखांतून असें दीन वचन निघालेंहि नसेल! तो कुमार माझा आत्मज आहे. सुभद्रेनें त्याला जन्म दिला आहे आणि माधवाचा तो भागिनेय आहे. तो असे उद्गार कदापि काढणार नाहीं. तथापि मी किती पाषाणहृदयी आहें पहा? तो माझा आजानुबाहु रक्ताक्ष कुमार दृष्टीं न पडल्यामुळें माझें हें हृदय विदीर्ण तरी कसें होत नाहीं!

अहो, त्या सुकुमार बालकावर तीक्ष्ण शर सोडण्यास ते दुष्ट धनुर्धर धजले तरी कसे! तो वीर माझा पुत्र आहे व वासुदेवाचा भागिनेय आहे, याचेंहि त्यांना कसें स्मरण राहिलें नाहीं? जो माझा कुमार नित्य अतिशय उत्साहानें मला सामोरा येऊन माझें अभिनंदन करीत असे, तो आज मी शत्रूचा निःपात करून आलों असतांहि कसा बरें माझ्या समोर येत नाहीं! खरोखर त्याचें सुंदर शरीर रक्तानें माखून तो माझा सुकुमार बालक रणांगणांत धूलीयुक्त धरणीवर निश्चेष्ट पडला असेल! त्याचा तेजस्वी देह आकाशांतून च्युत झालेल्या सूर्याप्रमाणें त्या भूमीला शोभवीत असेल!

आपला अजिंक्य कुमार रणांत हत झाल्याचें ऐकतांच पुत्रवत्सल सुभद्रेची काय स्थिति होईल! आतां आपला अभिमन्युबाळ कदापि दृष्टीं पडणार नाहीं, हें कळतांच ती शोकार्त होऊन मला काय म्हणेल! द्रौपदी दुःखार्त होऊन मला किती दोष देईल! त्यांना मी काय सांगूं! मी त्या विलाप करणाऱ्या अबलांचें सान्त्वन तरी कोणत्या शब्दानें करूं! खरोखर माझें हें हृदय वज्राहूनहि कठिण असलें पाहिजे, म्हणूनच शोकविह्वल होऊन रोदन करणाऱ्या त्याच्या भार्येकडे पाहूनहि तें भग्न होत नाहीं!

त्या दृप्त झालेल्या धार्तराष्ट्रांचा सिंहनाद मीं ऐकला. युयुत्सु त्यांचा उपहास करीत होता, तेंहि श्रीकृष्णानें ऐकलें. युयुत्सु म्हणाला—"हे महारथहो, अर्जुनापुढें तुमचें सामर्थ्य चालेना, म्हणून तुम्हीं त्याला स्वसैन्यापासून दूर

नेलेंत आणि अधर्माचें अवलंबन करून त्या अल्पवयी बालवीराचा वध केलात आणि आपल्या या निष्ठुर कृत्याबद्दल मोठा आनंद मानीत आहां. तथापि आतां पांडवांचें सामर्थ्य तुमच्या दृष्टीं पडेल. हे अधर्मज्ञहो, कृष्णार्जुनांचें अप्रिय करून तुम्ही हृष्ट चित्तानें सिंहनाद करीत आहां. पण याचा परिणाम काय होईल याची तुम्हांला कल्पना नाहीं. तुमच्या या दुष्कृत्याचें फल तुम्हांला लवकरच प्राप्त होईल. तुम्ही तीव्र अधर्माचरण केलें अहांत, त्याचें अशुभ फलहि तुम्हांला तितकेंच तीव्रतेनें भोगावें लागेल."

याप्रमाणें कौरवांची निर्भर्त्सना करून तो महाज्ञानी युयुत्सु क्रोध व शोक यांनीं युक्त होत्साता शस्त्र टाकून तेथून निघाला.

बा कृष्णा, तूं मला हा वृत्तान्त त्याच वेळीं रणांगणांतच कां सांगितला नाहींस ! त्या सर्व क्रूर महारथांस मी तेथेंच दग्ध करून टाकिलें असतें.

संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यावेळीं धनंजय पुत्रशोकानें अतिशय विह्वल झाला होता. त्याचे नेत्र अश्रूंनीं भरले होते. कंठ दाटून आला होता व तो पुत्रवत्सल पिता अभिमन्यूचें चिंतन करीत दुःखसागरांत बुडून गेला होता. त्यावेळीं वासुदेवानें त्याला सांवरून धरलें व त्याला धीर देत म्हटलें—

"बा अर्जुना, असा शोकसंतप्त होऊं नकोस. रणांतून परत न फिरणाऱ्या सर्व शूरांची हीच गति होत असते. विशेषतः युद्धावरच ज्यांचें जीवन आहे, अशा क्षत्रियांना संग्रामावांचून अन्य मार्गच नाहीं. युद्धांतून परत न फिरणारे वीर युद्धाला निघाले असतां धारातीर्थी आपले प्राण वेचीत असतात, असें सर्व शास्त्रज्ञांनीं म्हटलें आहे. युद्धापासून निवृत्त न होणाऱ्या योद्धयांचें मरण समरांतच निश्चित आहे व तेंच त्यांना भूषणावह आहे. अशा प्रकारें मृत झालेला अभिमन्यु पुण्य लोकींच गेला यांत संशय नाहीं. संग्रामांत शत्रूच्या संमुख मरण यावें, अशीच सर्व वीरांची आकांक्षा असते.

हे भरतसत्तमा, तुझा पुत्रहि महाबलाढ्य राजपुत्र व शेंकडों वीर यांचा वध करून महारथांच्या समक्ष मरण पावला व वीराला उचित अशाच मृत्यूला प्राप्त झाला. प्राचीन धर्मकर्त्या महात्म्यांनीं 'क्षत्रियांचा रणांत क्षय व्हावा' असा सनातन धर्मच नियत करून ठेवलेला आहे. यास्तव शोक करूं नकोस. तुला असा शोकाकुल झालेला पाहून हे पहा, तुझे सर्व भ्राते, सुहृद् व नृपाल

दीन होऊन बसले आहेत. त्यांचें तूं सान्त्वन कर. तूं ज्ञाता आहेस. युद्धाच्या आरंभीं मीं तुला गीता ऐकविली आहे. तुझ्यासारख्या आत्मवेत्त्याला असा शोक करणें शोभत नाहीं.''

राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें अद्भुत कर्मे करणाऱ्या कृष्णानें पार्थाचें सान्तवन केलें असतां सद्गदित झालेल्या सर्व आप्तांकडे पाहून अर्जुन म्हणाला--"माझा राजीवलोचन अभिमन्यु बाळ कसा मरण पावला, हें मला सांगा. त्या आजानुबाहु वीराचा कोणीं वध केला, तें मला कळूं द्या. म्हणजे रथाश्वांसह सर्व सैन्य घेऊन मी त्या सर्व शत्रूंचा संहार करीन. माझ्या पुत्राच्या सर्व वैऱ्यांचा त्यांच्या आप्तांसह मी नाश करीन.

अहो, तुम्ही सर्व शस्त्रसंपन्न वीर सन्निध असतां सौभद्राचा वध कसा होऊं दिलात ! साक्षात् इंद्रहि ज्याचा पराजय करण्यास समर्थ होणार नाहीं, तो वीर कौरवांच्या हातून हत व्हावा ना ! तुम्ही सर्व पांडव आणि पांचाल माझ्या बाळाचें रक्षण करण्यास असमर्थ अहां, हें जर मला पूर्वींच कळलें असतें, तर मीच त्याचा रक्षक झालों असतों. तुम्ही सर्व रथस्थ वीर शरवर्षाव करीत असतां तुम्हांला तुच्छ लेखून शत्रूंनीं अभिमन्यूचे प्राण कसे हो हरण केले ! ज्याअर्थीं शत्रूंनीं तुमच्या समक्ष अभिमन्यूचा वध केला त्याअर्थीं तुमचीं सर्व कवचें व आयुधें व्यर्थ आहेत. तुमच्या अंगीं पराक्रम नाहीं व पौरुषहि नाहीं. तुमची वाचा केवळ सभेंत पांडित्य करण्याच्याच उपयोगी आहे. तसें जर नसतें तर तुम्ही माझ्या पुत्राचें रक्षण करण्यास, असमर्थ झालां नसतां ! अहो, तुमच्यासारख्या दुर्बल, भीरु व अनिश्चित वृत्तीच्या आप्तांवर विश्वास टाकून मी निघून गेलों, हा माझाच अविचार झाला. त्याबद्दल मी स्वतःलाच दोष दिला पाहिजे. तुम्हांला बोलण्यांत काय अर्थ !''

इतकें बोलून तो धनुर्धर पार्थ स्तब्ध बसला. त्या वेळीं शोकसंतप्त झालेल्या त्याची चर्या अतिशय उग्र दिसत होती. त्याच्या मुखाकडे पहाण्यासहि कोणी समर्थ नव्हतें. तो बीभत्सु अंतकाप्रमाणें क्रुद्ध होऊन वारंवार उष्ण निश्वास सोडीत होता. पुत्रशोकानें व्याकुळ झालेल्या त्या धनंजयाचें मुख अश्रूंनीं भिजून गेलें होतें. त्यावेळीं त्याचा ज्येष्ठ भ्राता युधिष्ठिर व सखा वासुदेव या दोघांवांचून अन्य कोणीहि त्याच्या मुखाकडे पहाण्यासहि धजत नव्हतें, मग भाषण करणें दूरच राहिलें ! युधिष्ठिर व वासुदेव हे उभयतः अर्जुनाच्या हितांत

तत्पर असून सर्व अवस्थांमध्यें त्याचें मनोगत जाणून त्याप्रमाणें वागत असत. शिवाय अर्जुनाला ते प्रिय असून तो त्यांचा बहुमान करीत असे. त्यामुळें ते दोघेच काय ते त्याच्याशीं बोलूं शकले. त्यानंतर युधिष्ठिरानें दुःखातिरेकानें अतिशय क्रुद्ध झालेल्या पार्थाला अभिमन्युवधाचा वृत्तान्त सांगण्यास आरंभ केला. ७. ४. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ अभिमन्युवध कथन. २ अर्जुनाची प्रतिज्ञा. ]

( १ ) युधिष्ठिर—हे महाबाहो, तूं संशप्तकांच्या सैन्याकडे निघून गेल्यावर आचार्यांनें मला धरण्याचा अतिशय प्रयत्न केला. द्रोणाचार्यांनें व्यूह रचून आमचें सर्व बाजूंनीं निवारण करण्याचा यत्न चालविला. तथापि आम्हींहि आपल्या सैन्याचा प्रतिव्यूह रचून त्यांना प्रतिकार केला. याप्रमाणें आमच्या रथ्यांनीं शत्रूंचें निवारण केल्यामुळें मी सुरक्षित राहिलों. परंतु अल्पावधींतच तीक्ष्ण शरांची वृष्टि करीत तो आमच्या समीप येऊन ठेपला. द्रोण आम्हांला पीडा देत असतां आम्हांला त्याच्या सैन्याकडे बघण्याचेंहि धैर्य होईना. मग आम्ही त्यांचा व्यूहभेद कोठला करणार !

याप्रमाणें आम्ही सर्व संकटांत सांपडलों असतां मीं अप्रतिम पराक्रम करणाऱ्या सुभद्रात्मजाला म्हटलें—'वत्सा, आतां तूं या व्यूहाचा भेद कर.'

बा धनंजया, त्या कुमाराला हा भार असह्य होता, तथापि एखाद्या सदश्वाप्रमाणें त्या वीर्यवान् धनुर्धरानें आमची आज्ञा प्रमाण मानून तो भार आपल्या अंगावर घेतला. त्या वीराला तूं अस्त्रोपदेश केला होतास. तो स्वतः पराक्रमी होता. सागरांत प्रवेश करणाऱ्या सुपर्णाप्रमाणें त्यानें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. तो वत्स ज्या मार्गानें आंत शिरला, त्याच मार्गानें त्याच्या मागोमाग आम्ही निघालों.

इतक्यांत सैंधवराज जयद्रथ पुढें झाला व त्या क्षुद्र मनाच्या पुरुषानें रुद्राच्या वरप्रसादामुळें आम्हां सर्वांचें निवारण केलें. आम्हांला व्यूहाच्या मुखाशींच अडवून धरलें. त्यामुळें आम्ही आंत जाऊं शकलों नाहीं. इकडे व्यूहांत प्रवेश केलेल्या एकट्या सौभद्राला द्रोण, कृप, कर्ण, द्रौणि, बृहद्बल व कृतवर्मा या सहा महारथांनीं वेढून त्याच्यावर चाल केली. याप्रमाणें तो

एकटा बालक अनेक महारथांच्या हातीं सांपडला असतांहि तो शूर भ्रांत झाला नाहीं. त्यानें त्यांच्या हातांतून सुटण्याची पराकाष्ठा केली.

त्या सर्व महारथांनीं एकाच वेळीं एकट्या कुमारावर चाल करून त्याला विरथ केलें आणि त्या विरथ झालेल्या वीराला मोठ्या त्वरेनें संकटांत गांठून दौःशासनीनें त्याचा वध केला. बा अर्जुना, एकट्या अभिमन्यूनें आठ हजार रथ, नऊशें गज, दोन हजार राजपुत्र आणि असंख्य वीर यांना गतप्राण केलें. बृहद्बलाला यमालयीं पाठविलें. अशाप्रकारें अद्भुत पराक्रम करणारा तो परम-धर्मात्मा कुमार आम्हांला शोकसागरांत लोटून स्वतः स्वर्गलोकीं निघून गेला.

धर्मराजाचें हें भाषण ऐकून अर्जुनानें "हा पुत्रा" असें बोलून दीर्घ निश्वास सोडला व शोकविह्वल झालेला तो निश्चेष्ट होऊन भूमीवर पडला. पार्थ मूर्च्छित होऊन पडतांच तेथें असलेले सर्व पुरुष त्याच्या भोंवतीं जमले. त्या सर्वांचीं मुखकमलें खिन्न दिसत होतीं. ते दीन वदनानें परस्परांकडे पाहूं लागले. किंचित् कालानें पार्थ सावध झाला. तो इंद्रात्मज देहभानावर येतांच क्रोधसंतप्त झाला. अंगांत ज्वर भरल्याप्रमाणें तो कांपूं लागला. वरचेवर निःश्वास सोडूं लागला. त्याचे नेत्र व्याकुल दिसूं लागले. तो हात चोळीत उन्मत्ताप्रमाणें पहात असें म्हणाला—

( २ ) अर्जुन—हे बांधवहो, मी तुम्हांला सत्य प्रतिज्ञेनें सांगत आहें कीं, स्ववधाच्या भीतीनें जयद्रथ जर धार्तराष्ट्रांना सोडून जाणार नाहीं तर मी उद्यां त्याला मृत्यूच्या स्वाधीन करीन. धार्तराष्ट्रांचें प्रिय करण्याच्या इच्छेनें तो माझा स्नेहसंबंध विसरला व माझ्या बाळाचा जीव घेण्यास प्रवृत्त झाला! हे धर्मराजा, तो दुष्ट सैंधव तुला, श्रीहरीला किंवा आम्हांला जर शरण न येईल तर उद्यां तो माझ्याहातून वध पावेल.

हे महाराज, रणांगणांत त्या जयद्रथाचें रक्षण करण्यासाठीं माझ्याशीं युद्ध करण्यास जे कोणी पुढें सरसावतील, मग ते द्रोणाचार्य असोत कीं कृपाचार्य असोत, मी त्यांना शरांनीं आच्छादून टाकीन. हे पुरुषश्रेष्ठहो, माझ्या हातून जर याप्रमाणें घडलें नाहीं, तर शूरांना संमत असलेल्या पुण्यलोकांना मी प्राप्त होणार नाहीं. मीं जर जयद्रथाचा वध केला नाहीं, तर मातृपितृघातकी,

१ येथील पातकांच्या यादीचा संक्षेप केला आहे. हें वर्णन पूर्वी येऊन गेलें आहे.

गुरुदाररत, निंदक, परद्रव्यापहारक, ब्रह्म, इत्यादि घोर पातकें आचरणारांस जे लोक प्राप्त होतात, ते मला मिळोत. उद्यां माझ्या हातून जयद्रथाचा वध न झाला, तर अधार्मिक व पातकी लोकांच्या गती मला प्राप्त होवोत.

मी दुसरीहि एक प्रतिज्ञा करितों ती ऐका. तो पापी हत होण्यापूर्वी जर सूर्यास्त झाला, तर मी तेथेंच अग्नि प्रदीप्त करून त्यांत प्रवेश करीन. देव, दानव, मानव, पक्षी, पितर, ब्रह्मर्षि, देवर्षि, हें चराचर जगत् व इतरहि सर्व शक्ति जरी एकवटून आल्या, तरी त्यांतील कोणीहि माझ्या शत्रूचें संरक्षण करण्यास समर्थ होणार नाहीं. त्यानें रसातलांत प्रवेश केला, स्वर्गाचा आश्रय केला, किंवा दानवांच्या नगरींत वास केला, तरी मी उद्यां प्रभातीं माझ्या अभिमन्यूच्या वैऱ्याचें मस्तक सहस्रावधि बाणांनीं तोडून टाकीन.

अर्जुनानें अशी प्रतिज्ञा करून आपलें गांडीव धनुष्य डावीकडून उजवीकडे फिरविलें, तेव्हां त्या धनुष्याचा शब्द पार्थाच्या शब्दाचें अतिक्रमण करून अंतरिक्षांत जाऊन भिडला. धनंजयाची ही प्रतिज्ञा ऐकतांच जनार्दनानेंहि आपला पांचजन्य वाजविला आणि क्रुद्ध झालेल्या फाल्गुनानें देवदत्त वाजविला. अच्युताच्या पांचजन्याच्या ध्वनीनें आकाश-पाताळ व सर्व जगत् प्रलयकालाप्रमाणें कंपित झालें. पांडवसैन्यांत विविध रणवाद्यांचा घोष झाला व महात्म्या अर्जुनाची प्रतिज्ञा ऐकून चारी पांडुपुत्रांनीं सिंहनाद केले. ७. ४. ७३.

---

## अध्याय ७४ वा.

[ १ जयद्रथाची भयार्त स्थिति. २ दुर्योधनाचें आश्वासन. ३ द्रोणाचा उपदेश. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, जयाची आकांक्षा करणाऱ्या पांडवांचा तो महाशब्द ऐकून कौरवांच्या दूतांनीं अर्जुनाची प्रतिज्ञा जयद्रथाला निवेदन केली. तो वृत्तान्त कानीं पडतांच सिंधुराज शोकसागरांत बुडून गेला. तो भयभीत झाला. उद्विग्न होऊन राजांच्या सभेंत गेला व त्यानें दुःखपूर्ण अंतःकरणानें त्या नृपतींना आपलें मनोगत कथन केलें. अभिमन्यूच्या पित्याला भ्यालेला तो जयद्रथ लज्जित होऊन असें वचन बोलला—" अहो, पांडूच्या राणीला इंद्रापासून झालेला तो दुर्बुद्धि पार्थ मला एकट्यालाच यमा-

लयीं पाठविण्याची प्रतिज्ञा करून बसला आहे. पण मला माझ्या जीविताची आशा आहे. मी कांहीं येथें रहात नाहीं. मी आपल्या घरीं निघून जातों. तुमचें कुशल असो.

अथवा, त्या वीरापासून तुम्ही माझें रक्षण करा. अर्जुनानें माझा वध करण्याची प्रतिज्ञा केली आहे. यास्तव तुम्ही मला अभय द्या. द्रोण, दुर्योधन, कृप, कर्ण, बाल्हिक, दुःशासन इत्यादि रथी, महारथी मला अंतकाच्या दाढेंतून काढण्यास समर्थ आहेत. मग एकट्या अर्जुनाचा काय पाड! पार्थ माझा प्राण घेऊं लागला असतां तुम्ही सर्व पृथ्वीचे अधिपति माझें रक्षण करणार नाहीं काय! अहो, पांडवांचा हर्ष ऐकून मला अतिशय भय वाटत आहे. मरणोन्मुख झालेल्या माणसाप्रमाणें माझीं गात्रें कंप पावत आहेत.

वस्तुतः अभिमन्यूच्या वधामुळें पांडवांचा हा शोकाचा काल आहे. तथापि अर्जुनानें माझ्या वधाची प्रतिज्ञा करतांच ते हृष्ट होऊन गर्जना करीत आहेत. हे अस्त्रज्ञहो, धनंजयाची प्रतिज्ञा अन्यथा करण्यास देव, दानव, गंधर्व इत्यादि कोणीहि समर्थ नाहीं, मग तुम्हां नराधिपांची काय कथा! यास्तव मला स्वगृहीं जाण्याची अनुज्ञा द्या. मी आतां पांडवांच्या दृष्टीं पडणार नाहीं, अशा ठिकाणीं जाऊन लपून बसतों. देव तुमचें कल्याण करो."

(२) जयद्रथ भयार्त होऊन असें बोलला असतां स्वकार्याविषयीं दक्ष असलेला दुर्योधन त्याला म्हणाला—"हे नरव्याघ्रा, तूं भिऊं नको. आम्हां क्षत्रियवीरांच्या मध्यें स्थित असलेल्या तुझ्याशीं युद्ध करण्यास कोण समर्थ आहे! मी स्वतः, कर्णादि अनेक वीर आणि अनेक देशांतील नृपति आपापल्या सैन्यासह तुझें रक्षण करतील. तूं आपल्या मनांतील चिंता दूर कर. शिवाय तूं स्वतःहि शूर रथिश्रेष्ठ आहेस. असें असतां पांडवांना काय भितोस! माझ्या अकरा अक्षौहिणींतील अवशिष्ट राहिलेलें सर्व सैन्य युद्धाला तत्पर आहे. तें तुझें रक्षण करील. यास्तव हे सैंधवा, तूं यत्किंचित्‌हि भिऊं नको."

राजा, तुझ्या पुत्रानें याप्रमाणें जयद्रथास आश्वासन दिलें, तरी त्याचें समाधान न होतां तो दुर्योधनाला बरोबर घेऊन त्या रात्रीं द्रोणाचार्यांकडे गेला व आचार्यांच्या चरणांना वंदन केल्यावर त्यांच्या समीप जाऊन नम्रपणानें असें म्हणाला—"हे भगवन्, लक्ष्यभेद, दूरचें शरसंधान, हस्तलाघव व दृढवेधन यांत अर्जुनाहून श्रेष्ठ कोण आहे? अर्जुनाच्या आणि माझ्या विद्येंत काय भेद

आहे, तो कळावा, अशी माझी इच्छा आहे. यास्तव आम्हां दोघांत कोणाचें ज्ञान अधिक आहे, हें मला तत्त्वतः सांगा.''

( ३ ) द्रोण—हे तात, तुम्ही दोघांनींहि आचार्यांपासून हें शिक्षण सारखेंच संपादन केलेंत. तथापि पार्थाचा अभ्यास विशेष आहे. त्यामुळें त्याला तुझ्याहून अनुभव अधिक आहे. शिवाय आतां तर पुत्रशोकानें त्याला त्वेष आलेला आहे. यास्तव तत्त्वतः तो तुजहून अधिक आहे. तथापि तूं भिऊं नकोस. मी तुझें रक्षण करीन. युद्धांत पार्थापासून तुला पीडा होणार नाहीं. माझ्या बाहूंचा ज्यानें आश्रय केला आहे, त्याचें अप्रिय करण्यास साक्षात् देवहि समर्थ नाहींत. मी अशाप्रकारें व्यूह रचीन कीं, पार्थाला त्याचा भेदच करतां येणार नाहीं. यास्तव तूं युद्ध कर. भिऊं नको.

हे महारथा, युद्ध हाच क्षत्रियांचा धर्म आहे. त्या स्वधर्माचें पालन कर. आपल्या पितृ-पितामहांच्या मार्गाचें अनुवर्तन कर. युद्धाला भिऊन लपून बसणें हा क्षत्रधर्म नव्हे. तूं स्वतः यथाविधि वेदाध्ययन केलें आहेस. विधिवत् अग्न्याधान व यज्ञयाग केले आहेस. यास्तव तुला मृत्यूचें भय वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. तुला रणांगणांत शत्रूच्या संमुख मरण आल्यास तें तुझें महद्भाग्यच समजलें पाहिजे. तुला भाग्यहीन मानवास दुर्लभ असलेल्या अनुपम दिव्य लोकांची तुला स्वपराक्रमानें प्राप्ति होईल.

हे सर्व कौरव, पांडव, वृष्णि, मी, माझा पुत्र, आणि इतरहि सर्व मानव अशाश्वत आहों. कोणीहि अमर नाहीं. केव्हां तरी आपण सर्व आपापल्या कर्मांसह परलोकीं जाणारच आहों. तथापि तपाचरणानें तपस्व्यांना मिळणारे लोक क्षत्रधर्मानें वागणाऱ्या क्षत्रियांना प्राप्त होतात. यास्तव तूं युद्धपराङ्मुख होऊं नको.

याप्रमाणें भारद्वाजानें आश्वासन दिलें असतां, सैंधवाला धीर आला. त्याचें भय दूर पळालें व त्यानें पार्थाशीं युद्ध करण्याचा मनांत निश्चय केला. तेव्हां तुझ्या सैन्याला संतोष होऊन त्यांनीं रणवाद्यें व सिंहनाद यांचा प्रचंड घोष केला. ७. ४. ७४.

---

## अध्याय ७५ वा.

[ १ श्रीकृष्णाचें अर्जुनाला वृत्तान्तकथन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, इकडे अर्जुनानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली असतां वासुदेव त्याला असें म्हणाला—'धनंजया, मी सैंधवाचा वध करीन' अशी जी तूं प्रतिज्ञा केलीस, तें भ्रात्यांचा व माझा विचार न घेतां एक साहसच केलें आहेस, असें मला वाटतें. माझें मत न घेतां तूं हा भार आपल्या शिरावर घेतला आहेस खरा, तथापि सर्व लोकांच्या उपहासाला पात्र न होतां, तो उतरला पाहिजे.

कौरवांच्या शिबिरांत मीं दूत पाठविले होते, ते आतांच परत येऊन मला सांगत होते कीं, जयद्रथवधाची प्रतिज्ञा ऐकून पांडवसैन्यांत जो वाद्यांचा प्रचंड घोष झाला, तो ऐकून जयद्रथ भयभीत झाला. हा सिंहनाद निष्कारण झालेला नाहीं, हें जाणून कौरव सैन्याच्या व्यवस्थेला लागले. त्यामुळें रथाश्वांचा ध्वनि ऐकूं येत आहे. अभिमन्यूच्या वधानें क्रुद्ध झालेला अर्जुन रात्रींच चाल करून येत आहे, असें समजून ते युद्धाची सज्जता ठेवीत आहेत.

हे पांडवा, तुझी जयद्रथवधाची प्रतिज्ञा कौरवांना कळली आहे आणि तूं सत्यप्रतिज्ञ आहेस, हेंहि ते जाणून आहेत. त्यामुळें जयद्रथ व कौरव क्षुद्र-मृगांप्रमाणें त्रस्त झाले. नंतर तो सैंधव स्वशिबिरांत गेला व बराच विचार करून तो राजसभेंत परत आला. तेथें त्यानें स्वसंरक्षणाविषयीं दुर्योधनाची प्रार्थना केली.

जयद्रथाचें तें निर्वाणीचें भाषण ऐकून दुर्योधन अधोमुख होऊन बसला. पार्थाची ती प्रतिज्ञा ऐकतांच तो विचारमग्न झाला. तें पाहून सैंधवानें आत्म-हिताचा असा उपाय सुचविला. तो हलकेच म्हणाला—'हे कुरुश्रेष्ठा, तुझ्या सैन्यामध्यें मला असा एकहि धनुर्धर दिसत नाहीं कीं, जो अर्जुनाच्या अस्त्रा-वर प्रति अस्त्र सोडून त्याच्याशीं युद्ध करील. अहो, वासुदेव ज्याचा साह्यकर्ता आहे, तो धनंजय आपल्या धनुष्याचा टणत्कार करूं लागला असतां साक्षात् इंद्रहि त्याच्यापुढें उभा रहाण्यास समर्थ होणार नाहीं.

१ मागल्या अध्यायांत हें भाषांतर शब्दशः दिलें आहे. यास्तव येथें त्याची पुनरावृत्ति केली नाहीं.

पूर्वी पादचारी अर्जुनानें अमित शक्तिमान् महेश्वराशीं युद्ध केल्याचें आम्हीं ऐकलें आहे. देवराजाच्या आज्ञेनें त्या इंद्रात्मजानें केवळ एका रथानें हिरण्यपुरवासी दानवांचा संहार केला. वासुदेवासह असलेला तो पार्थ त्रैलोक्याचाहि नाश करील. यास्तव तूं मला स्वगृहीं निघून जाण्याची अनुज्ञा दे, किंवा पुत्रासह द्रोणाचार्यांनें माझें रक्षण करण्यास तयार व्हावें.'

अर्जुना, इतकें बोलूनच तो जयद्रथ थांबला नाहीं. त्यानें स्वतः आचार्यांची गांठ घेऊन त्याची प्रार्थना केली. तेव्हां काय करावयाचें याची योजना निश्चित करून कौरवांची सेना सज्जहि झाली आहे. कर्ण, भूरिश्रवा, अश्वत्थामा, वृषसेन, कृपाचार्य व मद्रपति हे अग्रभागीं रहातील. द्रोणाचार्य शकटव्यूह व अर्धपद्मव्यूह रचणार असून पद्मकर्णिकेच्या मध्याशीं सूचिमुखाच्या स्थानीं सिंधुपति जयद्रथ सुरक्षित रहाणार आहे. धनुर्विद्या, अस्त्रविद्या, पराक्रम व शरीरसामर्थ्य यांनीं युक्त असलेले हे सहा वीर कोणालाहि जिंकले जाणार नाहींत. त्यांचा पराभव केल्यावांचून जयद्रथ हातीं लागणें शक्य नाहीं. या सहा जणांचें सामर्थ्य अप्रतिम आहे. ते एकत्र होऊन युद्ध करीत असतां त्यांना जिंकणें अशक्य आहे. यास्तव आपलें कार्य साधण्यासाठीं कोणती युक्ति योजावी याविषयीं आपल्या हितचिंतक मंत्रकुशल सचिवांबरोबर मला विचार केला पाहिजे. ७. ४. ७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ पार्थानें केलेलें स्वपराक्रमाचें कथन. ]

( १ ) अर्जुन—हे मधुसूदना, कौरवांचे हे सहा वीर जरी अतिशय बलाढ्य असले, तरी त्या सर्वांचें बल एकत्र केलें असतां तें माझ्या निम्म्यानेंहि भरणार नाहीं, असें मला वाटतें. जयद्रथाच्या वधेच्छेनें मीं एकदां धनुष्य हातीं घेतलें कीं, त्या सर्वांचीं अस्त्रें छिन्न भिन्न झालेलीं तूं पहाशील. द्रोणाचार्य व त्याचे अनुचर कितीहि वल्गना करीत असले तरी त्यांच्या समक्ष मी जयद्रथाचें मस्तक भूतलावर पाडवीन.

हे केशवा, सर्व दिक्पालांसह इंद्र, पितर, गंधर्व, सागरादिक, सर्व देवता, भूतलावरील सर्व स्थावर-जंगम पदार्थ व इतर भूतें इत्यादि समग्र त्रिभुवन जरी सैंधवाच्या रक्षणार्थ धांवून आलें, तरी तो जयद्रथ उद्यां माझ्या बाणांनीं

हत होऊन पडलेला तूं पहाशील. हे कृष्णा, मी सत्याची शपथ घेऊन सांगतों कीं, त्या दुर्मतीचें रक्षण करणाऱ्या द्रोणावर मी प्रथम चाल करीन. हें युद्ध-रूपी द्यूत दुर्योधनानें द्रोणावर सोंपविलें आहे आणि आचार्याला निश्चित जय मिळणार, असें तो समजत आहे. यास्तव मी आरंभीं त्याच्याच सैन्याचा भेद करीन.

उद्यां मी सैंधवावर चालून जात असतां वज्रानें विदीर्ण होऊन पडलेल्या पर्वतशिखराप्रमाणें अनेक श्रेष्ठ वीर माझ्या तीक्ष्ण बाणांनीं हत झालेले तुला दिसतील. यम, कुबेर, वरुण व इंद्र यांच्यापासून मला प्राप्त झालेलीं घोर अस्त्रें उद्यां समरांगणांत लोकांच्या दृष्टीं पडतील. सैंधवाच्या रक्षणार्थ येणाऱ्या सर्वांचीं अस्त्रें माझ्या ब्रह्मास्त्रानें नाश पावलेलीं तुला दिसतील. या सर्व नृपा-लांचीं मस्तकें उद्यां भूतलावर लोळतील.

हा जयद्रथ आमचा आप्त असला तरी अत्यंत नीच आहे, त्यानें आमचे पुष्कळ अपराध केले आहेत. तो पापी देशांत जन्म पावलेला सिंधुराज उद्यां माझ्या हातून मरण पावेल व आपल्या आप्तेष्टांस शोकांत टाकील. हे माधवा, सर्व क्षीरान्न भक्षण करणारा व रणांगणांत अधर्मानें वागणारा तो पापाचरणी सैंधव आपल्या सर्व मांडलिक राजांसह मृत्युमुखीं पडलेला तूं पहाशील. उद्यां मी रणांगणांत माझें असें सामर्थ्य दाखवीन कीं, त्यामुळें दुर्योधन या लोकीं माझ्यासारखा अन्य धनुर्धर नाहीं, असें निश्चयानें समजूं लागेल.

हे हृषीकेशा, तुझ्या प्रसादानें मला युद्धांत कसली उणीव आहे! हें दिव्य गांडीव धनुष्य, तुझ्यासारखा सारथि व मी योद्धा असल्यावर अजिंक्य असें काय आहे! माझें सामर्थ्य कोणालाहि सहन होणें शक्य नाहीं, हें जाणत असून तूं मला व्यर्थ दोष कां देत आहेस! हे जनार्दना, चंद्रावरील लांछन, किंवा समुद्राचें जल हीं जशीं त्रिकालाबाधित आहेत, तशीच माझी ही प्रतिज्ञा सत्य आहे, हें निश्चित जाण.

हे कृष्णा, तूं माझ्या अस्त्रांना दुर्बल मानूं नको. माझ्या गांडीवाला दोष लावूं नको, किंवा धनंजय व त्याचें बल यांची निंदा करूं नको. मी कदापि पराभूत होणार नाहीं, पण शत्रूचा पराजय करीन. माझ्या या वचनावर विश्वास ठेव आणि जयद्रथ संग्रामांत हत झालाच, असें समज. हे अच्युता,

ब्राह्मणांच्या अंगीं सत्य, साधूंच्या अंगीं विनय, यज्ञाच्या ठिकाणीं श्री आणि नारायणाच्या बाजूला जय निश्चयानें वास करितो.

संजय—राजा, याप्रमाणें स्वसामर्थ्याचें कथन केल्यावर अर्जुन पुनः गर्जना करीत म्हणाला—"हे कृष्णा, हें महत्कार्य उपस्थित झालें आहे, यास्तव प्रभातींच माझा रथ सज्ज ठेव." ७. ४. ७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ दुश्चिन्हें. २ सुभद्रेचें सान्त्वन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, वासुदेव-धनंजयांनीं ती रात्र सर्पाप्रमाणें दीर्घ निश्वास सोडीत घालविली. दुःख-शोकार्त झालेल्या त्या दोघांनाहि रात्रभर निद्रा आली नाहीं. याप्रमाणें त्या नर-नारायणास संतप्त झालेले पाहून इंद्रादि देव अतिशय व्यथित होऊन 'आतां याचा परिणाम काय होणार! असा विचार करूं लागले. अशुभ सूचक रूक्ष वारे वाहूं लागले, उल्कापात झाले, विद्युल्लता चमकूं लागल्या, निर्जल मेघांची गर्जना होऊं लागली, सूर्याच्या भोंवतीं खळें पडून कबंधें नाचूं लागलीं, पर्वत व अरण्यें यांसह पृथ्वी कंप पावूं लागली, सप्तसागर क्षुब्ध झाले, नद्यांचे प्रवाह उलट वाहूं लागले. गजाश्वादि देहधर्म करीत रोदन करूं लागले व यमराष्ट्राची वृद्धि सूचित करूं लागले. याप्रमाणें अंगावर रोमांच आणणारे उत्पात पाहून व पार्थाची ती घोर प्रतिज्ञा ऐकून तुझे सैनिक अत्यंत व्यथित झाले.

( २ ) धृतराष्ट्रा, इकडे शोकविह्वल झालेला पार्थ कृष्णाला म्हणाला—"हे माधवा, तुझी भगिनी सुभद्रा व तिची स्नुषा या दोघींचेंहि सांत्वन करण्यास तूंच एक समर्थ आहेस. हे प्रभो, त्यांना युक्तीनें चार सामोपचाराच्या गोष्टी सांगून त्यांचा शोक दूर कर."

अर्जुनाचें तें वचन ऐकून वासुदेव खिन्न मनानें पार्थाच्या अंतर्गृहांत गेला आणि शोकार्त झालेल्या आपल्या भगिनीचें सांत्वन करूं लागला.

वासुदेव—हे वार्ष्णेयि, कुमारासाठीं असा शोक करणें योग्य नव्हे. तूं आपल्या स्नुषेसह दुःखानें विह्वल झाली आहेस, हें खरें. तथापि उत्पन्न झालेल्या सर्व प्राण्यांना कालानें हीच गति नियत करून ठेविली आहे. हे भीरु, क्षत्रियांना—विशेषतः शूरांच्या कुलांत जन्म पावलेल्या वीरांना—तुझ्या पुत्रासार-

खेंच मरण येत असतें, यास्तव शोक करूं नको. तुझा महारथ पुत्र पितृतुल्य पराक्रम करून वीराभिलषित गतीला प्राप्त झाला आहे. क्षत्रियाला उचित असेंच कर्म करून त्या धीरानें देह ठेवला. त्या शूरानें अनेक शत्रूंना जिंकलें. कित्येकांना मृत्यूच्या स्वाधीन केलें व तो अक्षय पुण्यलोकांना प्राप्त झाला.

हे भद्रे, साधु-संत तपानें, ब्रह्मचर्यानें, अध्ययनानें व प्रज्ञेनें ज्या गतीला प्राप्त होतात, ती परम गति तुझ्या पुत्राला लाभली आहे. तूं वीरमाता आहेस, वीरपत्नी आहेस, वीरकन्या आहेस आणि वीरभगिनी आहेस, यास्तव शोक करूं नको. तुझा बाळ श्रेष्ठ गतीला गेला आहे.

शिवाय, त्या अल्पवयी कुमाराचा घात करणारा तो पापी सैंधव आपल्या सुहृद्गणबांधवांसह उद्यां आपल्या अपराधाचें फल भोगील. तो पापाचरणी जयद्रथ अमरावतींत जाऊन जरी लपून बसला, तरी तो पार्थाच्या हातून उद्यां रात्रींपर्यंत कांहीं जिवंत सुटत नाहीं. रणामध्यें हत झालेल्या त्या दुर्मतीचें मस्तक स्यमन्तपंचकाच्या बाहेर पडल्याचें उद्यां तूं ऐकशील. तस्मात् रडूं नको, शोकाचा निग्रह कर. क्षत्रधर्माचा पुरस्कार करून अभिमन्यु सज्जनांच्या गतीला गेला आहे. इतरहि जे शस्त्रजीवी वीर आहेत, तेहि सर्व याच गतीला प्राप्त होत असतात.

हे नंदिनि, तुझा महापराक्रमी पुत्र स्वर्गलोकीं गेला आहे. तो युद्धांतून परत न फिरणारा कुमार आपल्या मातृ-पितृकुलाला अनुसरला. त्या महारथानें सहस्रावधि शत्रूंचा संहार केला व अतुल पराक्रम करून तो मरण पावला. यास्तव हा शोक सोडून दे, ऊठ; आपल्या स्नुषेचें सान्त्वन कर. उद्यां शत्रुवधाची प्रिय वार्ता तुमच्या कानीं येईल. पार्थाची प्रतिज्ञा कदापि अन्यथा होत नसते. हे भद्रे, तुझ्या भर्त्याचें ईप्सित कार्य निष्फल होत नसतें. यास्तव सर्व मानव, राक्षस, पिशाच आणि सुरासुरादि समग्र भूतें जरी सिंधुराजाच्या रक्षणार्थ धांवलीं, तरी तो उद्यां जिवंत रहाणार नाहीं. ७. ४. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ सुभद्रेचा विलाप. ]

( १ ) संजय—राजा, महात्म्या केशवाचें हें वचन ऐकून पुत्रशोकानें विह्वल झालेली सुभद्रा अधिकच दुःखार्त झाली व असा विलाप करूं लागली—

सुभद्रा—हे वत्सा, हे अभिमन्यो, मज अभागिनीला सोडून तूं कसारे गेलास! तूं पितृतुल्य पराक्रमी असतां युद्धांत कसा पडलास! अरे अरे, बाळा, तुझें नीलकमलाप्रमाणें सुंदर मुखकमल धूळीनें माखलें असेल! युद्धांतून कधींहि परत न फिरणाऱ्या तुज वीराला आज मृत्यु यावा ना! चारु नेत्रांनीं शोभणारा तुझा देह क्षतयुक्त होऊन पडला असतां सर्व भूतें उदय पावणाऱ्या चंद्राप्रमाणें तुझ्या मुखाचें निरीक्षण करीत असतील! सूत व मागध ज्या तुझे स्तुतिपाठ गात असत, त्या तुझ्या भोंवतीं मांसभक्षक हिंस्र प्राणी जमले असतील!

बा वत्सा, पांडव, वृष्णि व पांचाल तुझें रक्षण करण्यास तत्पर असतां तुझा अनाथाप्रमाणें कोणीं रे वध केला! बाळा, मी आतां तुला कोठें रे पाहूं! तुझें तें मधुर हास्यमुख माझ्या कधीं बरें दृष्टीं पडेल! तुला पहाण्यासाठीं मला आतां यमलोकींच जावें लागेल, हें स्पष्टच दिसत आहे! ज्यांना माझ्या बाळाचें रक्षण करतां आलें नाहीं, त्या वृष्णिवीरांच्या व पांचालांच्या बलाला धिक्कार असो! भीमसेनाच्या बलाला व धनुर्धर अर्जुनाच्या पराक्रमाला धिक्कार असो! माझ्या कुमाराचें ज्यांना रक्षण करतां आलें नाहीं, त्यांच्या पराक्रमाच्या वल्गना व्यर्थ होत! धिक्कार असो त्या केकय, चेदी, मत्स्य व सृंजयांनाहि! रणांगणांत गेलेल्या त्या एकट्या बालकाचें ज्यांना संरक्षण करतां आलें नाहीं, त्यांच्या सामर्थ्याचा काय उपयोग!!

माझा अभिमन्यु बाळ दृष्टीं न पडल्यामुळें ही समग्र पृथ्वी मला शून्य व निस्तेज दिसत आहे. शोकानें माझी दृष्टि मंद झाली आहे. वत्सा, तूं स्वतः अतिरथ, साक्षात् वासुदेव तुझा मातुल व गांडीवधन्वा पार्थ तुझा पिता, असें असतांना समरांत तूं कसारे निधन पावलास! अशा वीर कुमाराला युद्धांत पडलेलें पहाण्याचें माझ्या दैवीं यावें ना! बाळा, तूं स्वप्नांतील दृश्याप्रमाणें कसारे नाहींसा झालास! मनुष्याचें जीवित जलाच्या बुडबुड्याप्रमाणें अनित्य आहे, हेंच खरें.

बा कुमारा, तुझी तरुण पत्नी वत्सरहित धेनूप्रमाणें झाली आहे. त्या शोकसागरांत बुडलेल्या उत्तरेचें मी कोणत्या शब्दानें सान्त्वन करूं! बाळा, तुझ्या तारुण्यांत तुला पहाण्यास उत्सुक असलेल्या आम्हांला सोडून तूं

---

१ येथें अर्जुनाच्या विलापासारखेंच असलेलें दुःखवर्णन सोडलें आहे.

अकालीं कसारे निघून गेलास ! ज्याअर्थी केशवासारखा नाथ असतां अनाथाप्रमाणें संग्रामांत तुझा वध झाला, त्याअर्थीं कृतान्ताची कृति प्राज्ञांनाहि दुर्ज्ञेय आहे, असेंच मानावें लागतें.

हे वत्सा अभिमन्यो, दानशील, ब्रह्मचारी, कृतात्मे व सदाचारसंपन्न लोकांस जे लोक प्राप्त होतात, ते तुला मिळोत. सत्यनिष्ठ, धार्मिक, जितेंद्रिय व गुरुसेवानिरत अशा सत्पुरुषांची गति तुला प्राप्त होवो. महा संकटप्रसंगींहि आत्मसंयमन करून शोकाग्नीनें दग्ध न होणाऱ्या जीवांच्या गतीला तूं जा. परस्त्रीचा अभिलाष न करणाऱ्या सज्जनांच्या लोकीं तूं वास्तव्य कर.[1]

राजा, याप्रमाणें, ती शोकाकुल झालेली सुभद्रा दीन होऊन विलाप करीत बसली असतां, उत्तरेला बरोबर घेऊन द्रौपदी तेथें आली व तिघीहि मुक्तकंठानें रोदन करूं लागल्या. त्या दुःखातिरेकानें उन्मत्ताप्रमाणें आक्रोश करीत असतां मूर्च्छित होऊन भूमीवर पडल्या. त्यांची ती दीनावस्था पाहून कृष्णाला अतिशय खेद झाला. तथापि त्यानें आपलें दुःख बाजूला सारिलें व त्यांच्या अंगावर शीतल जलाचें सिंचन करून त्यांना उठविलें आणि मृदु शब्दांनीं त्यांना हितवचनें सांगून त्यांचें समाधान केलें.

पुत्रशोकानें सुभद्रेच्या मर्मावर आघात झाला होता. ती थरथरां कांपत होती व भ्रमिष्टाप्रमाणें आक्रोश करीत होती. त्या आपल्या प्रिय भगिनीचें सांत्वन करीत पुंडरीकाक्ष असें म्हणाला—

श्रीकृष्ण—सुभद्रे, असा शोक करूं नको. तूं किती शोक करशील ! पांचालि, तूं उत्तरेला धीर दे. आपला अभिमन्यु श्रेष्ठ गतीला गेला आहे. त्या क्षत्रियश्रेष्ठाला उत्तम लोक प्राप्त झाला आहे. आपल्या कुलांतील सर्व पुरुष यशस्वी अभिमन्यूच्याच गतीला प्राप्त होवोत. तुझ्या महारथ पुत्रानें जसें दुष्कर कर्म केलें, तसेंच आम्हीहि करूं.

याप्रमाणें सुभद्रा, द्रौपदी व उत्तरा यांचें सांत्वन करून श्रीकृष्ण पार्थाकडे आला. नंतर त्यानें सर्व नृपति, बांधव व पार्थ यांना आपापल्या शिबिरांत

---

१ श्रेष्ठ गतीला प्राप्त होणाऱ्या सज्जनांच्या सविस्तर निर्देशाचा येथें संक्षेप केला आहे.



**श्रीकृष्ण**—सुभद्रे, असा शोक करूं नको. पांचालि, तूं उत्तरेला धीर दे. आपला अभिमन्यु श्रेष्ठ गतीला गेला आहे. [ पृ. ३९२ ]

जाण्याची अनुज्ञा दिली व स्वतः पार्थाच्या अंतःपुरांत प्रवेश केला. तेव्हां ते सर्वहि स्वशिबिरांत गेले. ७. ४. ७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १ श्रीकृष्णाचें पूजन व निशाबलि. २ श्रीकृष्णाचा दारुकाशीं संवाद. ]

( १ ) संजय—धृतराष्ट्रा, त्या पुंडरीकाक्षानें अर्जुनाच्या अप्रतिम भवनांत प्रवेश करून जलस्पर्श केला ( हातपाय धुतले व आचमन केलें. ) व शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या स्थंडिलावर वैदूर्यासारखी ज्यांची प्रभा आहे, अशा दर्भांची शय्या पसरली. नंतर सुगंधयुक्त माला, मंगल अक्षता, सुवासिक पदार्थ यांनीं ती शय्या विधिवत् अलंकृत केली आणि तिच्या सभोंवार उत्तम आयुधें ठेविलीं. त्यानंतर अर्जुनानें स्नान केलें. त्याच्या विनयसंपन्न परिचारकांनीं त्याच्या समक्ष रात्रीचा त्र्यंबकबलि तयार केला. अर्जुनानें माधवाचें गंध-पुष्पांनीं प्रेमपूर्वक पूजन केलें आणि उपहारासह तो निशाबलि त्याला समर्पिला.

तेव्हां गोविंद स्मितपूर्वक म्हणाला—"हे पार्था, आतां नीज. तुझें कल्याण असो. मी तुझ्या कल्याणार्थ जात आहें."

असें बोलून त्या हृषीकेशानें पार्थाच्या रक्षणार्थ द्वारावर सशस्त्र रक्षकांना उभें राहण्यास सांगितलें व तो दारुकासह स्वशिबिरांत आला. तेथें तो आपल्या धवल शय्येवर पडला व अनेक प्रकारें विचार करूं लागला. तो सर्वेश्वर पुंडरीकाक्ष अर्जुनाच्या हितांत तत्पर होता. तो अर्जुनाचा शोक कोणत्या उपायानें दूर होईल, याचें चिंतन करीत बसला व शेवटीं जिष्णूचें प्रिय करणाऱ्या त्या विष्णूनें पांडवांचें यश व तेज वाढविणारी युक्ति मनांत योजून ठेविली.

राजा धृतराष्ट्रा, त्या रात्रीं पांडवांच्या शिबिरांत कोणालाहि झोंप आली नाहीं. पुत्रशोकानें संतप्त झालेल्या अर्जुनानें सिंधुपतीचा वध करण्याची जी प्रतिज्ञा केली आहे, ती घोर प्रतिज्ञा कशी तडीस जाणार याचा त्यांना मोठा विचार पडला. ते सर्व वीर आपसांत असें बोलूं लागले कीं, जयद्रथहि पराक्रमी आहे, अर्जुनाची प्रतिज्ञा दुष्कर तर खरीच, पण ती शेवटास जावो. पुत्रशोकानें संतप्त झालेल्या पार्थाचे भ्रातेहि पराक्रमी आहेत. त्यांचें सैन्यहि विपुल आहे. तथापि अर्जुनाच्या

प्रतिज्ञेची ही वार्ता कौरवांना कळून तेहि सावध झाले आहेत. दुर्योधनानें जयद्रथालाहि सर्व वृत्तान्त निवेदन केला आहे. प्रतिज्ञेप्रमाणें सैंधवाचा वध करून पार्थ परत येवो. उद्यां जर सिंधुराजाचा वध झाला नाहीं, तर धनंजय अग्निप्रवेश करील. तो शतक्रतूचा पुत्र आपली प्रतिज्ञा कदापि अन्यथा होऊं देणार नाहीं. अर्जुन जर मृत झाला तर धर्मराज कसा जिवंत राहील ! पांडवांचा सर्व विजय त्या विजयावर अवलंबून आहे. आमच्या हातून जर कांहीं पुण्याचरण घडलें असेल, तर त्या सुकृताच्या प्रभावानें उद्यां सव्यसाची शत्रूला जिंको.

( २ ) याप्रमाणें परस्परांशीं संभाषण करीत व पार्थाच्या जयाची इच्छा करीत त्या सर्व वीरांनीं ती रात्र मोठ्या कष्टानें घालविली. त्या रात्रीं श्रीकृष्णासहि स्वस्थ झोंप आली नाहीं. अर्जुनाच्या प्रतिज्ञेचें स्मरण होऊन तो दारुकास म्हणाला—'हे दारुका, पुत्रशोकानें क्रोधसंतप्त झालेल्या अर्जुनाची प्रतिज्ञा दुर्योधनाच्या कानीं गेली असेल आणि जयद्रथाचा वध होऊं नये म्हणून त्यानें आपल्या मंत्र्यांबरोबर संकेतहि केले असतील. उद्यां कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य सिंधुराजाच्या रक्षणार्थ सज्ज राहील. अस्त्रविद्येंत निष्णात असलेले द्रोणाचार्य पुत्रासह त्याचें रक्षण करण्यांत तत्पर रहातील. एकटा आचार्य संरक्षण करीत असत दैत्य-दानवांचा दर्प हरण करणारा सहस्राक्ष इंद्रहि युद्धांत जयद्रथाचा वध करण्यास समर्थ होणार नाहीं. यास्तव उद्यां सूर्यास्त होण्याच्या पूर्वीं अर्जुनाच्या हातून सैंधव हत व्हावा, अशी योजना मी करणार आहें.

दारुका, मला माझ्या स्त्रिया, स्नेही, बांधव किंवा अन्य कोणीहि अर्जुनाहून अधिक प्रिय नाहीं. अर्जुनविरहित मला या जगांत क्षणभरहि रहावणार नाहीं. मी पार्थासाठीं उद्यां दुर्योधन-कर्णादिकांस स्वतःच्या बलानें जिंकीन व कौरवांच्या सर्व योद्ध्यांना त्यांच्या गजाश्वांसह यमलोकीं पाठवीन. उद्यां होणाऱ्या महायुद्धांत समग्र त्रैलोक्याला माझें सामर्थ्य दिसेल. धनंजयासाठीं सहस्रावधि नरेंद्र व शेकडों राजपुत्र यांना रथाश्वांसह पलायन करण्यास लावीन. कौरवांची सेना माझ्या चक्रानें व्यथित झालेली तुझ्या दृष्टीं पडेल. मी सव्यसाचीचा सुहृद् आहें, हें देव, गंधर्व, पिशाच इत्यादि सर्व प्राण्यांच्या प्रत्ययास येईल. पार्थाचा जो द्वेष्टा, तो माझा द्वेष्टा आणि त्याचा जो मित्र तो

माझा मित्र. अर्जुन माझें अर्धें शरीरच आहे, असें समजून आतां रात्रींच माझा रथ सज्ज कर.

दारुका, माझीं सर्व आयुधें सज्ज करून रथांत ठेव. माझा गरुडध्वज व छत्र रथाच्या मध्यावर बांध. सूर्य व अग्नि यांच्यासारख्या तेजस्वी सुवर्णाच्या जाळ्या घाल. बलाहक, मेघपुष्प, शैब्य व सुग्रीव हे चारी अश्व भूषणांनीं अलंकृत करून रथाला जोड आणि तूंहि कवच चढवून सज्ज हो. निघण्याची वेळ झाली म्हणजे मी ऋषभस्वरानें पांचजन्य वाजवीन. तो भैरवनाद कानीं पडतांच तूं सत्वर मजकडे ये. मी अर्जुनाचा क्रोध व दुःख नाहींसें करीन. कौरवांच्या समक्ष बीभत्सु जयद्रथाचा वध करील. तो पार्थ ज्या कोणाचा वध करण्यास उद्युक्त होईल, त्यांत त्याला निश्चित जय मिळण्याची मी योजना करीन.

दारुक—हे पुरुषव्याघ्रा, ज्याचा तूं स्वतः सारथि झाला आहेस त्याचा पराजय कसा होईल ! निश्चयानें त्याचा जयच होणार ! विजयाच्या जयासाठीं मी आपल्या आज्ञेप्रमाणें रात्रींच सर्व व्यवस्था करून ठेवतों. ७. ४. ७९.

---

## अध्याय ८० वा.

[ १ पार्थाचें स्वप्न. २ स्वप्नांत महादेवाचें दर्शन. ३ रुद्राचें स्तवन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, इकडे सत्यप्रतिज्ञ धनंजय आपल्या संकेताचा विचार करीत पडला असतां तो निद्रावश झाला. शोकसंतप्त होऊन विचारमग्न झालेल्या त्या कपिध्वजाला तेवढ्या वेळांत स्वप्न पडलें व त्याला देदीप्यमान गरुडध्वज श्रीकृष्णाचें दर्शन झालें. पार्थाच्या मनांत वासुदेवाविषयीं अत्यंत प्रेमभाव व भक्ति वसत असल्यामुळें त्यानें स्वप्नांतहि त्याला उत्थान दिलें. आपल्या आसनावर बसविलें व तो प्रेमळ भक्त त्याच्या समीप उभा राहिला.

तेव्हां महातेजस्वी कृष्णानें कुंतीपुत्राचा निश्चय जाणून आपल्या आसनावरूनच म्हटलें—हे पार्था, तूं यत्किंचित्‌हि विषाद पावूं नको. काल दुर्जय आहे. तो सर्व भूतांवर अवश्य अपरिहार्य प्रसंग नियतकालीं आणीत असतो. ते कोणालाहि टाळतां येत नाहींत. यास्तव तूं खिन्न होऊं नको. तूं श्रेष्ठ ज्ञाता आहेस. शोकानें कार्याचा विनाश होत असतो, हें जाणतोस. मग तुला कशा-

साठीं विषाद होत आहे, हें मला सांग पाहूं. असा शोक करणें तुझ्यासारख्याला उचित नाहीं.

बा धनंजया, जो पुरुष प्रतिकाराचा कांहींच प्रयत्न न करितां केवल शोक करीत बसतो, त्याचें कार्य सिद्ध होत नाहीं. शोक त्याचा शत्रूच होय. विषाद आपल्या शत्रूंना उत्तेजन देतो व बांधवांना निरुत्साह करतो. शिवाय शोक करणारा स्वतःहि क्षीण होतो. यास्तव तूं शोक करूं नको.

कृष्णाचें हें वचन ऐकून विद्वान् पार्थ त्याला असें म्हणाला—केशवा, माझ्या पुत्राचा वध करणाऱ्या दुरात्म्या जयद्रथाचा उद्यां वध करीन, अशी दारुण प्रतिज्ञा मीं केली आहे, हें तूं जाणतोसच. माझ्या प्रतिज्ञेचा भंग व्हावा म्हणून उद्यां सर्व कौरव व त्यांच्या पक्षांतील महारथ सैंधवाला पाठीशीं घालून त्याचें रक्षण करतील. शिवाय कौरवांचें अनेक अक्षौहिणी अजिंक्य सैन्य अद्यापि अवशिष्ट आहे. त्या सर्व सैन्यासह ते महारथ सैंधवाला परिवेष्टित करून उभे राहिले, तर तो दुरात्मा माझ्या दृष्टीं पडणें तरी कसें शक्य आहे !

त्यामुळें माझी प्रतिज्ञा जर निष्फल झाली तर माझ्यासारख्याला जिवंत रहाणें अशक्य आहे. माझ्या या प्रतिज्ञेंत कांहीं तरी संकट येणार, असें मला वाटतें. तो शीघ्रगामी सूर्य त्वरित अस्ताला जाईल, म्हणून माझी प्रतिज्ञा विफल होईल कीं काय, अशी मला शंका वाटत आहे व त्यामुळें माझें मन खिन्न झालें आहे.

राजा धृतराष्ट्रा, धनंजयाच्या शोकाचें कारण कळतांच श्रीकृष्णानें उदकस्पर्श केला व तो गरुडध्वज पूर्वाभिमुख होऊन बसला. नंतर पांडुपुत्राच्या हितार्थ व सिंधुपतीच्या वधार्थ तो कमलवदन प्रभु असें वचन बोलला—"हे पार्था, पाशुपतनामक श्रेष्ठ अस्त्र आहे. त्या सनातन अस्त्रानेंच भगवान् महेश्वरानें पूर्वीं युद्धामध्यें सर्व दैत्यांचा संहार केला. तें श्रेष्ठ अस्त्र तुला उपस्थित असल्यास तूं उद्यां जयद्रथाचा वध करूं शकशील. यास्तव तुला जर तें अस्त्र अवगत नसेल, तर तूं त्या वृषभध्वजाचें चिंतन करून त्याला शरण जा. त्याचें ध्यान करून त्याला प्रसन्न करून घे. त्याच्या प्रसादानें तुला तें उग्र अस्त्र प्राप्त होईल."

श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून धनंजयानें जलस्पर्श केला. भूमीवर बसून एकाग्रचित्तानें शंकराचें ध्यान आरंभिलें. त्या ब्राह्ममुहूर्तावर त्याचें चित्त प्रभुचरणीं लीन झालें होतें. त्यावेळीं केशवासह आपण आकाशमार्गानें जात आहों, असा अर्जुनाला भास झाला. ते हिमालयाच्या पायथ्याशीं गेले. नंतर जेथें सिद्ध-चारण वास करितात, तो मणिमानपर्वत त्यांच्या दृष्टीं पडला. अशा प्रकारें तो पार्थ केशवाचा उजवा हात धरून वायुवेगानें चालला असतां मार्गांत त्यानें अद्भुत वनश्रीनें युक्त असलेले अनेक भूप्रदेश पाहिले. कुबेराचें निवासस्थान जेथें आहे, ती तुडुंब जलानें भरलेली गंगानदी त्यांना दिसली. फलपुष्पांनीं भरलेल्या वृक्षांनीं तिचे तीर शोभत असून तेथें मुनिजनांचे पवित्र आश्रम होते.

अशा मनोरम गंगानदीचें उल्लंघन केल्यावर किन्नरांच्या गायनानें निनादित झालेला मंदरपर्वत त्यांनीं पाहिला. त्याचीं शिखरें सुवर्णाचीं व रौप्यमय होतीं. तेथून ते दोघे महामंदर पर्वतावर चढले व तेथून त्यांनीं पृथ्वीकडे पाहिलें. तों चंद्रप्रकाशानें ती प्रकाशित झाली असून, तिच्यावरून अनेक पवित्र नद्या वहात होत्या. मनोरम नगरांनीं युक्त असलेल्या वसुंधरेची अप्रतिम शोभा अवलोकन करीत ते दोघे कृष्णार्जुन विष्णुपदाच्या समीप गेले. अंतरिक्षांतून वायुवेगानें संचार करीत असतां चंद्र-सूर्यासारखा तेजस्वी व अग्नीप्रमाणें देदीप्यमान असा पर्वत त्यांच्या दृष्टीं पडला.

( २ ) तेथें जाऊन अर्जुनानें तपश्चर्या करीत बसलेल्या महेश्वराचें दर्शन घेतलें. त्या जटाधारी, मृगचर्म परिधान केलेल्या गौरीहराच्या समीप पार्वती बसली असून भीषण भूतगण सभोंवार पसरला होता. त्यांतील कित्येक हंसत होते. कोणी वाद्यें वाजवीत होते. ब्रह्मवेत्ते ऋषि दिव्य स्तवनांनीं स्तवन करीत होते व सुगंधी द्रव्यांनीं पूजन करून उपासना करीत होते.

अशाप्रकारच्या अच्युत शंकराला पाहून वासुदेव आणि पार्थ यांनीं सनातन ब्रह्माचा उच्चार करीत भूमीवर मस्तक ठेवून त्या महादेवाला शिरसा वंदन केलें.

राजा धृतराष्ट्रा, तो महेश्वर सर्व सृष्टीचें आदिकारण, विश्वकर्मा, अज, ईश, अव्यय, तेजाचें अधिष्ठान, देव-दानव-मानवांस सिद्धि देणारा, स्रष्टा व संहारक, योग्यांचें परमधाम इत्यादि असंख्य गुणांनीं युक्त होता. त्याला

श्रीकृष्णानें काया-वाचा-मनानें वंदन केलें. सूक्ष्मदर्शी ज्ञानी ज्या पदाला प्राप्त होतात, त्या अज सर्वकारणात्मक देवाला ते उभयतां शरण गेले. तो महादेव सर्व भूतांचा आदि भूतभव्यभवोद्भव आहे, हें जाणून अर्जुनानें त्याला पुनः पुनः वंदन केलें.

त्या दोघां नर-नारायणांना पाहून शंकराचें मन अतिशय प्रसन्न झालें व तो त्यांस स्मितपूर्वक म्हणाला—“ हे नरश्रेष्ठहो, तुमचें स्वागत असो. तुमचे क्लेश दूर झाले आहेत. तुमची काय इच्छा आहे ! मी तुमचें कोणतें प्रिय करूं तें सत्वर सांगा व श्रेयस्कर वर मागून घ्या. मी तुमचे सर्व मनोरथ पूर्ण करीन.” महादेवाचें तें वचन ऐकून महात्म्या कृष्णार्जुनांनीं हात जोडले व त्या महात्म्यांनीं भक्तिभावानें त्याचें दिव्य स्तवन केलें.

कृष्णार्जुन—हे प्रभो, तुला नमस्कार असो. सर्वप्रभुत्वात् तुला भव म्हणतात. तूं सर्वांचा संहारक असल्यामुळें शर्व म्हटला जातोस. तूं रुद्र वरद व सर्व पशूंचा पति आहेस. तुज नीलग्रीवाला वंदन असो. तुज व्यापक परमेश्वराला आम्ही प्रणाम करितों. तुला सहस्र नेत्र आहेत, सहस्र मस्तकें आहेत. तूं वाचस्पति आहेस. तुला मोक्षहेतुत्व आहे. अशा तुज ब्रह्मस्वरूपाला नमस्कार असो.

संजय—याप्रमाणें अर्जुनासह वासुदेवानें अस्त्रप्राप्तीसाठीं महादेवाची स्तुति करून त्याला प्रसन्न केलें. ७. ४. ८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ पार्थाला स्वप्नांत दिव्यास्त्राची प्राप्ति. ]

( १ ) संजय—राजा, त्यावेळीं अर्जुनाचें अंतःकरण प्रसन्न झालें होतें. नेत्र प्रफुल्लित झाले होते. त्या पार्थानें वृषभध्वजाला दोन्ही कर जोडून वंदन केलें. तेव्हां रात्रीं त्यानें वासुदेवाला अर्पण केलेला त्र्यंबकबलि तेथें शंकराच्या सन्निध त्याच्या दृष्टीं पडला. नंतर पार्थानें शंकर व श्रीकृष्ण यांची मानसपूजा केली व भक्तिपूर्वक म्हटलें—“ हे प्रभो, मला दिव्य अस्त्राची इच्छा आहे.”

---

१ ‘ नमो भवाय च० ’ इत्यादि ही रुद्राध्यायांतील स्तुति आहे. तिचें समग्र भाषांतर येथें दिलें नाहीं. स्तवनाचा संक्षेप केला आहे.

पार्थांची ती प्रार्थना ऐकून देव कृष्णार्जुनांस हंसतच म्हणाला—हे नरश्रेष्ठहो, तुमचें स्वागत असो. तुमचा मनोदय मला कळला आहे. तुम्ही ज्याच्या प्राप्तीसाठीं येथें आलां आहांत, तें मी तुम्हांला देतों. ज्याच्या योगानें मीं देवांच्या शत्रूंचा युद्धांत निःपात केला, तें धनुष्य शरांसह मीं अमृतसरोवरांत टाकून दिलें. तें सरोवर येथें समीपच आहे. तुम्ही तेथून ते धनुष्य-बाण घेऊन जा.

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून ते उभयतां वीर सर्व पार्षदांसह त्या दिव्य सरोवराकडे जाण्यास निघाले. तें पवित्र सरोवर सर्व ऐश्वर्यांनीं संपन्न असून सूर्यमंडलासारखें तेजस्वी होतें. त्यांतील जल अतिशय खोल असून त्यांत एक घोर सर्प होता. तेथें दुसराहि एक सहस्र शिरांचा श्रेष्ठ नाग त्यांच्या दृष्टीं पडला. त्याच्या मुखांतून अग्नीसारख्या असंख्य ज्वाला निघत होत्या.

त्या सरोवराच्या समीप जाऊन त्या नर-नारायणांनीं जलाला स्पर्श केला व नागाला हात जोडून वंदन केलें. वृषभध्वज रुद्राला प्रणाम केला व रुद्राध्यायाचें पठन आरंभिलें. तेव्हां रुद्राच्या अतर्क्य प्रभावानें त्या प्रचंड नागाचें रूप नष्ट होऊन त्याच्या जागीं उत्कृष्ट धनुष्य व बाण निर्माण झाला. त्याचा स्वीकार करून कृष्णार्जुनांनीं मोठ्या प्रेमानें तें अतिशय तेजस्वी धनुष्य व बाण शंकराला नेऊन दिले.

त्यावेळीं त्या महादेवाच्या पार्श्व भागापासून एक बलाढ्य ब्रह्मचारी उत्पन्न झाला. त्याचे नेत्र पिंगट असून तो तपस्वी होता. तें भगवान् शंकराचें स्वरूप असून त्याची ती अपरमूर्ति 'नीललोहित' या नांवानें प्रसिद्ध होती. तो ब्रह्मचारी तें श्रेष्ठ धनुष्य हातीं घेऊन चित्त एकाग्र करून उभा राहिला. नंतर त्यानें धनुष्याला बाण जोडला व तें यथाविधि आकर्ण ओढलें. तेव्हां पार्थानें त्याची मौर्वी, मुष्टि व लक्ष्य हें सर्व एकाग्रचित्तानें लक्षांत घेतलें व भगवानानें उपदेशिलेल्या मंत्राचेंहि यथाशास्त्र ग्रहण केलें.

याप्रमाणें शरसंधानाची प्रत्यक्ष माहिती पार्थाला दिल्यानंतर त्या बलाढ्य प्रभूनें तें धनुष्य शरांसह पुनः त्याच सरोवरांत टाकून दिलें. त्यावेळीं धनंजयाला शंकरानें दिलेल्या पूर्वीच्या एका वराचें स्मरण झालें. पूर्वीं एकदा अरण्यामध्यें महादेवानें पार्थाला दर्शन दिलें होतें व त्याला अस्त्रप्राप्तीचा वरहि दिलेला होता. आतां महेश्वर प्रसन्न झाला आहे, असें पाहून अर्जुनानें

तो वर पूर्ण करण्यासाठीं रुद्राचें ध्यान केलें. तेव्हां शंकरानें त्याचें मनोगत जाणून मोठ्या प्रीतीनें त्याला वर दिला आणि पार्थाची प्रतिज्ञा पूर्ण करण्यास समर्थ असलेलें तें घोर पाशुपत अस्त्र त्याला साध्य करून दिलें.

महेश्वरापासून त्या अस्त्राची प्राप्ति झाली असतां पार्थ कृतकार्य झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. अस्त्रप्राप्तीनें प्रहृष्ट झालेल्या कृष्णार्जुनांनीं रुद्राला शिरसा वंदन केलें व त्याची अनुज्ञा घेऊन संतुष्ट चित्तानें स्वशिबिरांत प्रवेश केला. त्यावेळीं महासुरांचा संहार करणाऱ्या रुद्राची अनुज्ञा मिळाल्या-मुळें जयद्रथाच्या वधाची इच्छा करणारे ते दोघे कृष्णार्जुन इंद्र-विष्णूंप्रमाणें प्रसन्न दिसले. ७. ४. ८१.

---

## अध्याय ८२ वा.

[ १ युधिष्ठिराच्या प्रातःकर्माचें वर्णन. २ वासुदेवाचें आगमन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, इकडे कृष्ण व दारुक यांचें संभाषण चाललें असतां ती रात्र संपून दिवस उगवला. तेव्हां युधिष्ठिरहि जागृत झाला. मधुपर्काच्या समयीं गायन करणारे मागध हातांनीं ताल धरून गाऊं लागले, सूत-वैतालिक स्तुति करूं लागले आणि नर्तकांनीं नृत्य आरंभिलें. विविध वाद्यें वाजूं लागलीं. त्या सर्वांचा मेघगर्जनेप्रमाणें प्रचंड निर्घोष झाला व तो अंतरिक्षाला जाऊन भिडला.

त्या सुमंगल ध्वनीनें राजा युधिष्ठिर जागृत झाला. तो आपल्या श्रेष्ठ शय्ये-वरून उठला व अवश्य कार्यें उरकण्यासाठीं प्रथम स्नानगृहांत गेला. तेथें शुभ्र वस्त्र परिधान केलेले एकशें आठ तरुण हातांत सुवर्णाचे जलपूर्ण कुंभ घेऊन उभे होते. युधिष्ठिर एक आंखुड वस्त्र परिधान करून चौरंगावर बसला. त्यानें चंदनानें सुवासिक केलेल्या जलानें स्नान केलें. अनेक परिचारकांनीं त्याच्या अंगाला सुगंधयुक्त वनस्पतींची उटी लावली व सचैल स्नान घातलें. नंतर केस कोरडे व्हावे म्हणून त्यानें सैलसें वस्त्र मस्तकाला गुंडाळलें. अंगाला चंदनाची उटी लावली. गळ्यांत पुष्पांच्या माला घातल्या व तो धर्मराज शुभ्र धूतवस्त्र परिधान करून प्राङ्मुख होऊन बसला. त्या कुंतीपुत्रानें हात जोडून जप केला व अग्निगृहांत प्रवेश केला. तेथें समिधा व आज्याहुति यांनीं मंत्रयुक्त होम केला आणि अग्नीचें संतर्पण करून सभागृहांत प्रवेश केला.

त्या सभागृहांत वयोवृद्ध, जितेंद्रिय, ब्रह्मचर्यानें वेदाध्ययन करून स्नातक झालेले, अवभृत स्नान केलेले, सूर्योपासक इत्यादि महात्मे होते. अशा प्रकारच्या एक हजार द्विजश्रेष्ठांचें दर्शन घेऊन युधिष्ठिरानें स्वस्तिवाचन करविलें. त्या द्विजांची मधुपर्कानें पूजा केली. त्यांना अक्षता, पुष्पें व फलें समर्पण केलीं. त्यानंतर त्या धर्मराजानें प्रत्येक ब्राह्मणाला एकेक निष्क दिला व अश्व, धेनु, वस्त्रें इत्यादिकांचें दान दिलें.

तेथून बाहेर आल्यावर युधिष्ठिर रत्नजडित आसनावर बसला. तें आसन विश्वकर्म्यानें निर्मिलेल्या विधीनें निर्माण केलें होतें. तेथें मूल्यवान् अलंकार घेऊन सेवक उभे होते. ते सर्व धारण केल्यावर धर्मराजाचें रूप अतिशय देदीप्यमान दिसूं लागलें. त्याचें तें स्वरूप पाहून शत्रूचा शोक वृद्धिंगतच झाला असता. त्यावेळीं युधिष्ठिरावर परिचारिका चवऱ्या ढाळूं लागल्या. वाद्यें वाजूं लागलीं आणि बंदिजनांनीं त्याला वंदन केलें.

इतक्यांत एका द्वारपालानें तेथें प्रवेश केला व भूमीवर गुडघे टेंकून धर्मराजाला शिरसा वंदन करून म्हटलें "हे महाराज, श्रीकृष्ण आपल्या भेटीस येत आहे."

तें ऐकतांच धर्मराज म्हणाला—"त्याला सत्वर आंत घेऊन या. त्या महात्म्याला आमच्या गृहीं येण्यास केंव्हांहि प्रतिबंध नाहीं. माधव येत आहे, त्याला अर्घ्य व आसन द्या."

( २ ) असें बोलून युधिष्ठिरानें वार्ष्णेयाला आंत आणविलें व त्याला श्रेष्ठ आसनावर बसवून त्याचें यथाविधि पूजन केलें. ७. ४. ८२.

---

## अध्याय ८३ वा.

[ १ युधिष्ठिराची प्रार्थना. २ वासुदेवाचें आश्वासन. ]

संजय—राजा, त्यानंतर युधिष्ठिरानें जनार्दनाचें अभिनंदन करून परम प्रीतीनें त्याला म्हटलें—"हे मधुसूदना, तुझी रात्र सुखानें गेली ना! तुझें सर्व ज्ञान–विद्या उपस्थित आहे ना?"

तेव्हां वासुदेवानेंहि त्याला उलट कुशलप्रश्न विचारिले. इतक्यांत नृपालादि सभासद भेटीला आल्याचें द्वारपालानें धर्मराजाला निवेदन केलें व युधिष्ठिरानें त्या सर्वांना आंत घेऊन येण्याची त्याला आज्ञा दिली. तेव्हां

विराट, धृष्टद्युम्न, सात्यकि, द्रुपद, शिखंडी, केकयांसह चेकितान, द्रौपदेय व इतरहि अनेक राजपुत्रांसह विविध नृपाळ हे सर्व सभागृहांत आले ते सर्व बलाढ्य वीर आपापल्या आसनांवर अधिष्ठित झाले आणि सात्यकि व श्रीकृष्ण हे दोघे अमिततेजस्वी महात्मे एकाच आसनावर बसले.

ते सर्व क्षत्रिय आसनस्थ झाल्यावर युधिष्ठिर त्या सर्वांस ऐकूं जाईल अशा उच्च स्वरानें श्रीकृष्णास असें मधुर वचन बोलला—"हे कृष्णा, इंद्राचा आश्रय करणाऱ्या अमरांप्रमाणें आम्हीं तुझा आश्रय केला आहे. तुझ्या आधारावर आम्ही जयाची व शाश्वत सुखाची इच्छा करीत आहों. हे भक्तवत्सला, शत्रूंनीं आमच्या राज्याचा कसा अपहार केला आणि आम्हांला विविध प्रकारें कसे क्लेश दिले, तें सर्व तूं जाणतोसच. हे सर्वेशा, तूंच आमचें सर्वस्व आहेस. आम्हा सर्वांचें सुख तुजवर अवलंबून आहे. आमचें जीवनहि तूंच आहेस. तुझ्यावर असलेला माझा विश्वास आज सत्य होऊं दे.

हे माधवा, अर्जुनाची प्रतिज्ञा सत्य करून आम्हांला या दुःखार्णवाच्या पार नेणें केवळ तुझ्या स्वाधीन आहे. ह्या दुःखसागर तरून जाणाऱ्या आमची तूं नौका हो. हे जनार्दना, समरांगणांत सारथ्याच्या कौशल्यानें जें कार्य होतें, तें प्रत्यक्ष रथ्याच्या हातूनहि होत नसतें. यास्तव तूं आमचें सर्व प्रकारें रक्षण कर.

हे शंख-चक्रधर पुरुषोत्तमा, तुला माझा नमस्कार असो. हे सनातन देव-देवेशा, हे परमात्मन्, तुला प्रणाम असो. तूं पुराण ऋषि नारायण आहेस, असें देवर्षि नारदानें आम्हांला सांगितलें आहे. यास्तव हे माधवा, आपला वर यावेळीं सत्य कर."

याप्रमाणें त्या राजसभेंत धर्मराजानें वासुदेवाची प्रार्थना केली असतां तो वक्त्यांतील श्रेष्ठ प्रभु आपल्या घनगंभीर वाणीनें युधिष्ठिराला असें प्रतिवचन बोलला—

( २ ) वासुदेव—हे धर्मात्म्या, या धनंजयासारखा वीर तुला त्रैलोक्यांतहि सांपडणार नाहीं. हा महाबलाढ्य तेजस्वी धनुर्धर अस्त्रविद्याप्रवीण आहे. तुझा हा भ्राताच शत्रूंचा नाश करील. हा पार्थ इंधनाचें भस्म करणाऱ्या अग्नीप्रमाणें कौरवसेनेला दग्ध करील. आज अर्जुन त्या पापाचरणी सौभद्रघातकाला आपल्या शरांनीं अशा मार्गांत फेंकून देईल, कीं तो पुनः या जगांत

कोणाच्याहि दृष्टीं पडणार नाहीं. श्येन, गृध्र व गोमायु त्याचें मांस भक्षण करतील. इंद्रासह सर्व देव जरी त्याच्या रक्षणार्थ आले, तरी आजच्या युद्धांत तो सैंधव निश्चयानें यमालयीं जाईल. आज सायंकालीं विजयी जिष्णु सैंधवाचा वध करून यशस्वी होऊन तुझ्याकडे येईल. यास्तव हे राजन्, तूं निश्चिंत हो. शोक करूं नको. चित्त शांत ठेव. ७. ४. ८३.

---

## अध्याय ८४ वा.

[ १ पार्थाचें राजसभेंत आगमन व स्वप्नकथन. २ युद्धार्थ प्रयाण. ३ सात्यकीला युधिष्ठिराच्या रक्षणार्थ प्रेरणा. ]

( १ ) संजय—राजा, याप्रमाणें त्यांचें संभाषण चाललें असतां सुहृद्गणांनीं परिवेष्टित असलेल्या धर्मराजाच्या दर्शनार्थ धनंजय आला. तो राजाला वंदन करून त्याच्या पुढें उभा राहिला. तेव्हां धर्मराजानें उठून मोठ्या प्रेमानें त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें; आपल्या दोन्ही हातांनीं त्याला जवळ घेऊन आलिंगन दिलें व त्याला उत्तम आशीर्वाद देऊन स्मितपूर्वक म्हटलें— " हे अर्जुना, आजच्या युद्धांत तुझा विजय निश्चित आहे, असें तुझ्या या प्रसन्न मुखावरून व्यक्त होत आहे आणि श्रीकृष्णाच्या प्रफुल्ल वदनावरूनहि हेंच स्पष्ट दिसत आहे."

अर्जुन—हे राजन्, तुमें कल्याण असो. काल रात्रीं मीं श्रीकृष्णाच्या प्रसादानें एक महदाश्चर्य पाहिलें. इतकें बोलून पार्थानें अखिल सुहृदांच्या उत्साहार्थ स्वप्नांतील सर्व वृत्तान्त त्यांस कथन केला. तो ऐकून सर्व सभासदांना विस्मय वाटला त्या सर्वांनीं आपापलीं मस्तकें भूमीवर टेंकून त्र्यंबकाला भक्तियुक्त नमस्कार केला व प्रसन्न मनानें 'धन्य धन्य' असे उद्गार काढले.

( २ ) त्यानंतर ते सर्व वीर राजाची अनुज्ञा घेऊन मोठ्या त्वरेनें बाहेर पडले व युद्धार्थ सज्ज झाले. अर्जुन, सात्यकि व कृष्ण धर्मराजाला वंदन करून तेथून निघाले. सात्यकि व अच्युत हे दोघेहि वीर एकाच रथानें अर्जुनाच्या शिबिरास गेले. तेथें श्रीकृष्णानें पार्थाचा श्रेष्ठ रथ सारथ्याप्रमाणें सज्ज केला. तप्तकांचनाप्रमाणें देदीप्यमान असलेला तो रथ बालसूर्याप्रमाणें प्रकाशूं लागला. त्या श्रेष्ठ रथाचा निर्घोष मेघगर्जनेसारखा गंभीर होता.

याप्रमाणें सर्व आयुधांनीं परिपूर्ण असलेला तो रथ सज्ज करून अर्जुनाला निवेदन केला. धनंजयानें आपलें आह्निक आटोपतांच सुवर्णाचें कवच चढविलें, मुकुट धारण केला व हातांत सशर धनुष्य घेऊन रथाला प्रदक्षिणा घातली. नंतर तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध अशा जितेंद्रिय द्विजांना वंदन करून त्यांचे जयाशीर्वाद घेतले. ते स्तुति करीत असतां धनंजय महारथावर आरूढ झाला.

विजयशील सांग्रामिक मंत्रांनीं तो श्रेष्ठ रथ पूर्वींच अभिमंत्रित केलेला होता. त्या रथावर पार्थ उदय पावलेल्या भास्कराप्रमाणें शोभला. त्या सुवर्णमय रथावर आरूढ झालेला अर्जुन मेरुपर्वतावरील दिवाकराप्रमाणें भासला. शर्यातीच्या यज्ञास इंद्र निघाला असतां त्यास अनुसरणाऱ्या दोघां अश्विनीकुमारांप्रमाणें कृष्ण व सात्यकि पार्थाच्या मागोमाग रथारूढ झाले. वृत्रासुराच्या वधप्रसंगीं इंद्राचें सारथ्य करणाऱ्या मातलीप्रमाणें गोविंदानें त्या श्रेष्ठ अश्वांचे रश्मी आपल्या हातीं घेतले.

राजा धृतराष्ट्रा, अंधकाराचा नाश करण्यासाठीं बुध व शुक्र यांच्यासह चंद्र जसा उदय पावतो, किंवा तारकासुराच्या वधार्थ मित्रावरुणासह इंद्र जसा निघावा, तसा अर्जुन जयद्रथाच्या वधार्थ श्रीकृष्ण-युयुधानांसह श्रेष्ठ रथांत बसून बाहेर पडला. त्यावेळीं मंगल वाद्यांचा घोष झाला. मागधांनीं शुभ स्तवनें गाइलीं. जयाशीर्वाद, पुण्याहवाचन आणि वाद्यांचा निनाद यांच्या योगानें सर्व योद्धयांचीं मनें उत्साहयुक्त झालीं. पुण्यगंधयुक्त वारे वाहूं लागले. त्याच्या योगानें पांडव हृष्ट झाले व कौरव खिन्न झाले. याप्रमाणें त्यावेळीं पांडवांना जयसूचक अनेक शुभ शकून झाले व हे राजन्, तुझ्या सैन्यांत दुश्चिन्हें होऊं लागलीं.

(३) आपल्या सैन्यांत जयसूचक शुभ चिन्हें होत आहेत हें पाहून उजव्या बाजूला बसलेल्या सात्यकीला अर्जुन म्हणाला—हे युयुधाना, आज युद्धांत माझा निश्चयानें विजय होणार, असें दिसतें, ज्याअर्थीं अशाप्रकारचीं शुभ चिन्हें होत आहेत, त्याअर्थीं तो सैंधव यमालयीं जाण्याच्या इच्छेनें जेथें स्थित असेल, तेथें मी जातों. तो माझें सामर्थ्य पहाण्याची प्रतीक्षा करीत असेल. सैंधवाचा वध व धर्मराजाचें रक्षण हीं दोन माझीं श्रेष्ठ कर्तव्यें आहेत. तस्मात् तूं आज धर्मराजाचें संरक्षण कर. तूं त्याचें रक्षण करीत असतां मीच

तेथें असल्यासारखें आहे. तूं वासुदेवाच्या तुल्य आहेस. तुझा पराभव करणारा एकहि वीर मला या लोकीं दिसत नाहीं. इतकेंच नव्हे, तर साक्षात् इंद्रहि तुला जिंकण्यास समर्थ नाहीं.

हे शिबिश्रेष्ठा, तूं व श्रीकृष्ण या दोघांच्या साह्यानेंच मी आज सिंधुपतीचा वध करण्यास उद्युक्त झालों आहें. तूं माझी यत्किंचित्‌हि चिंता करूं नको. राजाचें मात्र दक्षतेनें संरक्षण कर. जेथें वासुदेव व मी आहें, तेथें कांहींच काळजी नाहीं.

अर्जुनानें याप्रमाणें सांगितलें असतां सात्यकि 'ठीक आहे' असें बोलून जेथें राजा युधिष्ठिर होता, तेथें जाण्यास निघाला. ७. ४. ८४.

येथें चवथें प्रतिज्ञापर्व समाप्त झालें.

---

# जयद्रथवधपर्व ५.



## अध्याय ८५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला समरांगणांतील वृत्तान्ताविषयीं प्रश्न. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अभिमन्यु हत झाला असतां दुःख व शोक यांनीं युक्त झालेल्या पांडवांनीं दुसऱ्या दिवशीं काय केलें आणि माझ्या कोणत्या योद्ध्यांनीं संग्राम केला तें मला सविस्तर सांग. अरे, सव्यसाचीचीं दुष्कर कर्में जाणत असतां माझे पुत्र अभिमन्युवधाचा घोर अपराध करून निर्भय कसे राहिले ! पुत्रशोकानें संतप्त झालेला पार्थ आपलें श्रेष्ठ धनुष्य हलवीत अंतकाप्रमाणें समरांगणांत आला असतां माझ्या पक्षांतील योद्ध्यांनीं काय केलें ! तें सर्व मला कथन कर.

हे सूता, संग्रामांतील दुर्योधनाचा तरी वृत्तान्त काय आहे. आज विजयाची वार्ता कानीं न येतां माझ्या सैन्यांत महान् विषाद पसरलेला ऐकूं येत आहे. सिंधुपतीच्या शिबिरांतून सर्वदा कर्णमधुर ध्वनि निघत असतो, तो आज कसा ऐकूं येत नाहीं ! सूत-मागध माझ्या पुत्रांची स्तुति कशी गात नाहींत ! दीनांचा प्रचंड शब्दहि आज कोठें ऐकूं येत नाहीं ! बा संजया, मी सत्यधृति

व सोमदत्त यांच्या शिबिरांत बसून पूर्वी अत्यंत मधुर शब्द ऐकत असें, तोच आज पुण्यहीन झालेला मी पुत्रांच्या शिबिरांतून निघणारे आर्तस्वर ऐकत आहें. विविंशति, चित्रसेनादि माझ्या इतर पुत्रांचाहि जयशब्द कानीं येत नाहीं.

अरे, द्रोणपुत्र अश्वत्थामा माझ्या पुत्रांच्या हितांत तत्पर असतो. त्या धनुर्धराची ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य शिष्यत्वानें उपासना करीत असतात. तो महात्मा अहोरात्र वितंडा, वादविवाद, चर्चा व भाषण यांत निमग्न असावयाचा. विविधप्रकारचें गायन व वाद्यें यांच्या योगानें ज्यांचें रंजन चालतें, असे कौरव-पांडव आणि सात्वत इत्यादि अनेक वीर आचार्यपुत्राचा बहुमान करीत असतात. त्याच्या गृहांतून आज कसलाच शब्द ऐकूं येत नाहीं. अनेक सूत, गायक व नर्तक त्या धनुर्धर द्रोणपुत्राचें स्तवन करीत असतात, त्यांचाहि ध्वनि आज कोठेंच येत नाहीं.

त्याचप्रमाणें विंदानुविंदांच्या शिबिरांतून नित्य महाध्वनि कानीं पडत असे. केकयांच्या घरांतून तालसुरावर गायन चालत असे. श्रुतनिधीच्या शिबिरांत याजक तंतु वाद्यांनीं त्याचें रंजन करीत असत. द्रोणाचार्यांच्या सैन्यांत ब्रह्मघोष, तोमर, खड्ग व ज्याघोष यांचा सारखा निर्घोष चालू असावयाचा. शिवाय नानादेशांतील नृपालांच्या गृहांतून गीतें, वाद्यें इत्यादिकांचा प्रचंड निस्वन दाही दिशांत दुमदुमत असे. आज त्यांतील कांहींच कसें ऐकूं येत नाहीं! सर्वत्र स्तब्धता पसरलेली दिसत आहे.

संजया, पूर्वी सर्व प्राण्यांच्या अनुकंपेनें वासुदेव जेव्हां उपप्लव्यनगरीहून साम करण्यासाठीं आला, तेव्हां मी दुर्योधनाला सांगत होतों कीं, श्रीकृष्णाच्या उपदेशाप्रमाणें तूं पांडवांबरोबर साम करावास, हेंच प्राप्त समयाला उचित आहे. तूं त्याच्या विरुद्ध जाऊं नकोस. तो श्रीहरि तुझ्या श्रेयाचाच उपदेश करीत आहे. तूं जर त्याची अवज्ञा करशील, तर युद्धांत तुला कदापि जय होणार नाहीं.

बा सूता, याप्रमाणें मी सांगत असतांहि त्या माझ्या मंदमति पुत्रानें दाशार्हाचें अनुकूल भाषणहि अनादरानें मान्य केलें नाहीं आणि दुःशासन व

---

१ मूल ग्रंथाला अनुसरून येथें वर्तमानकाल जरी योजिला आहे, तरी कथेला अनुसरून तो भूतकालार्थी आहे, असें जाणावें.

कर्ण यांच्या मतानें तो दुर्मति वागूं लागला. भवितव्याप्रमाणें बुद्धि होत असते, हेंच खरें. त्याच्यापुढें पुरुषप्रयत्न व्यर्थ आहेत. मी स्वतः द्युताच्या विरुद्ध होतों. विदुराला तें संमत नव्हतें. जयद्रथ, भीष्म, शल्य, भूरिश्रवा, पुरुमित्र, जय, अश्वत्थामा, कृप, द्रोण, हेहि सर्व द्यूताला अनुकूल नव्हते. आम्हां सर्वांच्या मताप्रमाणें जर तो माझा दुर्बुद्धि पुत्र वागला असता, तर सर्व ज्ञातिबांधवांसह सुखांत राहिला असता.

संजया, मी दुर्योधनाला म्हणालों कीं, बा वत्सा, पांडव सरल वर्तनाच्या ज्ञातिबांधवांशीं प्रिय भाषण करणारे आहेत. ते कुलीन, प्राज्ञ आणि मधुरभाषणी आहेत. त्यांना निश्चयानें सुख प्राप्त होईल. धर्माचरणी मनुष्याला सर्वत्र नित्यसुखाचा लाभ होत असतो. त्यास मरणोत्तरहि श्रेयःप्राप्ति होत असते. पांडव पृथ्वीचा उपभोग घेण्यास समर्थ असून पितृ-पितामहांपासून ही समुद्रवलयांकित पृथ्वी त्यांचीच आहे. तिचा स्वीकार करण्यास त्यांना पूर्ण अधिकार आहे. तरीहि त्या पृथ्वीचा त्याग करण्याचा प्रसंग आल्यासहि ते धर्ममार्गालाच अनुसरतील. बाबारे, माझे असे कांहीं आप्त आहेत कीं, ज्यांचें वचन पांडव कदापि अमान्य करणार नाहींत. शल्य, सोमदत्त, भीष्म, द्रोण, विकर्ण, बाह्लीक, कृप व इतरहि कांहीं भरतकुलांतील वृद्ध महात्म्यांनीं त्यांना आज्ञा केल्यास ते त्यांच्या शब्दाप्रमाणें वागतील. यांच्याविरुद्ध कोणी जाईल, असें तुला वाटतें काय! कृष्ण कदापि धर्माचा त्याग करणार नाहीं. सर्व पांडव तर त्याचेच अनुयायी आहेत. मींहि जर त्यांना धर्मयुक्त वचन सांगितलें तर तें धर्मात्मे पांडव अमान्य करणार नाहींत.

बा संजया, याप्रमाणें मी अनेक प्रकारानें त्याची समजूत घालीत होतों, पण त्या मूढानें तें ऐकलें नाहीं. यावरून आमचा कालच फिरला, असें म्हणावें लागतें. वृकोदर धनंजय माद्रेय, शिखंडी इत्यादि अजिंक्य वीर ज्यांच्या पक्षांत आहेत व मधुसूदन ज्यांचा मंत्री आहे, त्यांच्याशीं विजयेच्छेनें युद्ध करील, असा एक तरी महारथ या लोकीं आहे काय! त्यांच्या दिव्य अस्त्रांचा वर्षाव सहन करण्यास दुर्योधन, कर्ण, दुःशासन व शकुनि या चौघांखेरीज पांचवा वीर मला तर एकहि दिसत नाहीं. ज्यांच्या पक्षांत कृष्णार्जुन आहेत, त्यांचा पराभव कदापि होणार नाहीं.

हे सूता, याप्रमाणें मी त्यावेळीं वारंवार आक्रोश करीत होतों, त्याचें

दुर्योधनाला आतां स्मरणहि नसेल ! पुरुषव्याघ्र भीष्म-द्रोण हत झाल्याचें तूं मला सांगत आहेस. त्यावरून विदुराचें भविष्य खरें ठरून माझे हे दुराग्रही पुत्र अखेर शोक करीत बसतील, हेंच खरें. हेमंत ऋतूच्या अंतीं तृणाला भस्मसात् करणाऱ्या अग्नीप्रमाणें धनंजय माझ्या पुत्रांना दग्ध करील.

संजया, तूं वर्णन करण्यांत कुशल आहेस, यास्तव मला सविस्तर वृत्तान्त सांग. मूढ दुर्योधनाच्या घोर अपराधामुळें माझ्या सर्व पुत्रांवर असा दारुण प्रसंग ओढवला. अभिमन्यूचा वध करून पार्थाचा अत्यंत अपराध करून त्याला क्षुब्ध केल्यानंतर त्याचें समरांतील शौर्य आमच्या वीरांना कदापि सहन होणार नाहीं. दुर्योधन लोभी, दुष्ट व मूढ आहे. क्रोधानें तो विवेकहीन झाला आहे. राज्याच्या अभिलाषानें त्या मात्सर्यपूर्ण दुर्बुद्धीनें पुढें काय केलें तें सर्व मला कथन कर. ७. ५. ८५.

---

## अध्याय ८६ वा.

[ १ संजयानें केलेली धृतराष्ट्राची निर्भर्त्सना. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, ठीक आहे. मीं जें कांहीं प्रत्यक्ष पाहिलें, तें सर्व तुला सांगतों. स्वस्थ चित्तानें ऐक. यांत प्रथम तुझाच महान् अपराध आहे. जलाशयांतील सर्व जल वाहून गेल्यावर त्याला बांध घालण्याप्रमाणेंच तुझा हा विलाप निष्फल आहे. हे भरतश्रेष्ठा, कालाचें अतिक्रमण कोणालाहि करतां येत नाहीं. पुरातन दैवघटनाच तशी आहे, यास्तव शोक करूं नकोस.

हे राजन्, तूं पूर्वींच जर आपल्या पुत्रांस धर्मराजाशीं द्यूत करण्यापासून निवृत्त करतास, तर आज तुझ्यावर हें संकट ओढवलें नसतें. त्यानंतर युद्धाचा प्रसंग समीप आला असतां तूं जर त्यांना निवृत्त केलें असतेंस, तर आजच्या अनर्थांत सांपडला नसतास. किंवा दुर्मति दुर्योधनास बंधनांत ठेवण्याची जरी कुरूंना आज्ञा दिली असतीस, तरीहि आजचा हा दुर्धर प्रसंग टळला असता. राजा, यांतील कोणत्या तरी मार्गाला तूं अनुसरला असतास, तर पांडव, पंचाल, वृष्णि व इतर नराधिप यांना तुझ्या वैषम्याचा अनुभव आला नसता.

हे नराधिपा, तूं पुत्राला सन्मार्गांत स्थित करून आपलें पितृकर्तव्य बजाविलें असतेंस व धर्मानें वागला असतास, तर या संकटांत सांपडला नसतास.

राजा, तूं या लोकांत अतिशय प्राज्ञ म्हणून गणला जातोस. त्या तूं सनातन धर्माचा त्याग करून दुर्योधन, कर्ण व शकुनि यांच्या मताला अनुमोदन द्यावेंस हें केवढें आश्चर्य ! तूं जो पूर्वी आक्रोश केलास म्हणून म्हणत आहेस, तो सर्व मीं ऐकला आहे. तथापि तुझ्या मनामध्यें राज्यलोभानें प्रवेश केल्यामुळें तुझें तें सर्व भाषण विषमिश्र मधाप्रमाणें होतें.

हे प्रभो, पूर्वी श्रीकृष्ण पांडवांपेक्षांहि तुझा अधिक बहुमान करीत असे. तो अच्युत भीष्म-द्रोणादिकांसहि तुझ्या इतका मान देत नसे. तथापि तूं राजधर्मापासून च्युत झाल्याचें त्याच्या लक्षांत येतांच तुझ्याविषयीं त्याच्या मनांतील आदर नाहींसा झाला. हे राजा, आपल्या पुत्रांना राज्य मिळावें, अशीच तुझी इच्छा होती. त्यामुळें कौरवांनीं पांडवांना जीं कठोर भाषणें ऐकविलीं, त्यांची तूं उपेक्षा केलीस. त्या अधर्माचें फल आज तुला भोगावें लागत आहे.

हें पितृ-पितामहांचें राज्य जर तूं पांडवांना परत दिलें असतेंस, तर पार्थांनीं जिंकलेली समग्र पृथ्वी तुला प्राप्त झाली असती. पांडुराजानें जिंकलेलें राज्य व कौरवांचें यश हीं दोन्ही धर्माचरणी पांडवांनीं अधिक वाढविलीं असतीं. तथापि त्यांचे सर्व प्रयत्न तुझ्या द्वेषबुद्धीमुळें व्यर्थ झाले. तूं केवल लोभानें त्यांच्या वडिलार्जित राज्याचा अपहार केलास. असें असतां आतां युद्धाचा प्रसंग येऊन ठेपला, तेव्हां तूं स्वतःचा सर्व दोष पुत्रांवर लादीत आहेस व त्यांचीच निंदा करीत आहेस, त्या तुला काय म्हणावें ! तूं स्वपुत्रांना जीं अनेकप्रकारें दूषणें देत आहेस, तें योग्य नव्हे.

रणांगणांत युद्धाला आरंभ झाला असतां कोणताहि क्षत्रिय आपल्या जीविताचें रक्षण करीत नसतो. तुझ्याकडील सर्व योद्धे प्राणावर उदार होऊन पांडवसेनेशीं युद्ध करीत आहेत. ज्या सैन्याचें वृकोदर व सात्यकि रक्षण करीत आहेत, त्या पांडवसेनेशीं युद्ध करण्यास कौरवांवांचून इतर कोण समर्थ होणार ! कौरव क्षत्रधर्मनिरत व शूर अशा नृपालांस योग्य असलेलें शौर्य यावेळीं प्रकट करीत आहेत. यास्तव कौरव-पांडवांचें युद्ध कसें झालें, तें सांगतों. तें सर्व तूं लक्षपूर्वक ऐक. ७. ५. ८६.

---

## अध्याय ८७ वा.

[ १ कौरवांच्या व्यूहाचें वर्णन. ]

( १ ) संजय—राजा, ती रात्र संपून दिवस उजाडतांच द्रोणाचार्य कौरवसेनेचा व्यूह रचूं लागला. त्यावेळीं वीरांच्या गर्जना, शस्त्रांचे खणखणाट, धनुष्याचे टणत्कार व रणवाद्यांचा घोष यांचा प्रचंड कोलाहल कानीं आला. कांहीं वीर सज्ज होऊन 'कोठें आहे तो अर्जुन ? तो कृष्ण कोठें आहे ? तो मानी वृकोदर कोठें दिसत नाहीं !' इत्यादि शब्दांनीं त्यांना युद्धाचें आव्हान करीत होते.

द्रोणाचार्य मोठ्यानें शंखनाद करीत व अश्वांना वेगानें चालवीत सर्व सैन्यांत संचार करीत होता. त्या सर्व योद्ध्यांना सैन्यामध्यें व्यवस्थित उभे करून तो आचार्य जयद्रथाला असें म्हणाला—"जयद्रथा, तूं, सौमदत्ति, कर्ण, अश्वत्थामा, शल्य, वृषसेन व कृपाचार्य असे तुम्ही आपल्याबरोबर एक लक्ष अश्वसादी, साठ सहस्र रथ, चौदा सहस्र गज आणि कवचें चढवून सज्ज झालेले एकवीस हजार पदाति घेऊन माझ्यापासून सहा कोसांवर जाऊन उभे रहा. हे सैंधवा, अशाप्रकारें तूं सुरक्षित असल्यावर इंद्रासह सर्व देवहि तेथें येण्यास समर्थ होणार नाहींत, मग पांडवांची काय कथा ! तूं निश्चिंत रहा."

याप्रमाणें द्रोणानें आश्वासन दिलें असतां जयद्रथाला धीर आला व तो आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें ते महारथ व विपुल सैन्य यांनीं परिवेष्टित होत्साता तेथून निघाला. राजा, तुझा पुत्र दुर्मर्षण सर्व सैन्याच्या अग्रभागीं स्थित झाला. दुःशासन व विकर्ण यांनीं सिंधुपतीच्या कार्यसिद्धीसाठीं पृष्ठभाग संभाळला. तुझ्या दुसऱ्या दोघां पुत्रांसह विकर्ण सैन्याच्या पुढें राहिला.

नंतर द्रोणानें इकडे सैन्याची व्यूहरचना चालविली. राजा, त्याचा तो प्रचंड व्यूह चोवीस कोस लांब पसरला असून, त्याचा पृष्ठभाग दहा कोस विस्तृत होता. भारद्वाजानें तो व्यूह मध्यभागीं चक्र असलेल्या शकटाच्या आकाराचा निर्माण केला. नानादेशांतील नृपति, राजपुत्र व अनेक क्षत्रिय वीर आपापल्या सैन्यासह ठिकठिकाणीं व्यवस्थेनें उभे होते.

---

१ अशाप्रकारचीं व्यूहाचीं वर्णनें पूर्वी अनेकदां येऊन गेलीं आहेत. यास्तव येथें त्यांचा संक्षेप केला आहे.

द्रोणाचार्यांनें स्वतः मोठ्या कौशल्यानें रचलेल्या त्या व्यूहाच्या पृष्ठभागांत दुसरा एक 'सूचीपद्म' नामक दुर्भेद्य व्यूह निर्माण केला होता. त्याच्या गर्भांत आणखी एका गूढ व्यूहाची रचना केली होती. अशा प्रकारें तो प्रचंड व्यूह रचून आचार्य युद्धार्थ सज्ज झाला. सूचीमुखावर कृतवर्मा स्थित झाला. त्याच्या मागें कांबोजाधिपति व जलसंध सज्ज होऊन राहिले. त्यांच्या पृष्ठभागीं दुर्योधन व कर्ण असून दुसरे असंख्य वीर द्वाररक्षणार्थ शकटामध्यें स्थित होते.

सूचीमुखाच्या पार्श्वभागीं विपुल सैन्यांनीं परिवेष्टित झालेला जयद्रथ होता. मुखापाशीं स्वतः द्रोणाचार्य होते. भोजराजा त्यांच्या मागें उभा राहून आचार्यांचें रक्षण करीत होता. त्यावेळीं श्वेत वस्त्रें परिधान केलेला द्रोणाचार्य धनुष्याचा टणत्कार करीत असतां क्रुद्ध झालेल्या साक्षात् अंतकाप्रमाणें भासला. ध्वज व पताका यांनीं शोभणारा द्रोणाचा रथ पाहून कौरवांना हर्ष झाला. क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें तो विस्तृत व्यूह पाहून सिद्ध-चारण विस्मित झाले. हा व्यूह पर्वत-वनांसह सर्व वसुधा व्यापून टाकितो कीं काय! अशी सर्व प्राण्यांना भीति वाटूं लागली. परंतु अनेक रथ, असंख्य वाहनें व विपुल योद्धे यांनीं संपन्न असलेला व त्या समयाला योग्य असा तो अद्भुत शकट व्यूह पाहून राजा दुर्योधन अतिशय संतुष्ट झाला. ७. ५. ८७.

---

## अध्याय ८८ वा.

[ १ रणांगणांतील वीरांचें वर्णन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें व्यूहरचना झाल्यावर कौरवपक्षांतील वीर मोठमोठ्यानें गर्जना करूं लागले. रणवाद्यांचा प्रचंड ध्वनि झाला. कोलाहलांत सर्व योद्धे आपापलीं शस्त्रें घेऊन सज्ज झाले. इतक्यांत त्या रौद्र मुहूर्तावर सव्यसाची रणांगणावर प्राप्त झाला. त्यावेळीं अनेक हिंस्र पशु कौरवसेनेंत अशुभ स्वरानें ओरडूं लागले. उल्कापात झाला व इतरहि दुःश्चिह्नें होऊं लागलीं. रूक्ष वारे वाहूं लागले.

याप्रमाणें कौरवांची व्यूहरचना चालली असतां शतानिक व धृष्टद्युम्न या दोघांनीं पांडवसेनेचा व्यूह रचला. इतक्यांत तुझा पुत्र दुर्मर्षण पुढें आला.

त्याच्या बरोबर एक हजार रथ, शंभर गज, तीन हजार अश्वसादी व दहा हजार पदाती इतकें सैन्य होतें. त्या सैन्यापासून दीड हजार धनुष्यांच्या अंतरावर उभा राहून तो म्हणाला—" हे वीरहो, गांडीवधारी अर्जुनास मी आज सागराच्या तीराप्रमाणें अडवून धरीन. त्याच्याशीं युद्ध करण्यास सर्व लोक भीत असतात. तथापि मी आज एका पाषाणावर आपटणाऱ्या दुसऱ्या पाषाणाप्रमाणें त्याच्याशीं युद्ध करीन. हे शूरहो, तुम्ही स्वस्थ उभे रहा. तुम्हांला संग्रामाची आकांक्षा आहे. परंतु आज मी एकटा येथें जमलेल्या सर्व शत्रूंशीं संग्राम करीन तो तुम्ही पहा. मी आज आपलें यश व मान वृद्धिंगत करीन. "

असें बोलून तो तुझा महाबुद्धिमान् पुत्र आपल्या सर्व शूर अनुयायांसह सज्ज होऊन उभा राहिला. नंतर नर-नारायणरूपी ते दोघे कृष्णार्जुन आपल्या श्रेष्ठ रथांतून समरांगणांत येतांच तो पार्थ उदय पावणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभला. त्यावेळीं धनंजय क्रुद्ध झालेल्या अंतकाप्रमाणें दिसला. जणुकाय वज्र हातीं घेतलेला इंद्र, किंवा कालानेंच प्रेरणा केलेला दंडपाणि मृत्यूच अवतरला आहे कीं काय असा भास झाला. प्रजेला दग्ध करणाऱ्या युगान्तसमयींच्या प्रदीप्त झालेल्या अग्नीप्रमाणें तो क्रोधानें संतप्त झाला होता. आपली प्रतिज्ञा सत्य करण्यासाठीं तो पांडव शत्रुसैन्याच्या संमुख येऊन बाणाच्या अंतरावर उभा राहिला व त्यानें आपला रथ उभा करून शंख वाजविला. तेव्हां कृष्णानेंहि आपला पांचजन्य फुंकून प्रचंड नाद केला. त्या दोन शंखांचा ध्वनि ऐकतांच तुझे सैनिक व अश्व-गजादि वाहनें भयभीत झालीं व जागच्याजागीं देहधर्म करूं लागलीं.

तुझ्या सैनिकांची ही अवस्था पाहून कौरवसैन्यांत रणवाद्यें वाजूं लागलीं. त्यांच्या निनादानें तुझे सैनिक भानावर आले. त्यांच्या अंगांत वीरश्रीचा संचार झाला व ते उत्साहानें युद्धार्थ सज्ज झाले. महारथांचे सिंहनाद व रण-वाद्यांचा निर्घोष यांच्या योगानें भीरूंचें भय वाढविणारा प्रचंड शब्द झाला. तो ऐकून पार्थ अत्यंत हृष्ट चित्तानें दाशार्हाला असें वचन बोलला. ७.५. ८८.

## अध्याय ८९ वा.

[ १ अर्जुनाचा शत्रुसैन्यांत प्रवेश. ]

( १ ) अर्जुन—हे हृषीकेशा, या गजसैन्याचा भेद करून जेथें दुर्मर्षण उभा आहे, तेथें माझा रथ ने.

संजय—राजा, सव्यसाचीकडून असें बोलला गेलेला महाबाहु केशव अश्वांना प्रेरणा करून अर्जुनाचा रथ दुर्मर्षणाच्या समीप घेऊन गेला. तेव्हां शत्रूंचे अनेक नर व गजाश्व यांचा संहार करणारें दारुण युद्ध प्रवृत्त झालें. तुझ्या सैन्यांतील वीरांना अर्जुनानें शरवृष्टीनें झांकून टाकिलें. तुझ्या सैन्यांतील वीरहि कृष्णार्जुनांवर बाणांचा वर्षाव करूं लागले. तथापि पार्थ अत्यंत क्रुद्ध होऊन तुझ्या सैनिकांचा शिरश्च्छेद करीत चालला होता. त्यामुळें ती रणभूमि कमलवनाप्रमाणें वीरांच्या मस्तकांनीं आच्छादित झाली. गजाश्वांचे प्रचंड देह, मृत वीरांचे छिन्न-विछिन्न झालेले भिन्न-भिन्न अवयव आणि विविध आयुधें यांनीं तें रणांगण व्यापून गेलें.

हे महाराज, त्यावेळीं तुझ्या सैनिकांना सर्वत्र पार्थ दिसूं लागला. ते काल-प्रेरित झालेले वीर 'हा पहा पार्थ, कोठें आहे तो पार्थ, हा येथें आहे' इत्यादि गर्जना करीत परस्परांवरच प्रहार करूं लागले. कित्येकांनीं तर पार्थाच्या भ्रांतीनें स्वतःवरच शस्त्राघात केले. त्यामुळें असंख्य वीर रक्तबंबाळ झाले; आणि प्राणान्तक वेदनांनीं संज्ञाशून्य होऊन पडले. जे थोडेसे योद्धे देहभानावर होते, ते आपल्या बांधवांना हांका मारूं लागले. त्यावेळीं जेवढा सैनिक अर्जुनाच्या पुढें येई, तेवढा बाणानें विद्ध झाल्यावांचून रहात नव्हता.

याप्रमाणें अर्जुन अतिशय उत्साहानें युद्ध करीत असतां त्याचें तें विलक्षण हस्तलाघव पाहून सर्व शत्रुहि विस्मित झाले. तुझ्या सैन्यांतील विशाल गज विदीर्ण होऊन पडल्यामुळें ती रणभूमि पर्वतांनीं व्यापलेल्या प्रदेशाप्रमाणें भासली. प्रचंड मारुतानें जसें मेघसमुदायांना उडवून द्यावें, तसें अर्जुनानें कौरवसैन्याला उधळून दिलें. त्यावेळीं तो क्रोधसंतप्त झालेला धनंजय मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें दुष्प्रेक्ष्य झाला होता. तुझ्या सैन्याची अशी वाताहत झाली असतां तें त्वरेनें पळ काढूं लागलें. त्यावेळीं त्यांतील कांहीं योद्धे अर्जुनाच्या बाणजालानें भ्रान्त झाले व उलट दिशेनें न जातां, पार्थाकडेच पळत सुटले. ७. ५. ८९.

---

## अध्याय ९० वा.

[ १ दुःशासनाच्या सैन्याचा पराजय. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, अर्जुनानें सैन्याच्या अग्रभागीं असलेल्या वीरांचा असा संहार चालविला असतां माझ्याकडील कोणते वीर त्याच्यावर चालून गेले ? भयभीत होऊन शकटव्यूहांत ज्यांनीं प्रवेश केला होता, ते द्रोणाच्या आश्रयानें तरी निर्भय राहिले ना ?

संजय—हे महाराज, अर्जुनानें तुझ्या सैन्याची अशी वाताहत उडविली असतां तें भयभीत होऊन पळत सुटलें. तेव्हां तुझा पुत्र दुःशासन अर्जुनावर धांवला. त्या वीरानें प्रचंड गजसैन्य बरोबर घेऊन अर्जुनाला वेढून टाकिलें. त्यावेळीं हत्तींचे चीत्कार व धनुष्यांचे टणत्कार यांचा नाद अंतरिक्षापर्यंत जाऊन पोंचला. क्षुब्ध झालेल्या सागरांत प्रवेश करणाऱ्या मकराप्रमाणें अर्जुनानें त्या गजसैन्यांत प्रवेश केला व आपल्या सर्पतुल्य तीक्ष्ण बाणांनीं त्या कुंजरांचा संहार आरंभिला.

पार्थाकडून वध पावणारे ते प्रचंड हत्ती मोठ्यानें चीत्कार करून भूमीवर पडत असतां छिन्नपक्ष पर्वतांचाच भास झाला. गजारूढ झालेल्या वीरांचीं मस्तकेंहि पार्थाच्या भल्ल बाणांनीं पटापट खालीं पडूं लागलीं. त्या दारुण युद्धांत चोहोंकडे असंख्य कबंधें उठून संचार करूं लागलीं.

याप्रमाणें पार्थानें दुःशासनाच्या सैन्याचा संहार चालविला असतां तें भयभीत होऊन दश-दिशांत पळत सुटलें व शरपीडित झालेल्या दुःशासनानेंहि सैन्यासह त्रस्त होऊन द्रोणाचार्याकडून संरक्षणाची आकांक्षा करीत शकट-व्यूहाकडे पलायन केलें. ७. ५. ९०

---

## अध्याय ९१ वा.

[ १ पार्थाची द्रोणाचार्याला प्रार्थना. २ द्रोणाचें उत्तर. ३ पार्थाचा कौरव-सेनेंत प्रवेश. ]

( १ ) संजय—हे महाराज, दुःशासनाच्या सैन्याचा याप्रमाणें नाश

करून महारथ सव्यसाची जयद्रथाला गांठण्यासाठीं द्रोणसैन्याकडे वळला. तेथें द्रोणाचार्य व्यूहाच्या मुखाशींच उभे होते. तेव्हां पार्थ प्रथम त्यांच्या समीप गेला व कृष्णाच्या अनुमतीनें हात जोडून असें वचन बोलला—" हे ब्रह्मन्, मला शुभाशीर्वाद द्या. माझें कल्याण व्हावें, असें चिंतन करा. आपल्या प्रसादानें मी या दुर्भेद्य सैन्यांत प्रवेश करण्याची इच्छा करीत आहें. हे आचार्य, आपण मला पित्यासमान अहां, धर्मराज व साक्षात् श्रीकृष्ण यांच्या तुल्य तुम्ही अहांत, हें मी आपल्याला सत्य सांगतों. हे तात, अश्वत्थामा जसा आपल्याला सर्वथैव रक्षणीय आहे, तसें माझेंहि आपण सदैव संरक्षण करणें उचित आहे. आज युद्धामध्यें सिंधुराजाचा वध करण्याची माझी इच्छा आहे, ती आपल्या प्रसादानें पूर्ण व्हावी. हे द्विजश्रेष्ठा, आपण माझी प्रतिज्ञा सत्य होऊं द्या."

( २ ) संजय—हे प्रभो, पार्थाचें हें वचन ऐकून आचार्यांनें स्मित केलें व त्याला म्हटलें—" हे बीभत्सो, मला जिंकल्यावांचून तुला जयद्रथाचा पराजय करतां येणें शक्य नाहीं."

असें बोलून त्या सेनानीनें अर्जुनाला त्याचा सारथि, रथ, अश्व व ध्वज यांसह झांकून टाकिलें. तेव्हां पार्थानें आपल्या घोर शरांनीं त्या शरजालांचा छेद केला व आचार्यांस वंदन करून क्षत्रधर्मानुसार नऊ बाणांनीं त्यांस विद्ध केलें. आचार्यांनेंहि अग्निज्वालेसारख्या दीप्त बाणांनीं कृष्णार्जुनांस विद्ध केलें व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. ते परस्परांचें शरजाल तोडीत होते व पुनः परस्परांवर शरवृष्टि करीत होते.

याप्रमाणें त्या दोघां अजिंक्य वीरांचें युद्ध चाललें असतां तें लवकर संपण्याचें चिह्न दिसेना. तेव्हां महाबुद्धिमान् वासुदेव जयद्रथवधाचें दुर्घट कार्य लक्षांत आणून धनंजयाला म्हणाला—" हे महाबाहो, पार्था, येथें असा वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. द्रोणाला सोडून आपण येथून जाऊं या. आपलें महत्त्वाचें कार्य तर पुढेंच आहे."

तेव्हां पार्थ म्हणाला—" हे कृष्णा, तुला जें योग्य वाटत असेल तसें कर." नंतर बीभत्सूनें आचार्यांना उजवी प्रदक्षिणा घातली व तो बाणांची वृष्टि करीत पुढें निघाला. तें पाहून द्रोणाचार्य स्वतःच होऊन त्याला म्हणाला—

" धनंजया, अरे हें काय ! शत्रूला जिंकल्यावांचून तूं रणांगणांतून परत फिरत नाहींस ना ! मग आतां कोठें चाललास !"

अर्जुन—हे आचार्य, आपण माझे गुरु अहां. शत्रु नाहीं. मी आपला शिष्य आपल्याला पुत्रासारखा आहें. आपला पराभव करील असा एकहि मानव या लोकीं नाहीं.

( ३ ) संजय—हे महाराज, आचार्यांना असें बोलून तो महाबाहु जयद्रथाच्या वधेच्छेनें मोठ्या त्वरेनें तुझ्या सैन्याकडे वळला. तेव्हां युधामन्यु व उत्तमौजा हे त्याचे दोघे चक्ररक्षक तुझ्या सैन्यांत शिरणाऱ्या पार्थाला अनुसरले. धनंजय आपल्या व्यूहाचा भेद करून सैन्यांत प्रवेश करीत आहे हें पहातांच जय, सात्वत, कृतवर्मा, कांबोज व श्रुतायु यांनीं धनंजयाचें निवारण केलें. त्यांच्या मागोमाग सहस्रावधि रथासह अभीषाह, शूरसेन, शिबि, वसाति, मावेल्लक, ललित्थ, केकय, मद्रक, नारायणगण, गोपालगण आणि ज्यांना पूर्वी कर्णानें युद्धांत जिंकलें होतें, ते शूरसंमत कांबोजगण एकत्र जमून निघाले व भारद्वाजाचा पुरस्कार करून त्या सर्वांनीं मिळून पुत्रशोकानें संतप्त झालेल्या महापराक्रमी धनंजयाचा प्रतिकार केला. तेव्हां त्यांचें अर्जुनाशीं तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. हे महाराज, त्यावेळीं व्याधींचा प्रतिकार करणाऱ्या ओषधीप्रमाणें त्या सर्व वीरांनीं मिळून पार्थाचें निवारण केलें. ७. ५. ९१.

---

## अध्याय ९२ वा.

[ १ पार्थाचें द्रोणाशीं युद्ध. २ भोजराजावर चाल. ३ श्रुतायुधाचा वृत्तान्त. त्याचा वध. ४ सुदक्षिणाचा वध.

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें कौरववीरांनीं अर्जुनाचें निवारण केलें असतां, तो रथिश्रेष्ठ मोठ्या वेगानें द्रोणावर धांवून गेला व सूर्याच्या प्रखर किरणाप्रमाणें प्रदीप्त शरजालानें सर्व शत्रुसैन्यास त्रस्त करूं लागला. त्यानें गजाश्वांचा संहार चालविला. अशाप्रकारें सर्व सैन्यास कंपित करून आपली प्रतिज्ञा सत्य करूं इच्छिणारा तो इंद्रात्मज द्रोणावर चालून गेला असतां आचार्यांनें आपल्या शिष्यावर वीस बाण सोडले. तथापि पार्थानें ब्रह्मास्त्र सोडून त्या सर्व बाणांचा छेद केला.

हे महाराज, त्यावेळीं आचार्यांचें अद्भुत युद्धकौशल्य आमच्या दृष्टीं पडलें. धनुर्धर पार्थानें कितीहि यत्न केला, तरी तो द्रोणाला विद्ध करूं शकला नाहीं. सहस्रशः जलधारांचा वर्षाव करणाऱ्या मेघाप्रमाणें द्रोणानें अर्जुनावर शरवृष्टि चालविली. त्या शरजालाचें पार्थानें ब्रह्मास्त्र सोडून निवारण केलें. तथापि द्रोणानें पुनः कृष्णार्जुनांवर असंख्य बाण सोडले व अर्जुनानें त्याहि तीक्ष्ण बाणांचा छेद केला. तेव्हां आचार्य त्या दोघां नरश्रेष्ठांचा वध करण्याच्या विचारांत आहे, हें पाहून ते दोघे रथिश्रेष्ठ त्या दुर्धर्षाला सोडून दुसरीकडे वळले. त्यावेळीं द्रोणाचार्य युगान्त अग्नीप्रमाणें भासत होता.

( २ ) इकडे कौन्तेय द्रोणाच्या तीक्ष्ण शरांना चुकवून भोजराजाकडे वळला व त्याच्या सैन्याचा नाश करूं लागला. त्या किरीटमालीनें मैनाकपर्वताप्रमाणें द्रोणाला वर्ज करून कृतवर्मा व कांबोज यांच्यावर चाल केली. तथापि तो भोज यत्किंचित्हि भ्रांत झाला नाहीं. त्यानें दहा कंकपत्र बाणांनीं पार्थाला विद्ध केलें. तेव्हां पार्थानेंहि उलट त्याच्यावर शंभर बाण सोडले. याप्रमाणें त्या दोघांचें बराच वेळ युद्ध झालें.

तेव्हां या दोघांच्या युद्धांतच सर्व दिवस जाईल कीं काय अशी वार्ष्णेयाला चिंता वाटूं लागली व तो पार्थाला म्हणाला—" हे पार्था, या कृतवर्म्यावर दया करूं नको. आप्तसंबंध सर्व बाजूला ठेवून याचा वध कर. "

कृष्णाची ही सूचना ऐकतांच पार्थानें कृतवर्म्याला शरानें मोहित करून कांबोजाच्या सैन्यावर चाल केली. तें पाहून कृतवर्मा अर्जुनाच्या दोघां चक्र-रक्षकांवर धांवला. ते दोघेहि पांचाल पार्थाच्या मागोमाग निघाले असतां कृतवर्म्यानें आपला रथ मध्यें घालून त्यांचा निरोध केला. तेव्हां त्याचें त्या दोघांशीं युद्ध जुंपलें.

इकडे अर्जुनानें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. परंतु त्याच्या चक्ररक्षकांना कृत-वर्म्यानें अडविल्यामुळें त्या दोघां पांचालांना आंत शिरण्यास मार्ग सांपडला नाहीं. ते दोघे तुझ्या सैनिकांशीं युद्ध करण्यांत गुंतले असतां पार्थ कौरव-सेनेला त्रस्त करीत पुढें निघाला. कृतवर्मा हातीं आला असतांहि त्या परंत-पानें त्याचा वध केला नाहीं.

धनंजय त्वरेनें पुढें येत आहे, हें पाहून श्रुतायुधराजा त्याचा प्रतीकार कर-ण्यासाठीं पुढें सरसावला. त्यानें पार्थावर तीन व कृष्णावर सत्तर बाण सोडिले,

तेव्हां अर्जुनानें नव्वद बाण सोडून त्याला विद्ध केलें. त्याचे अश्व व सारथि यांचा वध केला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें.

( ३ ) तो वीर श्रुतायुध वरुणाचा पुत्र होता. शीतलजल 'पर्णाशा' महानदी त्याची माता होय. एकदा ती वरुणाला म्हणाली—'हा माझा पुत्र या लोकीं शत्रुला अवध्य व्हावा.'

तेव्हां वरुण तिला प्रेमपूर्वक म्हणाला—"मी याला एक हितावह वर आणि दिव्य अस्त्र देतों. त्याच्या योगानें हा तुझा पुत्र अवध्य होईल. या लोकीं मानवाला कदापि अमरत्व प्राप्त होत नसतें, उत्पन्न झालेल्या सर्व प्राण्यांना मरण येणें अवश्य आहे. तथापि हा तुझा पुत्र अस्त्रप्रभावानें युद्धामध्यें शत्रूला अजिंक्य होईल. यास्तव तुझी चिंता दूर होवो."

असें बोलून वरुणानें त्याला मंत्रयुक्त गदा दिली. त्या गदेमुळें हा श्रुतायुध सर्व लोकांत दुराधर्ष झाला आहे. तो जलेश्वर वरुण पुनः त्याला म्हणाला—"तुझ्याशीं युद्ध न करणारावर मात्र ही गदा तूं कदापि फेकूं नकोस. तसें केल्यास ती उलट तुझ्यावरच येऊन पडेल. ही गदा प्रतिस्पर्धा करणाराचा वध तरी करील, किंवा त्याच्या अभावीं तिचा प्रयोग करणावर तरी उलट फिरेल."

राजा धृतराष्ट्रा, वरुणानें असें सांगून ठेविलें असतांहि श्रुतायुधानें या नियमाचें पालन केलें नाहीं. त्यानें ती वीरघातिनी गदा जनार्दनावर फेंकली. तेव्हां श्रीकृष्णानें तो प्रहार आपल्या स्कंधप्रदेशावर झेलून घेतला. तथापि विंध्यपर्वतास कंपित करण्यास असमर्थ असलेल्या वायूप्रमाणें ती गदा शौरीला कंपित करूं शकली नाहीं. योग्यप्रकारें अनुष्ठान न झाल्यास तें करणारावरच उलटणाऱ्या अभिचारदेवतेप्रमाणें ती गदा परत फिरली आणि समरांगणांत स्थित असलेल्या श्रुतायुधाला गतप्राण करून भूमीवर पडली.

हे प्रभो, ती गदा परत आली व तिच्या आघातानें श्रुतायुध हत झाला, हें पाहून तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला. तो वीर स्वतःच्याच आयुधानें मृत झाला, हें पाहून सर्व सैनिक भयभीत झाले. श्रुतायुधानें युद्ध न करणाऱ्या केशवावर गदाप्रहार करून स्वतःचें मरण ओढवून घेतलें. वरुणाच्या वचनाप्रमाणें सर्व वीरांच्या समक्ष तो निधन पावला. तो पर्णाशेचा प्रिय पुत्र

याप्रमाणें मृत होऊन पडला असतां वायूनें भग्न होऊन पडलेल्या शाखांयुक्त वृक्षाचाच भास झाला.

( ४ ) याप्रमाणें श्रुतायुध मृत होऊन पडतांच कौरवांचें सैन्य व सेनापति पळत सुटले. तेव्हां कांबोजाधिपाचा पुत्र सुदक्षिण पार्थावर धांवला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. त्यानें अर्जुनावर 'सर्वपारसवी'-नामक शक्ति सोडली असतां ती पार्थाला विद्ध करून भूमीवर पडली. त्या प्रज्वलित शक्तीच्या प्रहारानें धनंजयाला क्षणभर मूर्च्छा आली. परंतु तो तत्काल सावध झाला व सुदक्षिणावर तीक्ष्ण बाणांची वृष्टि करूं लागला. क्रुद्ध झालेल्या पार्थानें त्याचे अश्व, ध्वज, धनुष्य व सारथि यांसह त्याला विद्ध केलें. त्याचा रथ भग्न करून टाकिला व शेवटीं एक तीक्ष्ण धारेचा बाण सोडून त्या कांबोजाधिपाचें हृदय विदीर्ण करून टाकिलें. तेव्हां गिरिशिखरावरून झंझावातानें मोडून खालीं पडणाऱ्या कर्णिकार वृक्षाप्रमाणें चेतनाशून्य झालेला त्याचा मृतदेह भूमीवर पडला.

सुदक्षिण अतिशय सुंदर होता, त्याचे नेत्र आरक्त होते. तो मरण पावल्यानंतर तेजस्वी कांचनमाला धारण करणारें त्याचें शरीर भूमीवर पडलें असतांहि फार शोभत होतें. याप्रमाणें श्रुतायुध व कांबोज या दोघांचाहि वध झालेला पहातांच तुझ्या पुत्राच्या सर्व सैन्यांनीं पलायन केलें. ७. ५. १२.

---

## अध्याय ९३ वा.

[ १ श्रुतायु-अच्युतायूंचा वध. २ अर्जुनाचा पराक्रम. ३ अंबष्ठवध. ]

( १ ) संजय—राजा, सुदक्षिण व श्रुतायुध या दोघां वीरांचा वध झालेला पहातांच तुझे दुसरे सैनिक क्रुद्ध होऊन पार्थावर धांवले. त्यांत अभीषाह, शूरसेन, वसाति व शिबि यांनीं अर्जुनाला बाणांनीं झांकून टाकलें. तथापि अर्जुनानें आपल्या शरजालांनीं त्यांचा पराभव केला, तेव्हां ते व्याघ्राच्या भीतीनें पळणाऱ्या क्षुद्रमृगांप्रमाणें पळत सुटले, परंतु तत्काल पुनः मार्गे वळले व त्यांनीं धनंजयाला चोहोंबाजूंनीं परिवेष्टित केलें.

अर्जुनानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्या सैनिकांचीं मस्तकें तोडून खालीं पाडविलीं. तेव्हां श्रुतायु व अच्युतायु हे दोघे वीर पार्थावर तुटून पडले आणि

त्यांनीं त्या पांडवावर बाणांची वृष्टि चालविली. क्रुद्ध श्रुतायूनें तोमराचा प्रहार केला. त्यानें पार्थ अतिशय विह्वल होऊन मूर्च्छित झाला. त्याची ती स्थिति पाहून श्रीकृष्णहि क्षणभर मोहित झाला. इतक्यांत अच्युतायूनें तीक्ष्ण शूलानें धनंजयाला ताडन केलें. तेव्हां क्षतावर क्षार ओतल्याप्रमाणें पार्थ अतिशय विद्ध झाला व त्यानें ध्वजदंडाचा आश्रय केला.

तें पाहून तुझे सैनिक 'धनंजय मरण पावला' असें समजून मोठ्यानें सिंहनाद करूं लागले. पार्थाला चेतनाशून्य झालेला पहातांच कृष्णहि अतिशय क्षुब्ध झाला व प्रेमल शब्दांनीं त्याला सावध करूं लागला. इतक्यांत त्या दोघां रथिश्रेष्ठांनीं वासुदेवासह अर्जुनाचा रथ शरांनीं झांकून टाकिला. त्यांचें तें अद्भुत युद्धकौशल्य पाहून सर्व लोक विस्मित झाले.

हे भारता, इकडे अल्पावकाशांतच, यमलोकीं जाऊन परत येणाऱ्या जीवाप्रमाणें पार्थ सावध झाला व नेत्र उघडून पाहूं लागला, तों 'आपला रथ केशवासह शरजालानें झांकून गेला असून अग्नीप्रमाणें देदीप्यमान शत्रु पुढें उभे आहेत' असें त्याच्या दृष्टीं पडलें. तेव्हां पार्थानें शक्रास्त्र सोडलें. त्या अस्त्रापासून सहस्रावधि नतपर्व बाण उत्पन्न झाले. त्या बाणांनीं शत्रूंच्या शरजालांचें चूर्ण करून टाकिलें व श्रुतायु आणि अच्युतायु या दोघां वीरांचीं मस्तकें तोडून खालीं पाडविलीं. तेव्हां ते दोघे वायूनें उन्मुलून पडणाऱ्या वृक्षांप्रमाणें भूतलावर पडले. त्या दोघां वीरांना अनुसरणाऱ्या मुख्य मुख्य वीरांचा त्यांच्या पन्नास अनुयायांसह वध करून पार्थानें कौरवसेनेंत प्रवेश केला.

( २ ) याप्रमाणें श्रुतायु व अच्युतायु यांचा वध झालेला पहातांच त्यांचे पुत्र नियुतायु व दीर्घायु पितृवधामुळें क्रोधसंतप्त होऊन कौन्तेयावर धांवले. परंतु पार्थानें क्षणार्धांतच त्यांना यमसदनीं पाठवून दिलें. कमलसरोवर तुडविणाऱ्या मत्त गजाप्रमाणें पार्थ तुझ्या सैन्याचें मर्दन करीत असतां एकहि क्षत्रियश्रेष्ठ त्याचें निवारण करूं शकला नाहीं. युद्धकलेंत निष्णात असलेल्या सहस्रावधि अश्वसादींनीं त्या पांडवाला वेढून टाकिलें. दुर्योधनाच्या आज्ञेनें प्राच्य, दाक्षिणात्य व कलिंग देशांतील मुख्य मुख्य नृपाल आपापल्या पर्वतप्राय गजसैन्यांसह अर्जुनावर चालून आले. तथापि त्या सव्यसाचीनें त्या सर्वांचीं मस्तकें व भूषणयुक्त बाहु यांचा क्षणार्धांत छेद केला.

नंतर आसुरी माया जाणणारे कृष्णवर्णाचे दुराचारी यवन, पारद, शक, बाह्लीक, द्राविड, म्लेच्छ, दरद, पुंड्र यांच्या असंख्य सैन्यांनीं अर्जुनावर शरांचा वर्षाव चालविला. त्यावर पार्थानें केलेल्या प्रचंड शरवृष्टीनें अंतरिक्षांतून येत असलेल्या शरभांप्रमाणें किंवा अभ्राच्छादित आकाशाप्रमाणें सर्व सैन्यांवर अंधकार पसरला.

अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रभावानें सर्व मुंड, अर्धमुंड, श्मश्रूयुक्त जटिल इत्यादि सर्व म्लेच्छसंघांचा संहार केला. त्यावेळीं तेथें रक्ताची दारुण नदीच निर्माण झाली. क्रुद्ध झालेल्या धनंजयानें तुझें सैन्य दग्ध करून सोडलें. त्यावेळीं कृष्ण वायूप्रमाणें त्याला प्रज्वलित करीत असून तो अग्नितुल्य पार्थ आपल्या शरांच्या ज्वालांनीं अरण्याप्रमाणें तुझ्या सैन्याला दग्ध करीत होता. त्यानें अनेक रथ उध्वस्त केले व भूमि मृतदेहांनीं आच्छादित केली.

( ३ ) याप्रमाणें धनंजयानें कौरवसभेंत प्रवेश करून संहार चालविला असतां अंबष्ठानें त्याचें निवारण केलें व तो वीर गदायुद्ध करूं लागला. तेव्हां पार्थानें अंबष्ठाच्या गदेचें आपल्या तीक्ष्ण शरांनीं चूर्ण करून टाकिलें व दुसरा एक बाण सोडून त्याच्या मस्तकाचा छेद केला. तेव्हां यंत्राचें बंधन तुटलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें त्याचा देह भूमीवर पडला. त्यावेळीं सर्व सैनिक असंख्य गजाश्वांसह पार्थाच्या सभोंवार जमले असतां तो इंद्रात्मज मेघांनीं आवृत्त झालेल्या भास्कराप्रमाणें शोभला. ७. ५. ९३.

---

## अध्याय ९४ वा.

[ १ दुर्योधन-द्रोणसंवाद. २ दुर्योधनाला मंत्रयुक्त कवचाचें प्रदान. ३ सुवर्ण-कवचाचा पूर्ववृत्तान्त. ]

( १ ) हे महाराज, सिंधुराजाच्या वधेच्छेनें कौन्तेयानें दुस्तर द्रोणसैन्याचा व भोजसैन्याचा भेद केला. कौरवसेनेंत प्रवेश करून सुदक्षिण व श्रुतायुध यांचा वध केला. सैन्यांना त्रस्त करून दाही दिशांत उधळून लाविलें. तें पाहून तुझा पुत्र दुर्योधन एकटाच मोठ्या वेगानें द्रोणाचार्यांकडे निघाला व आपला रथ त्यांच्या समीप नेऊन त्यांस असें म्हणाला—

दुर्योधन—हे आचार्य, पुरुषव्याघ्र अर्जुन या महाचमूचा संहार करीत आपल्या व्यूहांत शिरला आहे आणि त्यानें दारुण प्राणहानि आरंभिली आहे.

यास्तव आतां आपण त्याचा प्रतिकार कसा करावा, याचा विचार करा. ज्यायोगें जयद्रथाचा वध होणार नाहीं, अशी कांहीं तरी योजना करा. तुम्हीच आमचा आधार अहांत. शुष्क तृणाचें भस्म करणाऱ्या अग्नीप्रमाणें हा पार्थ माझ्या सैन्याला दग्ध करीत आहे. या अभेद्य व्यूहाचेंहि उल्लंघन करून कौन्तेय पुढें चालला आहे, त्यामुळें जयद्रथाच्या जीविताविषयीं सर्व वीर साशंक झाले आहेत. द्रोण जिवंत असेपर्यंत अर्जुन त्याचें अतिक्रमण करूं शकणार नाहीं, असें आतांपर्यंत सर्व सैनिक समजत होते. पण पांडव आपल्या प्रतिबंधाला न भितां सैन्यांत शिरला. तें पाहून सर्व वीर भयभीत झाले आहेत.

हे ब्रह्मन्, आपण सदैव पांडवांच्या हितासाठीं झटत असतां, हें मी जाणून आहें. तथापि कार्याचें महत्त्व जाणून मी पुनः पुनः मोहित होतों व आपलीं आर्जवें करावयास येतों. मीं आपली वृत्ति उत्तमप्रकारें ठेविली आहे. आपला चरितार्थ चालवून आपणांस संतुष्ट ठेवण्यांत मी नेहमीं तत्पर असतों, तथापि आपण मात्र तें स्मरत नाहीं. आम्ही नित्य आपल्या भक्तींत रत असतांहि आपण आमचें श्रेय चिंतित नाहीं आणि आमचें अप्रिय करण्यांत तत्पर असलेल्या पांडवांवर मात्र आपण प्रसन्न असतां. आपली उपजीविका आमच्यावर चालली आहे, याचें आपल्याला विस्मरण पडलेलें दिसतें, म्हणूनच आमचें अप्रिय करण्यास असे धजत अहां.

आपण मधामें माखलेल्या सुऱ्याप्रमाणें असाल याची मला कल्पना नव्हती. अर्जुनाचा निग्रह करण्याचें जर आपण मला आश्वासन दिलें नसतें, तर मीं स्वगृहीं जाण्यास सज्ज झालेल्या जयद्रथाला ठेवून घेतलेंच नसतें. मीं निवारण केलें म्हणून तो राहिला. खरोखर मीं मंदमतीनें आपल्याकडून त्याचें रक्षण होणार नाहीं, असा विचारहि मनांत आणला नाहीं व मोहानें बिचाऱ्या जयद्रथास मृत्यूच्या हातीं दिलें. प्रसंगीं मृत्यूच्या दाढेंत गेलेला मनुष्यहि सुटून येईल, पण अर्जुनाच्या हातीं सांपडलेला जयद्रथ कदापि जिवंत सुटणार नाहीं. यास्तव हे आचार्य, माझ्या या दुःखार्त होऊन केलेल्या प्रलापाचा रोष मानूं नका व सैंधवाचें रक्षण करा.

द्रोण—हे विशांपते, मला तुझ्या बोलण्याचा यत्किंचित्हि रोष वाटत नाहीं. तूं माझ्या अश्वत्थाम्यासारखाच आहेस. हे राजा, अर्जुनाच्या विजयाचें कारण मी तुला सांगतों ऐक. श्रीकृष्ण अतिशय निष्णात सारथि आहे. त्याचे

जातिवंत अश्व अत्यंत वेगवान् आहेत. त्यामुळें अर्जुनाला अल्पसें अंतर दृष्टीं पडतांच त्वरेनें तेथून रथ नेतां येतो. पार्थ वेगानें जात असतां त्यानें सोडलेले शर कोसभर मागें राहिलेले दिसतात.

बा दुर्योधना, मी आतां वृद्ध झालों आहें. माझ्यानें तेवढ्या वेगानें जाववत नाहीं. शिवाय आपल्या सैन्याच्या मुखाशींच पांडवांचें सैन्य स्थित आहे. 'अर्जुन जर समीप नसेल तर मी धर्मराजास धरीन' अशी मीं सर्व क्षत्रियांच्या समक्ष प्रतिज्ञा केली होती. त्याप्रमाणें आज धनंजय दूर गेला असून युधिष्ठिर माझ्या संमुख स्थित आहे, त्यामुळें मला व्यूहमुख सोडून पार्थाच्या मागें जातां येत नाहीं.

तथापि हे राजा, अर्जुनाशीं युद्ध करण्यास तुला पुष्कळांचें साह्य आहे. तो कुलवान् व पराक्रमी पांडव सर्व प्रकारें तुझ्या तुल्य आहे. तो एकटाच व्यूहांत शिरला आहे. यास्तव तूं स्वतःच त्याच्याशीं युद्ध कर, जा. भिऊं नकोस. अरे, तूं सर्व जगाचा पति आहेस. परपुरंजय वीर आहेस. तस्मात् जेथें तो धनंजय असेल, तेथें तूं स्वतः जा.

दुर्योधन—हे आचार्य, आपण सर्व शस्त्रधारण करणाऱ्या वीरांत श्रेष्ठ असूनहि पार्थानें ज्याअर्थी आपलेंहि अतिक्रमण केलें, त्याअर्थी मला त्याचें निवारण करतां येणें अशक्य आहे ! वज्रपाणि इंद्रालाहि प्रसंगीं जिंकतां येईल; पण अर्जुनाला युद्धांत जिंकणें अशक्य आहे. ज्यानें अमरतुल्य आपण व हार्दिक्य भोज यांना जिंकलें, श्रुतायु, सुदक्षिण, अंबष्ठ, यांचा वध केला व सहस्रावधि म्लेच्छ वीरांचा संहार केला, त्या अग्नीप्रमाणें जाज्वल्य व शस्त्रनिपुण धनंजयाशीं मी कसा युद्ध करूं ? मीं आज पार्थाशीं युद्ध करावें, असें जर आपल्याला वाटत असेल, तर माझ्या यशाचें आपणच रक्षण करा. मी आपला दास आहें.

द्रोण—हे कौरवा, तूं म्हणतोस तें सत्य आहे. धनंजय युद्धांत खरोखर अजिंक्य आहे. तथापि मी आज तुला त्याचा पराक्रम सहन करण्यास समर्थ करितों. वासुदेवाच्या समक्ष तूं पार्थाचा निरोध केला आहेस आणि तो धनुर्धर तुझ्याशीं युद्ध करीत आहे, असें अद्भुत दृश्य आज सर्व लोकांच्या दृष्टीं पडेल. मी तुला सुवर्णकवच देतों. तें धारण केलें असतां तुला युद्धांत शर किंवा अस्त्रें यांपासून यत्किंचित्‌हि पीडा होणार नाहीं. सुरासुर, यक्ष, राक्षस,

उरग व मानव यांसह समग्र त्रिभुवन जरी एकत्र होऊन तुझ्याशीं युद्ध करूं लागलें तरीहि तुला त्यापासून भय नाहीं. कृष्ण, कौन्तेय किंवा अन्य कोणताहि शस्त्रधारी वीर तुझ्या या कवचावर शर सोडण्यास समर्थ होणार नाहीं. यास्तव हें कवच धारण करून तूं स्वतःच क्रुद्ध झालेल्या अर्जुनावर चालून जा. आज तुझाच पराक्रम त्याला सहन होणार नाहीं.

( २ ) संजय—हे महाराज, असें बोलून द्रोणानें मोठ्या त्वरेनें जलस्पर्श केला, तें भास्वर कवच घेऊन मंत्राचा यथाविधि जप केला आणि आपल्या हातानें तें अद्भुत कवच दुर्योधनाच्या अंगावर चढविलें. त्या महायुद्धांत तुझ्या पुत्राचा जय व्हावा आणि आपल्या विद्येचाहि लोकांना विस्मय वाटावा, या दोन हेतूंनीं त्या ब्रह्मवित्तमानें तें मंत्रयुक्त दिव्य कवच दुर्योधनाच्या अंगावर चढविलें.

( ३ ) तें कवच चढविते वेळीं द्रोणाचार्य म्हणाला—" हे भारता, ब्रह्मा, ब्राह्मण, सरीसृप, इत्यादि जेवढे श्रेष्ठ आहेत, ते सर्व तुझें कल्याण करोत. ययाति, नाहुष, धुन्धुमारु, भगीरथ, हे राजर्षि तुझें सर्वदा कुशलचिंतन करोत. एकपाद, बहुपाद व अपाद यांपासून या महारणांत तुझें क्षेम असो. स्वाहा, स्वधा व शचि तुझें सर्वदा कल्याण करोत. त्याचप्रमाणें लक्ष्मी, अरुंधती, असित आणि वसिष्ठादि सप्तर्षि तुझें रक्षण करोत. धाता, विधाता, दिशांचे अधिपति विवस्वान्, ऐरावत, वामन, आंजन आणि सार्वभौम हे चार दिग्गज व पृथ्वीला धारण करणारा शेष हे सर्व तुझें कुशल करोत.

हे दुर्योधना, पूर्वी वृत्रासुरानें युद्धांत पराक्रम गाजवून देवांना जिंकून त्यांचे देह सहस्रधा विदीर्ण केले होते. इंद्रासह त्या सर्व अमरांचें तेज व बल नष्ट झालें. तेव्हां ते सर्व देव ब्रह्मदेवास शरण गेले.

देव—हे सुरश्रेष्ठ, वृत्रासुरानें आम्हांला ग्रस्त केलें आहे. आम्हां देवांची तूंच गति आहेस. या महाभयापासून आमचें रक्षण कर.

त्यावेळीं विष्णु बाजूला उभा राहिला होता व इंद्रादि देव खिन्न झाले होते. त्यांच्याकडे पहात ब्रह्मदेव म्हणाला—"हे सुरश्रेष्ठहो, द्विज व इंद्र यांसह सर्व देव मला रक्षणीय आहेत. तथापि ज्यानें वृत्रासुराला उत्पन्न केलें, तें त्वाष्ट्रतेज अतिशय दुर्धर आहे. पूर्वी त्वष्ट्यानें दहा लक्ष वर्षें तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतलें व त्या रुद्राच्या वरानें वृत्रासुराला उत्पन्न केलें.

त्या महेश्वराच्या प्रसादानें वृत्रासुर अतिशय बलाढ्य झाला आहे. यास्तव तुम्ही सर्व देव शंकराच्या निवासस्थानाकडे जाऊन त्या पिनाकपाणीला जर प्रसन्न न कराल, तर तो बलवान् शत्रु तुमचा वध केल्यावांचून रहाणार नाहीं. पण तुम्ही जर त्या कैलासाधीशाचें दर्शन घ्याल तर वृत्रासुराला जिंकूं शकाल. यास्तव सत्वर मंदर पर्वतावर जा.

त्यानंतर ब्रह्मदेवासह सर्व देव मंदराचलावर गेले. तेथें कोटिसूर्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे, अशा तेजोनिधान शंकराचें त्यांनीं दर्शन घेतलें. तेव्हां तो सर्वभूतेश्वर त्यांना म्हणाला—" हे देवहो, तुमचें स्वागत असो. मी तुमचें कोणतें प्रिय करावें, तें सांगा. माझें दर्शन विफल होऊं नये व तुमचेंहि कार्य व्हावें, अशी माझी इच्छा आहे."

देव—हे महेश्वरा, वृत्रासुरानें आमचें तेज हरण केलें आहे यास्तव तूं आमचा आश्रय हो. आमचीं शरीरें शस्त्रप्रहारांनीं कशीं क्षतयुक्त झालीं आहेत, पहा ! आम्ही तुला शरण आलों आहों. आमचें रक्षण कर.

शर्व—हे देवहो, ही महाबलाढ्य कृत्या, त्वष्ट्याच्या तेजापासून उत्पन्न झाली असून ती अजितेंद्रियांना अजिंक्य आहे, हें तुम्ही जाणतांच ! याप्रसंगीं सर्व देवांना साह्य करणें, हें माझें कर्तव्य आहे. हे सुरेश्वर शक्रा, माझ्या देहापासून उत्पन्न झालेलें हें भास्वर कवच घे आणि सुरशत्रु वृत्रासुराच्या नाशासाठीं हा मानसमंत्र ग्रहण कर. ( या मंत्राचा केवल मनांतच उच्चार करावयाचा असतो. )

द्रोण—राजा दुर्योधना, असें बोलून त्या वरदप्रभूनें तें कवच व तो मंत्र इंद्राला दिला. तेव्हां त्या कवचानें सुसंरक्षित असलेला इंद्र वृत्रावर चालून गेला. त्या दारुण महायुद्धांत नानाप्रकारच्या शस्त्रांचे आघात होत असतांहि त्या अभेद्य कवचामुळें इंद्र अक्षत राहिला व त्यानें वृत्राचा वध केला.

पुढें इंद्रानें तें दिव्य कवच मंत्रासह अंगिरामुनीला अर्पण केलें. मुनीनें तें आपल्या 'बृहस्पति'-नामक मंत्रज्ञ पुत्राला दिलें. बृहस्पतीनें अग्निवेश्याला अर्पिलें आणि अग्निवेश्याकडून तें मला मिळालें. हे नृपश्रेष्ठा, तेंच हें कवच मी तुझ्या रक्षणार्थ मंत्रपूर्वक तुला देत आहें.

संजय—राजा धृतराष्ट्रा, असें बोलून द्रोणाचार्य क्षणभर स्तब्ध बसला व नंतर तुझ्या पुत्रास म्हणाला—" हे भारता, मी ब्रह्माच्या उपदेशानुसार हें

कवच तुझ्या देहावर बांधतों. पूर्वी युद्धामध्यें हिरण्यगर्भानें विष्णूला जसें कवच बांधलें, किंवा तारकासुराच्या संग्रामांत ब्रह्मदेवानें इंद्राच्या अंगावर जसें कवच चढविलें, तसें मी तुझ्या अंगावर हें कवच बांधतों."

नंतर त्या द्विजसत्तमानें तें कवच मंत्रपूर्वक यथाविधि त्याच्या अंगावर चढविलें व त्याला अर्जुनाशीं युद्ध करण्यास पाठवून दिलें. तेव्हां आचार्यांच्या कवचानें शोभणारा तो तुझा पुत्र अनेक महारथ व विपुल सैन्य यांसह पार्थाकडे वळला. तेव्हां तुझ्या सैन्यांत प्रचंड सिंहनाद झाला. ७. ५. ९४.

---

## अध्याय ९५ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, कृष्णार्जुन व्यूहांत शिरले असतां त्यांच्या मागोमाग दुर्योधन गेला. तेव्हां सोमकांसह पांडव वेगानें द्रोणावर चालून आले आणि व्यूहाच्या अग्रभागीं त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. रथांनीं शोभणाऱ्या दोन्ही प्रमुख सेना एकत्र झाल्या. त्यावेळीं वर्षा ऋतूंत गंगा व यमुना या दोन नद्या तुडुंब भरून जशा वेगानें एकमेकींत मिसळून जातात, तशा त्या कौरव-पांडवांच्या प्रचंड सेना एकमेकींत शिरल्या. असंख्य शस्त्रास्त्रांची वृष्टि झाली. द्विजश्रेष्ठ द्रोणाचार्य पांडवांच्या सेनेंत शिरून तिला क्षुब्ध करूं लागला. तेव्हां वाळूचा बांध फोडून वहात जाणाऱ्या जलप्रवाहाप्रमाणें पांडवहि अतिशय वेगानें द्रोणावर धांवले. तथापि जलप्रवाहाला अडवून धरणाऱ्या पर्वताप्रमाणें द्रोणानें क्रुद्ध झालेले पांडव, पंचाल व केकय यांचें निवारण केलें.

तेव्हां इतरहि नृपाल पुढें सरसावले व त्यांनीं पांचालांस चोहोंकडून वेढून टाकिलें. तें पाहून पांडवांसह नरश्रेष्ठ पार्षतानें शत्रुसैन्याचा भेद करण्यासाठीं द्रोणावर शरवृष्टि चालविली आणि तो व द्रोण यांचें तुमुल युद्ध जुंपलें. द्रोणाचार्य आपली शिकस्त करीत असतांहि पार्षतानें तुझ्या सैन्याचा त्रिधा भेद केला. तेव्हां कांहीं सैन्य भोजराजाकडे वळलें, कांहींनीं जलसंधाकडे धांव घेतली व कित्येकांनीं द्रोणाचा आश्रय केला.

रथिश्रेष्ठ द्रोण आपल्या सैन्याला एकत्र जमवीत होता व धृष्टद्युम्न त्या सेनेला उधळून लावीत होता. याप्रमाणें कौरवसैन्याची वाताहत चालली

असतां सृंजय व पांडव यांनीं त्यांचा संहार मांडला. धृष्टद्युम्नानें मोहित केलेल्या वीरांना साक्षात् यमच ग्रासीत आहे कीं काय असा भास झाला. हे महाराज, अन्यायी राजाचें राष्ट्र दुष्काळ, व्याधि व तस्कर यांच्या योगानें जसें पीडिलें जातें, तसें तुझें सैन्य त्रस्त होऊन पांडवांच्या भयानें पळूं लागलें.

शत्रूचा हा पराक्रम द्रोणाला सहन झाला नाहीं. तो शरवृष्टि करीत पांचालावर धांवला आणि द्रोण व पार्षत यांचें तुमुल युद्ध जुंपलें. आचार्यांच्या बाणांनीं विद्ध झालेलें पार्षताचें सैन्यहि इतस्ततः भ्रमण करूं लागलें. याप्रमाणें द्रोण-पार्षत यांच्या शरांनीं पीडित होत असतांहि तीं दोन्ही सैन्यें प्राणांवर उदार होऊन युद्ध करीत होतीं. त्यावेळीं एकहि वीर रणांगण सोडून गेला नाहीं.

इकडे विविंशति, चित्रसेन व विकर्ण यांचें वृकोदराशीं युद्ध जुंपलें. बाह्लीक, कुलपुत्र व अमात्यासह सहसेन यांनीं द्रौपदेयांवर चाल केली. शैब्यराजानें काशिराजाच्या पुत्राचें निवारण केलें. धर्मराज व मद्राधीश शल्य यांचें युद्ध जुंपलें. दुःशासन सात्यकीवर चालून गेला. मीहि कवच चढवून सज्ज झालों व चारशें धनुर्धरांसह चेकितानाचें निवारण केलें. सातशें गांधार वीरांसह शकुनीनें माद्रीपुत्रांस अडविलें. विंदानुविंदांनीं विराटाचें निवारण केलें. शिखंडी व बाह्लीक या दोघांचें युद्ध प्रवृत्त झालें. अवंतीचा अधिपति प्रभद्रक व सौवीर यांनीं धृष्टद्युम्नाचें निवारण केलें. घटोत्कचावर अलायुध धांवला व अलंबुषाशीं कुंतिभोजाचें युद्ध जुंपलें.

याप्रमाणें सैन्याच्या अग्रभागीं भिन्न भिन्न योद्ध्यांचें तुमुल युद्ध जुंपलें असतां सर्व सैन्याच्या पृष्ठभागीं सिंधुराज जयद्रथ स्थित होता व कृपाचार्यादि धनुर्धर त्याचें संरक्षण करीत होते. त्याच्या डाव्या बाजूला कर्ण व उजव्या बाजूला अश्वत्थामा हे दोघे महा समर्थ वीर चक्ररक्षण करीत होते. सौमदत्तिप्रभृति धनुर्धर त्याचे पृष्ठरक्षक होते. अशा प्रकारें कृपाचार्यादि युद्धनिपुण नीतिज्ञ वीर त्या सैंधवाचें संरक्षण करीत युद्धांत तत्पर असलेले दिसत होते. ७. ५. ९५.

---

## अध्याय ९६ वा.

[ १ पूर्वोक्त वीरांचें द्वंद्वयुद्ध. ]

**( १ ) संजय**—हे राजन्, त्यावेळीं कुरु-पांडवांचा कसा अद्भुत संग्राम प्रवृत्त झाला तें मी तुला सांगतों ऐक. व्यूहाच्या अग्रभागीं स्थित असलेल्या भारद्वाजास पराभूत करून त्याच्या सैन्याचा भेद करण्याच्या इच्छेनें पांडव द्रोणाचार्याला भिडले व आपल्या व्यूहाचें रक्षण करून महद्यश संपादन करण्याच्या मनीषेनें आचार्यानें त्यांच्याशीं युद्ध आरंभिलें.

दोघे विंदानुविंद व विराट यांचे दोन मदोन्मत्त गज व सिंह यांच्या प्रमाणें दारुण रणकंदन माजलें. मागें वर्णन केलेले सर्व वीरहि आपापल्या प्रतिस्पर्ध्यांवर तुटून पडले. पांडुपुत्रांनीं शकुनीचा पराभव करून त्याला परत फिरविलें. तेव्हां तो द्रोणसैन्याकडे पळाला. युधिष्ठिर, वृकोदर व माद्रेय यांनीं अनेक वीरांचा पराभव केला व तुझ्या चित्रसेन-विकर्णादि पुत्रांशीं भीमसेनाचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. ७. ५. ९६.

---

## अध्याय ९७ वा.

[ १ द्रोण व धृष्टद्युम्न यांचें युद्ध. ]

**संजय**—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें अंगावर रोमांच उत्पन्न करणारा तो घनघोर रणसंग्राम प्रवृत्त झाला असतां त्रिधा विभागलेल्या कौरवसेनेवर पांडव धांवून गेले. भीमसेन जलसंधावर धांवला. युधिष्ठिरानें ससैनिक कृतवर्म्याशीं युद्ध केलें आणि धृष्टद्युम्न द्रोणावर तुटून पडला. तेव्हां इतर धनुर्धरांनींहि घोर युद्ध आरंभिलें. तीं दोन्ही सैन्यें विविध शस्त्रें घेऊन निर्भयपणें युद्ध करूं लागलीं असतां योद्धयांचा भयंकर संहार होऊं लागला.

इकडे द्रोण व पार्षत परस्परांवर असंख्य बाणांची वृष्टि करीत एकमेकाला जिंकण्याची पराकाष्ठा करीत होते. बराच वेळ त्या दोघांचें निकराचें युद्ध झाल्यावर द्रोणानें धृष्टद्युम्नाचे अश्व, ध्वज, छत्र व पार्ष्णिसारथि यांचा छेद करून त्यांना खालीं पाडविलें व शेवटीं इंद्राच्या वज्राप्रमाणें एक प्राणनाशक

---

१ या पुढील युद्धाचें वर्णन मागच्या अध्यायाप्रमाणेंच असल्यामुळें योद्धयांच्या नांवांचा येथें संक्षेप केला आहे.

बाण आकर्ण ओढून तो पार्षतावर सोडला. इतक्यांत सात्यकीनें चौदा तीक्ष्ण शरांनीं त्या बाणाचे तुकडे केले व आचार्यांनें ग्रासलेल्या त्या पांचालास सोडविलें.

शिनिश्रेष्ठ सात्यकि धृष्टद्युम्नाचें रक्षण करीत आहे, हें पहातांच द्रोणानें त्याच्यावर शरांचा वर्षाव चालविला. तथापि सात्यकीनें द्रोणावर तीक्ष्ण बाण सोडून त्याचें वक्षःस्थल विद्ध केलें. तेव्हां द्रोण-सात्यकींचें युद्ध जुंपलें आहे, असें पहातांच जयाची इच्छा करणाऱ्या सर्व पांचालांनीं पार्षताला तेथून दूर नेलें. ७. ५. ९७.

---

## अध्याय ९८ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ द्रोण-सात्यकियुद्धाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, सात्यकीनें बाणांचे तुकडे करून धृष्टद्युम्नाचें रक्षण केलें, हें त्या अमर्षी आचार्याला सहन झालें नसेल ! त्यानें त्या शैनेयाशीं कसें युद्ध केलें तें मला सांग.

( २ ) संजय—हे महाराज, त्यावेळीं त्या असहिष्णु द्रोणाचार्यांचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. तो महानागाप्रमाणें फूत्कार सोडीत होता. तो तीक्ष्ण धारेचे शर सोडीत मोठ्या वेगानें सात्यकीवर धांवला. त्याचे ते शुभ्र अश्व इतक्या वेगानें धांवत होते कीं, तो अंतरिक्षांतूनच संचार करीत आहे कीं काय, असा भास झाला.

द्रोणरूपी अनावर मेघ आपल्यावर वृष्टि करीत आहे, हें पाहून सात्यकि हंसतच आपल्या सारथ्याला म्हणाला—" हा द्रोण राजा धृतराष्ट्राचा आधार असून त्याच्याच बलावर तो राजा निर्भय आहे. तो द्विज राजपुत्रांचा आचार्य असल्यामुळें सर्वांस वंद्य आहे. तथापि त्या ब्राह्मणानें स्वकर्म सोडून शस्त्र धारण केलें आहे. त्या शूर धनुर्धराकडे सत्वर अश्वांना वळीव. यत्किंचितही भिऊं नको."

सात्यकीच्या आज्ञेप्रमाणें त्याच्या सूतानें मोठ्या वेगानें अश्वांना चालविलें व रथ द्रोणाच्या संमुख नेऊन उभा केला. तेव्हां द्रोण व सात्यकि यांचें

तुमुल युद्ध जुंपलें. शरजालांनीं अंतरिक्ष झांकून गेले, सर्वत्र अंधकार पसरला. तेव्हां इतर सर्व वीर हतबल झाले. परंतु शीघ्रास्त्रवेत्त्या त्या उभय धनुर्धरांनीं परस्परांच्या शरजालांचा छेद करून दारुण युद्ध आरंभिलें व सर्व दिशा शरांनीं व्यापून टाकिल्या.

याप्रमाणें त्या दोघां महात्म्यांचें विलक्षण युद्ध प्रवृत्त झालें असतां युधिष्ठिराचे व आमचे वीर स्तब्ध राहून तें पाहूं लागले. ते दोघे पुरुष-व्याघ्र परस्परांचीं अस्त्रें चुकवून अनेक प्रकारानें मागें पुढें होत प्रहार करीत होते. त्यांचें तें अद्भुत युद्धकौशल्य पाहून विमानस्थ ब्रह्म-सोमादि देव, सिद्ध-चारणांचे समुदाय, विद्याधर व महोरग विस्मित झाले. सात्यकीचें तें रणां-गणांतील अतिमानुष कर्म पाहून द्रोणाचार्य मनांत म्हणाला कीं, या सात्वत श्रेष्ठाचें अस्त्रबल परशुराम, धनंजय किंवा भीष्म यांच्या तुल्य आहे.

मनांत असा विचार करून द्रोणानें सात्यकीच्या पराक्रमाचा गौरव केला. त्याचें तें इंद्रतुल्य हस्तलाघव पाहून इंद्रासह सर्व देव संतुष्ट झाले. त्या दोघां श्रेष्ठ वीरांचें अस्त्रयुद्ध सुरू झालें असतां देव-गंधर्वादि विस्मित झाले. द्रोण जें अस्त्र सोडीत होता, त्याच्या उलट सात्यकीचा अस्त्रप्रयोग होऊं लागला. तेव्हां अस्त्रज्ञ द्रोणहि क्षणभर भ्रान्त झाला.

नंतर आचार्यानें त्याच्या वधार्थ दिव्यास्त्र सोडिलें. तें महा घोर अग्न्यस्त्र पाहतांच सात्यकीनें वारुणास्त्र सोडून त्याला प्रतिकार केला. तेव्हां तीं दिव्यास्त्रें पाहून दोन्ही सैन्यांत मोठा हाहाकार उडाला. खग आकाशांत संचार करि-नासे झाले. अभिमंत्रित केलेलीं तीं दिव्य अस्त्रें सुटतांच भास्करहि माध्याह्नींच परावृत्त होऊं लागला.

राजेंद्रा, त्यावेळीं चौघे पांडुपुत्र सात्यकीच्या संरक्षणार्थ त्याच्या भोंवतीं जमले. विराट, केकय, मत्स्य, शाल्वेय व सेना यांच्यासह धृष्टद्युम्नादि वीर मोठ्या वेगानें द्रोणावर धांवले. दुःशासनानेंहि असंख्य राजपुत्रांसह द्रोणाला वेढा देऊन त्याचें रक्षण केलें. तेव्हां त्या दोन्ही पक्षांतील योद्ध्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. ७. ५. ९८.

---

## अध्याय ९९ वा.

[ १ वासुदेवाचें रथकौशल्य. २ विंदानुविंदांचा वध. ३ श्रांत झालेल्या अश्वांना कृष्णानें दिलेली विश्रांति. ४ अश्वांच्या तृषानिवारणार्थ सरोवरनिर्माण व नारदमुनींचें दर्शन. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, आदित्य अस्ताचलीं जाऊं लागला व धूलि उडत असल्यामुळें सूर्यप्रकाश अधिकच मंद होऊं लागला, तेव्हां कांहीं योद्धे पराभूत होऊन परत फिरूं लागले व कित्येक जयाकांक्षी वीर युद्धांत गढून गेले. याप्रमाणें तें कौरवसैन्य इकडे गुंतलें असतां कृष्णार्जुन सरळ जयद्रथाकडे निघाले. कौन्तेयानें तीक्ष्ण शरांनीं मार्ग काढला असतां वासुदेवानें त्या मार्गांतून मोठ्या वेगानें अश्व चालविले. महात्म्या अर्जुनाचा रथ ज्या बाजूला वळत असे, तेथील सैन्य दुभंग होऊन त्याला मार्ग देत असे. उत्तम, मध्यम व कनिष्ठ मंडलें घेऊन दाशार्ह आपलें रथ चालविण्यांतील कौशल्य प्रकट करीत होता. अर्जुन एक कोसभर पुढें असलेल्या शत्रूवर जो बाण सोडीत असे, तो बाण अर्जुनाचा रथ शत्रूचें उल्लंघन करून कोसभर निघून गेल्यावर त्या शत्रूला विद्ध करीत असे. याप्रमाणें मन व गरूड यांच्या वेगानें अश्वांना चालविणाऱ्या कृष्णाचें तें कौशल्य पाहून सर्व जगत् आश्चर्यचकित झालें. इंद्र, रुद्र, वरुण व आदित्य यांतील कोणाचाहि रथ इतक्या वेगानें चालत नाहीं. अर्जुनाच्या त्या मनोजव रथाच्या वेगानें पूर्वी कोणाचाच रथ रणांगणांत गेलेला नाहीं.

अशाप्रकारें अतिशय वेगानें अश्व चालवून श्रीकृष्णानें पार्थाचा रथ सेनेच्या मध्यभागाकडे वळविला. ते जातिवंत अश्व जेव्हां सैन्याच्या मध्यभागीं येऊन पोंचले, तेव्हां ते क्षुधा व तृषा यांनीं अतिशय व्याकुळ झाले होते व मोठ्या कष्टानें रथ ओढीत होते. शस्त्रांच्या प्रहारांनीं त्यांचें अंग क्षतयुक्त झालें होतें. तरीहि ते विचित्र मंडलें घेत गजाश्वांच्या मृत देहांवरून उड्या मारून त्या रणांगणांत संचार करीत होते.

(२) हे महाराज, याप्रमाणें पार्थाचे अश्व श्रांत झाले आहेत, ही संधि पाहून दोघा विंदानुविंद भ्रात्यांनीं त्याच्यावर चाल केली व मोठ्या उत्साहानें शरवृष्टि आरंभिली. तेव्हां धनंजयानेंहि त्यांच्यावर तीक्ष्ण बाण सोडून त्यांचे अश्व, सारथि, चक्ररक्षक व इतर अनुयायी यांचा वध केला, ध्वजाचा छेद केला व

रथ भग्न करून टाकिला. नंतर एकाच तीक्ष्ण बाणानें विंदाचें मस्तक तोडून खालीं पाडविलें.

याप्रमाणें ज्येष्ठ भ्राता गतप्राण होऊन पडलेला पहातांच अनुविंद आपल्या अश्वहीन रथांतून खालीं उतरला. त्यानें आपली गदा हातीं घेऊन ती गरगर फिरविली व क्रोधानें श्रीकृष्णाच्या मस्तकावर फेंकली. तथापि त्या आघातानें तो मधुसूदन यत्किंचित्हि चलित झाला नाहीं. तो मैनाकपर्वताप्रमाणें निश्चल राहिला. इतक्यांत अर्जुनानें सहा बाणांनीं त्या आवंत्याधिपाचे हस्त, पाद व मस्तक यांचा छेद केला. तेव्हां तो छिन्न-भिन्न झालेला अनुविंद पर्वतशिखराप्रमाणें भूमीवर पडला.

दोघेहि आवंत्य भ्राते गतप्राण होऊन पडतांच त्यांचे सहस्रावधि अनुचर क्षुब्ध होऊन बाणांचा वर्षाव करीत अर्जुनावर धांवून गेले. तथापि त्या सव्यसाचीनें तत्काल त्यांचा पराभव केला व अश्व श्रांत झाले होते तरी तो इंद्रात्मज सैन्याचें उल्लंघन करून तसाच पुढें निघाला. तेव्हां तो मेघांचें अतिक्रमण करून प्रकाशणाऱ्या सूर्याप्रमाणें शोभला. त्याला पाहून कौरव भयभीत झाले, परंतु ते लगेच पार्थावर तुटून पडले.

हे राजा, आपले अश्व श्रांत आहेत व जयद्रथ तर अद्यापि पुष्कळ दूर आहे, हें पाहून अर्जुनानें प्रचंड गर्जना केली व शत्रूचें निवारण आरंभिलें. कौरव अतिशय क्षुब्ध झाले आहेत, हें पाहून पार्थ विस्मयानें हलकेंच वासुदेवाला म्हणाला—"हे कृष्णा, आपले अश्व अतिशय विद्ध झाले आहेत. त्यांचें सर्वांग क्षतपूर्ण झालें आहे. शिवाय ते तृषार्त झाले आहेत. जयद्रथ अद्यापि पुष्कळ दूर आहे, तेव्हां आतां काय करावें, तें सांग. हे माधवा, तुझें ज्ञान त्रिकालाबाधित आहे. तुझ्याच उपदेशाप्रमाणें वागल्यानें पांडवांना रणांत जय मिळेल. यावेळीं आपल्याला काय करणें इष्ट आहे, तें सांग. मला तर वाटतें कीं, तूं अश्वांना मोकळें सोडून त्यांना शल्यरहित करावेंस."

पार्थानें असें सांगितलें असतां केशव म्हणाला—पार्था, माझें मत तसेंच आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणेंच करूं या.

अर्जुन—हे केशवा, तुला जसें योग्य वाटेल, तसें तूं आपलें कार्य कर. तोंवर मी शत्रुसैन्याचें निवारण करितों.

( ३ ) संजय—असें बोलून धनंजय रथावरून खालीं उतरला व यत्किंचितहि भ्रांत न होतां हातांत धनुष्य घेऊन पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. याप्रमाणें तो पार्थ भूमीवर स्थित आहे, ही संधि पाहून जयाची इच्छा करणारे क्षत्रिय वीर त्याच्यावर धांवून गेले. तथापि त्या एकट्या धनुर्धरानें असंख्य रथसमुदायांचें निवारण केलें. दिवाकराला आच्छादित करणाऱ्या मेघसमुदायांप्रमाणें कौरव वीरांनीं पार्थाला शरांनीं झांकून टाकिलें. त्यावेळीं बाणांच्या संघर्षणानें अंतरिक्षांत अग्नि उत्पन्न झाला व त्यांतून प्रचंड ज्वाळा निघाल्या.

महाधनुर्धर वीरांच्या क्षतयुक्त शरीरांतून रक्ताच्या धारा वहात होत्या. कांहीं योद्धे दीर्घ निश्वास टाकीत होते. त्या समरांगणांत क्रुद्ध झालेले अनेक वीर अर्जुनाचा पराभव करण्यास उत्सुक झाले होते, तथापि धनंजयानें समुद्राच्या तीराप्रमाणें त्यांना अडवून धरिलें.

धृतराष्ट्र—बा संजया, अर्जुन भूमीवर स्थित झाला व वासुदेव त्याच्या अश्वांचा श्रमपरिहार करण्यांत गुंतला. अशी संधि सांपडली असतांहि अर्जुनाचा घात कसा झाला नाहीं !

संजय—राजा, केवळ एक लोभ इतर अनेक गुणांना जसें मार्गे टाकतो, तद्वत्च भूमिस्थ असलेल्या एकट्या पार्थानें अनेक रथस्थ नृपाळांस पराभूत केलें. तेव्हां जनार्दन अर्जुनाला म्हणाला, “ पार्था, या रणांगणांत अश्वांना पिण्यास पुरेसें जलहि मिळत नाहीं व या अश्वांना तर आतां पाणी पाजलें पाहिजे. ते तृषाक्रांत झाले आहेत. त्यांना धुतलें नाहीं, तरी चालेल, पण जल पाजलेंच पाहिजे.”

( ४ ) कृष्णाचे हे शब्द ऐकतांच पार्थानें ‘ हें पहा जल ’ असें म्हणून अस्त्रसामर्थ्यानें भूमींत बाण मारून तेथें सुंदर सरोवर निर्माण केलें. तें सरोवर हंस, चक्रवाकादि पक्ष्यांनीं शोभत होतें. त्यांतील जल निर्मल असून त्यांत प्रफुल्ल कमलें तरंगत होतीं. मत्स्य-कूर्मांनीं व्याप्त, ऋषिजनांनीं सेविलेलें असें तें सरोवर पार्थानें निमिषार्धांत निर्माण केलें होतें. अशाप्रकारच्या त्या पवित्र सरोवराच्या दर्शनार्थ नारदमुनि तेथें प्रकट झाले. अद्भुत कर्में करणाऱ्या पार्थानें त्याच्या भोंवतीं शरमंदिर निर्माण केलें. महात्म्या अर्जुनाचें तें कौशल्य पाहून कृष्ण हंसून म्हणाला—‘ पार्था, धन्य, धन्य आहे तुझी ! ’ ७. ५. ९९.

---

## अध्याय १०० वा.

[ १ सरोवर पाहून कौरवसैन्याचा विस्मय. २ वासुदेवानें केलेली अश्वांची शुश्रूषा. ३ रथस्थ कृष्णार्जुनांना पाहून कौरवांचा खेद. ४ पार्थाचें जयद्रथाकडे प्रयाण. ]

( १ ) संजय—हे महाराज, अर्जुनानें त्या रणांगणांत जलपूर्ण सरोवर निर्माण केलें व सर्व शत्रुसैन्याचें निवारण करून शरांचें मंदिरच बांधलें असतां वासुदेव रथावरून खालीं उतरला व त्यानें शरांनीं पीडित झालेल्या अश्वांना सोडिलें. पार्थाचें तें अद्भुत कर्म पाहून सिद्ध-चारणांचे संघ व सैनिक यांनीं विस्मित होऊन ' धन्य धन्य ' असे प्रशंसोद्गार काढले.

त्यावेळीं तो कौन्तेय पादचारी असूनहि युद्ध करीत होता. तथापि शत्रूचा एकहि महारथ त्याचा पराभव करूं शकला नाहीं. तुझ्या पक्षांतील नृपति पार्थावर असंख्य शरांचा वर्षाव करीत होते, पण तो पांडुपुत्र आपल्या महान् अस्त्रांच्या प्रभावानें त्या सर्व शरसंघाचा तत्काल नाश करीत होता. पार्थ व वासुदेव या दोघांचेंहि तें अद्भुत कर्म पाहून कौरवहि त्यांची प्रशंसा करूं लागले. युद्ध चालू असतां भर रणांगणांत कृष्णार्जुनांनीं आपल्या रथाचे अश्व सोडले, याहून जगांत दुसरें अद्भुत कर्म कोणतें असणार ! असें साहस पूर्वीं कोणीं केलें नसेल व पुढेंहि कोणी करणार नाहीं. त्या नरोत्तमांनीं आम्हांला भयभीत करून सोडलें; पण ते स्वतः मात्र त्या रणभूमीवर निर्भयपणें संचार करीत होते.

( २ ) हे भारता, हृषीकेशानें त्यावेळीं जणुंकाय स्त्रियांमध्यें स्थित असल्याप्रमाणें हंसत हंसतच अश्व सोडले व त्यांना तुझ्या सैन्याच्या समक्ष पार्थानें निर्माण केलेल्या सरोवराकडे नेलें. तेथें अश्वविद्यानिपुण कृष्णानें त्या श्रांत झालेल्या अश्वांना योग्य विश्रांति देऊन त्यांची उचित शुश्रूषाहि केली. त्यांच्या तोंडांतून येणारा फेंस व अंगाचा घाम पुसला, शरीरांत रुतलेलीं शल्यें काढून टाकिलीं, क्षतें बुझवून टाकिलीं, स्नान घातलें व चंदी-चारा घालून जल पाजलें. तेव्हां त्या अश्वांच्या श्रमाचा परिहार होऊन ते पूर्ववत् उत्साहयुक्त झाले. त्यानंतर श्रीकृष्णानें त्यांना रथाला जोडलें व पार्थासह रथारूढ होऊन तेथून त्वरेनें प्रयाण केलें.

( ३ ) श्रीकृष्ण पार्थासह रथारूढ होऊन चालला आहे, हें पहातांच कौरवांना खेद झाला. ते सर्व वीर भग्नदंष्ट्र सर्पाप्रमाणें दीर्घ निश्वास सोडीत

परस्परांस म्हणाले—"अहो, हा पार्थ व कृष्णहि आमच्या हातांतून कसा निसटून गेला पहा! धिक्कार, धिक्कार असो आम्हांला."

आपल्या सैन्याची ती अवस्था पाहून कित्येक योद्धे 'त्वरा करा, त्वरा करा' अशी गर्जना करूं लागले. तेव्हां सर्व सैन्याला तुच्छ लेखून कृष्णार्जुन मोठ्या त्वरेनें पुढें निघून जात आहेत, हें पाहून कांहीं सैनिक म्हणाले—"हे कौरवहो, या कृष्ण-किरीटींच्या वधार्थ तुम्ही सर्व त्वरा करा. हा रथस्थ दाशार्ह आपणां सर्वांस तुच्छ मानून सर्व धनुर्धरांच्या समक्ष जयद्रथाकडे चालला आहे, पहा. त्याला प्रतिबंध करा."

कित्येक नृपाल परस्परांशीं संभाषण करीत असतांना असेंहि म्हणूं लागले—"सर्व सैन्य व धार्तराष्ट्र यांचा आतां निश्चयानें नाश होणार! दुर्योधनाच्या अपराधानें सर्व क्षत्रिय व समग्र पृथ्वी क्षय पावत आहे, हें त्या राजाच्या कसें लक्षांत येत नाहीं!" कांहीं वीर म्हणाले—"या मूढ दुर्योधनाला आतां काय उपाय योजावा, हें कळत नाहीं. त्यानें जयद्रथ यमलोकीं गेलाच, असें समजून पुढील व्यवस्थेला लागावें."

(४) राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर सूर्य पश्चिमेकडे चालला असतां अर्जुन आपल्या वेगवान् अश्वांच्या योगानें त्वरेनें पुढें निघाला. त्याचे ते जातिवंत अश्व जल प्राशन करून उत्साहपूर्ण झाले होते व इतक्या शीघ्रगतीनें रथ नेत होते कीं, त्यांना प्रतिबंध करण्यास कोणीहि समर्थ झाला नाहीं. किंवा अंतकाप्रमाणें क्रुद्ध झालेल्या रथस्थ पार्थाचें कोणालाहि निवारण करतां आलें नाहीं. मृगांच्या कळपाला भयभीत करीत जाणाऱ्या सिंहाप्रमाणें तो नरव्याघ्र पार्थ तुझ्या सैन्याला त्रस्त करीत सिंधुराजाकडे चालला. सैन्याला क्षुब्ध करणाऱ्या कृष्णानें अश्वांना प्रेरणा करतांच ते शुभ्र अश्व वायुवेगानें निघाले. वासुदेवानें पांचजन्य वाजविला. पार्थाच्या धनुष्यापासून सुटलेले बाण मागें पडत होते व त्याचे वेगवान् अश्व मनोगतीनें पळत होते.

त्यावेळीं अनेक क्षत्रियांनीं धनंजयाला वेढून टाकिलें. दुर्योधन पार्थाच्या मागोमाग निघाला. परंतु कपिध्वजाचा रथ पाहून कौरवांचे रथी भयभीत झाले. शरांनीं आर्त झालेल्या त्या योद्ध्यांना कृष्णार्जुनाच्या मुखांकडे पहाण्याचेंहि धैर्य झालें नाहीं. ७. ५. १००.

## अध्याय १०१ ला.

[ १ उभय कृष्णांनीं केलेलें द्रोणसैन्याचें उल्लंघन. २ दुर्योधनाचें आगमन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, धनंजय व वासुदेव सैन्याचें उल्लंघन करून पुढें चालले आहेत, हें पाहून तुझे वीर भयार्णवांत बुडून गेले. पण ते स्वतःच्या दुर्बलत्वाविषयीं लज्जित होऊन लगेच अतिशय वीरश्रीनें धनंजयावर धांवून गेले. त्यावेळीं अतिशय क्रुद्ध झालेले जे वीर अर्जुनावर धांवून गेले, ते योद्धे सागरापासून नद्या जशा परत फिरत नाहींत, तसे अद्यापि रणांगणांतून युद्धपराङ्मुख झाले नाहींत. त्यांत जे कित्येक भीरु होते, ते वेदापासून परावृत्त होणाऱ्या नास्तिकांप्रमाणें युद्धापासून परत फिरले आणि असा अधर्म आचरिल्यामुळें नरकाला प्राप्त झाले.

हे महाराज, त्यावेळीं त्या उभय कृष्णांनीं तुझ्या सैन्यजालाचें विदारण केलें व ते दोघे महात्मे द्रोणाच्या दुर्भेद्य व्यूहाचें उल्लंघन करून उदय पावलेल्या कालसूर्याप्रमाणें प्रखर ताप देऊं लागले. मकराच्या मुखांतून सुटलेल्या मत्स्याप्रमाणें त्या दोघां वीरांनीं द्रोणाच्या हातांतून मुक्त होऊन तुझ्या सैन्याला क्षुब्ध केलें.

तुझे पुत्र व इतर योद्धे 'हे दोघे कृष्ण द्रोणाचें अतिक्रमण करूं शकणार नाहींत' असें निश्चयानें समजत होते. द्रोण, हार्दिक्य व कृप, यांच्या हातून कृष्णार्जुन जिवंत सुटणार नाहींत, अशी जी त्यांना दृढ आशा होती, ती निष्फल झाली. ते दोघे परंतप द्रोणसैन्य व भोजसैन्य यांतून पार पडून जयद्रथाकडे वेगानें जात आहेत, हें पहातांच तुझे वीर सिंधुराजाच्या जीविताविषयीं निराश झाले.

इकडे कृष्णार्जुनांचे जयद्रथवधाविषयीं अनेक संकेत चालले होते. ते दोघे निर्भयपणें संभाषण करीत होते. 'सहा धार्तराष्ट्र महारथांनीं सैंधवाला मध्यें ठेवून त्याचें संरक्षण केलें आहे. तथापि त्या सिंधुपतीची दृष्टादृष्ट होतांच तो माझ्या हातून कदापि जिवंत सुटणार नाहीं. साक्षात् इंद्र जरी देवगणांसह त्याचें रक्षण करावयास आला, तरीहि आम्ही त्या जयद्रथाचा वध करूं' असें ते दोघे कृष्ण परस्परांस सांगत होते.

हे महाराज, मरुभूमीचें उल्लंघन करून गेलेले तृषार्त गज जलप्राशन करून जसे उत्साहयुक्त होतात, तसे ते दोघे अरिंदम उल्लसित दिसत होते. त्यांना

जरा-मृत्यूंचें भय नसावें, असें त्यांच्या मुखचर्येवरून दिसत होतें. त्या लोकविश्रुत धनुर्धरांनीं द्रोणाच्या अस्त्रबलाचेंहि निवारण केलें आहे, असें पाहून प्रचंड जलचरांनीं व्यापिलेल्या व जलानें परिपूर्ण भरलेल्या सिंधु, शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा आणि वितस्ता या सहा दुस्तर महा नद्यांनाच जणुंकाय ते दोघे धनुर्धर केवल आपल्या बाहुबलानें तरून गेले, असेंच सर्वांना वाटलें.

हे राजन्, त्यानंतर कृष्ण-धनंजय आपला रथ निर्भयपणें पुढें वेऊन गेले आणि मृगावर झडप घालण्यास टपून बसलेल्या दोन व्याघ्रांप्रमाणें ते दोघे त्याच्या समीप असलेल्या जयद्रथाकडे जिघांसेनें पाहूं लागले. त्यांची तशाप्रकारची मुखचर्या पाहून तुझे योद्धे 'जयद्रथ आतां हत झालाच आहे' असें समजले. हे दोघे कृष्णार्जुन सिंधुराजाकडे पाहून हृष्ट चित्तानें सिंहनाद करूं लागले. त्यावेळीं कृष्ण व धनुर्धर पार्थ या दोघांची उज्ज्वल प्रभा सूर्य व अग्नि यांच्या तुल्य भासली. आपण आतां जयद्रथाच्या अगदीं समीप आलों आहों, हें पाहून द्रोणसैन्यांतून पार पडलेल्या कृष्णार्जुनांस हर्ष झाला. आमिष जवळ आलेलें पाहतांच आनंदित होणाऱ्या श्येन पक्ष्याप्रमाणें ते दोघे हृष्ट झाले व त्यांनीं समीपस्थ सिंधुपतीवर झडप घातली.

( २ ) इतक्यांत द्रोणानें ज्याला दिव्य कवच बांधलें होतें, तो राजा दुर्योधन सिंधुपतीच्या रक्षणासाठीं एका रथानें तेथें येऊन पोंचला व कृष्णार्जुनांचें उल्लंघन करून कृष्णाच्या अग्रभागीं येऊन उभा राहिला. तेव्हां दुर्योधनानें धनंजयाचें अतिक्रमण केलेलें पाहून तुझे सैनिक हर्षभरानें रणवाद्यें वाजवूं लागले. सर्वत्र शंखध्वनि व सिंहनाद यांचा निर्घोष ऐकूं येऊं लागला.

हे प्रभो, तुझ्या पुत्राला पाहून जयद्रथाच्या रक्षणार्थ आलेले वीरहि अतिशय हृष्ट झाले. याप्रमाणें दुर्योधन आपलें अतिक्रमण करून अनुयायांसह आपल्या पुढें येऊन उभा राहिला, हें पाहून कृष्ण अर्जुनाला असें प्राप्तकाल वचन बोलला. ७. ५. १०१.

---

## अध्याय १०२ रा.

[ १ कृष्णाचें धनंजयाला प्रोत्साहन. २ दुर्योधनाचें पार्थाला आह्वान. ]

( १ ) वासुदेव—हे धनंजया, आपलें अतिक्रमण करून पुढें निघून गेलेल्या या दुर्योधनाकडे पहा. याचें हें कर्म मला अद्भुत दिसत आहे. याच्या रथासारखा अन्य रथ नाहीं. हा कृतास्त्र धार्तराष्ट्र अतिशय बलाढ्य आहे. हा मानी महारथ पांडवांचा नित्य द्वेष करीत असतो. अशा या बलाढ्य दुर्योधनाशीं युद्ध करण्याचा प्रसंग आलेला आहे. या युद्धदुर्मद वीराबरोबर होणारें युद्ध म्हणजे जयापजयाचें द्यूतच होय.

पार्था, तूं दीर्घकाल मनांत सांठवून ठेवलेलें क्रोधरूपी विष आज त्याला प्राशन करूं दे. तोच दुरात्मा पांडवांच्या सर्व संकटांचें मूळ आहे. तो आज अनायासें तुझ्या बाणांच्या तडाक्यांत सांपडला आहे. यास्तव आपलें कार्य सफल करून घे. हा राज्यलोभी धार्तराष्ट्र संग्रामांत तुझ्यापुढें कसा बरें येईल, याचा मी विचार करीत होतों. आज सुदैवानें अनायासें तो समय प्राप्त झाला आहे, यास्तव ज्यायोगें त्याचें जीवित नष्ट होईल असें कर.

हे पुरुषश्रेष्ठा, हा दुर्योधन ऐश्वर्यमदानें उन्मत्त झालेला आहे. यानें अद्यापि दुःख अनुभविलेलें नाहीं. किंवा त्यानें तुझा समरांगणांतील पराक्रमहि पाहिलेला नाहीं. शिवाय सुरासुरांसह त्रैलोक्यहि तुला जिंकण्यास समर्थ नाहीं. मग या एकट्या दुर्योधनाची काय कथा! तो दुर्मति आज तुझ्या रथासन्निध अनायासें आला आहे, हें मोठें भाग्यच होय. यास्तव हे महाबाहो, वृत्राचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं याला गतप्राण कर.

हे मानदा, हा दुर्योधन तुम्हांला संकटांत टाकण्यास सदैव तत्पर असतो. यानेंच कपटद्यूत खेळून धर्मराजाची वंचना केली. या पापबुद्धि कौरवानें निष्पाप असलेल्या तुमचा अनेक प्रकारें छळ केला. यानें तुमचें राज्य कपटानें हरण केलें. तुम्हांला वनवासाला पाठविलें. कृष्णेला क्लेश दिले. हे सर्व अपराध मनांत आणून या मायावी अनार्य पुरुषाचा निःशंकपणें वध कर.

हा पातकी दुर्योधन दैवयोगानें तुझ्या बाणांच्या कक्षेंत आला आहे, तूं ही संधि घालवूं नकोस. आपल्या इष्ट कार्यांत विघात करण्याच्या हेतूनें तो आपल्या संमुख येऊन उभा राहिला, हें योग्यच झालें. तो धार्तराष्ट्र तुझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत आहे, हेंहि सुदैवच होय. दैव अनुकूल

असलें कीं, आपले इष्ट हेतु अनपेक्षितपणें सफल होत असतात. यास्तव हे पार्था, पूर्वीं देवासुरांच्या युद्धांत जंभासुराचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं या धृतराष्ट्रपुत्राचे प्राण हरण कर. एकदा हा मृत झाला कीं, याचें सैन्य अनाथ होईल व तुला त्याचा सहज भेद करितां येईल ! या दुरात्म्याचें मूळच छेदून टाक, म्हणजे या वैराचा अंत होईल ! !

संजय—राजा धृतराष्ट्रा, कृष्णाचें हें भाषण ऐकून पार्थ म्हणाला—"ठीक आहे. माझें तें कर्तव्यच आहे. यास्तव इतर सर्वांची उपेक्षा करून जेथें तो सुयोधन आहे, तेथें चल. ज्यानें आमच्या राज्याचा अपहार करून तें निष्कंटक राज्य दीर्घकाल भोगलें, त्याचा मी युद्धांत पराभव करून शिरश्छेद करीन. बा माधवा, ज्या दुरात्म्यानें निष्पाप द्रौपदीचे केश धरून तिला सभेंत ओढीत नेवविलें, त्या दुष्टाचें पारिपत्य माझ्या हातून होईल ना ?"

( २ ) याप्रमाणें संभाषण करीत त्या कृष्णार्जुनांनीं दुर्योधनाच्या बाजूला आपले जातिवंत शुभ्र अश्व वळविले. त्यावेळीं बिकट प्रसंगांत सांपडलेला दुर्योधन यत्किंचित्‌हि भयभीत झाला नाहीं. उलट त्यानें कृष्णार्जुनांवर चाल करून त्यांचें निवारण केलें. त्याचें तें शौर्य पाहून सर्व क्षत्रियांनीं तुझ्या पुत्राची प्रशंसा केली. दुर्योधन पुढें सरसावला आहे, हें पाहून तुझ्या सैन्यांत प्रचंड सिंहनाद झाला. नंतर वासुदेव व धनंजय क्षुब्ध झाले आहेत, असें पाहून दुर्योधनानें त्यांस युद्धाचें आव्हान केलें. तें ऐकतांच कृष्ण व पार्थ यांनीं सिंहनाद करून आपले श्रेष्ठ शंख वाजविले.

हे महाराज, त्यावेळीं त्या उभयतांची उत्साहपूर्ण चर्या पाहून सर्व कौरव तुझ्या पुत्राच्या जीविताविषयीं निराश झाले. कित्येक शोकमग्न झाले, तर कोणी 'तुझ्या पुत्राची अग्नीच्या मुखांत आहुतिच पडली आहे' असें समजले. कृष्णार्जुनांस पाहून तुझे सैनिक 'राजा हत झाला, राजा पडला' असा आक्रोश करूं लागले.

त्यांचा हा कोलाहल ऐकून दुर्योधन त्यांना धीर देत म्हणाला—"वीरहो, भिऊं नका. मी कृष्णार्जुनांस मृत्यूच्या स्वाधीन करतों, पहा !"

याप्रमाणें आपल्या सैनिकांस आश्वासन देऊन तो जयाची आकांक्षा करणारा नराधिप पार्थाला अतिशय क्रोधानें असें वचन बोलला—"हे पार्था, तूं जर पांडूचा पुत्र असशील, तर तुला जेवढीं दिव्य व पार्थिव अस्त्रें साध्य

असतील, त्या सर्वांचा मजवर प्रयोग कर. तुझें व केशवाचें सर्व सामर्थ्य आज मला दाखीव. तुझा पराक्रम तरी आम्हांला पाहूं दे. तूं अनेक वीरोचित शौर्याचीं कर्में केलीं आहेस, अशी जी लोकवदंता आहे आणि त्यांविषयीं तुझ्या वीरश्रीची जी प्रशंसा होत असते, ती आमच्या कानीं आली आहे. परंतु तुझा प्रभाव आम्हीं प्रत्यक्ष पाहिलेला नाहीं. तो आज आम्हांला दाखीव." ७. ५. १०२.

---

## अध्याय १०३ रा.

[ १ पार्थ-दुर्योधनयुद्ध. २ कृष्णार्जुनसंवाद. ३ दुर्योधनाचा पराभव. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, असें बोलून दुर्योधनानें पार्थावर तीन शर सोडिले, चार बाणांनीं त्याच्या चारी अश्वांना विद्ध केलें, वासुदेवाच्या वक्षःस्थलावर दहा बाण सोडिले आणि एका भल्ल बाणानें त्याच्या प्रतोदाचा छेद करून तो भूमीवर पाडविला. तेव्हां अर्जुनानें यत्किंचित्‌हि भ्रान्त न होतां दुर्योधनावर चौदा तीक्ष्ण बाण सोडले. परंतु ते त्याच्या कवचाला स्पर्श करून खालीं पडले. ते शर निष्फल झालेले पाहून कौन्तेयानें त्याच्यावर आणखी चवदा बाण सोडिले, तेहि व्यर्थ गेले.

( २ ) याप्रमाणें पार्थाचे सर्व बाण निष्फल होत आहेत हें पाहून कृष्ण म्हणाला—"हे पार्था, शिलांचें सरपटणें जेवढें असंभाव्य वाटावें, तेवढेंच आश्चर्य तुझे शर निष्फल झालेले पाहून मला वाटत आहे ! तुझें गांडीवधनुष्य दृढ आहेना ! तुझें बाहुबल कायम आहेना ! आज तुझा काल तर फिरला नाहींना ! दुर्योधनाच्या रथावर टाकलेले तुझे बाण आज व्यर्थ कसे जात आहेत ! तुझे शर वज्र किंवा अशनि यांच्या तुल्य घोर आहेत. ते शत्रूंच्या देहांचा भेद करणारे आहेत. असें असतां आज तुझे शर विफल कां होत आहेत ! पार्था, अरे काय ही तुझी विडंबना !"

अर्जुन—हे कृष्णा, या धार्तराष्ट्रावर द्रोणानें आपल्या दिव्य विद्येचा प्रयोग केला आहे. त्यानें धारण केलेलें हें कवच माझ्या अस्त्रांना अभेद्य आहे. अशा प्रकारचें कवच त्रैलोक्यांत कोणालाहि साध्य नाहीं. तें धारण करण्याची विद्या केवल एकटा द्रोणाचार्यच जाणतो व त्याच द्विजसत्तमाच्या प्रसादानें ती मला

अवगत आहे. त्या कवचाचा बाणांनीं भेद करतां येणें कदापि शक्य नाहीं. साक्षात् इंद्राच्या वज्रप्रहारानेंहि तें तुटणार नाहीं.

हे गोविंदा, तूं हें जाणत असूनहि मला कां बरें असा मोहित करतोस ! त्रिभुवनांत जें कांहीं वृत्त घडलें आहे, वर्तमानकालीं घडत आहे व भविष्यत्कालीं जें घडेल, तें सर्व तुला विदित आहे. तुझ्यासारखा अन्य त्रिकालज्ञ नाहीं.

हे केशवा, द्रोणाच्या या कवचबंधनामुळें दुर्योधन रणांगणांत जरी निर्भयपणें उभा आहे, तरी पुढें युद्धांत कोणतें कार्य विहित आहे, याची त्याला कांहींच माहिती नाहीं. एखादी स्त्री जशी उत्तम अलंकारांनीं सजवावी, तसा हा दुर्योधन हें श्रेष्ठ कवच धारण करून येथें आलेला आहे. पण त्याला त्याच्या योगानें स्वसंरक्षण करतां येणार नाहीं.

हे जनार्दना, आज आतां माझ्या बाहूंचें सामर्थ्य पहा. या अभेद्य कवचानें संरक्षित असलेल्याहि या कौरव्याला मी पराजित करीन.

हें भास्वर कवच देवेशानें अङ्गिरसाला दिलें होतें. त्याच्यापासून तें बृहस्पतीला मिळालें, त्याच्याकडून इंद्राला प्राप्त झालें. इंद्रानें तें पुनः मला मंत्रपूर्वक समर्पण केलें. ब्रह्मदेवानें निर्माण केलेलें तें दिव्य कवच जर या दुरात्म्याचें संरक्षण न करतें, तर हा दुर्मति माझ्या बाणांनीं निश्चयानें हत झाला असता. ”

( ३ ) संजय—राजा, असें बोलून अर्जुनानें मानवास्त्रानें बाण अभिमंत्रवून ते धनुष्यास जोडले. तें अस्त्र दृढ कवचाचाहि भेद करणारें होतें. अर्जुन ते बाण सोडणार, इतक्यांत अश्वत्थाम्यानें धनुष्याच्या मध्यभागीं असलेल्या त्या शरांचा सर्वास्त्रघातक अस्त्रानें छेद केला. याप्रमाणें ब्रह्मवेत्त्या द्रौणीनें दूरूनच आपल्या बाणांचा छेद केला, हें पाहून पार्थ अतिशय विस्मित झाला व कृष्णाला म्हणाला—“ हे जनार्दना, या अस्त्राचा प्रयोग मला दोन वेळां करतां येणें शक्य नाहीं. कारण तें अस्त्र एकदा जोडल्यानंतर पुनः त्याचा प्रयोग केल्यास तें माझ्यासह सर्व सैन्याचा नाश करील. ”

धृतराष्ट्रा, त्यानंतर दुर्योधनानें कृष्णार्जुनांवर सर्पतुल्य तीक्ष्ण बाण सोडून त्यांना विद्ध केलें व त्यांच्यावर प्रचंड शरवृष्टि चालविली. ती पाहून तुझ्या वीरांना अतिशय हर्ष झाला. ते सिंहनाद करून वाद्यांचा घोष करूं लागले. त्यावेळीं क्रुद्ध होऊन युद्ध करणाऱ्या पार्थाला दुर्योधनाच्या शरीराचा कोणताच भाग कवचरहित दिसेना. त्याचा सर्व देह कवचानें संरक्षिलेला होता.

तें पाहून पार्थानें तीक्ष्ण बाणांनीं दुर्योधनाचे अश्व व पार्ष्णिसारथि यांचा वध केला. त्याच्या धनुष्याचा छेद केला, तलत्राण तोडून टाकिलें आणि रथ भग्न करण्यास आरंभ केला व अल्पावधींतच त्या प्रयत्नशील पार्थानें तीक्ष्ण बाण सोडून त्याला विरथ केलें. नंतर त्याच्या दोन्ही हातांच्या नखांतील मासांवर दोन तीक्ष्ण बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां त्या वेदनेनें व्याकुल झालेल्या दुर्योधनानें तेथून मोठ्या त्वरेनें पलायन केलें.

याप्रमाणें तो राजा संकटांत सांपडला आहे, असें पाहून अनेक धनुर्धर त्याच्या रक्षणार्थ धांवले. त्या वीरांनीं आपल्या चतुरंग सैन्यासह पार्थाला वेढून टाकलें. त्या सैन्यभारानें कृष्णार्जुन झांकून गेले. त्यांचा रथहि दिसेनासा झाला. पण अर्जुनानें आपल्या अस्त्रप्रभावानें त्या सैन्याचा संहार चालविला. तेव्हां मृत गजांचीं शरीरें व भग्न झालेले रथ यांच्या राशी समंततः एक कोस पसरल्यामुळें अर्जुनाचा रथ तेथें अडकून पडला. त्यांतून पलीकडे जाण्यास त्याला मार्गहि मिळेना.

तें पाहून श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला—हे पार्था, तूं धनुष्याचा टणत्कार कर आणि मी मोठ्यानें शंख वाजवितों.

असें बोलून वासुदेवानें आपला पांचजन्य वाजविला. तो प्रचंड ध्वनि ऐकून धैर्यवान् व भीरु असे सर्व सैनिक भयभीत होऊन भूमीवर पडले. अर्जुनानेंहि धनुष्याचा टणत्कार करून आपल्या भोंवतीं पडलेला शत्रुसैन्याचा वेढा दूर केला. तेव्हां त्यांच्या वेढ्यांतून मुक्त झालेला त्या परंतपाचा रथ मेघाप्रमाणें शोभला.

इकडे जयद्रथाचे रक्षक अकस्मात् पार्थाला पाहून क्षुब्ध झाले. अनुयायांसह त्या धनुर्धरानें गर्जना केली. त्याच्या योगानें भूमिहि कंपित झाली. वीरांचा सिंहनाद व धनुष्यांचे टणत्कार यांचा प्रचंड कोलाहल झाला. तो प्रचंड ध्वनि ऐकून कृष्णार्जुनांनीं आपापले श्रेष्ठ शंख वाजविले. त्या शब्दानें सर्व पृथ्वी निनादित झाली. दश-दिशांत तो ध्वनि दुमदुमला व कौरव-पांडव-सैन्यांत त्याचा प्रतिध्वनि उमटला. कृष्णार्जुनांस तेथें पाहून तुझे रथी भ्रान्त झाले व ते क्षुब्ध होऊन त्या दोघां महात्म्यांवर धांवले, तेव्हां तोहि एक अद्भुतच प्रकार घडला. ७, ५. १०३.

---

## अध्याय १०४ था.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें तुझे वीर कृष्णार्जुनांच्या जिघांसेनें त्यांच्याकडे जेव्हां वेगानें धांवून गेले, तेव्हां पार्थहि त्यांच्यावर तुटून पडला. भूरिश्रवा, शल, कर्ण, वृषसेन, जयद्रथ, कृप, शल्य व अश्वत्थामा हे आठ वीर आपल्या वेगवान् अश्वांच्या रथांवर आरूढ होऊन दश-दिशांतून धांवून आले. तेव्हां तुझ्या पुत्राच्या रक्षणार्थ अनेक कौरववीरहि नानादेशांतील जातिवंत अश्वांच्या योगानें मोठ्या त्वरेनें तेथें आले व त्यांनीं आपापले शंख वाजवून प्रचंड निर्घोष केला. त्या ध्वनीनें सागरान्त पृथ्वी व अंतरिक्ष दुमदुमून गेलें.

कृष्णार्जुनांनींहि आपापले श्रेष्ठ शंख वाजवून दश-दिशा निनादित केल्या. रणवाद्यें वाजूं लागलीं. त्या कोलाहलानें गजाश्व भयभीत झाले. आतां युगान्तच होतो कीं काय असा भास होऊन सर्व सैनिक भीतीनें त्रस्त झाले. याप्रमाणें तीं दोन्ही सैन्यें सज्ज झालीं असतां ते आठ महारथी व दुर्योधन यांनीं जयद्रथाच्या रक्षणार्थ अर्जुनाला वेढा दिला. त्या सर्वांनीं मिळून कृष्णार्जुनांवर असंख्य शरांचा वर्षाव केला व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें.

त्यावेळीं श्वेताश्व पार्थानें आपलें हस्तलाघव प्रकट करीत हंसत हंसत त्या सर्वांवर बाणांची वृष्टि चालविली व त्यांस विद्ध केलें. तेव्हां भूरिश्रवा अतिशय क्रुद्ध झाला, त्यानें तीक्ष्ण शर सोडून श्रीकृष्णाच्या प्रतोदाचा छेद केला आणि अर्जुनावर ब्याहत्तर बाण सोडिले. त्यावेळीं कौन्तेयानें मेघांस उडवून देणाऱ्या वायूप्रमाणें त्या सर्वांचें क्षणार्धांत निवारण केलें. ७. ५. १०४.

---

## अध्याय १०५ वा.

[ १ कौरव-पांडवांच्या ध्वजांचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, माझ्या वीरांचे व पांडवांच्या योद्ध्यांचे विविध आकाराचे देदीप्यमान ध्वज कसे होते तें मला सांग.

संजय—हे महाराज, त्या महात्म्यांचे ध्वज बहुविध आकाराचे होते. ते

---

१ ध्वज, अश्व, पताका यांचीं वर्णनें पूर्वी २३ अध्यायांत सविस्तर येऊन गेलीं आहेत, तीं पहावीं. येथें पुनरुक्तिपरिहारार्थ त्यांचें संक्षेपतः सामान्य वर्णन दिलें आहे.

प्रज्वलित अग्नीप्रमाणें देदीप्यमान होते. त्या सुवर्णाच्या ध्वजांचे दंडहि सुवर्णाचेच होते. सुवर्णमालांनीं भूषविलेले ते ध्वज कांचनपर्वतावरील कांचनशृंगाप्रमाणें भासत होते. त्यांच्या सभोंवार नानारंगाच्या चित्र-विचित्र पताका शोभत होत्या. त्या इंद्रधनुष्यासारख्या अशा अनेक रंगाच्या पताका वाऱ्यानें हलत असतां जणुं काय चित्र-विचित्र वस्त्रें परिधान केलेल्या नर्तकीच या रणांगणरूप रंगभूमीवर नृत्य करीत आहेत, असा भास होत होता. त्या वाऱ्यानें हलणाऱ्या पताका वीरांच्या श्रेष्ठ रथांना विशेष शोभा देत होत्या.

त्या चित्र-विचित्र दिसणाऱ्या ध्वजांच्या सभोंवार असंख्य क्षुद्रघंटिका बांधलेल्या होत्या. त्या रणांगणावर कौरवांचे नऊ ध्वज मुख्यत्वें करून झळकत होते. अश्वत्थाम्याचा सिंहपुच्छांकित ध्वज बालार्काप्रमाणें प्रकाशत होता. कर्णाच्या ध्वजावर गजशृंखलेचें चिह्न होतें. कृपाचार्यांचा ध्वज गोवृषांकित होता. वृषसेनाच्या ध्वजावर सुवर्णाचा मयूर शोभत होता. मद्रपतीचा ध्वज सुवर्णाच्या नांगरानें अलंकृत असून तो अग्नीच्या ज्वालेसारखा देदीप्यमान दिसत होता. जयद्रथाच्या ध्वजावर रौप्यवराहाचें चिह्न होतें. सौमदत्तीचा ध्वज यज्ञस्तंभाच्या चिह्नानें युक्त होता. चित्र-विचित्र मयूरांनीं सुशोभित केलेला रौप्य गज शल्याच्या ध्वजाला भूषवीत होता. दुर्योधनाच्या ध्वजावर रत्नजडित गज झळकत होता.

अशाप्रकारच्या या नऊ ध्वजांनीं तुझी सेना प्रकाशित झाली होती. त्या रणांगणावर पार्थाचा वानरचिह्नांकित दहावा श्रेष्ठ ध्वज असून शत्रुपक्षाकडील तेवढाच एक ध्वज तेथें होता. त्या तेजस्वी ध्वजाची दीप्ति वह्नियुक्त हिमालयासारखी भासत होती.

हे महाराज, त्यानंतर तुझ्या वीरांनीं अर्जुनाच्या पारिपत्यासाठीं आपापलीं धनुष्यें उचललीं. अर्जुनानेंहि गांडीव हातांत घेतलें. त्यांचें घनघोर युद्ध प्रवृत्त झालें. त्यावेळीं नानादेशांतून आलेले अनेक नृपति केवल तुझ्या अपराधामुळें मृत्युमुखीं पडले. दुर्योधनादि कौरववीर अर्जुनावर जेव्हां प्रहार करूं लागले, तेव्हां एकटा पार्थ अनेक शत्रूंबरोबर निर्भयपणानें युद्ध करीत होता. त्या परंतपानें असंख्य बाण सोडून तुझ्या योद्ध्यांना अदृश्य करून टाकिलें. त्याचें तें अद्भुत कर्म पाहून तुझ्या वीरांनींहि पार्थाला शरजालांनीं झांकून टाकिलें. अर्जुन अदृश्य झालेला पाहतांच पांडवसैन्यांत मोठाच हाहाकार उडाला. ७. ५. १०५.

## अध्याय १०६ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २. द्रोण-युधिष्ठिरयुद्ध. ३. युधिष्ठिराचा पराभव. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, पार्थ सिंधुपतीकडे चालला असतां भारद्वाजानें ज्यांचा निरोध केला होता, त्या पांचालांनीं कौरवांबरोबर कसें युद्ध केलें ! तें मला सांग.

( २ ) **संजय**—हे राजन्, अंगावर रोमांच आणणारा तो रणसंग्राम चालला असतां अपराह्णकालीं कौरव-पांडवांचें द्रोणासंबंधीं जणुंकाय द्यूतच प्रवृत्त झालें. द्रोणाच्या वधेच्छेनें पांचाल मोठ्यानें गर्जना करीत त्याच्यावर शरवृष्टि करूं लागले. सर्व पांचाल व पांडव द्रोणरथाच्या समीप येऊन सैन्याचा भेद करण्याच्या हेतूनें त्याच्यावर महान् अस्त्रें सोडूं लागले. देव-दानवांच्या युद्धाप्रमाणें त्यांचा घोर संग्राम सुरू झाला. पांडवांचे अनेक वीर द्रोणावर चालून गेले व कौरवांच्या महारथांनीं त्यांचें निवारण केलें.

त्यानंतर धर्मराजानें नव्वद बाण सोडून द्रोणाचीं मर्मस्थलें विद्ध केलीं. द्रोणानें उलट त्याच्या वक्षःस्थलावर पंचवीस बाण सोडिले. पण युधिष्ठिरानें आपलें हस्तलाघव प्रकट करीत द्रोणशरांचें निवारण केलें. तेव्हां द्रोणानें अतिशय क्रुद्ध होऊन युधिष्ठिराचें धनुष्य तोडून टाकिलें व असंख्य बाणांची वृष्टि करून त्याला चोहों बाजूंनीं झांकून टाकिलें.

त्यावेळीं भारद्वाजाच्या बाणांनीं आच्छादित झालेला युधिष्ठिर अदृश्य झाल्यामुळें कित्येकांना ‘ तो राजा मृत झाला ’ असेंच वाटलें. तथापि युधिष्ठिरानें यत्किंचित्हि भ्रान्त न होतां दुसरें दृढ धनुष्य हातीं घेतलें व द्रोणाच्या बाणजालाचा छेद केला. याप्रमाणें पराक्रम प्रकट करून त्या धर्मपुत्रानें पर्वतांचेंहि विदारण करील, अशी भयंकर शक्ति हातीं घेतली आणि मोठ्यानें गर्जना केली. त्या नादानें सर्व भूतें भयभीत झालीं.

युधिष्ठिर द्रोणावर शक्ति उगारीत आहे, हें पाहून सर्व लोक ‘ द्रोणाचें कुशल असो ’ असें एकाएकीं म्हणाले. धर्मराजाच्या हातांतून सुटलेली ती शक्ति आकाश, दिशा व उपदिशा यांना प्रज्वलित करीत मुख पसरलेल्या नागिणीप्रमाणें द्रोणाच्या समीप आली. ती शक्ति आपल्याकडे येत आहे, हें पाहतांच अस्त्रवेत्त्या आचार्यांनीं ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. तेव्हां तें श्रेष्ठ अस्त्र त्या शक्तीला भग्न करून युधिष्ठिराच्या रथाकडे चाललें. महाप्राज्ञ युधिष्ठिरानें

उलट ब्रह्मास्त्र सोडून द्रोणाचें अस्त्र शांत केलें. नंतर तीक्ष्ण बाणांनीं आचार्यांस विद्ध करून एका बाणानें त्याच्या धनुष्याचा छेद केला.

धनुष्य मोडून पडतांच द्रोणानें आपली गदा हातीं घेतली व ती धर्मराजावर फेंकली. वेगानें येणारी ती गदा पाहून युधिष्ठिरानेंहि उलट गदाप्रहार केला. तेव्हां त्या दोन गदा एकमेकींवर आदळल्या, त्यांच्या घर्षणानें अग्नि उत्पन्न झाला व त्या भूमीवर पडल्या. त्यावेळीं द्रोण अतिशय क्रुद्ध झाला. त्यानें चार बाणांनीं युधिष्ठिराच्या अश्वांचा वध केला. एका बाणानें त्याचें धनुष्य तोडलें, दुसऱ्या बाणानें ध्वज खालीं पाडविला आणि तीन बाण सोडून त्याला विद्ध केलें.

राजा, त्यावेळीं युधिष्ठिरानें आपल्या अश्वरहित रथांतून उडी मारली व शस्त्रहीन झालेला तो हात वर करून उभा राहिला. याप्रमाणें तो धर्मराजा विरथ व निःशस्त्र झाला आहे, हें पाहून द्रोणानें त्याच्या सर्व सैन्यासह शत्रूला मोहित केलें आणि मृगावर धांवणाऱ्या बलाढ्य सिंहाप्रमाणें द्रोणानें युधिष्ठिरावर झडप घातली.

( ३ ) परंतप द्रोण धर्मराजावर धांवून येत आहे, हें पहातांच सर्व पांडवसैन्यानें 'राजा हत झाला, द्रोणानें धर्मराजाचा वध केला' असा आक्रोश आरंभिला. इतक्यांत युधिष्ठिर संधि साधून सहदेवाच्या रथावर मोठ्या त्वरेनें आरूढ झाला व अश्वांना प्रेरणा करून तेथून दूर निघून गेला. ७. ५. १०६.

---

## अध्याय १०७ वा.

[ १ क्षेमधूर्तीचें पतन. २ वीरधन्व्याचा वध. ३ दुर्मुख-सहदेवयुद्ध. ४ नकुल व सात्यकि यांचा पराक्रम. ]

( १ ) संजय—हे महाराज, इकडे केकयदेशाचा पराक्रमी राजा बृहत्क्षत्र क्षेमधूर्तीवर चालून गेला. तेव्हां त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. द्रोणसैन्याचा भेद करण्याच्या हेतूनें बृहत्क्षत्रानें त्याचे अश्व व सारथि यांचा वध करून त्याला विरथ केलें व एक भल्लबाण सोडून त्याचें कुंडलानें शोभणारें मस्तक खालीं पाडविलें. त्यावेळीं भूमीवर पडलेलें तें किरीटयुक्त शिरकमल आकाशांतून तुटून पडणाऱ्या ताऱ्याप्रमाणें भासलें.

( २ ) याप्रमाणें क्षेमधूर्तीचा वध करून तो केकयाधिप अर्जुनाचें प्रिय करण्यासाठीं तुझ्या सैन्यावर तुटून पडला. त्यावेळीं द्रोणावर चालून जाणाऱ्या त्या धृष्टकेतूचें वीरधन्व्यानें निवारण केलें. दोन मदोन्मत्त गजांप्रमाणें त्या दोघां वीरांचें युद्ध जुंपलें. गिरिगह्वरांतील दोन क्रुद्ध व्याघ्रांप्रमाणें ते संतप्त झालेले वीर परस्परांवर तुटून पडले. त्यांचें तें तुमुल युद्ध सिद्ध-चारणांच्या संघासहि विस्मयकारक वाटलें. प्रथम वीरधन्व्यानें धृष्टकेतूचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां त्यानें तें तुटलेलें धनुष्य टाकून दिलें, प्रचंड शक्ति हातीं घेतली व ती अतिशय वेगानें वीरधन्व्याच्या रथावर फेंकली. त्या भयंकर शक्तीच्या प्रहारानें त्याचें हृदय विदीर्ण होऊन तो वीर रथांतून तत्काल खालीं पडला व गतप्राण झाला. याप्रमाणें त्रिगर्तांचा एक महारथी हत झाला असतां पांडववीरांनीं तुझ्या सैन्याला चोहोंबाजूंनीं उधळून दिलें.

( ३ ) हे महाराज, त्याच वेळीं दुसरीकडे सहदेव आणि दुर्मुख यांचें युद्ध जुंपलें होतें. दुर्मुखानें त्या माद्रेयावर साठ बाण सोडून पांडवांना भयभीत करण्यासाठीं प्रचंड सिंहनाद केला. तेव्हां सहदेवानें हंसतच त्याच्यावर तीक्ष्ण शरांची वृष्टि आरंभिली. त्यानें एक भल्ल बाण सोडून दुर्मुखाचा ध्वज तोडून टाकिला. चारी अश्वांचा वध केला, सारथ्याचा शिरश्छेद केला व शेवटीं त्याच्या धनुष्याचाहि छेद केला.

तेव्हां विरथ झालेला दुर्मुख निरमित्राच्या रथावर चढला. तथापि क्रुद्ध झालेल्या सहदेवानें त्या निरमित्राचा एकाच बाणानें वध केला. तेव्हां तो गतप्राण झालेला त्रिगर्तराजाचा पुत्र रथांतून खालीं पडला. त्यावेळीं खर राक्षसाच्या वधप्रसंगीं शोभणाऱ्या दाशरथि रामाप्रमाणें सहदेव शोभत होता. राजपुत्र निरमित्र पडलेला पाहून त्रिगर्त हाहाकार करूं लागले.

( ४ ) नकुलानें तुझ्या दीर्घलोचन व विकर्ण या दोघां पुत्रांस अतिशय त्रस्त केलें. व्याघ्रदत्तानें सात्यकीस अश्व, रथ व सारथि यांसह शरांनीं झांकून टाकिलें. त्या शैनेयानेंहि व्याघ्रदत्ताचा रथाश्वांसह संहार केला. तो मागधराजाचा पुत्र मरण पावतांच सर्व मागधवीर युयुधानावर धांवून गेले. तथापि सात्यकीनें त्या सर्वांस सहज जिंकलें. तेव्हां जिवंत असलेले मागध दश-दिशांत पळाले. तें पाहून युयुधानाच्या बाणांनीं त्रस्त झालेले तुझे सैनिकहि जेथें मार्ग दिसेल, तेथें पळत सुटले.

याप्रमाणें तुझ्या सैन्याचा नाश करून सात्यकि आपलें श्रेष्ठ धनुष्य हातांत घेऊन रणांगणांत झळकत असतां त्याच्या पुढें जाण्यास एकहि वीर धजला नाहीं. तें पाहून द्रोणाचार्य अतिशय क्रुद्ध होऊन सत्यपराक्रमी सात्यकीवर धांवून गेला. ७. ५. १०७.

---

## अध्याय १०८ वा.

[ १ द्रौपदेय-सौमदत्तियुद्ध, सौमदत्तीचा वध. २ अलंबुषाचा पराजय. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्या संकुलयुद्धांत सौमदत्तीनें महा धनुर्धर द्रौपदीपुत्रांवर अनेक बाण सोडून त्यांना विद्ध केलें. त्यावेळीं ते आरंभीं भ्रान्त झाले, काय करावें तें त्यांस क्षणभर सुचेना, इतक्यांत नकुलपुत्र शतानीकानें सोमदत्तीवर दोन बाण सोडून त्याला विद्ध केलें. तेव्हां त्याच्या दुसऱ्या भ्रात्यांनींहि त्याच्यावर शरवृष्टि चालविली. त्या पांची भ्रात्यांनीं त्याला परिवेष्टित करून शरांनीं पीडित केलें.

अर्जुनाच्या पुत्रानें त्याच्या अश्वांचा वध केला. भीमपुत्रानें धनुष्याचा छेद केला. युधिष्ठिराच्या पुत्रानें ध्वज पाडविला, नकुलपुत्रानें सारथ्याला गतप्राण केलें आणि सहदेवाच्या पुत्रानें एका तीक्ष्ण बाणानें त्याच्या मस्तकाचा छेद करून तें खालीं पाडविलें. याप्रमाणें महात्म्या सौमदत्तीचा शिरश्छेद झालेला पाहून तुझे सैनिक भयभीत झाले व अनेक मार्गांनीं पळत सुटले.

( २ ) हे राजन्, लक्ष्मणाशीं युद्ध करणाऱ्या इंद्रजिताप्रमाणें क्रुद्ध झालेला अलंबुष भीमसेनावर धांवला. त्या दोघां मानव-राक्षसांचें युद्ध जुंपलेलें पाहून सर्व प्राण्यांना विस्मय व भय वाटलें. भीमानें नऊ तीक्ष्ण शर सोडून त्या राक्षसेंद्राला विद्ध केलें. तेव्हां त्या राक्षसानें मोठ्यानें गर्जना केली व तो आपल्या अनुयायांसह भीमावर तुटून पडला. त्या सर्व राक्षसांनीं मिळून चारशें तीस रथांचें चूर्ण करून टाकिलें व भीमालाहि शरांनीं विद्ध केलें.

राक्षसांच्या शरांनीं अतिशय विद्ध झाल्यामुळें बलाढ्य भीमहि विह्वल झाला, त्याला मूर्च्छा आली व तो रथांतच निश्चेष्ट होऊन पडला. परंतु लगेच सावध होऊन तो देहभानावर आला आणि अलंबुषावर तुटून पडला. त्यानें आपलें दृढ धनुष्य हातांत घेऊन त्या राक्षसाचें सर्व अंग तीक्ष्ण शरांनीं भरून टाकिलें. त्यावेळीं काजळाच्या राशीसारखें त्याचें शरीर अनेक बाणांनीं विद्ध झाल्यामुळें पुष्पित पलाशवृक्षाप्रमाणें शोभलें.

भीमाच्या बाणांनीं पीडिलेल्या त्या राक्षसानें आपल्या भ्रात्याचा वध स्मरून घोर रूप धारण केलें व भीमाला म्हटलें—"हे पृथापुत्रा, थांब, आतां रणामध्यें माझा पराक्रम पहा. बकासुर माझा भ्राता होता. त्याचा तूं माझ्या परोक्ष वध केलास, त्याचें फल आज मी तुला भोगावयास लावीन."

असें बोलून तो राक्षस अदृश्य झाला व त्यानें भीमाबरोबर मायावी युद्ध आरंभिलें. त्यानें उत्पन्न केलेल्या घोर शरवृष्टीनें भीमाच्या सैनिकांचा संहार होऊं लागला आणि त्या रणांगणांत रक्ताची दारुण नदी निर्माण झाली. तो राक्षस समरांगणांत निर्भयपणें संचार करीत असतां पांडव अतिशय उद्विग्न होऊन शून्य दृष्टीनें त्याचा पराक्रम पाहूं लागले व तुझे सैनिक आनंदानें वाद्यें वाजवूं लागले.

तुझ्या सैन्यांत होणारा तो निर्घोष अमर्षी भीमसेनाला सहन झाला नाहीं. त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त होऊन प्रदीप्त अग्नीप्रमाणें दिसूं लागले. त्या वायुसुतानें साक्षात् विश्वकर्म्याप्रमाणें त्वाष्ट्र अस्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्रानें समंततः सहस्रावधि शर उत्पन्न झाले. तेव्हां तुझें सैन्य भयभीत होऊन पळूं लागलें. अलंबुषानें पसरलेल्या त्या मायेचा भीमसेनाच्या अस्त्रप्रभावानें नाश होऊन तो राक्षसहि पीडित झाला.

याप्रमाणें वृकोदरानें अनेकप्रकारें त्रस्त केलें असतां तो राक्षस रणांगण सोडून द्रोणसैन्याकडे पळाला. महाबलाढ्य भीमसेनानें अलंबुषास जिंकलेलें पाहून पांडवांनीं प्रचंड सिंहनाद केला. त्या नादानें दाही दिशा भरून गेल्या. नंतर प्रल्हादास जिंकलें असतां इंद्राची स्तुति करणाऱ्या मरुद्गणाप्रमाणें पांडवांनीं हर्षभरानें त्या महाबलाढ्य वृकोदराची प्रशंसा केली. ७. ५. १०८.

---

## अध्याय १०९ वा.

[ १ घटोत्कच-अलंबुषयुद्ध. २ अलंबुषाचा वध. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर अलंबुषराक्षस निर्भयपणें समरांगणांत संचार करूं लागला. तेव्हां घटोत्कच मोठ्या वेगानें त्याच्यावर धांवला. त्यावेळीं त्या दोघां राक्षसांचे शक्र-शंबरासुरांसारखें दारुण युद्ध जुंपलें. त्या दोघांनीं आपल्या भयंकर गर्जनांनीं अंतरिक्ष भरून टाकिलें. ते दोघेहि

मायायुद्धांत प्रवीण असल्यामुळें त्यांनीं मायावी युद्ध आरंभिलें. घटोत्कच मायेचा जेवढा प्रकार प्रकट करी, तेवढ्याचा अलंबुष नाश करी. याप्रमाणें मायायुद्धविशारद अलंबुष भीमपुत्राचा पराभव करीत आहे, हें पाहून क्रुद्ध झालेले पांडव पुढें सरसावले, त्यांनीं अलंबुषाला समंततः वेढा देऊन त्याच्यावर शरवृष्टि आरंभिली.

तथापि अलंबुषानें त्या सर्व बाणांचें आपल्या अस्त्रमायेनें निवारण केलें व अरण्यांतील वणव्यांतून बाहेर पडणाऱ्या गजाप्रमाणें तो त्या शरजालांतून बाहेर पडला. नंतर त्यानें चौघे पांडव व पांच द्रौपदेय यांच्यावर असंख्य बाण सोडले. तें पाहून क्रुद्ध झालेल्या घटोत्कचानें त्या राक्षसावर सात तीक्ष्ण बाण सोडिले. त्यांनीं तो अतिशय विद्ध झाला. पांडवांनींहि त्याच्यावर शरांचा वर्षाव चालविला, तेव्हां शरांनीं विद्ध झालेला अलंबुष मरणोन्मुख झाला. पुढें काय करावें तें त्याला सूचेना.

( २ ) अलंबुषाची ती भ्रान्त मनःस्थिति पाहून महाबलाढ्य हैडिम्बानें त्याच्या वधाचा विचार केला. तो अतिशय वेगानें त्या राक्षसाच्या रथावर धांवला आणि गरुड जसा सर्पावर झडप घालतो, तसें त्यानें अलंबुषाला उचलून घेतलें व दोन हातांनीं त्याला गरगर फिरवून जोरानें भूमीवर आपटलें. तेव्हां जलपूर्ण कुंभ दगडावर आपटला असतां त्याचें जसें चूर्ण होतें, तसें त्या राक्षसाचें विशाल शरीर भग्न झालें. भीमपुत्रानें राक्षसाचा नाश करून सर्व सैन्यास भयभीत केलें. त्यावेळीं अलंबुषाचे सर्व अवयव विदीर्ण झाले होते. त्याच्या अस्थींचें चूर्ण झालें होतें. त्यामुळें तो अतिशय भीषण दिसत होता. भूमीवर पडलेला त्याचा मृतदेह कंटकयुक्त शालवृक्षासारखा भासत होता.

याप्रमाणें त्या निशाचराचा वध झाला असतां पांडवांचीं मनें प्रसन्न झालीं. त्यांनीं हर्षभरानें सिंहनाद केला. पर्वत विदीर्ण व्हावा, त्याप्रमाणें बलाढ्य अलम्बुष हत झाल्याचें पाहून तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला. स्वेच्छेनें भूमीवर पसरलेल्या अग्नीप्रमाणें तो राक्षस रणांगणांत पडला असतां सर्व लोक मोठ्या कुतूहलानें त्याच्याकडे पाहूं लागले. घटोत्कचानें त्या राक्षसाला गतप्राण करून बलदैत्यास मारणाऱ्या वासवाप्रमाणें भयंकर गर्जना केली.

हैडिंबाचें तें दुष्कर कर्म पाहून त्याचा पिता व पितृव्य यांनीं त्याचा सत्कार केला. पक्व भोपळ्याप्रमाणें अलंबुषाचा नाश करून घटोत्कच आनंदित झाला

व पांडवसैन्यांत शंखनाद आणि रणवाद्यें यांनीं युक्त असा प्रचंड जयघोष झाला. ७. ५. १०९.

---

## अध्याय ११० वा.

[ १ द्रोण-सात्यकियुद्ध. २ युधिष्ठिराचें सात्यकीच्या साह्यार्थ गमन. ३ युधिष्ठिराची सात्यकीला अर्जुनाकडे जाण्याची प्रेरणा. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, भारद्वाजानें युयुधानाचें युद्धांत कसें निवारण केलें तें मला सांग. मी तें तत्त्वतः ऐकण्याविषयीं उत्सुक झालों आहें.

संजय—हे महाप्राज्ञ राजन्, युयुधानादि पांडवांबरोबर द्रोणाचा जो संग्राम झाला, तो अंगावर रोमांच उत्पन्न करणारा होता. त्या युद्धाचा वृत्तांत मी तुला सांगतों, ऐक. युयुधानानें सैन्याचा संहार चालविला आहे, हें पाहून द्रोण त्या सत्यपराक्रमी सात्यकीवर चालून गेला. त्या दोघांनीं परस्परांवर बाण सोडले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. त्या सात्वतानें द्रोणास विद्ध केलें व शेवटीं द्रोणानें तीक्ष्ण बाणांनीं त्याला मरणप्राय पीडित केलें. त्यावेळीं त्याला काय करावें, हेंहि सुचेना. तो विषण्णमुखानें द्रोणावर बाण सोडूं लागला. त्याची अशी दीनावस्था पाहून तुझे सैनिक हर्षभरानें सिंहनाद करूं लागले.

( २ ) कौरवसैन्याचा तो घोर शब्द ऐकून व सात्यकीची ती दुरवस्था पाहून युधिष्ठिर आपल्या सैनिकांस म्हणाला—" हे वीरहो, राहूकडून ग्रस्त होणाऱ्या सूर्याप्रमाणें हा वृष्णिवीर द्रोणाकडून ग्रासला जात आहे. यास्तव तो सात्यकि जेथें आहे तेथें चला."

नंतर तो धर्मराज पांचाल धृष्टद्युम्नाकडे वळून म्हणाला—" हे पार्षता, असा उभा काय राहिलास! सत्वर द्रोणावर चालून जा. या द्रोणानें आम्हांला घोर संकटांत टाकलें आहे. अरे, दोरीनें बांधलेल्या पक्ष्यांशीं बालक जसा खेळत असतो, तसा हा द्रोण रणामध्यें सात्यकीशीं क्रीडा करीत आहे. भीमसेनादि तुम्ही सर्व एकत्र जमून युयुधानाच्या साह्यार्थ जा. मीहि सैन्यांसह तुमच्या मागोमाग येतों. सात्यकि यमाच्या दाढेंत सांपडला आहे, तूं त्याला आधीं मुक्त कर, जा."

असें बोलून युधिष्ठिर सर्व सैन्यासह युयुधानाच्या रक्षणार्थ द्रोणावर धांवून गेला. तेव्हां द्रोणाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें पांडव व संजय यांनीं चोहों-

बाजूंनीं प्रचंड कोलाहल केला व द्रोणावर शरांची वृष्टि चालविली. तथापि तो आचार्य भ्रान्त झाला नाहीं. त्यानें हंसतच सर्व वीरांचा बाणांनीं सत्कार केला. त्यावेळीं द्रोणानें पांचालाचे पंचवीस प्रख्यात महारथी, केकयांचे शंभर वीर आणि पांडवसैन्यांतील मुख्य मुख्य योद्धे यांना यमसदनीं पाठवून दिले. सहस्रावधि पांचाल, सृंजय, मत्स्य व केकय यांचा पराभव केला आणि तो वृद्ध आचार्य मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें त्या रणांगणांत संचार करूं लागला. तेव्हां द्रोणाच्या शरांनीं विह्वल झालेल्या सैनिकांचा प्रचंड कोलाहल कानीं आला.

अंतरिक्षांतून देव, गंधर्व व पितर म्हणाले कीं हे पहा, पांचाल व पांडव आपल्या सैन्यासह पलायन करीत आहेत. याप्रमाणें द्रोणानें सोमकांचा संहार चालविला असतां, त्याच्या निवारणार्थ कोणीहि पुढें आलें नाहीं. जे कोणी आले, ते आचार्यावर शर सोडण्यास समर्थ झाले नाहींत.

अशाप्रकारें वीरांचा संहार चालला असतां एकाएकीं पांचजन्याचा प्रचंड ध्वनि धर्मराजाच्या कानीं आला. त्यावेळीं जयद्रथाचें रक्षण करणारे वीर युद्ध करीत होते. कौरवांचे योद्धे पार्थाच्या रथाभोंवतीं जमून मोठ्यानें गर्जना करीत होते. परंतु गांडीवाचा टणत्कार कोठेंच ऐकूं येईना. वासुदेवाचा श्रेष्ठ शंख मोठमोठ्यानें वाजत होता. तो शब्द ऐकतांच धर्मराजाच्या मनांत अशुभ कल्पना येऊन तो विचार करूं लागला. तो मनांत म्हणाला कीं, ज्याअर्थीं पांचजन्य जोरानें वाजत आहे व कौरव वारंवार प्रचंड गर्जना करीत आहेत, त्याअर्थीं धनंजयाचें कुशल नसावें. निश्चयानें त्याचें जीवित महत्संकटांत सांपडलें असावें.

असा विचार मनांत येतांच धर्मराजाचें अंतःकरण चिंतेनें व्याकुल झालें. तो मोहित झाला व जयद्रथवधाचें कार्य निर्विघ्नपणें पार पडावें, अशी आकांक्षा करणारा तो पांडव सद्गदित कंठानें सात्यकीला असें वचन बोलला—

( ३ ) युधिष्ठिर—हे शैनेया, आपत्कालीं मित्रकार्य विहित होण्याचा प्रसंग आला असतां कसें वागावें याविषयीं सज्जनांनीं जो शाश्वतधर्म सांगून ठेविला आहे, तो आचरण्याचा समय आतां प्राप्त झाला आहे. हे शिनिश्रेष्ठा, या सर्व योद्धयांचा विचार केला असतां त्या सर्वांत तुझ्याहून श्रेष्ठ सुहृद् मला दुसरा कोणीहि दिसत नाहीं. हे सात्यके, जो नित्य आपल्यावर प्रसन्न असतो

व ज्याचा निश्चय सर्वदा दृढ असतो, त्याच्यावरच आपत्कालीं आपलें कार्य सोंपवावें, असेंच माझें मत आहे.

हे वार्ष्णेया, तूं कृष्णाप्रमाणेंच पांडवांच्या हितार्थ सर्वदा तत्पर असतोस. तुझा पराक्रमहि कृष्णतुल्य आहे. यास्तव मी तुजवर महत्त्वाचें कार्य सोंपवितों. तें पार पाडण्यास तूं समर्थ आहेस. माझे मनोरथ तूं कदापि विफल करणार नाहींस. यास्तव तूं पार्थाला समरांगणांत साह्य कर. तो धनंजय तुझा भ्राता, मित्र व गुरु आहे. तूं दृढनिश्चयी व शूर आहेस. लोकांमध्यें तुझी सत्यवचनी अशी प्रसिद्धि असून तूं संकटसमयीं सुहृदांना साह्य करणारा आहेस. मित्रकार्यार्थ युद्धांत देह ठेवणारा आणि ब्राह्मणांना पृथ्वीचें दान देणारा हे दोघेहि समान आहेत. ब्राह्मणांना समग्र पृथ्वीचें यथाविधि दान करणारे अनेक नृपति स्वर्गाला गेल्याचें आम्हीं ऐकलें आहे.

यास्तव हे धर्मात्मन्, तूं अर्जुनाला या संग्रामांत साह्य कर अशी मी हात जोडून तुझ्यापाशीं याचना करीत आहें. त्यायोगानें तुला पृथ्वीदानाचें, तत्तुल्य दुसरें किंवा त्याहूनहि अधिक फल प्राप्त होईल. मित्रांना सर्वदा अभय देणारा श्रीकृष्ण पार्थासाठीं रणामध्यें प्राणत्यागहि करण्यास तत्पर असतो, त्याचप्रमाणें तूंहि आहेस, अशी माझी दृढ मति आहे. जयाची इच्छा करणाऱ्या पराक्रमी वीरास शूरच साह्य करूं शकतो. इतर प्राकृत जनांना तें शक्य नाहीं.

हे माधवा, सांप्रतच्या संग्रामांत पार्थाचें रक्षण करणारा तुजवांचून अन्य कोणी नाहीं. अर्जुन तुझ्या पराक्रमाची सर्वदा प्रशंसा करून माझ्या मनांत हर्ष उत्पन्न करीत असतो. तो नेहमीं म्हणत असतो कीं, सात्यकि विचित्र युद्ध करणारा असून त्याचें हस्तलाघव विलक्षण आहे. तो उदार अंतःकरणाचा महारथ अतिशय सुदृढ व बलाढ्य आहे. तो माझा आवडता शिष्य व मित्र असून मीहि त्याला अतिशय प्रिय आहें. माझा साह्यकर्ता युयुधान कौरवांचा निःपात करील. श्रीकृष्ण, बलराम, अनिरुद्ध, प्रद्युम्न, गद, सारण किंवा वृष्णीसह सांब हे सर्व जरी रणांगणांत आमच्या साह्यास तत्पर असले तरी मी माझ्या साह्यार्थ सत्य-पराक्रमी सात्यकीलाच घेईन. त्याच्यासारखा माझा अन्य साह्यकर्ता नाहीं.

बा युयुधाना, याप्रमाणें तुझ्या परोक्ष तुझ्या सद्गुणांचें वर्णन करून द्वैतवनांत धनंजयानें मजजवळ तुझी प्रशंसा केली होती. आतां धनंजयाचा व माझ्या भीमाचा संकल्प वृथा न होऊं देणें सर्वस्वीं तुझ्या स्वाधीन आहे. वार्ष्णेया,

तीर्थयात्राप्रसंगानें मी जेव्हां द्वारकेस गेलों होतों, तेव्हांहि तुझी अर्जुनावरील भक्ति माझ्या निदर्शनास आली आहे. संकटांतहि तूं आम्हांला साह्य करीत आला आहेस. अशा प्रकारचें निरपेक्ष प्रेम मला इतरत्र कोठेंहि आढळलें नाहीं. यास्तव तुझें मित्रप्रेम, गुरुभक्ति, सत्यनिष्ठा, कुलीनत्व व दयालुत्व यांस अनुरूप असेंच कर्म करणें तुला उचित आहे.

हे शिनिश्रेष्ठा, द्रोणानें दुर्योधनाला जें दिव्य कवच बांधलें आहे, त्या कवचाच्या सामर्थ्यावर तो धार्तराष्ट्र अर्जुनाकडे मोठ्या वेगानें गेला आहे. कौरवांचे महारथ पूर्वींच तेथें जमले आहेत. आतां अर्जुनाच्या सैन्यांत फार मोठा कोलाहल ऐकूं येत आहे. यास्तव तूं सत्वर जा. मी व भीमसेन सैन्यासह सज्ज आहों. द्रोणानें जर तुला प्रतिबंध केला, तर आम्ही त्याचें निवारण करूं.

ही त्वरेनें जाणारी प्रचंड भारतीसेना पहा ! या शूर सिंधु-सौवीरांनीं अर्जुनाला वेढून टाकिलें आहे. हें अनिवार्य सैन्य सहज जिंकतां येणें शक्य नाहीं. हे सर्व वीर जयद्रथाच्या रक्षणासाठीं स्वतःच्या जिवावर उदार होऊन युद्ध करीत आहेत. बा सात्यके, पृथ्वीला कंपित करणारा हा कौरवसेनेचा शब्द ऐक. अर्जुनाच्या अग्रभागीं जयद्रथाचें सैन्य व मागच्या बाजूस द्रोणाचें सैन्य स्थित आहे. तें अपरिमित सैन्य साक्षात् देवेंद्रासहि ग्रस्त करील. त्या असंख्य सैन्यांत सांपडून धनंजय कदाचित् प्राणहि सोडील आणि त्या माझ्या आत्याच्या जीवाला जर युद्धांत कांहीं अपाय झाला, तर मीं जिवंत तरी कसा राहूं शकेन ! अरे, तूं जिवंत असतांना मीं अशा संकटांत सांपडावें ना !

हे शैनेया, शीघ्रास्त्रवेत्ता गुडाकेश पार्थ सूर्योदयापासून शत्रुसैन्यांत शिरला आहे. तो आतां माध्याह्नकाल उलटून गेला तरी तेथेंच आहे, त्यामुळें त्याच्या जीविताविषयीं मला संशय वाटूं लागला आहे. कौरवांचें हें सैन्य सागरासारखें अपार पसरलें असून बीभत्सु एकटाच त्यांत शिरला आहे. ही कौरवसेना देवांनाहि असह्य आहे. त्यामुळें माझें मन अतिशय अस्वस्थ झालें आहे. युद्धाकडे लक्ष लागत नाहीं.

द्रोणाचार्य क्षुब्ध होऊन माझ्या सैन्याला पीडा देत आहे. तुझ्या समक्ष तो द्विज रणांगणांत कसा संचार करीत आहे पहा. याप्रमाणें अनेक कार्यें एकाच वेळीं उपस्थित झालीं आहेत. तथापि तूं विचक्षण आहेस. कोणतें कार्य

अधिक महत्त्वाचें व अल्प साधनानें साधणारें आहे, याचा विचार कर. परंतु माझ्या मतानें तर अर्जुनाचें संरक्षण हेंच मुख्य कार्य होय. दाशार्ह कृष्ण सर्व जगाचा पालनकर्ता आहे, त्याच्याविषयीं मला चिंता वाटत नाहीं. कारण रणांगणांत समग्र त्रैलोक्य जरी एकत्र होऊन आलें तरी त्यास जिंकण्यास तो पुरुषव्याघ्र समर्थ आहे. हें मी तुला सत्य सांगतों. मग त्याच्या पुढें अत्यंत दुर्बल असलेल्या कौरवसैन्याची काय कथा! तथापि धनंजय युद्धांत अनेक वीरांच्याकडून विद्ध होऊन प्राणास मुकेल कीं काय अशी मला भीति वाटते. यास्तव तूं त्याच्या साह्यार्थ जा.

पार्थासारख्या वीरावर संकट आलें असतां माझ्या सारख्याच्या प्रेरणेनें तुझ्या सारखेच श्रेष्ठ पुरुष पुढें होत असतात. रणांगणामध्यें प्रद्युम्न व तूं अशा दोघां वृष्णिवीरांची अतिरथ म्हणून प्रसिद्धि आहे. हे सात्वतश्रेष्ठा, तूं अस्त्रविद्येंत नारायणाच्या तुल्य आहेस. सामर्थ्यांत बलरामाच्या समान आहेस व तुझा पराक्रम अर्जुनासारखा आहे. भीष्म व द्रोण यांच्यावांचून पृथ्वी वरील सर्व वीरांत तूंच एक सर्व प्रकारच्या युद्धांत निष्णात आहेस. शिवाय 'या जगांत सात्यकीला अशक्य असें कांहींच नाहीं' असेंहि ज्ञाते जन म्हणत असतात.

यास्तव हे शैनेया, मी तुला सांगतों तसें कर. तुझें कुल, शील, ज्ञान इत्यादि सर्वांविषयीं सर्व लोकांची, अर्जुनाची व माझी जी श्रद्धा आहे ती अन्यथा करूं नको. तूं प्राणांचाहि त्याग करून रणांत संचार कर. दाशार्ह रणामध्यें प्राणाकडे पहात नसतो. युद्धपराङ्मुखत्व, अस्थैर्य व पलायन हे भीरूंचे मार्ग आहेत. श्रीकृष्ण त्यांचें कदापि अवलंबन करीत नाहीं.

बा युयुधाना, धर्मात्मा अर्जुन तुझा गुरु असून श्रीकृष्ण अर्जुनाचा गुरु आहे आणि मी तुझ्या गुरुचाहि गुरु आहें. यास्तव तूं माझ्या वचनाचा अवमान करूं नको. कृष्णार्जुनांचेंहि मजप्रमाणेंच मत आहे, असें निश्चयानें मानून तूं पार्थाच्या साह्यार्थ जा. माझें हें वचन मान्य करून तूं दुरात्म्या दुर्योधनाच्या सैन्यांत प्रवेश कर आणि हे शिनिश्रेष्ठा, तेथें महारथ्यांशीं यथान्याय युद्ध करून तुला अनुरूप असाच पराक्रम करून दाखीव. ७. ५. ११०.

---

## अध्याय १११ वा.

[ १ सात्यकीचें उत्तर. २ युधिष्ठिराची सात्यकीला पार्थसंरक्षणार्थ जाण्याची आज्ञा. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, युधिष्ठिराचें तें प्रीतियुक्त मधुर भाषण श्रवण करून तो सात्यकि असें म्हणाला—"हे धर्मराजा, तुझें बोलणें मीं लक्षपूर्वक ऐकलें. तें न्याययुक्त व फाल्गुनाला यशस्कर आहे. संकटप्रसंगीं तूं पार्थाला जसा उपदेश केला असतास तसा मलाहि करणें योग्यच आहे. मी धनंजयासाठीं प्राणांचाहि त्याग करण्यास तत्पर आहें. शिवाय तुझी आज्ञा झाली असतां मी देव-दानव-मानव यांसह समग्र त्रैलोक्याशींहि युद्ध करीन, मग दुर्योधनाच्या दुर्बल सैन्याची काय कथा ! मी या कौरवसेनेला आज युद्धांत जिंकीन, हें तुला प्रतिज्ञेनें सांगत आहें. मी स्वतः अक्षत राहून कुशल असलेल्या अर्जुनाला गांठीन आणि जयद्रथाचा वध करून पुनः तुझ्याकडे येईन.

तथापि हे राजा, श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांनीं मजवर जें कार्य सोंपविलें आहे तें तुला आधीं निवेदन केलें पाहिजे. सर्व सैन्याच्या मध्यभागीं उभे राहून वासुदेवाच्या समक्ष अर्जुनानें मला पुनः पुनः सांगितलें कीं, हे माधवा, मी जयद्रथाचा वध करून येईंपर्यंत तूं दक्ष राहून धर्मराजाचें रक्षण कर. तुझ्या व प्रद्युम्नाच्या हातीं राजाच्या रक्षणाचें कार्य सोंपवून मी कोणाच्याहि साह्याची अपेक्षा न करतां जयद्रथावर चालून जाईन. सर्व कौरवांत श्रेष्ठसंमत असलेल्या द्रोणानें धर्मराजास धरण्याची प्रतिज्ञा केली आहे, ती तुला अवगतच आहे. आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यास तो आचार्य समर्थ आहे. यास्तव राजाला तुझ्या स्वाधीन करून मी जयद्रथाच्या वधार्थ निघणार आहें. द्रोणानें धर्मराजाचें बलात्कारानें जर ग्रहण केलें नाहीं, तर मी जयद्रथाचा वध करून अल्पावधींतच परत येईन. परंतु राजा जर भारद्वाजाच्या हातीं लागला, तर मात्र माझा उत्साह नाहींसा होऊन सैंधवाचा वध करण्यास मी समर्थ होणार नाहीं. शिवाय सत्यवादी धर्मराज कौरवांच्या हातीं सांपडल्यास आम्हांला पुनः वनांत जावें लागेल, हें स्पष्टच दिसत आहे. क्रुद्ध झालेल्या द्रोणानें युद्धांत युधिष्ठिराचा जर निग्रह केला, तर माझा जय व्यर्थ होईल. यास्तव तूं आज माझें प्रिय करण्यासाठीं रणांगणांत राजाचें रक्षण कर. त्यायोगानें मला जय प्राप्त होऊन माझ्या यशाचें रक्षण होईल.

हे प्रभो, याप्रमाणें कौन्तेयानें द्रोणाच्या भीतीनें तुला 'ठेव' म्हणून माझ्या स्वाधीन केलें आहे. त्यानें सोंपविलेला हा भार सहन करण्यास रुक्मिणीपुत्रावांचून अन्य कोणीहि समर्थ नाहीं. मलाहि पार्थ भारद्वाजाचा प्रतियोद्धा समजतो. तेव्हां गुरूची आज्ञा उल्लंघून तुला सोडून जाण्यास माझें मन धजत नाहीं. राजा, द्रोणाचार्यांचें हस्तलाघव विलक्षण आहे. शिवाय त्यानें अभेद्य कवच धारण केलें आहे. तो पक्ष्याबरोबर खेळणाऱ्या शिशूप्रमाणें रणांगणांत योद्धयांशीं जणु काय क्रीडाच करील. यावेळीं मकरध्वज प्रद्युम्न जर हातीं धनुष्य घेऊन तुझ्या संनिध उभा असता, तर मी तुझ्या रक्षणाचा भार त्याच्याकडे सोंपवून गेलों असतों. तो वीर अर्जुनाप्रमाणें तुझें संरक्षण करील. पण आतां तुलाच स्वतःचें रक्षण करावें लागेल. आतां मी येथून गेल्यावर द्रोणाचें निवारण करून तुझें रक्षण करील, असा कोणता वीर आहे !

हे नृपश्रेष्ठा, तूं अर्जुनाविषयीं यत्किंचित्‌हि चिंता करूं नको. धनंजयानें एकदा एखादें कार्य स्वीकारलें कीं मग तो कदापि माघार घेत नसतो. कौरवांचे ते सौवीर, सैंधव, पौरव, उदीच्य, दाक्षिणात्य आणि कर्णादि महारथ यांना पार्थाच्या षोडशांशाचीहि बरोबरी करतां येणार नाहीं. सुरासुरांसह ही समग्र पृथ्वी व स्थावर-जंगमात्मक सर्व पदार्थ जरी एकत्र होऊन अर्जुनाच्या विरुद्ध उठले, तरीहि ते त्या सव्यसाचीचा पराभव करूं शकणार नाहींत. यास्तव हे राजा, तूं अर्जुनाविषयीं निश्चिंत रहा.

जेथें सत्यपराक्रमी महाधनुर्धर कृष्णार्जुन आहेत, तेथें कार्यहानि कदापि होणार नाहीं. हे राजन्, तूं आपल्या शास्त्रज्ञ भ्रात्याचें सामर्थ्य, अभिज्ञान, असहिष्णुत्व, कृतज्ञता व सदयत्व लक्षांत आण. शिवाय मी जर येथून निघून गेलों तर द्रोणाचें विचित्र अस्त्रलाघव विचारांत घे. ( तुझें रक्षण करण्यास मी जर सन्निध नसलों तर द्रोण तुला तत्काल धरील, असा याचा भावार्थ. ) तो आचार्य तुझें ग्रहण करण्यास उद्युक्त झाला आहे. तो युद्धनिपुण वीर आपली प्रतिज्ञा सत्य करण्यास उत्सुक झाला आहे. मी येथून हलल्यास तुलाच स्वतःचें रक्षण करावें लागेल. यास्तव हे राजा, ज्याच्यावर तुझ्या संरक्षणाचें कार्य सोंपविलें असतां, मला धनंजयाकडे निश्चिंतपणें जातां येईल, अशा वीराच्या स्वाधीन तुला केल्यावांचून मी येथून कोठेंहि जाणार नाहीं, हें मी तुला सत्य सांगत आहें. हे बुद्धिमानांतील श्रेष्ठ राजा, याचा तूं पूर्णपणें विचार कर आणि मग तुला जें श्रेयस्कर वाटेल, त्याची मला आज्ञा कर."

(२) युधिष्ठिर—हे महाबाहो, तूं म्हणतोस, तें सर्व सत्य आहे. तथापि अर्जुनाच्या जीविताविषयीं माझ्या मनांतील संशय अद्यापि दूर होत नाहीं. मी स्वतःच्या रक्षणाविषयीं दक्ष राहीन, पण तूं माझ्या अनुज्ञेनें धनंजयाच्या साह्यार्थ जा. हा महाबलाढ्य भीम, बांधवांसह धृष्टद्युम्न, पांच द्रौपदेय व हे सर्व महाबलाढ्य राजे माझें रक्षण करतील, यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें पांच केकय भ्राते, घटोत्कच, विराट, द्रुपद, शिखंडी, धृष्टकेतु, कुंतिभोज, पुरुजित, नकुल-सहदेव, पांचाल व सृंजय हे सर्व माझ्या संरक्षणार्थ तत्पर असतील. हे सर्व वीर येथें माझ्या सन्निध असल्यावर ससैन्य द्रोण किंवा कृतवर्मा समरांगणांत माझ्या समीप येण्यासहि धजणार नाहींत. हा परंतप धृष्टद्युम्न क्रुद्ध झालेल्या द्रोणाचें समुद्राच्या वेलेप्रमाणें निवारण करण्यास समर्थ आहे. हा परवीरांचा नाश करणारा पार्षत जेथें असेल, तेथें द्रोण किंवा त्याचें बलाढ्य सैन्य पाऊल टाकण्यासहि धजणार नाहीं. तो पांचाल केवल द्रोणाच्या वधासाठींच कवच, खड्ग, धनुष्य, शर व भूषणें यांसह अग्नींतून उत्पन्न झाला आहे. यास्तव तूं निर्भयपणें येथून जा. माझ्याविषयीं यत्किंचित्‌हि चिंता करूं नको. धृष्टद्युम्न क्रुद्ध झालेल्या द्रोणाचें रणामध्यें निवारण करील. ७. ५. १११.

---

## अध्याय ११२ वा.

[ १ सात्यकीचें पार्थाच्या साह्यार्थ गमन. २ किरातादि भिन्न भिन्न सैन्यांचें वर्णन. ]

(१) संजय—हे महाराज, धर्मराजाचें तें वचन ऐकून त्या शिनिपुङ्गवाचें चित्त द्विधा झालें. राजाला सोडून गेल्यास धनंजय काय म्हणेल, याचें त्याला भय वाटलें आणि अर्जुनाच्या साह्यार्थ न गेल्यास भीरुत्वाचा अपवाद येईल. 'हा शत्रूला भ्याला व फाल्गुनाकडे गेला नाहीं' असें लोक बोलूं लागतील. याप्रमाणें अनेकप्रकारें विचार करून शेवटीं त्यानें मनाचा निश्चय केला व तो युधिष्ठिरास असें म्हणाला—

सात्यकि—हे विशांपते, तुझें कुशल असो. मी स्वतःचें रक्षण करूं शकेन, असें तूं मानीत आहेस, तर ठीक आहे. मी तुझ्या आज्ञेप्रमाणें बीभत्सूच्या साह्यार्थ जातों. समग्र त्रैलोक्यांत मला अर्जुनापेक्षां अधिक प्रिय कोणी नाहीं.

तुझ्या आज्ञेप्रमाणें मी पार्थाकडे जातों. तुझ्यासाठीं मी करणार नाहीं, असें कोणतेंच कार्य नाहीं. मला जसें माझ्या गुरूचें वचन मान्य आहे, त्याचप्रमाणें किंबहुना त्याहूनहि अधिक तुझी आज्ञा प्रमाण आहे.

हे नृपश्रेष्ठा, कृष्णार्जुन सर्वदा तुझें प्रिय करण्यांत तत्पर असतात आणि मी तर त्या दोघांचें प्रिय करण्यास झटत असतों. यास्तव तुझी आज्ञा शिरसामान्य करून मी पार्थाकडे जातों. कौरवांच्या दुर्भेद्य सैन्याचा भेद करून मी आंत प्रवेश करीन आणि जेथें तो जयद्रथ असेल, तेथें जाईन. अर्जुनाच्या भीतीनें तो सैंधव सेनेच्या मध्यभागीं राहिला आहे. अश्वत्थामा, कर्ण व कृप हे बलाढ्य वीर सैन्यांसह त्याचें रक्षण करीत आहेत. तो जेथें स्थित आहे, तें स्थल येथून सुमारें तीन योजनें दूर आहे. जयद्रथवधार्थ उद्युक्त झालेला पार्थहि तेथें समीपच आहे. राजा, तो सिंधुपति जरी येथून तीन योजनें दूर स्थित आहे, तरी त्याचा वध होण्यापूर्वींच मी तेथें जाऊन पोंचेन.

हे प्रभो, गुरूच्या आज्ञेवांचून कोणता मानव युद्धाला उद्युक्त होईल ! आणि गुरूनें आज्ञा केल्यावर माझ्यासारखा कोणता वीर युद्धाला सज्ज होणार नाहीं ! मी जेथें जाणार आहें, त्या प्रदेशाची मला चांगली माहिती आहे. हा सैन्यसागर नांगर, शक्ति, गदा इत्यादि नानाविध आयुधांनीं युक्त आहे, तथापि मी त्यालाहि क्षुब्ध करीन.

( २ ) हे राजा, हें जें असंख्य गजसैन्य दिसत आहे, तें आंजनकनामक कुल होय. हे गज अतिशय पराक्रमी आहेत. त्यांवर आरूढ झालेले म्लेच्छ युद्धनिपुण आहेत. मदस्राव करणारे हे मेघतुल्य गज जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें युद्धामध्यें कदापि माघार घेत नाहींत. त्यांचा वध झाल्यावांचून ते पराभूत होत नाहींत.

हे धर्मराजा, त्याचप्रमाणें पलीकडे जे सहस्रावधि रथी तूं पहात आहेस, ते ‘रुक्मरथ’नामक बलाढ्य राजपुत्र आहेत. ते अस्त्रज्ञ असून द्वंद्वयुद्धांत प्रवीण आहेत. त्यांना धनुर्वेद, मुष्टियुद्ध, गदायुद्ध इत्यादि युद्धांतील सर्व प्रकार चांगले अवगत आहेत. ते परस्परांशीं स्पर्धा करणारे वीर विद्यासंपन्न व शूर आहेत. कर्णानें त्यांची योजना केली असून ते दुर्योधनाच्या मतानें वागत असतात. श्रीकृष्णहि त्यांची श्रेष्ठ रथी म्हणून प्रशंसा करीत असतो. ते कर्णाच्या वश असून सतत त्याचें प्रिय करण्यांत तत्पर असतात. कर्णाच्या वचनावरूनच

ते अर्जुनाचा पक्ष सोडून कौरवपक्षांत गेले. त्यांचीं धनुष्यें व कवचें अतिशय दृढ असून ते वीर क्लान्त किंवा श्रान्त होत नाहींत. केवल माझें निवारण करण्यासाठींच दुर्योधनानें त्यांची येथें योजना केली आहे. तथापि हे राजा, तुझें प्रिय करण्यासाठीं मी प्रथम त्यांचें मर्दन करून नंतर अर्जुनाकडे जाईन.

त्यांच्या पलीकडे सातशें किरातांनीं युक्त असलेले गज दिसत आहेत ना ! ते कवचें धारण केलेले योद्धे पूर्वीं दिग्विजयप्रसंगीं किरातराजानें पार्थाला अर्पण केले होते. ते सर्व गज अलंकृत करून महातांसह स्वतःच्या रक्षणार्थ दिलेले होते. त्यांनीं पूर्वीं तुझी पूर्णपणें सेवा केली आहे. पण आज तेच तुझ्या विरुद्ध युद्धाला उभे राहिले आहेत. कालाचा प्रभाव कसा असतो पहा ! त्यांचे महातहि किरातच असून ते हस्तशिक्षाविशारद आहेत. त्यांची उत्पत्ति अग्नीपासून झालेली आहे. त्यांना अर्जुनानें युद्धांत जिंकलें होतें. तथापि आज ते दुर्योधनाच्या वश झाले असून माझें निवारण करण्यासाठीं दक्षतेनें उभे आहेत. परंतु याहि युद्धदुर्मद किरातांचा मी शरांनीं संहार करीन आणि मग सैंधवाच्या वधासाठीं सज्ज होऊन पार्थाकडे जाईन.

हे जे विशाल गज दिसत आहेत, ते अंजनकुलांत उत्पन्न झाले असून ते युद्धामध्यें ऐरावततुल्य आहेत. ते मदोन्मत्त व कर्कश असले तरी चांगले शिक्षित आहेत. क्रूर स्वभावाच्या दस्यूंनीं हिमाचलाच्या उत्तरेकडून ते गज आणिले आहेत. ते दस्युहि शूर व घोर असून कृष्णवर्ण लोखंडी कवचानें युक्त आहेत. त्यांतील कित्येकांची उत्पत्ति गोयोनीपासून, कांहींची वानरापासून तर कांहींची मानवांपासून झाली आहे. हिमालयाच्या दुर्गम प्रदेशांत रहाणारे हे म्लेच्छ सैनिक धूम्रवर्णाचे आहेत. हें सैन्य प्राप्त झाल्यामुळें दुर्योधन पांडवांना तुच्छ लेखीत आहे. हें संपूर्ण राजमंडल कृप, सौमदत्ति, द्रोण, जयद्रथ व कर्ण यांच्या साह्यामुळें तर तो कालप्रेरित धार्तराष्ट्र स्वतःला कृतार्थ मानीत आहे.

तथापि हे धर्मराजा, ते सर्व वीर आज माझ्या बाणांच्या कक्षेंत आले असून, त्यांनीं मनोवेगानें जरी पलायन केलें तरी ते जिवंत सुटणार नाहींत. परवीर्योपजीवी दुर्योधनानें आजवर ज्यांचा मोठा सत्कार केला तेच आज माझ्या शरांनीं पीडित होऊन विनाश पावतील.

हे जे सुवर्णध्वज उभारलेले रथी दिसत आहेत, ते 'दुर्वारण'नामक कांबोज

आहेत, तूं कदाचित् त्यांच्याविषयीं ऐकिलेंहि असशील. ते विद्यासंपन्न व धनुर्वेदवेत्ते वीर परस्परांच्या हिताविषयीं तत्पर असल्यामुळें एकीनें वागतात. त्याचप्रमाणें कुरुवीरानें संरक्षण केलेलें दुर्योधनाचें कित्येक अक्षौहिणी सैन्य माझा प्रतिकार करण्यासाठीं सज्ज होऊन दक्षतेनें उभें आहे. तथापि तृणाला भस्मसात् करणाऱ्या अग्नीप्रमाणें मी त्यांना क्षणार्धांत दग्ध करीन.

हे राजन्, कुशल शिल्पकार माझा रथ सर्व प्रकारच्या आयुधांनीं सज्ज करूं दे. या संग्रामांत मला नानाप्रकारच्या शस्त्रांचा उपयोग करावा लागेल. दुर्योधनानें लालन केल्यामुळें सतत त्याच्या हितांत तत्पर असणारे किरात, विषतुल्य शर सोडणारे कांबोज, इंद्रतुल्य पराक्रमी शक आणि इतरहि युद्धदुर्मद वीरांशीं मी संग्राम करीन. आतां माझा सारथि अगोदर या शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या अश्वांना जल पाजून उत्साहयुक्त करूं दे व नंतर त्यांना माझ्या रथाला जोडूं दे.

संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर युधिष्ठिरानें त्याचा रथ सर्व प्रकारच्या शस्त्रांनीं सज्ज करविला. अश्वांची सेवा करणाऱ्या चतुर सेवकांनीं त्याच्या जातिवंत चारी अश्वांना रुचकर व मादक पेयें पाजलीं, ते अश्व दाणा खाऊन व पाणि पिऊन भूमीवर लोळले व अंग धुवून पुनः उत्तेजित झाले. त्यांच्या अंगांतील शल्यें काढून टाकिलीं होतीं. त्यामुळें ते प्रसन्न होत्साते जणुंकाय नृत्यच करीत होते. नंतर त्यांच्या अंगावर अलंकार चढवून त्यांना रथाला जोडलें. सात्यकीचा तो श्रेष्ठ रथहि उत्तमप्रकारें सजविला होता व सर्व आयुधांनीं युक्त होता. सात्यकीचा सारथि दारुकाचा कनिष्ठ भ्राता असून तो त्याचा प्रिय मित्रहि होता. त्यानें इंद्राच्या मातलीप्रमाणें सात्यकीला रथ सज्ज असल्याचें सांगितलें.

त्यानंतर सात्यकीनें स्नान केलें. शुचिर्भूत होऊन सर्व मंगल कृत्यें केलीं. स्नातकांस सुवर्णाच्या निष्कांचें दान दिलें, नंतर त्या मधुपर्कार्ह शैनेयानें शुभाशीर्वाद ग्रहण केले व शेवटीं ‘कैलातक’नामक मद्य प्राशन केलें. त्यावेळीं मदयुक्त झालेल्या त्याचे नेत्र आरक्त झाले. वीरांस योग्य असलेलें पेय प्राशन केल्यामुळें त्याचें तेज द्विगुणित झालें व तो रथिश्रेष्ठ अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसूं लागला. त्यानें सशर धनुष्य हातीं घेतलें, अलंकार धारण केले. त्यावेळीं ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन करून आणि कन्यांनीं सुगंधयुक्त पुष्पें व लाह्या उध-

कून त्याचें अभिनंदन केलें. तेव्हां त्या महाबाहूनें युधिष्ठिराच्या चरणांना वंदन करून हात जोडले असतां धर्मराजानें त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें. नंतर तो आपल्या महारथावर आरूढ झाला असतां त्याचे सिंधुदेशांतील मस्त झालेले जातिवंत अश्व रथ ओढीत वायुवेगानें पळत सुटले.

त्याचप्रमाणें युधिष्ठिरानें ज्याचा सत्कार केला आहे, असा भीमसेनहि धर्मराजास अभिवादन करून सात्यकीलाच अनुसरला. ते दोघे अरिंदम कौरवसेनेंत प्रवेश करीत आहेत, हें पाहून द्रोणादि वीर सज्ज झाले. भीमसेन आपल्या मागोमाग येत आहे, हें पाहतांच सात्यकीनें त्याचें अभिवादन केलें व हर्षभरानें म्हटलें—"हे भीमा, तूं राजाचें रक्षण कर. तेंच तुझें सर्वांत मुख्य कर्तव्य आहे. कालानेंच परिपक्क झालेल्या या शत्रुसैन्याचा मी एकटाच भेद करीन. परंतु याक्षणीं व उत्तरकालींहि धर्मराजाचें रक्षण करणेंच अधिक महत्त्वाचें कार्य आहे. हे अरिंदमा, तूं माझें सामर्थ्य जाणतोस व मीहि तुझा पराक्रम जाणतों. भीमा, माझें प्रिय व्हावें, असें जर तुला वाटत असेल, तर तूं परत फिर."

सात्यकीचें हें भाषण ऐकून भीम म्हणाला—हे पुरुषश्रेष्ठा, मी येथें राहून राजाचें रक्षण करतों. तूं जाऊन कार्यसिद्धि करून ये.

भीमाची ही संमति ऐकून हृष्ट झालेला सात्यकि म्हणाला—" हे पृथापुत्रा, जा, जा, सत्वर परत फिर. माझ्या गुणांवर अनुरक्त असलेला तूं ज्याअर्थी मला वश झालास, त्याअर्थी माझा विजय निश्चित आहे. हीं सर्व शुभ चिह्नें हेंच सूचित करीत आहेत. त्या पातकी सैंधवाचा महात्म्या पार्थानें वध केल्यानंतर मी धर्मात्म्या युधिष्ठिराला भेटेन."

असें बोलून त्या महा यशस्वी वीरानें भीमाला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि व्याघ्र जसा मृगसमुदायाकडे पहातो, तसा तो नरव्याघ्र नेत्र विस्फारून तुझ्या सैन्याकडे पाहूं लागला. त्यावेळीं तुझ्या सैन्यांत प्रवेश करण्यास उद्युक्त झालेल्या त्या सात्यकीला पहातांच तुझ्या सैन्याचा थरकांप झाला. ते भ्रांत होऊन पाहूं लागले; इतक्यांत त्या शिनिश्रेष्ठानें धर्मराजाच्या आज्ञेनें प्रथम अर्जुन कुशल आहे कीं नाहीं, हें पहाण्यासाठीं तुझ्या सैन्यांत प्रवेश केला. ७. ५. ११२.

---

## अध्याय ११३ वा.

[ १ पांडवसैन्याची सज्जता. २ सात्यकीचा कौरवसेनेंत प्रवेश ]

( १ ) **संजय**—हे महाराज, याप्रमाणें युद्धाच्या इच्छेनें सात्यकि अर्जुनाकडे गेला असतां युधिष्ठिर आपल्या सैन्यांसह द्रोणाला गांठण्यासाठीं त्याच्या मागोमाग निघाला. तेव्हां पंचालराजाचा युद्धदुर्मद पुत्र वसुदान पांडवसेनेंत मोठ्यानें गर्जना करून म्हणाला—"हे वीरहो, या, प्रहार करा, सत्वर धांवून या. सात्यकीला सुलभ रीतीनें जातां येईल, असा त्याला मार्ग द्या. त्याचा पराजय करण्याचा अनेक महारथी यत्न करीत आहेत."

त्याचे हे शब्द कानीं पडतांच पांडवांकडील योद्धे मोठ्या वेगानें पुढें सरसावले. कौरवसैन्यहि सात्यकीला जिंकण्याच्या इच्छेनें त्यांच्यावर चालून गेलें. तेव्हां युयुधानाच्या रथासमीप फार मोठा कोलाहल झाला. सात्यकीच्या शरांनीं व्याप्त झालेली तुझी सेना पळूं लागली. याप्रमाणें सात्यकीनें ती सेना प्रभग्न करून पुढील सेनेंतील सात महाधनुर्धर वीरांचा वध केला आणि तुझ्या असंख्य सैनिकांचा संहार चालविला. त्या महावीरानें याप्रमाणें त्रस्त केलें असतां ते सर्व वीर भयभीत होऊन रणांगण सोडून निघून गेले. त्या शिनिश्रेष्ठाच्या तेजानें ते मोहित झाले व वस्तुतः एकच असलेला सात्यकि त्यांना अनेक असल्याप्रमाणें भासला.

( २ ) याप्रमाणें तुझ्या सैन्याचा भेद करून सात्यकीनें व्यूहांत प्रवेश केला. ज्या मार्गानें अर्जुन आंत गेला, त्याच मार्गानें तो जात असतां द्रोणानें त्याचा निरोध केला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. ते दोघेहि परस्परांस हार जाईनात. तेव्हां द्रोणाचार्य त्याला म्हणाला—"हे माधवा, तुझा गुरु अर्जुन एखाद्या क्षुद्र मनुष्याप्रमाणें युद्ध सोडून गेला. मी त्याच्याशीं युद्ध करीत असतां तो मला प्रदक्षिणा घालून निघून गेला. यास्तव तूंहि जर आतां आपल्या आचार्यालाच अनुसरून युद्ध सोडून न जाशील, तर व्यर्थ प्राणाला मुकशील."

**सात्यकि**—हे ब्रह्मन्, धर्मराजाच्या आज्ञेनें मी पार्थाकडे जात आहें. तुझें कल्याण असो. तुझ्याशीं युद्ध करण्यांत माझा वेळ जाईल व इष्ट स्थलीं पोंचण्यास उशीर होईल. शिष्य नेहमीं आपल्या गुरूच्याच मार्गाला अनुसरत असतात, याच न्यायानें मीहि माझ्या गुरूप्रमाणेंच त्वरेनें निघून जातों.

संजय—राजा, असें बोलून शैनेयानें आचार्यास टाळलें व तेथून प्रयाण करीत असतां आपल्या सारथ्यास म्हटलें—"हे सूता, हा आचार्य मला प्रतिबंध करण्याचा प्रयत्न करील, यास्तव अतिशय दक्षतेनें रणांगणांतून रथ चालीव. शिवाय मी तुला महत्त्वाची माहिती देतों, ती लक्षपूर्वक ऐक. हें अवंतिदेशाचें महा तेजस्वी सैन्य दिसत आहे. त्याच्या पलीकडे दाक्षिणात्यांचें प्रचंड सैन्य आहे. त्याच्या बाजूला बाह्लिकाचें सैन्य आहे. त्याच्या पुढें कर्णाचें अपार सैन्य दक्षतेनें उभें आहे. हीं सैन्यें परस्परांपासून जरी पृथक् उभीं आहेत, तरी त्यांना एकमेकांचा आश्रय असल्यामुळें तीं रणांगणांतून पलायन करणारीं नाहींत. यास्तव या दोन्ही सैन्यांच्या मधल्या मार्गांतून मोठ्या धैर्यानें अश्वांना चालीव. माझा रथ मध्यम वेगानें चालवीत मला येथून घेऊन चल.

हे बाह्लिक नानाप्रकारचीं शस्त्रें हातांत घेऊन प्रहार करण्यास उद्युक्त झाले आहेत. त्याचप्रमाणें कर्णासह दाक्षिणात्य वीरहि सज्ज होऊन उभे आहेत. गजाश्वांनीं व्याप्त असलेलें हें सैन्य नानादेशांतील पदातींनीं युक्त आहे."

असें बोलून द्रोणाला टाळण्यासाठीं तो पुनः सारथ्याला म्हणाला—"हे सूता, कर्णाच्या प्रचंड सैन्यांतून रथ ने."

सारथ्याला याप्रमाणें सांगून तो युद्धांतून मागें न फिरणारा युयुधान पुढें जाण्यास निघाला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या द्रोणानें बाण सोडीत त्याचा पाठलाग चालविला. सात्यकीनें कर्णाच्या त्या अतिप्रचंड सेनेस तीक्ष्ण शरांनीं त्रस्त करीत भारतीसेनेंत प्रवेश केला. तेव्हां अमर्षी कृतवर्म्यानें त्याच्या मार्गाचा निरोध केला. त्यावेळीं त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. कृतवर्म्यानें सात्यकीच्या धनुष्याचा बाणासह छेद केला. तेव्हां त्या शिनिश्रेष्ठानें कृतवर्म्यावर शक्ति सोडली, दुसरें दृढ धनुष्य घेऊन त्या हार्दिक्याचा रथ चोहोंबाजूंनीं बाणांनीं आच्छादित केला व एक भल्ल बाण सोडून त्याच्या सारथ्याचा शिरश्छेद केला. तेव्हां त्याचा मृत देह रथावरून खालीं पडला. याप्रमाणें नियंता नसल्यामुळें रथाचे अश्व उधळले व इतस्ततः धांवूं लागले. त्यावेळीं त्या भोजानें एका हातानें अश्वांचें नियमन करून दुसऱ्या हातांत धनुष्य सज्ज ठेविलें. त्याचें हें कौशल्य पाहून सर्व सैन्यांनीं त्याची अतिशय प्रशंसा केली.

त्यानंतर कृतवर्म्यानें क्षणमात्र विश्रांति घेतली व पुनः अश्वांना प्रेरणा करून शत्रूस त्रस्त करून सोडिलें. इतक्या अवकाशांत सात्यकि दूर निघून

गेला. तें पाहून तो भोजपति भीमसेनावर धांवला. इकडे युयुधानानें भोज-सैन्याचें उल्लंघन करून कांबोजांच्या सैन्यांत प्रवेश केला. तेव्हां अनेक महा-रथांनीं त्याचा प्रतिकार केला. तथापि सात्यकि यत्किंचित्‌हि भ्रान्त झाला नाहीं.

सात्यकि आपल्या सैन्यांत पुढें पुढेंच चालला आहे, हें पाहून द्रोणानें सैन्याची व्यवस्था केली, त्याचा सर्व भार कृतवर्म्यावर सोंपविला आणि तो युयु-धानाचें निवारण करण्याच्या इच्छेनें त्याच्या मागोमाग त्वरेनें निघाला. द्रोणाचार्य सात्यकीचा पाठलाग करीत चालला आहे. हें पाहून पांडवांच्या श्रेष्ठ योद्ध्यांनीं त्याचें निवारण केलें आणि हार्दिक्याशीं युद्ध करण्यांत भीमसेन, पांचाल इत्यादि वीरांचा निरुत्साह झाला. कृतवर्म्यानें आपल्या पराक्रमानें पांडवांचीं वाहनें व योद्धे यांना क्लान्त करून सोडलें. भोजराजानें याप्रमाणें निग्रह केल्यामुळें महद्यशाची इच्छा करणारे ते पांडववीर क्षणमात्र स्वस्थ उभे राहिले. ७. ५. ११३

---

## अध्याय ११४ वा.

[ १ धृतराष्ट्राचा खेद. २ संजयाचें उत्तर. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, शौर्यादि अनेकविध गुणांनीं युक्त असलेलें माझें सैन्य प्रबल असून त्याची यथाशास्त्र व्यूहरचना केली होती. तरीहि त्याचा पराभव व्हावाना ! आम्ही या सर्व सैन्याचा नित्य सत्कार करीत होतों आणि त्याचाहि आम्हांवर सतत लोभ होता. तें अतिशय विस्तृत असून व्यूहाची अति अद्भुत रचना केली होती. त्यानें पूर्वीं अनेक प्रसंगीं पराक्रम गाजविले आहेत. त्या सेनेंतील योद्धे अतिशय वृद्ध नाहींत किंवा अगदीं बाल नाहींत. सर्व सैनिक प्रौढ वयाचे आहेत. ते अतिशय कृश नाहींत किंवा अति स्थूल नाहींत. त्यांचे अवयव पुष्ट असून ते सर्व नीरोगी आहेत. त्यांचे देह कवचांनीं आच्छादित झालेले आहेत. माझें सर्व सैन्य शस्त्रसंपन्न असून युद्धनिपुण आहे. त्या सर्व सैनिकांना आप्तसंबंधामुळें किंवा स्नेहसंबंधामुळें सैन्यांत नियत केलें नसून त्या सर्वांची योग्य परीक्षा घेऊन व वेतन देऊन घेतलेलें आहे. ते सर्व कुलीन व उदारांतः-करणाचे आहेत. ते विनयशील, यशस्वी व प्रगल्भ मनाचे आहेत. त्यांच्यावर

नेमलेले अधिकारी मोठे मुत्सद्दी व पवित्राचरणी असून लोकपालतुल्य वीर आहेत. अशा त्या नरश्रेष्ठांनीं आमच्या सैन्याचें पालन केलें आहे.

शिवाय आमचें प्रिय करण्याच्या इच्छेनें पुष्कळ राजे सैन्यांसह स्वेच्छेनेंच आमच्याकडे आलेले आहेत. ते आमच्या सैन्याचें रक्षण करीत आहेत. बा संजया, माझें सैन्य मूळचेंच प्रचंड आहे. त्याच्या सभोंवार ससैन्य नृपाल उभे असल्या-मुळें तें समंततः नद्यांनीं परिपूर्ण झालेल्या महासागरासारखें विस्तृत पसरलेलें आहे, पक्षहीन पक्ष्याप्रमाणें भासणारे रथ व अश्व यांनीं व्यापलेलें आहे आणि मदोन्मत्त गजांनीं तें परिवेष्टित झालें आहे. तें माझें महत्सैन्यहि ज्याअर्थीं नाश पावलें, त्याअर्थीं माझें दुर्दैवच प्रबल म्हटलें पाहिजे. याहून आणखीं दुर्भाग्य तें कोणतें असणार ! अशा माझ्या सैन्यसागराचें उल्लंघन करून कृष्णार्जुन निघून गेले.

त्याचप्रमाणें युयुधानहि निघून गेला. कृष्णार्जुन व सात्यकि यांनीं व्यूहांत प्रवेश केल्यावर माझ्या सैन्यांत कांहीं बल राहिलें असेल, असें मला वाटत नाहीं. ते दोघे परंतप वीर मोठ्या वेगानें सैन्यांत शिरले असतां व जयद्रथ गांडीवापासून सुटलेल्या शरांच्या कक्षेत आला असतां कौरवांनीं काय केलें ! असा अति दारुण प्रसंग येऊन ठेपला असतां कालानेंच ज्यांना प्रेरणा केली आहे, त्या माझ्या पुत्रांनीं कोणती योजना केली व ती कितपत यशस्वी झाली ! तें मला सांग.

बा संजया, या युद्धांत कौरवांना मृत्यूनेंच ग्रासलें आहे, असें मला वाटतें. रणांगणांत त्यांचा पराक्रमहि दिसून येत नाहीं. कृष्णार्जुन युद्धामध्यें सर्वदा अक्षत रहात असतात. त्यांचें निवारण करील असा एकहि योद्धा माझ्या सैन्यांत नाहीं. मीं अनेक महारथांची निवड करून त्यांचें योग्य वेतनानें पोषण केलें आहे व प्रिय वाणीनें त्या योद्ध्यांचा सत्कार केला आहे. ज्याचा सत्कार केला नाहीं, असा एकहि वीर माझ्या सैन्यांत सांपडणार नाहीं. प्रत्ये-काची त्याच्या योग्यतेनुरूप मी संभावना करीत असतों. माझ्या सैन्यांत पराक्रमशून्य पुरुष सांपडणार नाहीं. दान, सन्मान व आसन यांच्या योगानें मी त्यांचा सर्वदा गौरव करीत असतों. त्याचप्रमाणें माझ्या पुत्रांनीं व माझ्या आप्तांनीं त्यांचा अनेकदा सत्कार केला आहे. अशा प्रकारचे माझे वीर पार्थां-

१ येथील जलादिकांचें रूपक गाळलें आहे.

करून पराभव पावले व सात्यकीनेंहि त्यांना त्रस्त केलें, यापेक्षां आणखी दैवदुर्विलास तो काय असणार !

संजया, ज्याचें रक्षण केलें जात आहे, तो जयद्रथ आणि त्याचें रक्षण करणारे माझे वीर, यांची गति काय होणार ! ते सर्व एकाच पंथाला लागणार कीं काय ! रणांगणांत अर्जुन सैंधवाच्या अग्रभागीं जाऊन उभा राहिला आहे, हें पाहून अतिशय मोहित झालेल्या माझ्या पुत्रांनीं काय योजना केली ? सात्यकीनेंहि निर्भयपणानें सैन्यांत प्रवेश केल्याचें पाहून दुर्योधनानें कोणतें कृत्य करण्याचा समय प्राप्त झाला आहे, असें मानिलें ? ते दोघे रथिश्रेष्ठ सैन्यांत शिरले असतां त्यांचें निवारण करण्याचें धैर्य कोणत्या वीरांनीं दाखविलें ? सज्ज झालेला दाशार्ह व सात्यकि या दोघांना पाहून माझे पुत्र खिन्न झाले असतील, असें मला वाटतें.

शत्रूला जिंकण्याविषयीं निरुत्साह झालेल्या त्या रथ्यांनीं पलायन करण्यांत उत्साह दाखविलेला पाहून दुर्योधनाला अतिशय दुःख झालें असेल ! माझ्या वीरांचा पराभव करून पार्थानें सर्व सैन्याचा संहार आरंभिला असतां माझे पुत्र विजयाविषयीं निराश झाले असतील व त्यांना कृतकर्माचा पश्चात्तापहि झाला असेल, यांत संशय नाहीं. बा संजया, ते दोघे रथिश्रेष्ठ द्रोणसैन्याचें एका क्षणांत उल्लंघन करून पुढें निघून गेल्याचें पाहून माझे पुत्र भयभीत झाले असतील. कृष्णार्जुन व सात्यकि यांनीं माझ्या सैन्यांत प्रवेश केला, हें ऐकून माझें चित्त चिंतायुक्त झालें आहे. त्या शैनेयानें भोजसैन्याचें अतिक्रमण केलें असतां कौरवांनीं पुढें काय केलें तें मला सांग. त्याचप्रमाणें द्रोणानें पांडवांचा निग्रह केला असतां त्यांचें कसें युद्ध झालें तेंहि मला कथन कर.

द्रोण अतिशय बलवान् असून तो अस्त्रज्ञ आचार्य युद्धदुर्मद आहे. त्या श्रेष्ठ वीराशीं पांचालानें कसें युद्ध केलें, तें मला सांग. अर्जुनाच्या जयेच्छेनें त्यांनीं द्रोणाशीं वैर केलें आणि द्रोणानेंहि त्यांच्याविषयीं मनांत दृढवैर धरलें आहे. त्या प्रतिस्पर्ध्यांनीं परस्परांचा पराभव कसा केला, अर्जुनानें जयद्रथाच्या वधासाठीं काय प्रयत्न केला, हें सर्व मला सविस्तर सांग. तूं वर्णन करण्यांत अतिशय कुशल आहेस.

( २ ) संजय—हे भरतश्रेष्ठा, तुझ्या अपराधामुळें तुजवर हें संकट ओढवलें आहे. या प्रसंगीं तुला असा शोक करणें योग्य नाहीं. हे राजा, विदुरा-

सारखे सुहृद् व इतर प्राज्ञ जन यांनीं तुला पूर्वींच 'पांडवांचा उपहास करूं नको' असें वारंवार सांगितलें असतांहि तूं तें ऐकलें नाहींस.

हितचिंतक सुहृदांचें आप्तवचन जो ऐकत नाहीं, तो महत्संकटाला प्राप्त होऊन तुझ्यासारखाच शोक करीत बसतो. हे राजन्, युद्धाच्या पूर्वी दाशार्ह कृष्णानेंहि तुझ्यापाशीं शमाची याचना केली असतां, महा यशस्वी वासुदेवाची ती कामना तूं पूर्ण केली नाहींस. वासुदेव तुझें हें गुणवैषम्य जाणून होता. तुझा पक्षपात, धर्माविषयीं अनिश्चय, पांडवांचा द्वेष, कुटिल अभिप्राय आणि आर्तप्रलाप हें सर्व ओळखून त्या तत्त्वज्ञ सर्वलोकश्वरानें कौरवांचें हें महायुद्ध प्रवृत्त करविलें.

हे राजा, तूं स्वतःच्या अपराधामुळें या महान् क्षयाला प्राप्त झाला आहेस. त्याविषयीं दुर्योधनाला दोष देण्यांत अर्थ नाहीं. हे मानदा, आरंभीं, मध्यकाळीं किंवा शेवटीं तुझें एकहि सुकृत दिसून येत नाहीं. तस्मात् या सर्व पराजयाचें मूल तूंच आहेस. आतां सर्व लोकांचा सामान्य स्वभाव लक्षांत घेऊन तूं मन स्थिर कर आणि देव-दानवांच्या संग्रामासारख्या या घोर युद्धाचा वृत्तान्त श्रवण कर.

हे महाराज, सत्यप्रतिज्ञ सात्यकीनें तुझ्या सैन्यांत प्रवेश केला असतां भीमसेनादि पांडव तुझ्या सैन्यावर धांवून आले. ते सर्व महारथ क्षुब्ध होऊन येत आहेत, हें पाहून एकट्या कृतवर्म्यानें त्या सर्वांचें निवारण केलें. त्यामुळें त्याचें उल्लंघन करून पांडवांस पुढें जातां येईना. त्यावेळीं त्या हार्दिक्यानें अतिशय अद्भुत पराक्रम प्रकट केला. भीमसेनानें कृतवर्म्याला तीन बाणांनीं विद्ध केलें. नकुल, सहदेव, धृष्टद्युम्न व द्रौपदेय यांनींहि अनेक बाण सोडिले व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. कृतवर्म्यानें वृकोदरावर सत्तर शर सोडून त्याचा ध्वज खालीं पाडविला. धनुष्याचा छेद केला व त्यालाहि विद्ध केलें. त्यावेळीं बलाढ्य भीमसेनहि भूकंपाच्या वेळीं कंप पावणाऱ्या पृथ्वीप्रमाणें रथांतल्या रथांतच कांपूं लागला.

भीमसेनाची अशी दीनावस्था झालेली पाहून धर्मराजादि प्रमुख वीरांनीं तीक्ष्ण शरांनीं कृतवर्म्यास जर्जर केलें. त्या सर्वांनीं वृकोदराचें रक्षण करण्या-

---

१ सुहृदां हितकामानां वाक्यं यो न शृणोति ह।
स महद्व्यसनं प्राप्य शोचते वै यथा भवान् ॥

करितां त्या हार्दिक्यास चोहोंबाजूंनीं वेढून टाकिलें. इतक्यांत भीमसेनहि सावध झाला. त्यानें पोलादी शक्ति हार्दिक्यावर सोडली. ती अग्नीसारखी प्रदीप्त शक्ति येत असलेली पाहून हार्दिक्यानें दोन बाणांनीं तिचे तुकडे करून टाकिले. आपल्या शक्तीचा नाश झालेला पाहून भीमसेन अतिशय क्रुद्ध झाला व त्या दोघांनीं पुनः धनुष्यांनीं युद्ध आरंभिलें.

त्या दोघांचें युद्ध चालू असतां शिखंडीनेंहि आपलें धनुष्य हातीं घेऊन कृतवर्म्याचें निवारण केलें. हार्दिक्यानें शिखंडीला असंख्य बाणांच्या वृष्टीनें जर्जर केलें असतां त्याला मूर्च्छा आली व त्याच्या हातांतून धनुष्य गळून पडलें. त्याला मूर्छित पडलेलें पहातांच कौरवांचे सैनिक हार्दिक्याची प्रशंसा करून वस्त्रें हलवूं लागले. इतक्यांत शिखंडीच्या सारथ्यानें त्याचा रथ रणांगणांतून मोठ्या त्वरेनें दूर नेला. शिखंडी रथांत निश्चेष्ट होऊन पडला आहे, हें पाहून पांडवांनीं कृतवर्म्याला समंततः वेढून टाकिलें. तथापि तो वीर श्रान्त झाला नाहीं. त्यानें आपलें आश्चर्यकारक युद्धनैपुण्य प्रकट केलें.

त्या एकट्या हार्दिक्यानें पांडवांचें त्यांच्या अनुयायांसह निवारण केलें. नंतर चेदि, पांचाल, मत्स्य, सृंजय व केकय यांसहि जिंकलें. याप्रमाणें हार्दिक्यानें पराभूत केलेले पांडवांकडील वीर पळत सुटले. त्यांस स्थिर रहाण्याचें धैर्य होईना. अशाप्रकारें कृतवर्म्यानें भीमसेनादि पांडवांचा पराजय केला असतां तो वीर रणांगणांत धूमरहित अग्नीप्रमाणें शोभला व त्याच्या शरवृष्टीनें पीडित झालेले पांडवांकडील योद्धे त्यावेळीं युद्धपराङ्मुख झाले. ७. ५. ११४.

---

## अध्याय ११५ वा.

[ १ कृतवर्म्याचा पराभव. २ जलसंधाचा वध. ]

(१) संजय—हे राजन्, महात्म्या कृतवर्म्यानें पांडवांच्या सैन्याला पळवून लाविलें असतां पांडव लज्जेनें अवनत झाले व कौरव हृष्ट झाले. तो सर्व वृत्तान्त सविस्तर सांगतों, लक्षपूर्वक ऐक. अपार समुद्रांतील द्वीपाप्रमाणें पांडवांना आधारभूत असलेल्या सात्यकीनें कौरवांचा प्रचंड जयघोष ऐकतांच कृतवर्म्यावर चाल केली व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. सात्यकीनें हार्दिक्याचे अश्व,

सारथि व पृष्ठरक्षक यांचा वध करून त्याच्या धनुष्याचाहि छेद केला. याप्रमाणें कृतवर्मा विरथ होतांच त्याचें सैन्य शरांनीं पीडित होत्सातें दुभंग पावलें.

हे महाराज, अशाप्रकारें महासागरासारख्या प्रचंड द्रोणसैन्याचें उल्लंघन करून व कृतवर्म्याचा पराभव करून सात्यकि पुढें निघाला. तो आपल्या सारथ्याला म्हणाला—" हे सूता, यत्किंचित्‌हि भ्रान्त न होतां हळु हळू रथ चालूं दे. द्रोणसैन्याच्या उजव्या बाजूला मेघसमुदायाप्रमाणें जें हें प्रचंड गज-सैन्य दिसत आहे, तें सैन्य महाधनुर्धर राजपुत्रांचें आहे. ते सर्व राजकुमार युद्धांत दुर्निवार आहेत. रुक्मरथ त्यांचा नेता आहे. दुर्योधनाच्या आज्ञेनें ते जीवावर उदार होऊन माझ्याशीं संग्राम करण्यास सज्ज झाले आहेत. ते सर्व प्रसिद्ध योद्धे आहेत. ते महारथ त्रिगर्त माझ्याशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें माझ्या संमुख उभे आहेत. यास्तव मला सत्वर तेथें घेऊन चल. मी द्रोणाच्या समक्ष या त्रिगर्तांशीं युद्ध करीन."

सात्यकीच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या आज्ञांकित सारथ्यानें रथ हलकेच पुढें चालविला. त्याचा सूर्याप्रमाणें देदीप्यमान व तेजस्वी असलेला रथ रणांगणांतून वायुवेगानें चालला असतां अनेक वीरांनीं आपलें हस्तलाघव प्रकट करीत त्याच्यावर नानाप्रकारच्या तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला व गजसैन्यानें त्याला समंततः वेढून टाकिलें. तेव्हां पर्वतावर जलवृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें सात्यकीनें गजसैन्याशीं युद्ध आरंभिलें. तेव्हां त्याच्या विविध प्रकारच्या बाणांनीं विद्ध झालेले ते गज चीत्कार करीत तेथेंच देहधर्म करूं लागले व कित्येक क्षतांनीं विह्वल होत्साते इतस्ततः फिरत पळूं लागले. याप्रमाणें त्या सात्वतश्रेष्ठानें पीडिलेलें तें गजसैन्य दश-दिशांत संचार करूं लागलें.

( २ ) गजसैन्याचा पराभव झालेला पाहून महाबलाढ्य जलसंधानें सात्यकीवर निकरानें चाल केली. त्या मागधाचा श्रेष्ठ गज आपल्या अंगावर येत आहे, हें पाहतांच समुद्राच्या वेलेप्रमाणें सात्यकीनें त्याचें निवारण केलें. तेव्हां सात्यकीच्या तीक्ष्ण शरांनीं आपला गज पराभूत झाल्याचें पहातांच जलसंध क्रुद्ध झाला व त्यानें एकाच बाणानें सात्यकीचें धनुष्य तोडून टाकिलें. तथापि महापराक्रमी सात्यकि यत्किंचित्‌हि भ्रान्त झाला नाहीं. त्यानें दुसरें धनुष्य हातीं घेतलें व 'थांब थांब' अशी गर्जना करीत तीक्ष्ण बाण सोडून जलसंधाचेंच धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां जलसंधानें तें तुटलेलें धनुष्य टाकून तोमर हातीं घेतला

व त्या दोघांचें तोमरांनीं युद्ध जुंपलें. तोमरहि भग्न झाल्यावर त्यांनीं खड्ग-युद्ध आरंभिलें. जलसंधानें आपलें खड्ग गरगरां फिरवून सात्यकीवर फेंकलें व सात्यकीचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां सात्यकीनें पुनः दृढ धनुष्य धारण केलें. त्याचें तें प्रचंड धनुष्य तालवृक्षाच्या शाखांप्रमाणें दिसत होतें. सात्यकीनें दोन बाण सोडून जलसंधाचे अलंकारांनीं भूषविलेले दोन्ही दीर्घ बाहु सहज लीलेनें तोडून टाकिले. तेव्हां त्या श्रेष्ठ गजाच्या पाठीवरून घसरत खालीं पडणारे ते परिघासारखे बाहु पर्वतावरून सरपटणाऱ्या पंचमुखी भुजंगांसारखे भासले. नंतर एकाच बाणानें त्याचें मस्तकहि उडवून दिलें. त्यावेळीं मस्तक व बाहु यांनीं रहित असलेलें तें जलसंधाचें मृत शरीर अतिशय भीषण दिसूं लागलें व त्यांतून होणाऱ्या रक्तस्रावानें त्याचा श्रेष्ठ गज माखून गेला.

याप्रमाणें जलसंधाचा वध केल्यावर सात्वतानें मोठ्या त्वरेनें त्याची अंबारी खालीं पाडविली. ती अंबारी भूमीवर न पडतां त्या गजाच्या पोटाखालीं लोंबकळूं लागली. अशा प्रकारचा तो जलसंधाचा गज सात्यकीच्या बाणांनीं विह्वल होऊन चीत्कार करीत पळत असतां आपल्याच सेनेला तुडवूं लागला. सात्यकीनें जलसंधाचा वध केल्याचें पाहून तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला, योद्धे पराङ्मुख होऊन इतस्ततः धावूं लागले व शत्रूला जिंकण्यास असमर्थ झालेले ते अतिशय उत्साहानें पलायन करूं लागले.

हे महाराज, याप्रमाणें तुझ्या सैन्याची दुर्दशा झालेली पाहून द्रोणाचार्य अश्वांना प्रेरणा करीत मोठ्या वेगानें युयुधानावर धांवला. आचार्यानें चाल केलेली पहातांच कौरववीरहि सात्यकीवर तुटून पडले. त्यावेळीं द्रोण व सात्यकि या दोघांचें देवासुरांच्या युद्धाप्रमाणें दारुण युद्ध प्रवृत्त झालें. ७. ५. ११५.

---

## अध्याय ११६ वा.

[ १ सात्यकि-दुर्योधनयुद्ध. २ कृतवर्मा-सात्यकि युद्ध. ३ कृतवर्म्याचा पराभव. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, ते सर्व दक्ष योद्धे सात्यकीवर तुटून पडले. द्रोण, दुर्मर्षण, दुःसह, विकर्ण, चित्रसेन व दुर्योधन यांनीं युयुधानावर शरांचा वर्षाव चालविला. त्या सर्व वीरांनीं सात्यकीवर एकाच वेळीं जरी शरांची

वृष्टि चालविली होती, तरी तो वीर श्रान्त न होतां त्या सर्वांशीं पृथक् पृथक् युद्ध करूं लागला. त्या वृष्णिश्रेष्ठानें त्या सर्व महारथांवर उलट शर सोडिले.

तें पाहून तुझा अमर्षी पुत्र दुर्योधन त्याच्यावर चालून गेला व त्या दोघांचें युद्ध जुंपलें. त्या दोघांनीं परस्परांस शरांनीं झांकून टाकिलें. त्या कुरुराजानें सात्यकीला विद्ध केलें असतां, रसाचा स्राव करणाऱ्या रक्तचंदनाच्या वृक्षाप्रमाणें त्याचा रक्तानें माखलेला देह शोभला. त्यावेळीं माधवानेंहि तीक्ष्ण बाण सोडून तुझ्या पुत्राला विद्ध केल्यामुळें तो उभारलेल्या यज्ञस्तंभाप्रमाणें भासला.

नंतर त्या दोघांनीं परस्परांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं, पण त्यांनीं तत्काळ दुसरीं धनुष्यें घेऊन युद्ध आरंभिलें. सात्यकीनें दुर्योधनाचे चार अश्व व सारथि यांचा वध केला. धनुष्याचा व ध्वजाचा छेद केला. तेव्हां अत्यंत पीडित झाल्यामुळें दुर्योधनानें तेथून पलायन केलें व चित्रसेनाच्या रथावर उडी टाकिली.

तेव्हां राहूनें ग्रासलेल्या चंद्राप्रमाणें दुर्योधनाला सात्यकीनें ग्रस्त केलेलें पाहून तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला. तो कोलाहल ऐकून कृतवर्मा पुढें सरसावला. त्यानें आपलें श्रेष्ठ धनुष्य हलवीत आपल्या अश्वांना "पुढें चला, त्वरेनें चला" अशी प्रेरणा केली व आपल्या सारथ्याची निर्भर्त्सना करीत रथ पुढें चालविला.

( २ ) हे महाराज, मुख पसरलेल्या अंतकाप्रमाणें कृतवर्मा येत आहे, हें पहातांच सात्यकि सारथ्याला म्हणाला—"हा धनुर्धर त्वरेनें मजकडे येत आहे, यास्तव त्या वीराच्या संमुख माझा रथ ने."

सारथ्याला अशी आज्ञा करून सात्यकीनें त्या भोजराजाचा रथ गांठला व त्या दोघांचें घोर युद्ध जुंपलें. प्रदीप्त अग्नीप्रमाणें क्रोधसंतप्त झालेले ते दोघे महारथ व्याघ्राप्रमाणें परस्परांवर धांवले. कृतवर्म्यानें सात्वताच्या अश्वांना विद्ध केलें व सात्यकीनें त्या भोजराजावर ऐशीं बाण सोडून त्याला अतिशय त्रस्त केलें. तेव्हां तो भूकंपाच्या वेळीं कांपणाऱ्या पर्वताप्रमाणें कांपूं लागला.

त्यानंतर युयुधानानें कृतवर्म्याचे चार अश्व व सारथि यांचा वध केला आणि यमदंडासारखा एक सर्पतुल्य बाण त्याच्यावर सोडला. त्या बाणानें कृतवर्म्याच्या उज्ज्वल कवचाचा भेद केला व रक्तानें भरलेला तो तीक्ष्ण शर

भूमींत शिरला. त्या शरानें पीडित झालेल्या कृतवर्म्याच्या शरीरांतून रक्त वाहूं लागलें, तेव्हां तो भोजाधीश हातांतील धनुष्यबाण बाजूला टाकून आपल्या श्रेष्ठ आसनावरून खालीं पडला व पुढल्या जानूवर आपटला.

( ३ ) हे राजन्, याप्रमाणें सहस्रार्जुनतुल्य पराक्रमी व सागराप्रमाणें गंभीर असलेल्या कृतवर्म्याचें निवारण करून सात्यकि पुढें निघून गेला. त्यावेळीं अश्व-गजांनीं युक्त असलेल्या चतुरंग सेनेचें उल्लंघन करून व सहस्रावधि क्षत्रियांचा पराभव करून निघालेला तो शिनिश्रेष्ठ असुरांच्या सेनेचें मर्दन करून जाणाऱ्या इंद्राप्रमाणें सर्व सेनेच्या समक्ष निघून गेला. इतक्यांत कृतवर्माहि देहभानावर आला व दुसरें धनुष्य घेऊन पांडवांचें निवारण करण्यासाठीं तेथेंच उभा राहिला. ७. ५. ११६.

---

## अध्याय ११७ वा.

[ १ द्रोण-सात्यकियुद्ध. २ द्रोणाचें निवारण. ३ सात्यकीचा व्यूहप्रवेश. ]

( १ ) संजय—हे राजा, इकडे सात्यकीनें तुझ्या सैन्यास शरवृष्टीनें भयग्रस्त केलें असतां आचार्यांनीं त्याच्यावर शरवर्षाव करून त्याला झांकून टाकिलें. त्यावेळीं द्रोण व सात्यकि या दोघां बलिष्ठ वीरांचें इंद्र व बलि यांच्यासारखें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें. त्यांचा तो अद्भुत संग्राम पाहून विस्मित झालेलीं सर्व सैन्यें स्तब्ध होऊन जागच्याजागीं उभीं राहिलीं. ते दोघेजण परस्परांवर तीक्ष्ण बाण सोडीत होते व परस्परांच्या बाणांचा हंसतच छेद करीत होते. त्या दोघांहि रथिश्रेष्ठांचें हस्तलाघव अप्रतिम व समान होतें.

नंतर क्रुद्ध झालेल्या सात्यकीनें द्रोण, त्याचा सारथि व ध्वज यांवर असंख्य बाण सोडले. युयुधानाचें तें हस्तलाघव पाहून आचार्यांनेंहि त्याचा सारथि व अश्व यांना विद्ध केलें, एका बाणानें त्याच्या ध्वजाचा छेद केला आणि त्या शिनिश्रेष्ठाचें धनुष्यहि तोडून टाकिलें. तेव्हां सात्यकीनें तें तुटलेलें धनुष्य टाकून दिलें व आपली पोलादी गदा उचलून ती द्रोणावर फेंकली; परंतु त्या युद्धनिपुण आचार्यानें अनेक शर सोडून त्या गदेची गति मार्गांतच कुंठित केली. तें पाहून सात्यकीनें अनेक तीक्ष्ण बाणांनीं द्रोणाला विद्ध करून मोठ्यानें सिंहनाद केला.

शत्रूची ती गर्जना द्रोणाचार्यास सहन झाली नाहीं. त्यानें रौप्यदंडानें युक्त असलेली एक पोलादी शक्ति घेऊन ती सात्यकीवर फेंकली. परंतु ती कालतुल्य उग्र शक्ति सात्यकीला न लागतां, त्याच्या रथाचा भेद करून दारुण शब्द करीत भूमींत शिरली. नंतर सात्यकीनें एका बाणानें आचार्यांचा उजवा हात विद्ध केला. तेव्हां क्रुद्ध झालेल्या द्रोणानें युयुधानाचें धनुष्य तोडिलें व त्याच्या सारथ्यास विद्ध केलें. त्या प्रहारानें त्याचा सारथि क्षणमात्र मूर्च्छित होऊन रथोपस्थावर पडला.

त्यावेळीं सात्यकीनें आपलें अतिमानुष सामर्थ्य प्रकट केलें. त्या वीरानें अश्वांचे रश्मि हातांत घेऊन स्वतःच सारथ्य करीत युद्ध आरंभिलें. क्रुद्ध झालेल्या सात्यकीचा व द्रोणाचा कांहीं काल पुनः दारुण संग्राम झाला. नंतर सात्यकीनें द्रोणाच्या सारथ्याचा वध केला. तेव्हां आचार्यांचे अश्व तो रथ घेऊन वेगानें धांवत सुटले. रणामध्यें असंख्य मंडलें घेत ते अश्व इतस्ततः पळत असतां द्रोणाचा तो श्रेष्ठ रथ सूर्याप्रमाणें शोभला.

( २ ) तेव्हां सर्व नृपाल व राजपुत्र यांनीं "धांवा, द्रोणाच्या अश्वांचा निग्रह करा. त्या पळणाऱ्या अश्वांना धरा." असा आक्रोश चालविला. तो ऐकून सर्व वीर सात्यकीला सोडून द्रोणाच्या साह्यार्थ त्वरेनें गेले. याप्रमाणें ते वीर समरांगणांत पळत असतां सर्व सैन्य भयभीत झालें व इतस्ततः धांवत सुटलें.

( ३ ) इकडे सात्यकीच्या बाणांनीं विद्ध झालेले अश्व रथ घेऊन जे पळत सुटले, ते व्यूहाच्या मुखापाशीं येऊन थांबले. तेथें पांडव व पांचाल यांनीं व्यूहभेद करून आंत प्रवेश केल्याचें पाहून आचार्यानें सात्यकीचा पाठलाग करण्याचें सोडून दिलें व तो तेथेंच व्यूहाचें रक्षण करीत उभा राहिला. त्यावेळीं पांडु-पांचालांचें निवारण करून क्रोधरूपी इंधनानें प्रदीप्त झालेला तो आचार्य उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें त्यांस दग्ध करीत तेथें उभा राहिला. ७. ५. ११७.

---

## अध्याय ११८ वा.

[ १ सात्यकि-सुदर्शनयुद्ध. २ सुदर्शनवध. ]

( १ ) संजय—हे महाराज, याप्रमाणें कृतवर्मा, द्रोण इत्यादि बलाढ्य पुरुषांना जिंकल्यावर तो शिनिश्रेष्ठ आपल्या सारथ्याला म्हणाला—" हे सूता, आज आपण केवल निमित्तमात्र आहोंत. या कौरवसेनेस केशवार्जुनांनीं पूर्वींच दग्ध करून टाकिलें आहे. इंद्रात्मज पार्थानें हत केलेल्या सेनेचाच आपण पराभव करीत आहों."

सारथ्याला असें बोलून तो शैनेय समंततः शरांची वृष्टि करीत पुढें निघाला. तो तेजस्वी वीर शशी व शंख यांच्या वर्णाचे शुभ्र अश्व, ज्याला जोडले आहेत, अशा आपल्या श्रेष्ठ रथांतून शत्रुसैन्याचें मर्दन करीत चालला असतां कौरवांचा एकहि रथिश्रेष्ठ त्याचें निवारण करण्यास समर्थ झाला नाहीं. तथापि विचित्र युद्ध करणारा सुदर्शन पुढें झाला. त्यानें सुवर्णाचें कवच धारण केलें होतें व तो अतिशय अमर्षी होता. त्यानें सात्यकीचें मोठ्या त्वेषानें निवारण केलें व त्या दोघांचें घोर युद्ध जुंपलें. त्यावेळीं इंद्र व वृत्र यांच्या युद्धाची प्रशंसा करणाऱ्या अमरांच्या संघाप्रमाणें तुझ्या योद्ध्यांनीं त्यांची प्रशंसा केली.

( २ ) सुदर्शनानें सात्यकीवर अनेक शर सोडिले. त्याच्या दृढ कवचाचा भेद केला व अश्वांनाहि विद्ध केलें. तेव्हां सात्यकीनें त्याच्या अश्वांचा वध करून प्रचंड गर्जना केली, सारथ्याचा शिरश्छेद केला. नंतर अग्नितुल्य एक देदीप्यमान बाण सोडून सुदर्शनाचेंहि मस्तक देहापासून वेगळें केलें.

याप्रमाणें राजपुत्र सुदर्शनाचा वध करून तो शूर यदुश्रेष्ठ देवराज इंद्रासारखा शोभला. नंतर तो शिनिश्रेष्ठ मार्गांतील शत्रुसैन्याचें निवारण करीत पार्थ ज्या मार्गानें गेला त्याच मार्गानें पुढें चालला असतां सर्व लोक विस्मित झाले. तेथें जमलेले सर्व योद्धे त्याच्या अप्रतिम शौर्याची प्रशंसा करूं लागले. तेव्हां सात्यकीनें आपल्या बाणाच्या कक्षेंत आलेल्या सर्व शत्रुसैन्याला दग्ध करीत आपल्या इष्टस्थलीं रथ चालविला. ७. ५. ११८.

## अध्याय ११९ वा.

[ १ सात्यकि-सूतसंवाद. २ यवनांचा पराजय. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें सुदर्शनाचा वध केल्यानंतर सात्यकि आपल्या सारथ्याला म्हणाला—" अश्व-गजांनीं व्याप्त असलेला हा दुस्तर सैन्यसागर तरून आपण परतीराला आलों आहों. आतां शिल्लक राहिलेली शत्रुसेना मला क्षुद्र नदीसारखी वाटत आहे. तिचें उल्लंघन सहज करतां येईल. यास्तव भ्रान्त न होतां अश्वांना प्रेरणा कर. अजिंक्य असलेल्या द्रोणाचार्यांस त्याच्या अनुयायांसह जिंकल्यानंतर आतां आपण अर्जुनाच्या समीप गेलोंच असें समज.

या योद्धयांमध्यें कृतवर्मा अतिशय वरिष्ठ होता. तोहि पराभूत झाला आहे. तेव्हां आतां मी धनंजयाच्या जवळ जाऊन पोचलोंच आहे, असें समजतों. वनांतील शुष्क तृण व गुल्म यांपासून प्रदीप्त अग्नीला जसा त्रास होत नाहीं, तसें मला हें शत्रूचें अनेकविध सैन्य पाहून भय वाटत नाहीं.

हे सारथे, पांडुपुत्र धनंजय जेथून गेला, ती ही भूमि पहा ! रथ, अश्व, गज यांच्या समुदायांनीं व्याप्त झालेल्या या रणांगणांत चालण्यासहि मार्ग राहिलेला नाहीं. त्या महात्म्यानें भग्न केलेलें सैन्य पळत सुटल्यामुळें रेशमासारख्या अरुण वर्णाची धूलि उडत आहे. त्याचप्रमाणें गांडीवाचा टणत्कार ऐकूं येत आहे. त्यावरून कृष्णसारथि पार्थ येथून जवळच असावा असें मला वाटतें. मला जे शुभ शकुन होत आहेत, त्यावरून सूर्यास्ताच्या पूर्वीच अर्जुन सैंधवाचा वध करील, असें निश्चयानें मानण्यास हरकत नाहीं.

यास्तव हे सूता, अश्वांना विश्रांति देत तूं हळुहळू रथ चालीव आणि जेथें हे सर्व तलत्राणें घातलेले दुर्योधनादि वीर उभे आहेत तेथें चल. कवचांनीं युक्त असलेले काम्बोज, धनुष्यबाण धारण केलेले यवन, शक, किरात, दरद, ताम्रलिप्तक व दुसरे अनेक म्लेच्छ माझ्या संमुख स्थित आहेत. तेथें माझा रथ ने. युद्धाची इच्छा करणाऱ्या या सर्व वीरांना व शत्रुसैन्याला पराभूत करून या महाघोर सैन्याचेंहि मीं अतिक्रमण केलेंच आहे, असें समज.

सूत—हे वार्ष्णेया, सत्यप्रतिज्ञ असलेल्या तुजविषयीं मला यत्किंचित्‌हि शंका वाटत नाहीं. साक्षात् जामदग्न्य राम, रथिश्रेष्ठ द्रोण, मद्रपति शल्य किंवा कृपाचार्य जरी तुझ्या पुढें येऊन उभे राहिले, तरी तुझ्या आश्रयानें मी

यत्किंचित्‌हि भ्रान्त होणार नाहीं. हे महाबाहो, यापूर्वी तूं किती तरी क्रूर यवनांचा पराभव केला आहेस. अनेक म्लेच्छांना युद्धांत जिंकलें आहेस. त्यावेळीं जर मला भय वाटलें नाहीं, तर मग आतां गायीच्या पावलासारख्या असलेल्या या क्षुल्लक युद्धांत मीं भयभीत कां व्हावें !

हे आयुष्मन् , मी कोणत्या मार्गानें तुला धनंजयाकडे नेऊं ? तूं कोणावर क्रुद्ध झाला आहेस ! कोणाचा मृत्यु आज समीप आला आहे ! कालान्तक यमाचीच ज्याला उपमा योग्य आहे, अशा तुला पाहून आज कोणते वीर रणांगणांतून पलायन करणार आहेत ! यमराजाला आज कोणाचें स्मरण झालें आहे !

सात्यकि—हे सारथे, दानवांचा संहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें मी आज या मुण्डांचा वध करून आपली प्रतिज्ञा पूर्ण करीन. माझा रथ प्रथम काम्बोजाकडे घेऊन चल. त्यांचें कदन करून मी अर्जुनाकडे जाईन. दुर्योधनासह सर्व कौरव आज माझें सामर्थ्य पाहोत. या म्लेच्छांचें सैन्य नष्ट झालें असतां कौरवांचें सैन्य सर्वांसमक्ष वारंवार विदीर्ण होऊन आक्रोश करूं लागेल. तो आर्तस्वर ऐकून दुर्योधन क्रोधानें संतप्त होईल.

आज अर्जुनाच्या समक्ष मी द्रोणाचार्यांला माझी अस्त्रविद्या दाखवीन. ( द्रोण पार्थाचे आचार्य व पार्थ माझा गुरु. तेव्हां त्याच्यापासून प्राप्त झालेली विद्या व माझें त्यांतील प्रावीण्य द्रोणाच्या दृष्टीं पडो. असा याचा भावार्थ. ) आज माझ्या बाणांनीं हत होऊन पडलेल्या सहस्रावधि योद्ध्यांना पाहून दुर्योधनावर पश्चात्तापाचा प्रसंग येईल. मी शीघ्रगतीनें शर संधान करीत असतां माझें धनुष्य अलातचक्राप्रमाणें फिरत असतें. तें माझें हस्तलाघव कौरवांना दिसून येईल. माझ्या बाणांनीं क्षतयुक्त झालेल्या सैनिकांना पाहून दुर्योधनाला अतिशय खेद होईल.

मीं संतप्त होऊन श्रेष्ठ श्रेष्ठ कौरवसैन्याचा संहार चालविला, म्हणजे या लोकीं दोन अर्जुन आहेत, असाच दुर्योधनाला भास होईल. आजच्या युद्धांत मीं सहस्रावधि राजांचा वध केला असतां दुर्योधन संतप्त होईल. मी जेव्हां असंख्य राजांना गतप्राण करून पांडवांवरील माझें प्रेम व्यक्त करीन, तेव्हां कौरव माझें बल, पराक्रम व कृतज्ञत्व तत्त्वतः जाणतील.

( २ ) संजय—राजा, सात्यकीचें हें भाषण ऐकतांच त्याच्या सारथ्यानें आपल्या जातिवंत अश्वांना प्रेरणा केली. तेव्हां ते शीघ्रगामी अश्व वायु-

वेगानें निघाले व जणुंकाय आकाशाला प्राशन करीतच युयुधानाचा रथ यवनांच्या सेनेकडे घेऊन गेले. युद्धांत माघार न घेणाऱ्या सात्यकीची गांठ पडतांच अनेक योद्धयांनीं त्याच्यावर शरवृष्टि चालविली. तथापि सात्यकीनें त्या बाणांचा मार्गांतच छेद केला, तीक्ष्ण शर सोडून यवनांचीं कवचें भग्न केलीं व त्यांचीं मस्तकें तोडून टाकिलीं. तेव्हां त्यांचे प्रचंड देह भूतलावर पडले. सात्यकीच्या एका बाणानें सात-आठ यवन मृत होऊन खालीं पडत होते.

हे महाराज, याप्रमाणें त्या धनुर्धरानें कांबोज, शक, शबर, किरात व बर्बर यांच्या सैन्यांतील सहस्रावधि वीरांना गतप्राण केलें. लांब दाढी असलेल्या दस्यूंच्या मस्तकांनीं ती भूमि व्याप्त झाली. रक्तांनीं माखलेल्या कबंधांनीं तें रणांगण, रक्तवर्ण अभ्रांनीं भरलेल्या आकाशाप्रमाणें भासलें. तीं सर्व सैन्यें शरपीडित होत्सातीं इतस्ततः पळत सुटलीं.

अशाप्रकारें सात्यकीनें अजिंक्य कांबोजांचा संहार करून यवन, शक व इतर म्लेच्छ यांच्याहि प्रचंड सैन्याचा पराभव केला. नंतर तुझ्या योद्धयांना जिंकून त्यानें व्यूहाच्या अंतर्भागीं प्रवेश केला व सारथ्याला पुढें चलण्याची आज्ञा केली. त्याचें तें अलौकिक समरकर्म पाहून चारण व गंधर्व त्याची स्तुति करूं लागले. अर्जुनाचा तो रक्षक पुढें निघाला आहे, हें पाहून चारण संतुष्ट झाले व तुझे वीरहि सात्यकीची प्रशंसा करूं लागले. ७. ५. ११९.

---

## अध्याय १२० वा.

[ १ दुर्योधन-सात्यकियुद्ध. २ दुर्योधनाचें पलायन. ]

( १ ) संजय—हे धृतराष्ट्र महाराजा, रथिश्रेष्ठ सात्यकि यवन व काम्बोज यांचा पराभव करून अर्जुनाकडे जाण्यास निघाला. चित्रविचित्र कवच व ध्वज धारण करणारा तो नरव्याघ्र मृगांच्या कळपाला भयभीत करणाऱ्या व्याघ्राप्रमाणें कौरवसैन्याला त्रस्त करूं लागला. तो शिनिश्रेष्ठ आपलें श्रेष्ठ धनुष्य वेगानें फिरवीत चालला असतां उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें शोभला. त्या शैनेयाचें कवच, बाहुभूषणें व शिरस्त्राण हीं सर्व सुवर्णाचींच होतीं. त्याचें धनुष्य व ध्वजहि कांचनमय असल्यामुळें तो मेरू पर्वताच्या शिखराप्रमाणें देदीप्यमान दिसत होता.

हे राजन्, मत्त गजासारख्या असलेल्या सात्यकीची गति मत्त गजासारखीच होती. आपल्या कळपांत दक्षतेनें उभ्या असलेल्या मत्त मातंगावर व्याघ्रांनीं जशी झडप घालावी, तशी सात्यकीचा प्राण घेण्याची इच्छा करणाऱ्या तुझ्या वीरांनीं त्याच्यावर चाल केली. ज्या रथिश्रेष्ठानें दुस्तर असलेल्या द्रोणसेनेचें व भोजसेनेचें उल्लंघन केलें, जलसंधाचा सेनासमुद्र तरून कांबोजांच्या सैन्याचें अतिक्रमण केलें, हार्दिक्याचा पराभव केला व शेवटीं तुझ्या सैन्याच्या पार जाऊन रथ पुढें चालविला. इतक्यांत त्या वृष्णिवीराला तुझ्या पुत्रांनीं चोहोंबाजूंनीं वेढा दिला.

दुर्योधन, चित्रसेन, दुःशासन, विविंशति, शकुनि, दुःसह, दुर्धर्षण, क्रथ व दुसरे अनेक शस्त्रधारी वीर सात्यकीचा पाठलाग करीत त्याच्या मागोमाग चालले. तेव्हां क्षुब्ध झालेल्या सागराच्या शब्दासारखा प्रचंड कोलाहल झाला. तो ऐकून आपल्यावर चालून येत असलेल्या त्या सर्व योद्धयांचें निरीक्षण करीत सात्यकीनें हंसतच आपल्या सारथ्यास असें म्हटलें.

सात्यकि—हे सारथे, हें शत्रुसैन्य आपल्या रथघोषानें दाही दिशा, अंतरिक्ष व पृथ्वी यांना कंपित करीत आहे. परंतु पौर्णिमेच्या दिवशीं क्षुब्ध होणाऱ्या सागराला मागें परतविणाऱ्या वेलेप्रमाणें मी या प्रचंड सेनासागराचें रणांगणांत निवारण करीन. आज माझा इंद्रतुल्य पराक्रम तुझ्या दृष्टीं पडेल. मी तीक्ष्ण बाणांनीं शत्रुसैन्याचा विध्वंस करतों, तो पहा. माझ्या अग्नितुल्य बाणांनीं सहस्रावधि पदाति, अश्व, गज व रथ नाश पावतील.

याप्रमाणें तो अमितपराक्रमी सात्यकि आपल्या सारथ्याला सांगत आहे, इतक्यांत ते सर्व कौरवयोद्धे 'मारा, धांवा, थांब, पहा पहा, तो पहा' अशा गर्जना करीत सात्यकीच्या समीप येऊन पोंचले. याप्रमाणें वल्गना करीत ते पुढें सरसावतात तोंच सात्यकीनें तीक्ष्ण बाण सोडून तीनशें अश्व व चारशें गज यांचा वध केला. तेव्हां त्या वीरांचें सात्यकीशीं दारुण युद्ध जुंपलें. तुझ्या पुत्रांचें सैन्य आपल्या सर्पतुल्य शरांनीं त्या शिनिश्रेष्ठाशीं युद्ध करूं लागलें. त्यांनीं आपल्या शरजालांनीं सात्यकीला झांकून टाकिलें असतां त्या वीरानें यत्किंचित्‌हि भयभीत न होतां तुझ्याकडील असंख्य योद्धयांना गतप्राण केलें.

त्यावेळीं देवासुरांच्या युद्धाप्रमाणें प्राणहानि झाली. त्या युद्धांत एक महदाश्चर्य आमच्या दृष्टीं पडलें. सात्यकीचा एकहि शर व्यर्थ जात नव्हता. रथ, अश्व,

गज व पदाति यांनीं व्यापलेला तो सैन्यसागर सात्यकीच्या समीप येतांच स्थिर झाला. युयुधानाच्या कक्षेंत सांपडला नाहीं, असा एकहि प्राणी तेथें नव्हता. शैनेयाच्या शरांनीं त्रस्त झालेलें तें सैन्य शीतानें कंपित होणाऱ्या धेनूप्रमाणें इतस्ततः भ्रमण करूं लागलें. सात्यकीनें तुझ्या सैन्याचा जसा क्षय केला, तसा अर्जुनानेंहि केला नाहीं. आपलें हस्तलाघव प्रकट करीत तो अर्जुनापेक्षांहि अधिक कौशल्यानें युद्ध करीत होता.

( २ ) नंतर दुर्योधन पुढें झाला. त्यानें सात्यकीचा सारथि व अश्व यांना शरांनीं विद्ध केलें व सात्यकीवर बाण सोडिले. दुःशासन, चित्रसेन, शकुनि, आणि दुःसह या सर्वांनीं मिळून सात्यकीवर विपुल शरांचा वर्षाव केला, तेव्हां त्या रथिश्रेष्ठानें हास्य केलें व तो त्या सर्व प्रबल शत्रूंवर बाण सोडीत त्या रणांगणांत संचार करूं लागला. त्यानें शकुनीचें धनुष्य तोडून टाकिलें व इतर वीरांना अनेक बाणांनीं विद्ध केलें. याप्रमाणें त्यांचें युद्ध जुंपलें असतां सात्यकीनें दुर्योधनाच्या सारथ्यावर एक तीक्ष्ण बाण सोडून त्याला गतप्राण केलें. तेव्हां तो तत्क्षणीं भूमीवर पडला असतां त्याचे अश्व निग्रहाच्या अभावीं रथ घेऊन पळत सुटले व दुर्योधनाला रणांगणांतून दूर घेऊन गेले.

याप्रमाणें दुर्योधनाचा रथ रणांगणांतून निघून जातांच तुझे पुत्र व सैनिक त्याच्या मागोमाग पळत सुटले. त्यामुळें तें सैन्य सहस्रधा विभागलें गेलें. तें पाहून सात्यकीनें पुनः त्यांच्यावर शरांचा वर्षाव करून त्यांना उधळून दिलें व नंतर तो शिनिश्रेष्ठ अर्जुनाच्या रथाकडे जाण्यास निघाला. त्यावेळीं शरसंधान करीत सारथ्यासह आपलें संरक्षण करणाऱ्या त्या वीराचा तुझ्या सैन्यांतील सर्व लोकांनीं गौरव केला. ७. ५. १२०.

---